

आद्य क्रांतिकारक

# वासुदेव बळवंत फडके

## यांचे चरित्र

लेखक

विष्णू श्रीधर जोशी, बी.ए.




वीर सावरकर प्रकाशन

'सावरकर सदन, ७१ शिवाजी उद्यान मुंबई २८

वैशाख विक्रम संवत् २०३ 卐 मे १९७४

आवृत्ती पहिली १९४७
पहिली शालेय आवृत्ती १९५१
पहिली इंग्रजी आवृत्ती १९५९

प्रकाशक :
बा. शि. सावरकर,
वीर सावरकर प्रकाशन,
७१ शिवाजी उद्यान, मुंबई २८

सुधारून वाढविलेली दुसरी आवृत्ती


मूल्य रुपये २०

मुखपृष्ठ : प्रमोद
ठसे : पारकर
प्रिंट आर्ट,
प्रभादेवी मुंबई २५

मुद्रक :
सौ. वसुधा रघुनाथ खरे
अक्षर मुद्रणालय,
लोणावळा.

# अनुक्रमणिका

| प्रकरण | नाव | | पृष्ठ |
|---|---|---|---|




### चित्रसूची

५ फरसफोळपुन्यातील 'नरसोबाचे देऊळ'; त्या देवळातील सभामंडप;
लो. टिळक (तरुणपणचे छायाचित्र); वासुदेव बळवंतांचे पुण्यातील शेवटचे
निवासस्थान: सचिवांच्या पिछाडीचा पट्टीवाल्यांचा (आता विड्यांचा) वाडा.

६ जुन्या मुरलीधराचे देऊळ आणि त्या देवळातील सभामंडप; रास्ते वाडा;
जुन्या तपकीर गल्लीतील किबे वाडा.
महर्षी अण्णासाहेब पटवर्धन; न्या. महादेव गोविंद रानडे.

७ वासुदेव बळवंतांचे आराध्यदैवत: श्री दत्त; वासुदेव बळवंतांची
मोडी स्वाक्षरी; सार्वजनिक काका.

८ वासुदेव बळवंतांचे बाळबोध हस्ताक्षर; संकल्पित 'दत्तमहात्म्य' ग्रंथाच्या
त्यांच्या हस्तलिखितातील शेवटच्या पानावरून. मुंबईचे तत्कालीन राज्यपाल
सर रिचर्ड टेंपल; हैदराबादचे तत्कालीन राजनिवासी सर रिचर्ड मीड; पुण्यातील
सिटी जेलच्या कोठड्या.

९ पुण्याच्या जिल्हा दंडाधिकाऱ्यांचे न्यायालय; संगमावरचा पूल;
सत्र न्यायालयाचे आवार; मुळामुठेच्या संगमावरील नदीतीरे; संगमावरचे
पुण्याचे त्या वेळचे सत्र न्यायालय.

१० नानाभाई हरिदास; येरवड्याच्या तुरुंगातील जन्मठेपीच्या बंद्यांच्या कोठड्या.
महादेव चिमणाजी आपटे; चिंतामण पांडुरंग लाटे; येरवडा कारागाराचे
प्रवेशद्वार.

११ आगनावेने एडनला जाताना दिसणारा एडनचा किल्ला; एडनचा तुरुंग.

१२ बाईसाहेब फडके; शिरढोण येथील दीपस्तंभ

## लेखकाची इतर पुस्तके

| | | | |
|---|---|---|---|
| १ | आद्य क्रांतिकारक वासुदेव बळवंत फडके यांचे चरित्र | | १९४७ |
| | ,, ,, ,, | (शालेय आवृत्ती) | १९५१ |
| २ | मृत्युंजयांचा आत्मयज्ञ | पहिली आवृत्ती | १९५१ |
| | ,, ,, | (सुधारून वाढविलेली दुसरी आवृत्ती) | १९७२ |
| ३ | कंठस्नान आणि बलिदान | (पहिली आवृत्ती) | १९७३ |

## कादंबऱ्या

| | | | |
|---|---|---|---|
| १ | दोभा | (पहिली आवृत्ती) | १९३९ |
| | पुनर्मीलन | (दुसरी आवृत्ती) | १९४९ |
| २ | मंगला | (पहिली आवृत्ती) | १९५१ |

## इंग्रजी

1. VASUDEO BALVANT PHADKE
First Indian Rebel against British Rule — 1959

## आगामी

१ वडवानल (प्रख्यात क्रांतिकारक चंद्रशेखर आझाद
आणि सरदार भगतसिंग यांच्या आणि त्यांच्या राजगुरू प्रभृती
शूर सहकाऱ्यांच्या क्रांतिपर्वाचा रोमहर्षक इतिहास)

२ पहाटेचं चांदणं (कादंबरी)

# दुसऱ्या आवृत्तीच्या निमित्ताने—

आद्य क्रांतिकारक वासुदेव बळवंत फडके यांचे चरित्र या माझ्या पुस्तकाची ही सुधारून वाढविलेली दुसरी आवृत्ती. त्याची पहिली आवृत्ती प्रसिद्ध झाल्यावर अगदी 'टाइम्स ऑफ इंडिया' सारख्या इंग्रजी वृत्तपत्रांनीसुद्धा त्याची वाहवा केली. आणि त्या विषयावरचे साद्यंत असे तेच एकमेव पुस्तक हा त्याचा विशेष चिरंतन राहिला. त्यातील साहित्यावरून बऱ्याच जणांनी वासुदेव बळवंतांवरील पुस्तकातील, लेखातील, बोलपटातील, नभोवाणीवरील आणि चित्रवाणीवरील आपले साहित्य ऋणनिर्देश न करताही सजविले. माझ्या या पुस्तकाच्या प्रती बरीच वर्षे दुर्मिळ झाल्या होत्या. त्यामुळे या दुसऱ्या आवृत्तीची आवश्यकता भासू लागली. या आवृत्तीत पहिल्या आवृत्तीतील बराचसा वृत्तांत होता तसाच असला, तरी आतापर्यंत अप्रकाशित असलेली बरीच नवी माहिती तीत नव्याने आलेली आहे. विशेषतः वासुदेव बळवंतांची पुण्यामुंबईतील नेमकी निवासस्थाने, गणपतराव घोटवडेकर, भिकाजीपंत हर्डीकर, अप्पाराव वैद्य, विष्णुपंत गद्रे आणि रंगोपंत महाजन या त्यांच्या सहकाऱ्यांची माहिती आणि नंतरचे जीवनवृत्तांत, श्रीशैल मल्लिकार्जुन येथे वासुदेव बळवंतांनी जेथे आत्मार्पणाचा प्रयत्न केला, त्याच ठिकाणी दोनशे वर्षे आधी छत्रपती शिवाजी महाराजांनी केलेला थेट तसाच आत्मार्पणाचा प्रयत्न, राज्यपाल सर रिचर्ड टेंपल यांच्या 'टेंपल कलेक्शन' मधील लॉर्ड लिटन यांना त्यांनी लिहिलेल्या गोपनीय पत्रातील वासुदेव बळवंतांच्या बंडासंबंधीची माहिती, वासुदेव बळवंतांवर ठेवावयाच्या राजकीय अपराधाच्या आरोपासंबंधी, त्यांना फाशी व्हावी या सरकारी इच्छेसंबंधी, काळ्या पाण्यावरील स्थानांतरासंबंधी, त्यांच्या तेथील अन्नत्यागासंबंधी आणि बलिदानासंबंधी वरिष्ठ सरकारी वर्तुळात झालेला विचारविनिमय आणि पत्रव्यवहार, काळ्या पाण्यावर जातानाच इहलोक सोडून जाण्याचा त्यांनी व्यक्त केलेला निश्चय, राजबंदी म्हणून आपल्या हक्कासाठी त्यांनी एडनच्या तुरुंगात काळ्या पाण्यावर दिलेला झुंजार लढा, त्यांचा तेथील प्रदीर्घ अन्नत्याग, विख्यात रशियन प्रवासी मिनाएफ यांच्या दैनंदिनीत दिसून येणारी त्यांची आणि त्यांच्या बंडाची मिनाएफ यांच्यावर पडलेली मोहिनी, बंकिमचंद्रांच्या 'आनंदमठ' कादंबरीस आणि पर्यायाने 'वंदेमातरम्' या राष्ट्रगीतास त्यांच्या बंडाने आणि बलिदानाने दिलेल्या स्फूर्तीचा व्यक्त करणारा इतिहास, न्या. रानडे आणि लो. टिळक यांनी त्यांच्यावर लिहिलेले अद्यापपर्यंत अज्ञात असलेले लेख आणि इतर मराठी वृत्तपत्रांचे त्यांच्यावरील लेख इ. संबंधीची माहिती या आवृत्तीत नव्याने आलेली असून वासुदेव बळवंतांशी संबद्ध असलेल्या स्थळांची, इंग्रजी अधिकाऱ्यांची, वकिलांची

आणि तुरुंगातील कोठड्यांची त्याचप्रमाणे त्यांच्या बाळबोध हस्ताक्षराचे अशी छायाचित्रेही प्रथमच या आवृत्तीत दिलेली आहेत.

या आवृत्तीच्या प्रकाशनाचा योग 'वीर सावरकर प्रकाशना'चे संचालक श्री. बाळ सावरकर यांच्यामुळेच येत आहे. स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या सान्निध्यात एका निराळ्याच ध्येयप्रेमाने वैयक्तिक भवितव्याचा विशेष विचार न करता ज्यांनी आयुष्य झोकून दिले अशा व्यक्तींमध्ये श्री. बाळ सावरकरांचे स्थान मोठे आहे. वासुदेव बळवंत फडके हे सावरकरांच्या क्रांतिकारक गुरुपरंपरेतील अग्रगण्य महापुरुष म्हणूनच श्री. बाळ सावरकरांनी हे प्रकाशनाचे काम अंगावर घेतले. त्याविषयी त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत. लोणावळ्याच्या अक्षर मुद्रणालयाचे धनी श्री. प्रभाकर सरदेसाई आणि श्री. रघुनाथराव खरे यांनी त्याचे मुद्रण अतिशय त्वरेने आणि सुरेख केले त्याविषयी त्यांचाही मी आभारी आहे. या आवृत्तीचे मुखपृष्ठ काढणारे तरुण चित्रकार श्री. प्रमोद जोशी, पुस्तकातील उत्तम ठसे करून देणारे प्रिंट आर्टचे श्री. पारकर आणि मुखपृष्ठ आणि चित्रे सुंदर रीतीने छापून देणारे बाँबे सर्वोदय प्रिंटर्सचे संचालक श्री. देसाई यांचेही मी आभार मानतो.

वासुदेव बळवंत फडके यांच्या वंशाचा आणि रोमहर्षक पराक्रमाचा आणि त्यांनी स्वातंत्र्यासाठी केलेल्या अविस्मरणीय आत्मार्पणाचा हा चित्तवेधक वृत्तांत प्रसिद्ध करून त्यांच्या ऋणातून अंशत: तरी मुक्त झाल्याचे माझे समाधान आज द्विगुणित झाले आहे. त्यांच्या इच्छेप्रमाणे हे राष्ट्र जरी शेवटी स्वतंत्र झाले असले तरी, आपल्या देशबांधवांचे जे दारिद्र्य, दैन्य आणि उपासमार पाहून त्यांच्या काळजाला घरे पडत असत आणि ज्या गोष्टी नाहीशा करण्यासाठी त्यांनी आपल्या आयुष्याची होळी पेटविली, त्या गोष्टी स्वातंत्र्यानंतर पंचवीस वर्षांनीही अजून तशाच आहेत, किंबहुना वृद्धिंगत झाल्या आहेत; त्याची खंत वाटून त्या नाहीशा करण्यासाठी प्रयत्न करण्याची स्फूर्ती आणि ईर्षा माझ्या महाराष्ट्रीय बांधवांना हे चरित्र वाचून मिळेल आणि राज्यकर्त्यांनाही तशी इच्छा होईल अशी मला आशा आहे.

'सुकृत'
१२७ शिवाजी पार्क, मुंबई २८
दि. १० मे १९७४

वि. श्री. जोशी

# पुरस्कार

प्रस्थापित परसत्तेविरुद्ध लढून जे स्वराष्ट्राचे स्वातंत्र्य संपादन करण्यासाठी सिद्ध होतात, त्या सशस्त्र क्रांतिकारकांची चरित्रें लिहिणे इतर अनेक अडचणीपेक्षा-ही त्यांच्या साधनांच्या अभावीच फार कठीण जाते. त्यातही अशा सशस्त्र क्रांति-कालाच्या आरंभी गुप्त संघटनांचाच मार्ग चोखाळावा लागत असल्यामुळे परसत्ते-विरुद्ध ज्या पहिल्या सशस्त्र चढाया होतात, त्यांतील सैनिकांचीच नव्हेत तर सेनानीं-चीही चरित्रे बहुशः अगदी अज्ञात असतात. कारण क्रांतिकारक गुप्त कटांचे कार्यक्रम किंवा कार्ये लिहिलेली नसतात! त्या क्रांतिवीरांची खरी नावेसुद्धा त्यांना लपवावी लागतात, खोटी नावे धारण करावी लागतात. त्यांच्याविषयीची माहिती प्रसिद्धिणे, त्यांची चरित्रे प्रसिद्धिणे हे परकीय सत्तेच्या धाकामुळे इतर कोणासही अशक्य होते. त्यांचे नावही काढण्यास बंदी असते. प्रस्थापित परकीय सत्ता त्याना 'नामशेष' सुद्धा होऊ देत नाही! स्वातंत्र्याच्या पहिल्या पहिल्या उठावणीमध्येच हे क्रांतिवीर बहुशः हत वा मृत होतात. त्यामुळे त्याच्या स्वतःच्या आठवणीही त्यांच्यासह नष्ट होतात. त्यांची पिढीही दीर्घ कालानें घडणाऱ्या स्वातंत्र्याच्या शेवटच्या यशस्वी युद्धाचे आधी-च कालवश झाल्याने सांगीव वा ऐकीव माहिती सांगण्यासही बहुधा कोणी उरत नाही! या कारणांमुळे स्वातंत्र्यास्तव ज्या सशस्त्र क्रांतिवीरानी, इतर नि.शस्त्र साधनानी चळवळ करणाऱ्या देशभक्तांपेक्षा अधिक त्रास, छळ, दुःख सोसलेले असतें, विपक्षाच्या जीवाशीच गाठ घालून ज्यानी शत्रूला अधिक धाकवलेले नि नमविलेले असते, स्वातंत्र्ययुद्धांतील शेवटच्या विजयाचे श्रेय ज्यांच्या हौतात्म्याला नि प्राणदाना-ला नि पराक्रमालाच अधिकात अधिक देणे न्याय असते, त्या त्यांचा इतिहास व्युत्क्रमाने बहुधा कमीत कमी उपलब्ध असतो! त्यांची चरित्रे लिहिणे म्हणजे महत्प्रयासाचे काम!!

म्हणूनच क्रांतिवीर वासुदेव बळवंत फडके यांचे सांगोपांग चरित्र लिहिण्याचे कामही महत्प्रयासाचेच आहे. सत्तावनच्या स्वातंत्र्यसमरानंतर भारतीय स्वातंत्र्याचे ध्येय इतक्या स्पष्टपणे पुढे ठेवून, ब्रिटिशाचे राज्य उलथून पाडण्यासाठी, नावाजण्या-सारखी अशी जी हिंदूची पहिली सशस्त्र उठावणी झाली, ती "वासुदेव बळवंत फडके याचे बंड" हीच होय! त्या कालखडात पंजाबात धर्मगुरू रामसिंग 'कूका' यांनीही एक महत्त्वाची सशस्त्र उठावणी केली होती. पण ती क्रांतिकारक झुंज पुष्कळ प्रकरणी निराळ्या स्वरूपाची होती. त्या प्रयत्नाविषयी कृतज्ञता व्यक्तवूनही आज उपलब्ध आहे, त्या माहितीप्रमाणे तरी सत्तावननंतर सशस्त्र राज्यक्रांतीची पहिली चढाई करणाऱ्या वासुदेव बळवंतानाच अर्वाचीन काळातील आद्य राज्यक्रांतिकारक म्हणून गौरविले पाहिजे!

परंतु ते आद्य क्रांतिकारक होते. यास्तवच त्यांचे नि त्या सशस्त्र चढाईचे वृत्त अगदीच अज्ञात आहे. आणि पुष्कळ अंशी आता अज्ञेयही! तथापि त्यातल्या त्यात

त्यांची एक दोन चरित्रे मराठीत आढळतात. आता हे जे नवीन चरित्र श्री वि. श्री. जोशी प्रसिद्धीत आहेत, त्याचा विशेष हा की, त्यांनी त्याविषयीची जितकी सापडू शकतात, तितक्या साधनांचा उपयोग करून, जुन्या वृत्तपत्रांची टाचणेसुद्धा हुडकून, वाचून, जुळवून, " वासुदेव बळवंतांविषयी आता काही अधिक माहिती सांगावयाची उरली नाही, " असे आज तरी म्हणता यावे, इतके ते चरित्र सांगोपांग करण्यासाठी फार परिश्रम घेतले आहेत. श्री. जोशी हे लेखक म्हणून इंग्रजी, मराठी नियतकालिकातून झळकलेले असतात. त्यांचा व्यासंग, प्रस्तुत विषयाची त्याना स्वभावतःच असलेली आवड आणि त्यांनी घेतलेले परिश्रम हे लक्षात घेता त्यानी लिहिलेल्या या चरित्रास मी मनःपूर्वक स्वागतितो. महाराष्ट्र वाचकवर्गही त्याचे स्वागत करील अशी मला आशा आहे. कारण, मराठी वाङ्मयात वासुदेव बळवंतांचे ह्या चरित्रापेक्षा अधिक ममंश, साद्यंत नि साधार असे चरित्र आज उपलब्ध नाही हे निश्चित!

" सावरकर सदन " मुंबई; वि. दा. सावरकर

दि. १ ऑक्टोबर, १९४७.

## अंधःकारातून प्रकाशाकडे

महाराष्ट्राचे आद्य क्रांतिकारक वासुदेव बळवंत फडके यांच्या तेजस्वी जीवनवृत्तांतासंबंधी केलेल्या महत्प्रयासाच्या संशोधनानंतर उपलब्ध झालेला इतिहास पुढील चारशे पृष्ठात ग्रथित करण्यात आलेला आहे.

अगदी लहानपणी वासुदेव बळवंतांचे एक भव्य तैलचित्र मी जेव्हा प्रथम पाहिले तेव्हा त्यांची भव्य दाढी, जटा आणि मुद्रा पाहून मला भयच वाटले ! पण ते कोण हे समजल्यावर त्या भयाच्या स्थळी आदराने स्थान पटकावले आणि पुढे वासुदेव बळवंतांची माहिती विचारून मी पुष्कळांना भंडावून सोडले. पण माझी जिज्ञासा कोणी कधीही पूर्ण केली नाही !

माझी ती जिज्ञासा कधी पूर्ण होईल असे मला दोन वर्षांपूर्वीपर्यंत वाटले नव्हते; आधी क्रांतिकारकांच्या जीवनाचा वृत्तांत मिळणेच कठीण असते; त्यात वासुदेव बळवंतांचे अवतारकार्यच इतक्या जुन्या काळात होऊन गेलेले की, त्याचा वृत्तांत मिळणे त्या सर्वात कठीण ! कारण त्यांच्या वेळची सर्व पिढीच आता नष्ट झालेली आहे. आणि त्यांच्या चरित्राविषयीच्या दुसऱ्या साधनांचा पूर्ण अभाव आहे. त्यामुळे त्यांनी बंड केले होते, त्यांना जन्मठेप झाली होती नि ते एडन येथे मृत्यू पावले, इतके वृत्त सोडले तर त्यांच्याविषयी बाकी सर्वत्र अंधःकार पसरलेला मला दिसला. परंतु त्या अंधःकारात संशोधनाचा दिवा घेऊन मी जेव्हा वावरू लागलो, तेव्हा त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे आणि सशस्त्र उत्थानाचे जे उज्ज्वल स्वरूप मला दिसले, त्याच्या प्रत्यक्षतेपुढे माझी त्याविषयीची कल्पनाही फिकी पडली आणि त्यांच्या राजकीय 'बंडा' मध्ये हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या दुसऱ्या सशस्त्र प्रयत्नाचे स्पृहणीय दृश्य मला दिसले ! त्यांच्या उत्थानाचे आणि त्यांच्या हौतात्म्याच्या जीवनाचे हृद्य

त्या व्यक्तींची अधिक माहिती माझ्याकडे धाडून द्यावी. ग्रंथ अतिशय त्वरेने आणि बिकट परिस्थितीत मुद्रित झाल्यामुळे त्यात पुष्कळशी अशुद्धे राहिली असण्याचा संभव आहे ! पण त्याचे उत्तरदायित्व परिस्थितीवर आहे.

ह्या ग्रंथाचा पुरस्कार हिंदुस्थानच्या सर्वश्रेष्ठ क्रांतिकारकाच्या हातचा असावा अशी माझी फार दिवसांची इच्छा होती. ती आज पूर्ण झाल्याचा माझा आनंद केवळ अवर्णनीय आहे ! तो पुरस्कार देणारे स्वातंत्र्यवीर सावरकर हे अलीकडे विकलांग स्थितीत दिवस काढीत आहेत. आपला हिंदुस्थान आचारविचाराने श्रेष्ठ, स्वतंत्र नि बलिष्ठ कसा होईल, या त्यांच्या अखंड तळमळीची त्यांच्या विवंचनेत प्रत्यही भर पडत आहे. अशा अस्वास्थ्यातही वेळ काढून त्यांनी ह्या ग्रंथास पुरस्कार लिहिला, ह्याविषयी त्यांचा मी अंतःकरणपूर्वक आभारी आहे.

वासुदेव बळवंतांचा नसलेला मोठेपणा फुलविण्यासाठी मी या ग्रंथात काहीच लिहिलेले नाही. तसे करण्याची आवश्यकताही नाही; कारण वासुदेव बळवंतांचे श्रेष्ठत्व स्वयंसिद्ध आणि जगद्विख्यात आहे. ह्या ग्रंथातील प्रत्येक ओळ नि वृत्त इतिहासदृष्ट्या पारखून, पडताळून तर्कसिद्ध ठरल्यावरच मी त्यांचा ग्रंथात समावेश केलेला आहे. त्यातील संभाषणे सुद्धा तेव्हा प्रसिद्ध झालेल्या वृत्तांतातून घेतलेली आहेत ! कथनामध्ये कल्पनेचा जो थोडा शिडकाव उडालेला आहे, तो उघड दिसण्यासारखा आहे ! वासुदेव बळवंतांच्या व्यक्तिमत्त्वाचे यथार्थ मूल्यमापन करता येण्यासाठी ६८ वर्षापूर्वीच्या सर्वस्वी निराळ्या भारतात कालमानाने जाऊनच हा ग्रंथ वाचला पाहिजे ! तरच वासुदेव बळवंतांनी त्या काळात जे केले नि भोगले त्याचे महत्तमत्व नीट समजून येईल.

हा चरित्रग्रंथ सर्वच दृष्टींनी सर्वसंपूर्ण नि नमुनेदार आहे, असा माझा मुळीच वाद नाही. पण वासुदेव बळवंतांच्या जीवनाविषयी किती तरी अप्रसिद्ध माहिती त्यांच्याविषयी महाराष्ट्रात पसरलेल्या अंधःकारांतून ह्या ग्रंथामुळे प्रथमच प्रकाशात येत आहे, असे मात्र निश्चितपणे मला वाटते ! इतके उद्दिष्ट जरी साध्य झालेले दिसले, तरी आपल्या श्रमांचे सार्थक झाले असे मला वाटेल !

दि. श्री. जोशी

"सुकृत"; मुंबई २८
दि. १० ऑक्टोबर १९४७

पुरस्कर्ते



स्वातंत्र्यवीर सावरकर

शिरढोण येथील स्मृतिमंदिर



छाया : मधुसूदन पाठक

## अर्पण-पत्रिका

हिंदुस्थानच्या स्वातंत्र्ययज्ञात आपल्या बहुमोल प्राणांची आहुति देणाऱ्या
सर्व ज्ञात आणि अज्ञात हुतात्म्यांना -

हे हुतात्म्यांनो! हिंदुस्थान स्वतंत्र व्हावा म्हणून तुम्ही मरण पत्करलेंत! तुमच्यापैकी कांहींचे नाव तरी मागे राहिले; इतरांना तेंही समाधान लाभले नाही; तरी पण तुम्हा सर्वांचा निदिध्यास एकच होता आणि तो म्हणजे आपला हिंदुस्थान स्वतंत्र झाला पाहिजे; ते तुमचे ध्येय आता साध्य झाले आहे! आणि मागे जे अशक्य झाले होते, ते आता शक्य होत आहे! मातृभूमीच्या स्वातंत्र्यासाठी तिच्या चरणी आपली शिरकमलें वाहणाऱ्या तुम्हा सर्व दिव्य आत्म्यांच्या पराक्रमी जीवनवृत्तांताचे पोवाडे तुमच्या राष्ट्राला मुक्त कंठाने गाता यावेत असा काळ आता आला आहे; ज्या भारतीय स्वातंत्र्यासाठी तुम्ही आपले देह ठेवलेंत, त्या स्वातंत्र्याचे पहिले किरण भारतवर्षात आता तळपूं लागले आहेत; त्यांच्या प्रकाशात लिहिलेले तुमच्यातील आद्य क्रांतिकारक हुतात्म्याचे हे उज्ज्वल चरित्र तुमच्या हौतात्म्याच्या ऋणाची अंशतः फेड म्हणून तुमच्या पवित्र स्मृतीस कृतज्ञतापूर्वक समर्पित असो!



— लेखक —
वि० श्री० जोशी

आद्य क्रांतिकारक

# वासुदेव बळवंत फडके



| जन्म : | उत्थान : | बलिदान : |
| --- | --- | --- |
| ४ नोव्हेंबर १८४५ | १८७९ | एडन - १७ फेब्रुवारी १८८३ |

आद्य क्रांतिकारक

# वासुदेव बळवंत फडके

## यांचे चरित्र

## प्रकरण १ ले

## स्वतंत्र महाराष्ट्राचा अस्त

"Here then in the year 1818 lies the grave of the last and one of the most glorious of our Hindu Empires! It is not without keen agony that we write this epitaph on the grave of this our great national Empire! Watch it, Hope, with frank incense and offerings even as Mary did, in loving solicitude. For who knows when the Resurrection comes!!" [1]

—स्वातंत्र्यवीर सावरकर

मानवी जीवनात अनिवार दुःखाचे जे काही क्षण असतात, त्या सर्वांत अत्यंत अनिवार दुःखाचा क्षण तो होय, की ज्या क्षणी आपल्या राष्ट्राचे स्वातंत्र्य नष्ट होत आहे हे पाहण्याची पाळी मनुष्यावर येते! ब्रिटिश सत्तेखालील हिंदुस्थानाला १८१८ हे वर्ष त्याच कारणामुळे राष्ट्रीय शोकाचे, अंतःकरणाला वेदना देणारे वर्ष वाटत असे. कारण, त्या वर्षी आपल्या मातृभूमीचे स्वातंत्र्य नष्ट झाले आणि प्रदीर्घ पारतंत्र्याच्या संकटमय आणि कंटाळवाण्या काळरात्रीला प्रारंभ झाला. १६ नोव्हेंबर १८१७ च्या मध्यरात्री शनिवारवाड्याच्या इतिहासप्रसिद्ध तटावरून स्वातंत्र्याचा झेंडा खाली खेचण्यात आला आणि इंग्रजांचे युनियन जॅक त्या तटावर फडकू लागले.

---

१ "तेव्हा आपल्या वैभवशाली हिंदू साम्राज्यांपैकी एका आणि शेवटच्या साम्राज्याची येथे १८१८ मध्ये समाधी बसत आहे. ह्या आपल्या महान राष्ट्रीय साम्राज्यावर समाधिलेख लिहिताना आम्हाला काही कमी वेदना होत आहेत असे नव्हे! त्याच्याकडे पाहून रहा; मेरीप्रमाणेच धूप आणि पूजासाहित्य घेऊन प्रेमोत्कट चित्ताने आशा धरा! कारण, पुनरुत्थानाची वेळ केव्हा येईल ते कोणास ठाऊक?"

—स्वातंत्र्यवीर सावरकर

हिंदू-पद-पादशाही, (इंग्रजी) पृ. २४१

हिंदुस्थानातील ब्रिटिश साम्राज्य काही एका दिवसात प्रस्थापित झाले नाही. मराठ्यांच्या डळमळत्या साम्राज्यावरील इंग्रजांच्या मुत्सद्देगिरीचे हल्ले त्यापूर्वीच कित्येक वर्षे सुरू झालेले होते. आपल्या व्यापारी आणि वसाहतीच्या स्थापनेच्या महत्त्वाकांक्षेने त्यांनी प्रथम हिंदुस्थानात पाय टेवला. ह्या देशातल्या अंदाधुंदीच्या वातावरणामुळे त्यांच्या उद्दिष्टाला चांगलाच वाव मिळाला. उत्तर आणि दक्षिण हिंदुस्थानात त्यांना आव्हान देणाऱ्या राजपुरुषांचा आणि सेनापतींचा तर त्यांनी क्रमाक्रमाने पराभव केलाच. पण त्याच्याच जोडीला त्यांच्याप्रमाणेच महत्त्वाकांक्षा बाळगणाऱ्या फ्रेंच आणि पोर्तुगीज प्रतिस्पर्ध्यांनाही त्यांनी त्याच वेळी धूळ चारली. आणि नंतरच हिंदुस्थानाच्या स्वातंत्र्याचा शेवटचा गड असलेल्या मराठ्यांच्या सत्तेवर त्यांनी तोफा डागल्या. डोळ्यापुढे भीषण भविष्यकाळ प्रत्यक्ष दिसत असतानासुद्धा शिंदे-होळकरांसारख्या मराठे सरदारांनी इंग्रजाविरुद्ध संयुक्त चढाई केली नाही आणि इंग्रजांनी त्यांना निरनिराळ्या लढयात पृथक्पणे पराभूत केले. त्याचा अधिपती म्हणून वावरणाऱ्या दुसऱ्या बाजीरावाने रणांगणातून एकसारखा पळ काढला. ३ जून १८१८ ला तर इंग्रजांनी आपल्या राज्याची सोडचिठ्ठीच देऊन ब्रह्मावर्ताचा आश्रय घेतला आणि इंग्रज सत्ताधाऱ्यांनी फेकलेल्या नेमणुकीचे आणि कृपाप्रसादाचे तुकडे चघळीत तो तेथेच राहिला! बाजीरावाच्या या लज्जास्पद शरणागतीच्या वेळीच हिंदुस्थानाचा राजकीय निःपात झाला! बायबलमधील एक वचन मॅझिनी उधृत करीत असे. ते म्हणजे, "जेथे दूरदृष्टी नसते तेथले लोक नाश पावतात!" अशी दूरदृष्टी असणाऱ्या हिंदी लोकांना इंग्रजांच्या नव्या राजवटीतील आपला भावी नाश स्पष्टपणे दिसला. आणि परतंत्रतेचे परिणाम टाळण्याची उपाय योजना ते करू लागले. आपले विद्यमान अधिकार किंवा मालमत्ता ज्यांनी गमावली त्यांनी आणखी एक पाऊल पुढे टाकले. आणि क्रांतीचीच कास धरली. ब्रिटिश सत्तेला आव्हान देणारे उठाव या लोकांनीच सुरू केले. त्यांचे हे प्रयत्न इंग्रजांचे राज्य आल्या क्षणापासूनच सुरू झाले. त्यांच्या अशा उठावात परकीय सत्तेला असलेला विरोध अंतर्भूत होताच. पण त्यांच्या उठावणीत स्वातंत्र्याकांक्षेची अर्वाचीन ध्येयप्रणाली मात्र सुस्पष्ट स्वरूपात प्रतीत झाली नव्हती!

उमाजी नाईकांची १८२७ मधील सरकारविरोधी लुटीची उठावणी आणि भाऊ खरे आणि इतर पुढाऱ्याच्या नेतृत्वाखाली १८३९ मध्ये कोळी लोकांनी केलेली बंडे अशाच प्रयत्नांपैकी होती. उमाजीने अगदी नुकतेच १८१५ मध्येही किल्लेदारीचे अधिकार उपभोगलेले होते. ते त्यांचे अधिकार इंग्रजांचे राज्य येताच संपुष्टात आले होते. खरे आणि त्यांचे सहकारी यांना इंग्रजांच्या सत्तेमुळे आपले हक्क आणि मत्ताही बुडतील अशी भीती वाटली. म्हणून त्यांना इंग्रजांच्या राज्याचा राग आला आणि त्यांनी बंड केले. त्यांच्या या उठावण्या सह्याद्री पर्वताच्या दोन्ही बाजूला झाल्या आणि त्यांना पकडण्यात येऊन देहदंडाचे शासन होईपर्यंत त्यांनी महाराष्ट्रात एकच खळबळ उडवून दिली.

याच महिन्यात आदल्या वर्षी मुंबईहून ठाण्यापर्यंत सुरू झालेला लोहमार्ग पुढे कल्याणपर्यंत नेण्यात येऊन त्याचे अनावरण झाले. त्याचे वृत्त वरील पत्राने पुढील शब्दात प्रसिद्ध केले. "कल्याणहून मुंबईपर्यंत रेल्वेची गाडी तारीख २ रोजी म्हणजे गेल्या मंगळवारी चालू झाली. त्या समारंभास नेक नामदार गव्हर्नर साहेब व कौन्सलदार वगैरे पुष्कळ साहेब लोक व मडमा पूर्व दिवशी गाडीत बसून मुंबईहून कल्याणास गेल्या. नंतर तेथे खुषीची मेजवानी झाली व एतद्देशीय मौज पहाण्याकरिता सणाच्या दिवसाप्रमाणे उत्तम पोषाख करून जमले होते." [१]

आणखी एक वर्षाने हा लोहमार्ग पुण्यापर्यंत गेला. तेव्हा या चमत्कारावर "पुणे शहरामध्ये इंग्रजांने केला कावा ॥ लोखंडाच्या सडकेवरून आगगाडी घेते धावा ॥" अशा तऱ्हेची बायकांची गाणी झाली. कित्येक दिवस रिकामटेकड्या लोकांना गाडी पहाण्याचा उद्योग लागला. ज्याच्यात्याच्या तोंडात आगगाडी, आगगाडीचे चकर, टेसन इ. शब्दच होते. कित्येक लोक चैनीने खडकीपर्यंत गाडीत बसून जात.

आपले राज्य गेल्याची प्रतिष्ठित लोकांनाही खंत वाटत नव्हती. मराठ्यांकडून हिंदुस्थानचे राज्य घेणाऱ्या माऊंट स्टुअर्ट एल्फिन्स्टनच्या आणि त्याच्या गोतावळ्याच्या मनोरंजनार्थ १८२५ मध्येही नाचगाण्याचा कार्यक्रम ठरवून त्याला त्या कार्यक्रमाला बोलावण्यात बाळाजीपंत नातू कशी धन्यता मानत होता ते एल्फिन्स्टननेच सांगितले आहे. बाळाजीपंत १८५० मध्ये मृत्यू पावला. तरी त्यानंतरही त्याच्या मुलाने तो शिरस्ता पाळण्याचे सोडले नाही. मराठी वृत्तपत्रांनीही त्या वृत्ताला ठळकपणे प्रसिद्धी दिली आणि म्हटले : "येथील एजंट साहेबांना श्रीमंत बाळाजीपंत नातूंच्या चिरंजीवांनी आणि श्रीमंत कुरुंदवाडकरांनी मेजवान्या दिल्या."

आपली येथील राज्यव्यवस्था चालविण्यासाठी इंग्रजांना लिपिकांचा भरणा हवा होता. तेव्हा त्यासाठी उपयोगी पडेल, अशी इंग्रजी शिक्षणाची पद्धत या देशात त्यांनी सुरू केली. असे शिक्षण देणाऱ्या त्यांच्या शाळांतून एक नवाच सुशिक्षित कामगार वर्ग निर्माण होऊन त्यांच्या कार्यालयातील कनिष्ठ जागांवर काम करू लागला. वरिष्ठ जागांवर मात्र त्यांना फक्त काही वेळाच पदोन्नती मिळत असे. अशा जागांवरचे हे सुशिक्षित लोक मग एखादा साक्षात्कार झाल्याप्रमाणे म्हणू लागले, "खरोखर आपल्या उद्धारासाठीच ही राज्यक्रांती घडून आली आहे!"

परतत्र महाराष्ट्राला आपल्या राज्याच्या या दिखाऊ तेजाने झुलविण्याचा इंग्रजांचा आटोकाट प्रयत्न एकीकडे चालू असता, आपली नवी राजवट झुगारून देऊन स्वातंत्र्याची लालसा निर्माण करणारी स्फूर्तिस्थाने असलेले स्वातंत्र्याचे अवशेष भराभर उखडून टाकून नष्ट करण्याचा सपाटाही इंग्रजांनी चालविला. १८४८ मध्ये लॉर्ड डलहौसी हिंदुस्थानचा महाराज्यपाल (गव्हर्नर-जनरल) झाला आणि वरील

---

१ 'ज्ञानप्रकाश' : दि. ८ मे १८५४

धोरणानुसार त्याचा राक्षसी हात त्या गादीला असल वारस नाही या कारणावरून प्रथम शिवछत्रपतींच्या परंपरागत चालत आलेल्या सातान्याच्या गादीवर पडला ! ज्या सिंहासनाची महाराष्ट्राने भक्तिभावाने पूजा केली होती, ते सिंहासनच विदेशी लोकांच्या आक्रमणाच्या जबड्यात नष्ट झाले! त्यानंतर पुढील आठ वर्षात डलहौसी-च्या साम्राज्यलोभी राजवटीत त्याच कारणास्तव अयोध्या, नागपूर आणि झाशी-सारखी अग्रगण्य संस्थाने इंग्रजी राज्यात समाविष्ट करण्यात आली. डलहौसीच्या या राक्षसी कृत्यांनी हिंदुस्थानातील राजपुरुष प्रक्षुब्ध झाले.एतद्देशीय लोकांच्या चालीरीतीं-वरील आणि धार्मिक भावनांवरील इंग्रज सरकारच्या अत्याचारी कृत्यांमुळे त्यांचा हा प्रक्षोभ अधिक तीव्र झाला आणि लढा दिल्यावाचून हिंदुस्थानाच्या आलेख्यावरून नामशेष व्हावयाचे नाही अशा दृढ निश्चयात त्याचे परिवर्तन झाले !

दुसरा बाजीराव ब्रह्मावर्त येथे १८५१ मध्ये मृत्यू पावला. त्याने वेणगावच्या भट घराण्यातील धोंडोपंत नानासाहेब या नावाचा एक पाणीदार मुलगा दत्तक घेतला होता. बाजीरावानंतर त्याची वार्षिक आठ लक्ष रुपयांची नेमणूक आपणास मिळावी म्हणून नानांनी इंग्रज सरकारकडे मागणी केली. पण जेथे विस्तीर्ण राज्ये-सुद्धा दत्तक वारसांना नाकारली गेली होती, तेथे अशी राजकीय नेमणूक अशा वार-सांना इंग्रज सरकार चालू ठेवण्याची शक्यताच नव्हती. इंग्रज सरकारने म्हणूनच नानांची ही विनंती धुडकावून लावली. परकीय सरकारने आपल्यावर केलेल्या या अन्यायामुळे त्या सरकारविरुद्ध लढाई करून स्वातंत्र्यासाठी खड्ग उपसण्याचा नाना-साहेबांचा निश्चय अधिक ठाम झाला.

नानासाहेबांच्या या निश्चयाच्याच वेळी अयोध्येचा नबाब, आणि बेगमा, झाशीची राणी लक्ष्मीबाई आणि इतर राजपुरुष यांचाही तसाच निश्चय झाला आणि त्या सर्वांनी १८५७ च्या राष्ट्रव्यापी स्वातंत्र्ययुद्धाचा आराखडा आखला. तो पूर्ण-पणे प्रत्यक्षात येता, तर सर्व हिंदुस्थान सहा महिन्यात स्वतंत्र होता!

पण या राष्ट्रीय क्रांतीची पहिली ठिणगी नियोजित दिवसांच्या कित्येक दिवस आधी पडली आणि १० मे १८५७ च्या संस्मरणीय दिवशी मीरत येथे सत्तावन-च्या स्वातंत्र्ययुद्धाने पेट घेतला. त्याच्या ज्वालांत राजधानीमागून राजधानी पेटत गेली. प्रांतामागून प्रांत स्वातंत्र्यासाठी 'बंड' करून उठले ! लक्षावधी हिंदुस्थान-वासियांनी स्वातंत्र्यप्रीत्यर्थ आपली खड्गे कोठावाहेर काढली, बंदुका सरसावल्या आणि सहस्त्रावधी वीरपुरुषांनी आणि वीरांगनांनी हौतात्म्याचा आनंदाने स्वीकार केला ! इटालीमधील जवळजवळ समकालीन राज्यक्रांती सोडली, तर हिंदुस्थाना-तील १८५७ च्या क्रांतियुद्धात स्वराज्य आणि स्वधर्म यांच्यासाठी देशभक्तांनी केलेल्या त्यागाचा, सोसलेल्या हालअपेष्टांचा आणि गाजवलेल्या शौर्याचा जितका उत्तुंग कळस झाला, तितका दुसऱ्या कोणत्याही राज्यक्रांतीमध्ये झालेला इतिहासात

आढळत नाही. क्रांतीचे जे चैतन्य आणि जी चित्तहारी दृश्ये फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळी पॅरिसमध्ये दिसली, तसले चैतन्य आणि तसली दृश्ये १८५७ मध्ये हिंदुस्थानातील कित्येक राजधान्यात दिसून आली !

या उत्थानाला कित्येक पक्षपाती वृत्तीच्या युरोपिअन इतिहासकारानी 'बंड' म्हणून संबोधण्यात धन्यता मानलेली आहे. विकृत इतिहास लिहिणाऱ्यांमधील अर-वादभूत इतिहासकार सत्य सिद्ध करीत असेल, तर स्वतः युरोपिअनच असलेल्या जस्टिन मॅकार्थी यांच्या लेखणीतून उतरलेला पुढील उतारा तो उठावणी हे एक बंड होते, या भ्रमाचा बुडबुडा फोडून त्याचे सत्यस्वरूप उघड करतो. जस्टिन मॅकार्थी म्हणतात –

"......It was not alone the sepoys who rose in revolt. *It was not by any means a merely military mutiny.* It was a combination of military grievance, national hatred and religious fanaticism against English occupiers of India. The quarrel about the greased cartridges was but the chance spark.........If that spark had not lighted it some other would have done the work........." (The Meerut Sepoys) "had found in one moment, a leader, a flag and a cause, and the mutiny was transfigured into a revolutionary war! When they reached the Jumna glittering in the morning light.........they had all unconsciously seized one of the great critical moments of history, and converted a military mutiny into a national and religious war!" [४]

("त्यावेळी नुसते शिपाईच बंड करून उठले नव्हते. ते केवळ सनिकांचेच उत्थान होते असे मुळीच नाही. हिंदुस्थानावरील ब्रिटिश सत्तेविरुद्ध एकत्रित झालेल्या सैन्यांतील गाऱ्हाण्यांचा, राष्ट्रीय द्वेषाचा, आणि धार्मिक ध्येयवेडेपणाचा तो परि-पाक होता. चरबी लावलेल्या काडतुसांविषयीचा तंटा ही एक योगायोगाची ठिणगी होती. जर त्या ठिणगीने ते पेटवले नसते तर दुसऱ्या कोणत्या तरी ठिणगीने ते काम केले असते... (मीरत येथील सैनिकांना) एका क्षणात आपला नेता, आपला ध्वज आणि आपले ध्येय सापडले आणि त्या सैनिक बंडाचे एका क्रांतियुद्धात परिवर्तन झाले. प्रातःकाळच्या प्रकाशात चमकणाऱ्या यमुनेच्या तीरावर ते जेव्हा पोहोचले, तेव्हा त्यांच्यापैकी सर्वजणांनी नकळत इतिहासातील एक महत्त्वपूर्ण आणि आणिबाणीचा क्षण साधला होता आणि त्या सैनिक बंडाचे एका राष्ट्रीय आणि धार्मिक युद्धात रूपांतर घडवून आणले होते !")

---

४ जस्टिन मॅकार्थी - "ए हिस्टरी ऑफ आवर ओन टाइम्स," खंड ३ रा, पृ. ४६, ४७, ५०, ५१

निरपवाद धिःकाराचे समर्थन कोणाही समंजस मनुष्याला करता येणे कठीण आहे.

राजकीय क्षेत्रात अशी निराशामय विचारप्रणाली महाराष्ट्रात ज्या काळी दिसत होती, त्याच काळात धार्मिक आणि सामाजिक क्षेत्रात दोन उल्लेखनीय महापुरुष जन्माला आले. त्यांची दृष्टी द्रष्टयाची होती. त्यांच्यापैकी विष्णुबुवा ब्रह्मचारी या प्रख्यात धर्माभिमानी पुरुषाचा जन्म १८२५ मध्ये कुलाबा जिल्ह्या-तील शिरवली गावी झाला. त्यांचे मूळचे नाव गोखले. ते पाच वर्षांचे होते तेव्हाच त्यांचे वडील मृत्यू पावले. गरिबीमुळे प्रथम शेतकाम, नंतर एका दुकानात नोकरी आणि नंतर ठाणे जिल्ह्यात 'कस्टम्स' विभागात त्यांनी नोकरी केली. त्या काळात धर्मग्रंथांचे बरेच वाचन आणि मनन त्यांनी केले. वयाच्या विसाव्या वर्षी धर्मोप-देशाचा त्यांना साक्षात्कार झाला. इंग्रजांचे राज्य आल्यावर हिंदू धर्मावर आणि हिंदूंच्या चालीरीतींवर ख्रिश्चन मिशनरी लोकांनी हल्ले चढविण्याचा धडाका लावला. तेव्हा त्यांच्याविरुद्ध बौद्धिक आणि संघटनेच्या क्षेत्रात विष्णुबुवांनी जी झुंज घेतली ती केवळ अपूर्व होती. १८५६ मध्ये त्यांनी मुंबईला प्रस्थान ठोकले. पुढे पंधरा वर्षे मुंबईच्या समुद्रकिनाऱ्यावर मिशनरी लोकांशी प्रकट वादविवाद करून त्यांनी कित्येक सभा जिंकल्या आणि अनाथ हिंदू मुलांची ख्रिश्चन धर्मात होणारी बाटवणूक थांबवून टाकली. महाराष्ट्रात मिशनऱ्यांना त्यांनी याप्रमाणे नामोहरम केले त्यांनी आपल्या तत्त्वज्ञानाची कित्येक पुस्तके लिहिली. त्यातील पुरोगामी विचारसरणी पाहून मन थक्क होते. १८७१ मध्ये ते मुंबईलाच काळपुळीच्या विका-राने दिवंगत झाले. त्यांच्यासारखा विद्वान, विचारवंत आणि लोककल्याणासाठी झटणारा पुरुष त्याआधी झाला नाही.

ज्योतिबा फुले या दुसऱ्या महापुरुषाचे मूळ घराणे माळी जातीचे आणि सातारा जिल्ह्यातील खातगूण या गावचे. त्यांचे मूळचे आडनाव गोऱ्हे. पण इत-रांच्या छळामुळे ते घराणे पुण्यास आल्यावर त्यांच्या घरचा फुलांचा पुडा पेशव्यां-कडे जाई, म्हणून त्यांचे नाव फुले पडले. तेथेच १८२७ मध्ये ज्योतिबा जन्मले. त्यांना लहानपणापासून शिक्षणाचा नाद होता आणि त्यामुळे ते इंग्रजी शाळेतही जाऊ लागले. या शाळेत त्यांच्याहून तीन वर्षांनी मोठे असलेले सदाशिव बल्लाळ गोवंडे त्यांचे सवंगडी बनले आणि पुढे सहकारीही. त्यांचा लहानपणाचा पिंड देश-भक्ताचा होता. त्यामुळे वासुदेव बळवंत फडके यांचे गुरू लहुजीबुवा यांच्याकडेच ते गोळीबार, दांडपट्टा इ. गोष्टीही शिकले. "या गोष्टी इंग्रज सरकारला पालथे घालण्याच्या उद्देशाने मी शिकलो व या कामी मला सुधारल्या भट विद्वानांपासून स्फूर्ती मिळाली होती," असे त्यांनी 'गुलामगिरी' नामक आपल्या पुस्तकात लिहून ठेवले आहे. १८४७ मध्ये आपले शिक्षण पुरे करून ज्योतिबा जगात वावरू लागले तेव्हाच त्यांना हिंदू समाजातील जन्मजात जातिभेदांचा अपमानास्पद प्रत्यय आला. वरिष्ठ वर्गातील ब्राह्मण यासंबंधात उच्च स्थान घेऊन बसले आहेत, ते खालच्या

जातीतल्या लोकांच्या अज्ञानामुळे होय, अशी निश्चिती होऊन ज्योतिबांनी अस्पृश्यांना आणि त्यांच्या स्त्रियांना सुशिक्षित करण्याचा निश्चय केला. आणि १८४८ मध्ये त्यांनी बुधवार पेठेत ब्राह्मण वस्तीत भिडयांच्या वाडयात त्यांच्या शिक्षणासाठी मुलींची शाळा काढली. त्या शाळेत शिकवण्याला स्त्री शिक्षिका कोठून मिळणार? तेव्हा त्यांनी आपल्या पत्नी सावित्रीबाई यांनाच शिक्षित करून या शाळेत विद्यादानासाठी सहकारी करून घेतले. त्या कार्यांत सावित्रीबाईंना 'सुशिक्षित' समाजाची हेटाळणी आणि छळही सोसावा लागला. पण तो त्यांनी सोसला. ज्योतिबांच्या या कृत्यामुळे प्रत्यक्ष त्यांच्या वडिलांनाही राग येऊन, त्यांनी त्याना घरातून घालवून दिले. तरीही ज्योतिबांनी पुढे अस्पृश्यांकरिता नानाच्या पेठेत दुसरी शाळा काढली. त्या काळात हा ध्येयनिष्ठ आचार प्रशंसनीय नव्हता असे कोण म्हणेल ? शिक्षणाच्या या प्रसाराप्रमाणे जातिभेदावरही ज्योतिबांनी मर्मी प्रहार केले. "मी कोणाच्याही घरी अन्नग्रहण करीन," अशी प्रकट प्रतिज्ञा त्यांनी केली. अज्ञानात वावरणाऱ्या समाजाला या मार्गाने वर आणावे म्हणून शेवटी २४ सप्टेंबर १८७३ ला त्यांनी 'सत्यशोधक समाजा'ची स्थापना केली आणि त्याच्याद्वारा निधनापर्यंत आपले कार्य चालू ठेवले. त्याची वरिष्ठ वर्गाविषयीची काहीशी द्वेषपूर्ण वृत्ती सर्वसमत होण्यासारखी नसली, तरी मनुष्यामनुष्यातील समानता प्रस्थापित करण्यासाठी त्यांनी केलेली आंदोलने ही संस्मरणीय होती. पण अशा पुरुषालाही शेवटी विपन्नावस्थेत आपल्या जातिबांधवाकडूनही विशेष वास्तपुस्त न होताच २७ नोव्हेंबर १८९० ला देह ठेवावा लागला.

धर्मकारण किंवा समाजकारण याच्यामध्ये हिंदी लोक अशा रीतीने चाचपडत असता त्यांच्या राष्ट्राची अवस्था काय होती? ते अजून एकसंघ आणि एकात्म राष्ट्राचे घटक म्हणून एकजीव झाले नव्हते. काँग्रेसचाच जन्म मुळी १८८५ मध्ये झाला. तेव्हा भावी काळातील राष्ट्रीय भावना अजून तीव्र आणि ज्वलंत बनल्या नव्हत्या हे काय सांगावयाला पाहिजे ?

सामाजिक परिस्थिती आणि समजुती हृदयविदारक होत्या. शिक्षणाचा प्रसार इतका अल्प होता की, हा एक दोन किंवा तीन इंग्रजी 'बुक' शिकला आहे अशा शब्दात शिक्षण मोजले जात असे. इंग्रजी पाचवी इयत्ता उत्तीर्ण होताच मध्यमवर्गीयांचे शिक्षण बहुधा संपे ! 'स्कूल फायनल' नावाची परीक्षा देणे हे एक शिक्षणाचे पुढचे पाऊल समजले जाई आणि मॅट्रिक्युलेशनची परीक्षा होणे हे विशेष प्रावीण्य समजण्यात येई. काही इयत्तांचे शिक्षण संपवून मध्यमवर्गाचे लोक अगदी संतोषाने व्यवसाय म्हणून सरकारी नोकरीत शिरत !

साहित्य असे फार उपलब्ध नव्हतेच. साहित्यिकांची बरीच मोठी झेप म्हणजे इंग्रजी पुस्तकांचे भाषांतर करणे हीच असे. राणी व्हिक्टोरियाच्या स्तुतीपर लिहि-

लेल्या कविता क्रमिक पुस्तकात न चुकता छापल्या जात. त्या मोठ्या आवडीने शाळांतून म्हटल्या जात आणि त्यांचा कोणाला विशेष रागही येत नसे !

तथाकथित उच्चवर्णीय ब्राह्मणांना आपण शिवून किंवा त्यांच्यावर आपली सावली पडू देऊन विटाळले तर ते पाप होय, असे तथाकथित अस्पृश्यांना आणि निम्न श्रेणीच्या मध्यमवर्गीयांना स्वत:लाच वाटे. मुसलमानांचा आणि ख्रिश्चनांचा स्पर्श झालेले अन्न भक्षण करणारे लोक आपली जातच गमावून बसत. आणि त्यांच्यावर सामाजिक बहिष्कार पडत असे.

आधुनिक विज्ञानाच्या चमत्कारांविषयी तर स्तंभित करणारे अज्ञान पसरलेले होते. रुग्णाईतांचे चिंताग्रस्त नातेवाईक ती आपत्ती शारीरिक विकृती न मानता भुतालेतांची बाधा मानीत. रुग्णाईतांना औषधे द्यावयाचे सोडून भगतांकडे किंवा भुते काढणाऱ्या बुवांकडे किंवा बायांकडे धाव घेत. त्यांच्या मंत्रांनी किंवा उताऱ्यांच्या विधींनी ईश्वराची कृपा संपादून किंवा अंगातील भुते हाकलून देऊन रुग्णाईतांना बरे करण्याचा प्रयत्न करीत ! याच भ्रामक समजुतीमुळे १८५३ मध्ये जेव्हा आगगाडी प्रथम सुरू झाली तेव्हा ती ओढणारे कोणतेच साधन दिसत नाही तर भूतपिशाच्चेच ती हाकलीत असावीत, अशा खऱ्या संशयाने आगगाडीच्या भयावह आवाजाच्या वाफयंत्रापुढे लोक त्या पिशाच्चांना प्रसन्न करण्यासाठी मुक्तपणे नारळ फोडीत.

कित्येक म्हाताऱ्या भोळ्या सात्त्विक बायका आगगाडी पाहिली म्हणजे तिला नमस्कार करीत. आगगाडीस देवगाडी मानून तिची पूजा करीत. भेटीस नारळ, सुपारी, पैसा घेऊन जात. आत बसण्याच्या वेळीही नवस करीत. 'आगगाडीने दर कोसास एक बळी घेतला, महागाई झाली' असेही काहीजण म्हणत. [८]

अशा परिस्थितीत राजकीय आंदोलन हिंदुस्थानात आणि महाराष्ट्रात नव्हतेच. आणि स्वातंत्र्य हा शब्दसुद्धा सर्वांना वर्ज होता. त्यामुळे राष्ट्रीय भावनेच्या एखाद्या माणसाने दुसऱ्याला रस्त्यात हटकून विचारले की, "अरे, आपला देश इतर देशाप्रमाणे स्वतंत्र असू नये काय? स्वातंत्र्य हा आपलाही हक्क नाही काय ? मग ते परत मिळविण्यासाठी आपण का प्रयत्न करू नये?" तर त्याला उत्तर मिळे, "आपला देश स्वतंत्र करावयाचा? इंग्रज सरकार उलथून पाडावयाचे? छे! भलतंच ? काय वेड लागलं आहे?" इंग्रजांचे राज्य हे अशा रीतीने स्थिर होते असेच नाही, तर ते हादरवून सोडावे असेही त्यांच्या टाचेखाली भरडल्या जाणाऱ्यांना वाटत नव्हते !

अशा अवस्थेत एखादा स्वातंत्र्याकांक्षी पुरुष जेव्हा मागे दृष्टी टाकीत असे तेव्हा नुकत्याच होऊन गेलेल्या एका क्रांतिप्रयत्नाच्या अपयशाचा घोर परिणाम त्याला

८ ना. वि. जोशी : "पुणे शहराचे वर्णन," पृ. १२६

दिसे! पण त्या अपयशाच्याही पलीकडे महाराष्ट्राच्या स्वातंत्र्याचे जे मनोवेधक दृश्य चमकताना दिसे, त्याचे मात्र अशा पुरुषाला तरीही आकर्षण वाटे!

स्वतंत्र महाराष्ट्राच्या अशा स्वप्नात दंग असलेल्या पुरुषांत महाराष्ट्राचेच काय, पण हिंदुस्थानचे आद्य क्रांतिकारक वासुदेव बळवंत फडके यांचे नाव अग्रगण्य आहे. त्यांच्या रोमांचकारी जीवनाचा वृत्तांत त्यामुळेच आपल्याला असामान्य आणि मनोहर वाटतो! म्हणून तो इतक्या कालावधीनंतर जितका शक्य झाला तितका पुढे ग्रथित केला आहे.

* * *

## प्रकरण २ रे

# कुलवृत्त, जन्म नि बालपण

Not in entire forgetfulness,
Nor in utter nakedness,
But trailing clouds of glory do we come,
From God who is our home!
—*William Wordsworth* [1]

हिंदुस्थानातील इंग्रजी राज्यसत्तेच्या शेवटच्या शंभर वर्षांच्या काळात महाराष्ट्रातील ज्या घराण्यांची नावे त्यांतील कुटुंबीयांनी राष्ट्रीय स्वातंत्र्ययज्ञात केलेल्या सर्वस्व-होमामुळे विशेषत्वाने प्रसिद्धी पावली, त्यात कुलाबा जिल्ह्यातील फडके हे घराणे ठळकपणे चमकते. फडके हे घराणे मूळचे रत्नागिरीजवळ सहासात मैलावर असलेल्या कुरघे या गावचे. त्यामुळे आपल्या आडनावापुढे ते कुरघेकर असे वर्णन जोडीत असत. गुहागर येथील वाडेश्वर हा या फडक्यांचा कुलस्वामी होता. त्याचप्रमाणे वाडेश्वरी, जोगेश्वरी ही त्यांची कुलस्वामिनी होती. सुखवस्तू राहणीस आवश्यक इतक्याच स्थावर मिळकतीवर काटकसरीने दिवस काढणारे असे हे घराणे प्रथम होते. परंतु दैन्यावस्थेकडे कुटुंबाची स्थिती झुकल्यावर कोकण प्रांत सोडून देशांतर करण्याचा प्रसंग या कुटुंबावर आला. आपले कुरघे गाव सोडून त्या कुटुंबातील लोकांना दुसरीकडे जाणे भाग पडले. ती मंडळी तेव्हा शिरढोण या गावी राहावयास आली नि पुढे तेथेच स्थायिक झाली.

शिरढोण या गावाचा पूर्वी ठाणे जिल्ह्यात अंतर्भाव होत असे. पनवेल सोडल्यावर पुण्याच्या रस्त्यावर पाच कोसावर हे गाव लागते.त्याच्या उत्तरेला पनवेलची खाडी आहे. ती टाकल्यावर दोन्ही बाजूच्या डोंगरापर्यंत पसरलेल्या शेतातून जाणाऱ्या रस्त्यावर कुलाब्याच्या थंडगार डोंगराळ प्रदेशातील वारे वाहत असताना

१ "संपूर्ण विस्मृतिशीलतेमध्ये नव्हे किंवा आत्यंतिक निःसंग स्थितीमध्ये नव्हे तर, वैभवाच्या मेघराशीचा परिवार मागे टाकीत आपल्या ईश्वररूपी घराहून आपण येथे येतो

—विल्यम वर्ड्‌सवर्थ

भर दुपारच्या प्रहरीही प्रवासाचा त्रास विशेष तापदायक वाटत नाही. पाच कोशा-धींवर शिरढोणची कौलारू घरे दिसू लागतात. नि तो रस्ता पुढे दोन कोशाधींवर एका डोंगरातून वाट फोडीत पुण्याकडे जातो. या ठिकाणच्या खिंडीला कल्हई खिंड म्हणतात. या सर्व प्रांताला पूर्वी कल्याण प्रांत म्हणत असत. आणि शिरढोणच्या फडके घराण्यातील काही पुरुषांनी शिरढोणजवळच असलेले एक राजकीय अधिकार-स्थान बरीच वर्षे भूषविले होते, त्यावरून त्या प्रांताचे एक प्रमुख अधिकारकेंद्र शिरढोणजवळ वसत असावे असे दिसते.

फडक्यांचा शिरढोण येथील जुना भव्य वाडा गावात शिरल्यावर साधारण मध्यावर घराच्या वर्तुळाकृती ओळीच्या व्यासावर बांधलेला दिसतो. आणि त्यावरून गावातील त्याचे वैशिष्ठ्यपूर्ण स्थान चटकन ध्यानात येते. तो बांधल्यावर मग बाकीची त्याच्याभोवतीची घरे उठवली गेली असली पाहिजेत, असा आपोआप तर्क संभवतो. त्याच्या बांधणीच्या वेळी वापरलेले लाकूड केवळ प्रयासलभ्य असे आहे आणि त्याचा सुबकपणा सात्र धनीच करून घेऊ शकेल असा आहे. या वाड्या-तच वासुदेव बळवत फडके याचा जन्म झाला. शिरढोणकर फडक्यांच्या या पुरातन वाड्यापुढे उभे राहून त्याच्याकडे पाहात असताना महाराष्ट्राच्याच काय पण हिंदु-स्थानाच्या आद्य क्रांतिकारकाच्या जन्मस्थानाचे आपण दर्शन घेतआहोत या विचाराने राष्ट्रवादी भावनाप्रधान मनात एका वेगळ्या प्रकारच्या भावनांची खळबळ उडून जाते!

या वाड्यात पिढ्यान् पिढ्या वसत आलेले फडक्यांचे घराणे चित्पावन ब्राह्मण घराण्यात मोडते. ते अत्रिगोत्रीय आहे या चित्पावनांच्या उत्पत्तीविषयी निरनिराळ्या आख्यायिका आहेत. त्यातील एकाप्रमाणे परशुरामाने आपल्या बाणाने समुद्र मागे हटवून हा प्रदेश निर्माण केला आणि त्या परशुरामाचे हे लोक वंशज होत. या कथेवर विश्वास ठेवला किंवा त्या दंतकथेचा अर्थ तो प्रदेश परशुरामाने नव्याने वसवला असा लावला, तरी इतके खरे की, या चित्पावनांनी हिंदुस्थानाच्या इतिहासावर आपल्या कर्तृत्वाचा ठाम ठसा उमटवून ठेवला आहे. जन्मजात मोठे-पणावर कोणताही बुद्धिवादी माणूस अंध विश्वास ठेवत नाही. इतिहासात ठळक दिसून येणारी गोष्ट म्हणूनच केवळ या गोष्टीचा निर्देश केला आहे.

इंग्रज राज्यकर्त्यांच्या आणि इतिहासकारांच्या दृष्टीतून ही गोष्ट निसटू शकली नाही. आणि त्यांच्याविरुद्ध उठावणी करणाऱ्या काही देशभक्तांना वरील वर्गाचे म्हणून निराळे काढून त्यांनी त्यांच्यावर आपल्या लिखाणात बरीच झोड उठवली आहे. वडखोर जमात म्हणून त्यांना वेगळे काढून सर व्हॅलेंटाईन चिरोल यांनी त्यांच्यावर निकराचा हल्ला चढविला, त्याचा हा नमुना पहा. महाराष्ट्रातील आंदोलनाचे "सनातनी प्रतिक्रिया" (Orthodox Reaction) असे वर्णन करून ते म्हणतात—

"The Stronghold of orthodox reaction was in the Mahratta Deccan, and its stoutest fighters were drawn from the Chitpavan Brahmans who had never forgiven us for snatching the cup of power from their lips just when they saw the inheritance of the Mogul Empire within their grasp." [२]

("सनातनी प्रतिक्रियेचा बालेकिल्ला हा मराठ्यांच्या दख्खनप्रांतात होता आणि मोंगल साम्राज्य आपल्या मुठीत आलेले आहे असा त्यांना विश्वास वाटतो न वाटतो, तोच राजसत्तेचा त्याचा तो ठेवा आपण त्यांच्याजवळून हिसकावून घेतला, म्हणून आपली ज्यांनी कधीही गय केली नाही, अशा चित्पावन ब्राह्मणातूनच त्या प्रतिक्रियेचे खंबीरातले खंबीर असे झुंजार योद्धे पुढे आले!")

दुसऱ्या एका ठिकाणी "ब्राह्मणशाही आणि दख्खनमधील राजद्रोह" या शीर्षका-खाली हेच महाशय लिहितात–

"Among many others (Chitpavan Brahmins) perhaps, indeed, amongst the great majority, there has undoubtedly been preserved for the hundred years, from the time of the downfall of the Peshwa dominion to the present day, an unbroken tradition of hatred towards British rule, an undying hope that it may some day be subverted and their own. ascendancy restored." [३]

(" दुसऱ्या कित्येकांमध्ये " (चित्पावन ब्राह्मणांमध्ये) "कदाचित त्यांच्यातील बहुसंख्याक लोकांमध्ये, पेशव्यांचे राज्य नष्ट झाल्यापासून आजमितीपर्यंत गेली शंभर वर्षे, ब्रिटिश राज्यसत्तेविषयीच्या द्वेषाची अखंड परंपरा टिकून राहिलेली आहे. ती सत्ता कधी काळी तरी नाश पावेल आणि त्याचा स्वतःचा वरिष्ठपणा पुनरपि प्रस्थापित होईल अशी दुर्दम्य आशा टिकून राहिलेली आहे.")

इंग्रजांविषयी या लोकांनी बाळगलेल्या शत्रुत्वाविषयीचे या लिखाणांतील उद्‌गार खरे असले, तरी ते शत्रुत्व आपल्या जमातीची सत्ता पुन्हा प्रस्थापित करण्याच्या आशेने मनात बाळगण्यात आले होते हा निष्कर्ष मात्र चूक आहे. येणाऱ्या स्वातंत्र्यात लोकशाही राज्यपद्धतीचा वरचष्मा राहील आणि त्यात आपल्या जमातीला एकतन्त्री सत्ता मिळणार नाही हे न कळण्याइतके हे लोक दूधखुळे नव्हते. ते लढले ते सर्व देशाच्या स्वातंत्र्यासाठी लढले, एका जमातीच्या सत्तेसाठी नव्हे! चिरोलनी इंग्रजांचा हा दृष्टिकोण विसाव्या शतकाच्या प्रारंभी प्रकट केला. पण इंग्रजांच्या मनात चित्पावन ब्राह्मणांविषयी अगदी प्रथमपासूनच हा ग्रह रुजलेला होता.

२ सर व्हॅलेंटाईन चिरोल : "इंडिया ओल्ड अँड न्यू", पृ. ११३
३ सर व्हॅलेंटाईन चिरोल : "इंडियन अनरेस्ट," पृ ३९

आपल्या हिंदुस्थानातील अस्तित्वाकडे हे लोक मनातून अशाच तिरस्काराने पाहतात, हे त्यांचे मत पूर्वीपासूनच बनलेले होते. सर रिचर्ड टेंपल यांनी हिंदुस्थानात बरीच वर्षे नागरसेवेत घालविली होती आणि पुढे तर ते मुंबईचेच राज्यपाल झाले. १८७९ मध्येच तेही म्हणाले होते :

"The Chitpavans imagine that some day, more or less remote, the British shall be made to retire, into that darkness where the Moghuls retired.

"Any fine morning, an observant visitor may ride through the streets of Pocna and mark the scowl with which so many persons regard the stranger."

" मोगल ज्या विस्मृतीमध्ये गेले त्याच विस्मृतीमध्ये जाण्यास आपण ब्रिटिशांना फार पुढच्या भविष्यकाळात का होईना एक दिवस भाग पाडू असे या चित्पावनांना वाटते.

" आजूबाजूला नीट लक्ष असणाऱ्या प्रवाशाने केव्हाही सकाळी पुण्याच्या रस्त्याने फेरफटका करावा आणि या पाहुण्याकडे कितीतरी लोक ज्या तिरस्काराने पाहतात तो तिरस्कार लक्षपूर्वक पाहावा."

फडके घराण्यातील पूर्वज शिरढोण येथे निश्चित केव्हा आले ते सांगणे कठीण आहे. पण फडके यांची शिरढोण यथील प्रस्तुतची पिढी दहावी पिढी असावी अशी त्या पिढीच्या विद्यमान व्यक्तींची माहिती आहे. म्हणजे सरासरी तीनशे वर्षांपूर्वी फडके घराणे शिरढोण येथे स्थायिक झाले असावे.

या तर्काला पुष्टी देणारे दोन पुरावे आहेत. एक म्हणजे फडके यांच्याकडे स्वराज्यात वंशपरंपरागत असलेले कर्नाळा नावाच्या ज्या किल्ल्यावरचे अधिकारपद होते, त्या शिरढोणजवळ असलेल्या किल्ल्याच्या प्रवेशद्वारावर उर्दूमध्ये लिहिलेले जे लेख आहेत त्यांच्यावरून तो किल्ला मुसलमानी राजवटीतच किल्लेदार फडके यांच्याकडे असावा हा तर्क संभवतो. दुसरा पुरावा स्वतः वासुदेव बळवंत फडके यांच्याच तोंडचा आहे. वासुदेव बळवंतांच्या सहकाऱ्यांपैकी कित्येकांवर पुढे गटागटाने जे चार अभियोग झाले, त्यातील पळस्पे येथील लूटीत झालेल्या मनुष्यवधाच्या प्रकरणात फाशी गेलेल्या उम्या तुकाराम या अभियुक्ताने न्यायालयांतील आपल्या निवेदनात सांगितले–"महाराजांना (वासुदेव बळवंतांना) आम्ही विचारलं–'आम्हाला इतक्या जणांना एकत्र आणून तुम्ही काय करायला सांगणार आहात?' तेव्हा महाराज म्हणाले– 'एके काळी आमच्याकडे होती,ती सर्व खेडी आम्हाला लुटायची आहेत.'

मी विचारले, 'तुमची खेडी याचा अर्थ काय?' तेव्हा महाराज म्हणाले, 'बादशहांच्या काळापासून ही खेडी आमच्याकडे इनाम म्हणून होती.' [४]

४ 'दि बॉबे गॅझेट' दि. १९ जुलै १८७९

वरील पुराव्यावरूनही शिरढोण येथे फडके घराणे कमीतकमी तीनशे वर्षांपूर्वीच स्थायिक झाले असले पाहिजे हे निश्चित होते. परंतु आज माहिती उपलब्ध आहे ती मात्र शिरढोणजवळील कर्नाळा किल्ल्याचे किल्लेदार असलेले किल्लेदार फडके म्हणून ओळखले जाणारे अनंतराव यांच्यापासूनच होय !

कर्नाळ्याची किल्लेदारी १८१८ मध्ये तो इंग्रजांना खाली करून दिला जाईपर्यंत अनंतरावांकडे होती. त्यामुळे त्यांना किल्लेदार म्हणत. हा किल्ला शिरढोणपासून दोन कोसांवर होता. मागे उल्लेखलेल्या कल्हई खिंडीतून जाताना खिंडीच्या मध्यावर गर्द झाडीतून डाव्या बाजूला चढण्याला अवघड अशा डोंगराच्या रांगांपैकी एकीचा पायथा अगदी रस्त्याला लागून येतो. एका चिंचोळ्या मोठ्या डोंगरावरचा हा किल्ला लांबून नुसते एखाद्या डोंगराचे शिखरच आहे असे वाटते. पूर्वी त्यावर जाण्याला रस्ता बांधलेला नव्हता. रानमाळावरील अंगाला बिलगणाऱ्या रानवेलींच्या विस्तारातून दगडादगडांवरून उड्या मारीत आपण वर जाऊ लागलो की, डोंगराळ प्रदेशात आपण पूर्णपणे वेढले जातो. अशा परिसरामुळे भर दुपारीसुद्धा त्या वाटेवर गारवा भासतो. तुटलेले कडे आणि खोल दऱ्या उजव्या हाताला टाकीत, टप्याटप्याने वर जात, डोंगर चढून झाला की, मग कर्नाळा किल्ल्याच्या काळ्या तटाचे आपणास दर्शन घडते आणि दोन एक तासात आपण कर्नाळ्याच्या प्रवेशदारासमोर पोचतो.

समोर एक अतिशय अरुंद नि चिंचोळी अशी पडक्या पायऱ्यांची वाट किल्ल्याच्या प्रवेशद्वाराशी जाते. या प्रवेशद्वाराला आता दारे नाहीत. त्याच्या दुबाजूस दोन बुरुज आहेत. त्या उघड्या तोंडातून आत शिरताच चतुष्कोणाकृती भिंतींनी दर्शित होणारी पण छपरे नसलेली ओसाड दालने लागतात. त्यांतून कर्नाळा किल्ल्याची कार्यालये एका काळी थाटलेली असत. ती टाकून पुढे गेले की, उंचच उंच स्तंभासारखा मोठ्या रुंदीचा निसर्गनिर्मित कठीण दगडाचा उपड्या प्रचंड बायलीसारखा दिसणारा, कर्नाळ्याचा सर्वोच्च सुळका दिसतो. त्याला तिकडे बिंड म्हणतात. त्याच्या बाजूने दोनच पावलांची वाट लागते. उजव्या बाजूला खोल दरी आणि पलीकडे तशीच चिंचोळी जागा सोडून त्या बाजूचीही दरी लागते. त्याच्यामागे मागील दोन बुरुज उभे आहेत. अशा अवघड जागी हे किल्ले आणि तट जुन्या काळात पूर्वजांनी बांधले ते दीर्घ काळपर्यंत शत्रूला दाद न देता आत रहाता यावे म्हणूनच ! अशा वेळी पाण्याचा पुरवठा व्हावा म्हणून या किल्ल्यात चौदा हौद बांधलेले असून त्यात नैसर्गिक पाण्याचे झरे आहेत. त्यांच्यापैकी एक "काळोख्या" हौद म्हणून प्रसिद्ध आहे. सिंहगडाच्या साधारण निम्म्या उंचीवर असणाऱ्या या डोंगरी किल्ल्यावरून एका बाजूला खोपोली-पुण्यापर्यंतच्या प्रदेशावर आणि दुसऱ्या बाजूला अलिबाग आणि खेसपर्यंतच्या प्रदेशावर सत्तेचा आवाका ठेवता येत असे. या किल्ल्याला असे मर्मस्थानाचे महत्त्व होते की, १६६५ मध्ये शिवाजीला औरंगजेबाला द्याव्या लागणाऱ्या काही थोड्या



वासुदेव बळवंतांचे जन्मस्थान : शिरढोण येथील फडक्यांचा वाडा

छाया : मेडकर



कर्नाळा किल्ला : प्रवेशद्वारापुढील पटांगण



वासुदेव बळवंताची चोकडाची गाडी

वासुदेव बळवंतांचे त्यांच्या वयाच्या ११ व्या वर्षाचे हस्ताक्षर : त्र्यंबकेश्वरच्या तीर्थोपाध्यायाना त्यांनी लिहून दिलेला लेख.





[डाव्या बाजूस]
पांडुरंग बळवंत फडके
[उजव्या बाजूस]
मथुताई फडके
[सौ. सीताबाई कर्वे]







[डाव्या बाजूस] कारखेळपुऱ्यातील 'नरसोबाचे देऊळ.' त्याच्या आवारात वासुदेव बळवंतांचा शस्त्रशिक्षणाचा वर्ग चाले. [उजव्या बाजूस वर] या देवळातील समोर दिसणाऱ्या जागी त्यांचे १२ वर्षे बिऱ्हाड होते.

लो. टिळक; तरुणपणचे छायाचित्र. वासुदेव बळवंतांचे ते एके काळी शिष्य होते.

[खाली] वासुदेव बळवंतांचे पुण्यातील शेवटचे निवासस्थानः सचीवांच्या पिछाडीचा थत्तेवाल्यांचा (आता विंझ्यांचा) वाडा



छाया :
वसंत मोरे





खुन्या मुरलीधराचे देऊळ आणि देवळातील सभामंडप. येथे वासुदेव बळवंतांची सायंकाळची बैठक असे.



रास्ते वाडा



जुन्या तपकीर गल्लीतील किबे वाडा

छाया : वसंत मोरे



महर्षि अण्णासाहेब पटवर्धन बंडात यांचा हात होता.



न्या. महादेव गोविंद रानडे बंडात हात असल्याचा सरकारचा यांच्यावर संशय होता.



वासुदेव बळवंतांचे आराध्य दैवत

श्री दत्त

वासुदेव बळवंतांची मोडी स्वाक्षरी

सार्वजनिक काका



वासुदेव बळवंतांचे वकीलपत्र घेण्यास भरल्या न्यायालयात हे धैर्याने उभे राहिले.

वणेपरमार्थं नृसिंव्हसरस्वतीश्रीगुरुनाथ रक्षीलत्याचे वंशो वंशी ७० अणेसरस्वतीगंगा
धर श्रोतयाकरिनमस्कार कथाएकामनोहर सकळाभीष्टलाधोलुझा॥७१॥ श्रीगुरुचरीत्र
कथाकल्पतरु श्रीनृसिंव्हसरस्वत्योपाख्याने सिध्दनामधारकसंवादे श्रीगुरुभक्ति कान्नूनगमनं नाम
एकपंचाशतमोऽध्यायःसमाप्त॥एकदरओव्या ७१७४ ॥दत्त॥ ॥दत्त॥ ॥दत्त॥
हेपुस्तक धर्मस्थापनाकारीता दर्थ वासुदेव बळवंत फडके राहाणार शिरढोण तालुकेपनवेल
जिल्हाठाणें याणी लिहिले आहे मिति कार्तिक कृष्ण षष्टी शके १८०० बहुधान्यनामसंवत्सरे ने
दिवशी सकाळी समाप्ती॥ ॥दत्त॥ ॥दत्त॥ ॥दत्त॥ ॥दत्त॥

वासुदेव बळवंतांचे
चालयोध हस्ताक्षर;
संकलित 'दत्त-
माहात्म्य' ग्रंथाच्या
त्यांच्या हस्तलिखि-
ताच्या शेवटच्या
पानावरील शेवटच्या
सात ओळी.

मुंबईचे तत्कालीन राज्यपाल
सर रिचर्ड टेंपल



हैदराबादचे तत्कालीन राजनिवासी
सर रिचर्ड मीड



पुण्याच्या सिटी जेलच्या कोठड्या: कारण्या यंदीत
या ठिकाणी वासुदेव बळवंतांचा अमानुष छळ झाला.





पुण्याच्या जिल्हा दंडाधिकाऱ्याचे न्यायालय



संगमावरचा पूल



सत्र न्यायालयाचे आवार



मुळामुठेच्या संगमावर



संगमावरचे पुण्याचे त्या वेळचे सत्र न्यायालय

छाया : वसंत मोरे





येरवड्याच्या तुरुंगातील जन्मठेपीच्या बंद्यांच्या कोठड्या. जन्मठेपीची शिक्षा ठोठावल्यानंतर वासुदेव बळवंतांना येथेच ठेवण्यात आले होते. (वर डाव्या बाजूस) नानाभाई हरिदास : न्यायालयांत यांनी सरकारची बाजू मांडली. (मध्ये डाव्या बाजूस) महादेव चिमणाजी आपटे: सत्र न्यायालयात यांनीच वासुदेव बळवंतांचा बेडरपणे बचाव केला. (खाली डाव्या बाजूस) चिंतामण पांडुरंग लाटे: सहाय्यक वकील म्हणून यांनी न्यायालयात निर्भयपणे त्यांच्या बचावाचे काम केले.

[खाली] येरवडा कारागाराचे प्रवेशद्वार









आगनावेने एडनला जाताना दिसणारा एडनचा किल्ला

छाया : फणींद्र जोशी



एडनचा तुरुंग: या ठिकाणीच जन्मठेप काळ्या पाण्यावर वासुदेव बळवंतांनी तुरुंगवास आणि अनन्वित हालअपेष्टा भोगल्या आणि त्यांचे बलिदान झाले.

किल्ल्यांपैकी आणि आग्र्याहून सुटका होऊन महाराष्ट्रात परत आल्यावर १६७० मध्ये त्याने परत घेतलेल्या काही थोड्या किल्ल्यांपैकी हा एक किल्ला होता.' पुढे दुसऱ्या बाजीरावाच्या सासऱ्याला याच किल्ल्याची मामलत मिळाली होती.

कर्नाळा किल्ल्यावरील सर्वोच्चपद अनंतराव फडके यांच्याकडेच होते. अनंतराव हे वासुदेव बळवंतांचे आजोबा होत. त्यांचा जन्म १७६२ मधला. ते दशग्रंथी ब्राह्मण होते आणि उत्तम बुद्धिबळपटू म्हणून त्यांचा मोठा लौकिक होता. ते आजानुबाहू होते. अनंतरावांच्या आधी फडके कुटुंबाची शेतीवाडी इनाम गावे सोडली तर फारशी नव्हती. पण अनंतरावांनी ती साठ खंडी उत्पन्नाची होईल इतकी वाढविली. त्यांच्या वेळेस दुभती जनावरेच दोनशेपर्यंत फडके यांच्या दारी होती. ते स्वतः कर्नाळा किल्ल्याचे किल्लेदार होते. पण आपल्या स्वतःची कामे नोकरचाकरांनी करावी हे त्यांच्या उद्योगी स्वभावाला मानवत नसे. ते ती स्वतःच करीत. त्यांच्या कष्टाळू स्वभावामुळे त्यांना वृक्षारोपणाची फार हौस होती. आणि नवी नवी कलमे लावण्याची आवड होती. त्यांनी त्यामुळे लवकरच अशा नव्याने लावलेल्या दोन तीन सहस्र झाडांची एक फळबागच निर्माण केली. त्या झाडात आंब्याची, चिंचेची आणि काजूची शेकडो झाडे होती. आणि हेतुतः दुसऱ्यांच्या बागेतून आणलेली इतर झाडे होती. अशा झाडांच्या काही बागा फडक्याकडे अजूनही आहेत. कुडाव्याची बाग, चिकणी बाग, तळ्यावरची बाग अशा नावांनी त्या ओळखल्या जातात.

अनंतरावांचा स्वभाव करारी होता. ते शूर आणि धाडसी होते. बरीच वर्षे कर्नाळ्याची किल्लेदारी गाजविल्यावर १८१८ मध्ये भारतीय स्वातंत्र्याचा अस्त झाला तेव्हा इंग्रजांनी कर्नाळा किल्ला खाली करण्यास त्यांना सांगितले. ती आज्ञा हाती पडताच अनंतरावांचा संताप आणि दुःख दोन्ही अनावर झाली. स्वातंत्र्यात वाढलेल्या त्यांच्यासारख्या अधिकारी पुरुषास परकीयांनी आपल्याला अशी आज्ञा सोडावी आणि आपण ती निमूटपणे पाळावी हे कसे सहन होणार? त्यांनी ती आज्ञा पाहिली आणि त्यांच्या तोंडून उद्गार बाहेर पडले, "किल्ला खाली करा? कोणाचा किल्ला आणि कोण तो खाली करावयास सांगणार?" आणि त्यांनी ती आज्ञा धुडकावून किल्ला लढविण्याचा आदेश गडावरील आपल्या लोकांना दिला. परंतु जेथे सबंध हिंदुस्थानच पराभूत होण्यास आता फारसा अवधी नव्हता, तेथे अनंतरावासारखा स्वाभिमानी परंतु असहाय्य किल्लेदार एकुलता एक कर्नाळा किती दिवस लढवणार? त्यांनी तीन दिवस तो किल्ला लढवला आणि चवथ्या दिवशी इंग्रजांच्या बलवत्तर सत्तेपुढे हार खाऊन त्यांना तो इंग्रजांना खाली करून देणे भाग पडले.[१] इंग्रजांनी कर्नाळा जिंकून घेतला त्या काळाचा इतिहासातील

उल्लेख या वृत्तांताशी जुळणारा आहे.[७]

अनंतरावांचे जेष्ठ चिरंजीव बळवंतराव फडके हे १८२१ मध्ये जन्मले. त्यांच्या वडिलांच्या किल्लेदारीच्या अधिकारपदाचे वैभव ध्यानात असणाऱ्या भोवतालच्या लोकांमध्ये त्यांचे कौतुक होत असे. आणि आता कोणताही तसा अधिकार फडके यांच्याकडे नसताही त्यांना लोक कौतुकाने 'सुभेदार' फडके म्हणत असत. "त्यांना आम्ही दादा म्हणत असू," असे सांगून गो. कृ. फडके म्हणाले, "त्यांच्यावेळेस आमच्याकडे एक मोठा घोडा होता. तो शुभदायी म्हणून सर्वांचा तो आवडता असे. दादा तर त्या घोड्यावर बसण्यात पटाईत होते. वासुदेव बळवंतानाही घोड्यावर बसण्याची कला लहानपणापासून अवगत झाली, तीही या घरच्याच घोड्यामुळे."[८]

बळवंतरावांचा विवाह कल्याण येथील विश्वनाथपंत बोरगावकर यांची कन्या भिकुताई हिच्याशी झाला. हे बोरगावकर घराणेही अतिशय श्रीमंत होते. त्यांची दुसरी नावे जोशी किंवा वाडेगावकर अशी होती.[९] विश्वनाथपंत हे अप्पा बोरगावकर म्हणूनच प्रसिद्ध होते. बोरगावकरांना मोरअण्णा आणि नारायणराव असे दोन मुलगे होते. भिकुताईचा बळवंतरावांशी विवाह झाला, तेव्हा त्याचे सासरचे नाव 'सरस्वती' असे ठेवण्यात आले. सरस्वतीबाई या स्वरूपवान आणि स्वभावाने करारी बाई होत्या.

याच दांपत्याच्या पोटी शिरढोण येथे कार्तिक शु॥ ५ शके १७६७ या तिथीस म्हणजेच ४ नोव्हेंबर १८४५ ला सायंकाळी पाचच्या संधीला महाराष्ट्राचे विख्यात आद्य क्रांतिकारक वासुदेव बळवंत फडके यांचा जन्म झाला.[१०] अनंतराव आता ज्यांशी

7 "... In January 1818 Colonel Prother with a force of 380 Europeans, 800 Native Infantry and a battering train took the important forts of Karnala, Rajmachi and Kaori." ("जानेवारी १८१८ मध्ये ३८० युरोपियन, ८०० एतद्देशीय पायदळ आणि तोफखान्याचे गाड घेऊन कर्नल प्रोथरने कर्नाळा, राजमाची आणि काओरी हे महत्त्वाचे किल्ले जिंकून घेतले") 'गॅझेटर ऑफ दि बॉंबे प्रेसिडेन्सी,' खंड ८ वा, भाग ३, पृ ५२२

८ गो. कृ. फडके वकील यांची माहिती.

९ वासुदेव बळवंतांचे पहिले चरित्रकार रा. म. बोरवणकर यांनी ही माहिती प्रसिद्ध केलीच आहे. पण एक जुने पत्र प्रस्तुत लेखकाच्या हाती आलेले आहे. त्यात बोरगावकरांनी स्वाक्षरीच विश्वनाथ जोशी अशी केलेली आहे

१० वासुदेव बळवंतांना पकडण्याचे सर्व प्रयत्न फसल्यावर त्यांना पकडून देणाऱ्यास किंवा ते करणे शक्य होईल अशी माहिती देणाऱ्यास पारितोषिक उद्घोषिणाऱ्या मुंबई सरकारच्या राजघोषणेच्या आधारे. वासुदेव बळवंतांच्या जन्मतिथीविषयी कोणत्याही साधनाच्या अभावी निश्चितपणे काही सांगणे प्रथम अवघड झाले होते. त्यांच्या पुनर्णशांनी प्रसिद्ध केलेल्या त्यांच्या छायाचित्राखाली त्यांचे जन्मवर्ष १८४६ असे दिले होते पण स्वत. वासुदेव बळवंतांनी आत्मचरित्रात "मी मौजे शिरढोण तालुका पनवेल, जिल्हा ठाणे, इलाखा मुंबई येथे शके १७६७ साली फडके कुळात जन्मलो," असे लिहून ठेवले आहे. त्यामुळे त्यांचे जन्मवर्ष १८४५ हे ठरू लागून गोंधळ निर्माण झाला पण योगायोगाने वर उल्लेख केलेली राजघोषणा माझ्या पाहण्यात आली आणि त्या

वर्षांचे वृद्ध गृहस्थ झाले होते. मोठमोठी स्थित्यंतरे आणि उत्कर्षाचे नि दुःखाचे दिवस पाहिलेल्या या वृद्ध पुरुषास आपल्या नातवाच्या जन्माचे वृत्त कळताच केवढा आनंद झाला! शिरढोणकर फडक्यांच्या वैभवसंपन्न आणि इतिहासप्रसिद्ध कुळात जन्मास आल्यामुळे वासुदेव बळवंत हे जन्मवेळी काहीच वैशिष्ट्य सांगता येऊ नये असे किंवा आगापिच्छा नसलेल्या कुळात जन्मलेल्या मुलाप्रमाणे जन्म घेत नव्हते. वैभवाच्या मेघराशीचा पसारा मागे टाकीतच आपण आपल्या ईश्वररूपी घराहून जन्म घेण्यासाठी येथे येतो, ही कव्युक्ती सार्थ करीत कीर्तीचे वंशलोण असलेल्या कुळात ते जन्म पावले होते.

त्या दिवशी नातवाच्या जन्मानिमित्त शिरढोण येथील फडक्यांच्या भव्य वाड्यात अनंतरावांनी आनंदोत्सव साजरा केला. आजूबाजूच्या पंचक्रोशीतही त्या जन्मोत्सवामुळे आनंद पसरला. फडके घराण्यातील आजोबांप्रमाणे वासुदेव बळवंताच्या आईच्या घराण्यातील त्यांच्या दुसऱ्या आजोबांनाही तसाच अवर्णनीय आनंद झाला. शिरढोण येथील आनंदोत्सवात आपल्या कुटुंबियांसह त्यांनीही भाग घेतला.

लहानपणी अडीच वर्षांचा होईतो वासुदेव शिरढोण येथे होता. नंतर मात्र कल्याण येथे आजोळी तो राहू लागला. अप्पा बोरगावकर आणि अनंतराव फडके या दोघा आजोबांना आपल्या नातवाचे अतिशय प्रेम होते. त्याचा गोरापान वर्ण, बाळसेदार शरीर, सरळ नाक आणि निळसर पाणीदार डोळे पाहून दोघांनाही प्रेमाचे भरते येई. कल्याण येथे राहावयास आल्यापासून आजोबांप्रमाणे आजीचाही (आईच्या आईचाही) वासुदेवाला फार लळा लागला. या त्याच्या आजीचे नाव आनंदीबाई असे होते. त्या वेळी त्याने मारलेल्या 'आई' या हाकेने त्या घरात मोठी फसगत होई. कारण, वासुदेवाचे दोन मामा आणि त्यांची आई ही सर्व आपल्या आईलाही 'आई' म्हणूनच हाक मारीत असत. त्यामुळे आपली आई आणि आजी यांचा पृथक् निर्देश दर्शविण्यासाठी 'माझी आई' आणि 'मामाची आई' अशी दोन निराळी संबोधनें वासुदेवाने लवकरच शोधून काढली आणि लहान मुले कित्येकदा ज्या संबोधनाचा आईला हाक मारताना वापर करतात, तो करून पुढे पुढे तर वासुदेव लहरीत आला म्हणजे आईला इतरांप्रमाणे सरळ सरळ 'भिकुताई' किंवा 'सरस्वती' अशा नावानेच हाक मारी.[११] कित्येक घरात अनुभवास येणारा हा प्रकार पाहून वासुदेवाच्या बालपणाच्या या मोठेपणाच्या अधिकारामुळे त्याच्या

घोषणेत वासुदेव बळवंताचे जन्मवर्षच काय, पण जन्मदिनांकही दिलेला आढळला. तो अर्थातच वासुदेव बळवंताचा खरा जन्मदिनांक होय. त्याचप्रमाणे त्यांच्या एका चरित्रात त्यांचा जन्म कल्याण येथे झाला असे म्हटले आहे तेही वासुदेव बळवंताच्या आत्मचरित्रातील वरील विधानावरून खोटे ठरते.

११ वासुदेव बळवंताचे 'आत्मचरित्र'

आजोबांची कौतुकाने हसता हसता पुरेवाट होई! कल्याण येथे आजोळी आजोबां-प्रमाणेच आजीचे आणि इतरांचेही वासुदेवावर फार प्रेम होते.

पण मधून मधून अनंतराव त्याच्यासाठी बोरगावकरांकडे अगत्याने बोलावणे पाठवीत, तेव्हा मात्र त्यावेळेपुरती वासुदेवाला शिरढोणची वारी घडे. अशा धावत्या भेटीत तो घरी आला म्हणजे त्याच्या सुदृढ शरीराकडे आणि तेजस्वी रूपाकडे पाहून त्याच्या दुसऱ्या आजोबांनाही मोठा आनंद होई. कौतुकाने त्याला ते 'छकड्या' या आवडत्या टोपण नावाने हाक मारीत. वासुदेवाच्या अंगी लहानपणी हूडपणा पुष्कळ होता. तो पाहून त्याच्या वडिलांना याचे पुढे कसे होईल अशी चिंता अनेकदा वाटल्यावाचून रहात नसे. त्याने फार द्वाडपणा केला तर ते त्याला रागेही भरत. आणि त्याच्याकडून प्राथमिक मुळाक्षरे इ. वळवून घेण्याचाही प्रयत्न करीत. त्यामुळे वासुदेवाला धाक असा हा वडिलांचाच काय तो होता. मुळाक्षरे तर त्यावेळेला मुलांना गिरवावी लागत ती दगडी पाटीवर नव्हे, मग आताप्रमाणे वहीवर शिसपेन्सिलीने कुठची? त्यावेळी असत त्या धूळपाट्या. पाटीवर पसरलेल्या विट-कराच्या मऊ धुळीच्या धूळपाटीवर तांब्याच्या काडीने त्याला ती गिरवावी लागत. पण त्याचा वचपा, अशा मुलांविषयी मातांना सदाच वाटते, तसे त्याच्या आईने निर-तिशय प्रेम भरून काढीत असे. वासुदेव बळवत म्हणूनच म्हणतात, "लहानपणा-पासून माझेवर बापाची प्रीती कमीच असे. आईची मात्र प्रीती सर्व भावंडांपेक्षा फार असे.[१२] वासुदेवाचे बालपण अशा कालक्रमात जात होते

वासुदेव बालपणाचे दिवस अशा प्रकारे घालवीत असता त्याच्या वयाच्या सहाव्या वर्षी अनंतरावानी त्याची थाटाने मुंज केली. पण नवीन बटूचे त्या बंधनातील कुतूहल तो शाळवू लागला, तोच पुढे तीनच वर्षांनी अनंतरावाना एक अपघात झाला. ते आता ब्याण्णव वर्षांचे झाले होते. पण आपल्या उद्योगप्रिय स्वभावामुळे आपला व्याप ते कमी करीत ना! अशाच धांदलीत एक दिवस पडून त्यांचा पाय मोडला. या शारीरिक आपत्तीमुळे त्यांची कष्टप्रियता मात्र मुळीच कमी झाली नाही. आपल्या नववृक्षारोपणाच्या उद्योगात त्यांनी कधीच खंड पडू दिला नाही. ते पुढे डोलीतून आपल्या उद्यानात फिरू लागले. आणि झाडांची नवीन नवीन रोपे लावण्याचा आपला उद्योग त्यांनी तसाच चालू ठेवला. त्यांच्या या फेर-फटक्याच्या वेळी वासुदेव कधी आसपास असला आणि "अण्णा ही झाडं कशाला आणखी लावता?" असे त्याने विचारले तर त्यांनी उत्तर द्यावे, "माझ्यामागे माझ्या मुलांनी अक्षय श्रीमंतीत रहावं, माझ्या वंशजांना सुख लाभावं आणि त्यांचा उत्कर्ष व्हावा म्हणून भावी पिढ्यांसाठी मी ही सोय करीत आहे."

मुंज झाल्यावरही वासुदेवाचा हूडपणा थांबला नाही. त्याचे अभ्यासाकडे

---

१२ वासुदेव बळवंतांचे 'आत्मचरित्र'

विशेष लक्ष नसे. वडील माणसांच्या प्रेमामुळे आणि बोरगावकरांसारख्या श्रीमंत कुटुंबात मिळणाऱ्या पुष्टिदायक आहारामुळे त्याचे शरीर मात्र अधिकच सुदृढ बनत गेले. चार वर्षांचा असताना पाऊण शेर दूध तो लीलेने पचवत असे. ते त्याचे मूळचे प्रकृतिमान वाढत्या वयात अधिक दणकट बनत गेले. पण सातव्या वर्षापर्यंत त्याने धुळाक्षरे किंवा बाराखडयाही पुऱ्या केल्या नाहीत. कोणी अभ्यासाचे नाव काढताच लांब कोठेतरी पळ काढावा अशी त्याची रीतच ठरलेली असे. बाहेर बैलांच्या गाडया मनसोक्त उडवाव्या; काही वेळा सकाळी जे घराबाहेर पडावे ते मध्यान्हापर्यंत घरी परतही येऊ नये, बाहेर केलेल्या खोडकरपणापायी सवंगडयांच्या काळच्या कित्येकदा आईपर्यंत आलेल्या तक्रारी दांडगाई करावी आणि मग शिक्षा चुकविण्यासाठी ओसाड पडलेल्या घरातून किंवा अडगळीच्या ठिकाणी लपून बसावे असा त्याचा नित्यक्रम होता. बैलगाडी उडविण्याची त्याला अतिशय हौस असे. त्याच्या हूडपणामुळे वडलधाऱ्यांना जी चिंता लागली असेल ती असो! पण बोरगावकराकडे मात्र त्याच्या दांडगाईचे त्याच्या रागात क्वचितच पर्यवसान होई! आपल्या या उपद्व्यापी नातवाचे लाड पुरविण्यासाठी त्यांनी त्याला एक छोटी बोकडाची नवी गाडी आणून दिली. त्या गाडीतून मग मोठ्या डौलाने वासुदेव प्रहर न् प्रहर हिंडे!

वासुदेवाचे हे बंडखोर बालपण आणि हा हूडपणा त्याच्या भावी बंडखोर आयुष्याकडे पाहता अगदी साहजिक ठरतात. पुढील आयुष्यात असामान्य पराक्रम गाजवून गेलेल्या पुरुषांचे बालपण अशा दांडगाईच्या कृत्यांनी भरलेले पुष्कळदा आढळते. फ्रॉन्सिस ड्रेकची स्वैर शिदिरी किंवा जॉर्ज वॉशिंग्टनची कुऱ्हाड ही या नियमाची उदाहरणे होत. वासुदेवाचा हा हूडपणा त्याच्या घरच्या वडील माणसांची काही काही वेळा फारच धादल उडवी. त्याच्या चिंतेमुळे सरस्वतीबाई कित्येकदा चिंताग्रस्त मुद्रेने सध्याकाळपर्यंत तो घरी सुखरूप परत येण्याची वाट पाहत बसत. अशाच एका वेळेस पावसाच्या सरीवर सरी कोसळत होत्या. कल्याण येथील उल्हास नदीला पूर आला होता. बोरगावकरांच्या वाड्याच्या अंगणातही पाणी चढले होते. दुपारच्या प्रहरी वासुदेवाने एकदम जी कोठे दडी मारली त्याचा पत्ता लागेना. पुष्कळ शोध केल्यावर तो नदीवर पोहण्यास म्हणून तर गेला नाही ना, या चिंतेने सर्वजण व्याकूळ झाले. “पोरास कुणी पुरात लोटून तर दिले नाही ना?” या शंकेने सरस्वतीबाई शोकाकुल झाल्या. वासुदेवावर यांचे निरतिशय प्रेम होते. त्यामुळे स्त्रीसहज मायेने त्या शेवटी रडू लागल्या. ही सर्व गंमत जवळच्याच एका हडप्याच्या मागे दडून बसून वासुदेव बराच वेळ पाहात होता. आईला रडताना पाहिल्यावर मात्र त्याच्याने तेथे राहवेना! तो धाईधाईने बाहेर आला आणि सरस्वतीबाईजवळ धावत गेला. त्यासरशी मळभाने काळवंडलेल्या दिशा सूर्यप्रकाशाने एकदम उजळाव्या त्याप्रमाणे त्यांच्या मुद्रेवर रडता रडता आनंद चमकला.

त्यांनी अश्रू आवरून वासुदेवाला पोटाशी घट्ट धरले ! त्या त्याला रागावल्या नाहीत, तर प्रेमभराने मुके घेण्यात त्याच्यावर रागावण्याचे त्यांना सुचलेच नाही !

वासुदेव दहा वर्षांचा झाला तेव्हा त्यांची अभ्यासाची चुकवाचुकव थांबविण्यात आली. त्या वर्षी वडील मंडळींनी त्याला शाळेत घालण्याचा चंगच बांधला. मुंबई विश्वविद्यालयाची स्थापनाच १८५७ मध्ये झाली. तेव्हा १८५५ मध्ये शिक्षण प्रसाराच्या अभावी शिरढोण येथे शिक्षणाची सोय कशी असणार ? म्हणूनच वासुदेवाच्या शिक्षणाची व्यवस्था कल्याण येथे झाली. आणि तेथे सरकारी शाळेत त्याचे नाव घालण्यात आले. या शाळेत वासुदेवाने पुढे चार वर्षे शिक्षण घेतले. त्या काळात त्याने व्यवहारी अपूर्णांकांपर्यंतचे गणित पुरे केले आणि सिद्धांताचे (भूमितीचे) पहिले पुस्तकही त्याने पूर्ण केले. या अवधीत वासुदेवाने इंग्रजी भाषेचाही अभ्यास करण्याचे ठरविले. पण तो त्याला गुप्तपणे करावा लागला. कारण बळवंतरावांच्या मनात त्याने इंग्रजी शिकावे असे नव्हते. त्यामुळे ही गुप्तता राखणे त्याला भाग पडले. त्याच्या मराठी शाळेची वेळ साडेदहा ते दीड वाजेपर्यंत होती. पण डॉ. विल्सन या युरोपियन प्रचारकाने (मिशनरीने) चालवलेल्या इंग्रजी शाळांपैकी एक शाळा कल्याण येथे होती. ती सकाळी सहा ते दहा आणि दुपारी दोन ते सहा वाजेपर्यंत भरत असे. तेव्हा मराठी शाळेची आपली वेळ सोडून भरणाऱ्या या शाळेत गुप्तपणे जाऊन इंग्रजी शिकणे वासुदेवाला त्यामुळेच शक्य झाले. त्या शाळेत इंग्रजीची दोन पुस्तके त्याने पूर्ण केली. पुढे वासुदेव बळवंताचे इंग्रजीवर उत्तम प्रभुत्व असल्याचे दिसून आले. त्याचा प्रारंभ हा असा होता ! मराठी शाळेत त्याला सखाराम शिवराम केळकर या नावाचे शिक्षक होते. त्यांना तात्या पंतोजी असेही म्हणत. डॉ. विल्सन यांच्या शाळेत वासुदेवाचे शिक्षक श्रीधरशास्त्री जांभेकर हे होते. हे दोन्हीही शिक्षक स्वभावाने फार चांगले होते. परंतु तात्या पंतोजी एखादे वेळेस तरी छात्रगणावर छडीचा प्रयोग करीत. त्यामुळे वासुदेवास त्यांचे थोडेतरी भय वाटे. पण जांभेकरांनी जवळ जवळ कधीच कोणाला मारले नाही. त्यामुळे वासुदेवास त्यांचे कधीच भय वाटले नाही. या दोन्ही शिक्षकांच्या आठवणी वासुदेव बळवंतांना भावी आयुष्यात उल्हसित करीत !

वासुदेव कल्याणला या शाळेत असताना शके १७७८ च्या फाल्गुनात म्हणजे मार्च १८५७ मध्ये शिमग्यानंतर बोरगावकराकडील गणपतराव बोरगावकर यांच्या मुलाचा व्रतबंध क्षेत्राच्या ठिकाणी जाऊन करण्याचे ठरून त्यासाठी ती मंडळी नाशिकजवळच्या त्र्यंबकेश्वरला गेली. त्यांच्यासमवेत आईसह वासुदेवही गेला. या वेळेला त्याची कल्याणची आजी, माई, ही आणि फडक्याकडचे अनंतराव आणि त्याचे बंधू सदाशिवराव आणि वासुदेवरावाचे धाकटे बंधू कृष्णाजी अशी मंडळीही त्या कार्याला गेली होती. अशावेळी क्षेत्राच्या ठिकाणचे उपाध्ये आपापल्या यजमानांना

त्यांच्यापैकी कोणाचे कोण पूर्वज त्या क्षेत्रात कधी आले होते, ते त्यावेळी त्यांच्याकडून लिहून घेतलेल्या लेखावरून अचूक सांगतात. इतकेच नव्हे तर पुढील पिढ्यांना तसा पुरावा दाखविण्यास उपयोगी पडावा म्हणून येणाऱ्या यजमानांच्या पिढीकडूनही तसा लेख लिहून घेतात. त्याप्रमाणे त्र्यंबकेश्वर येथील फडक्यांचे तीर्थोपाध्ये वेदमूर्ती रावजी फडके यांना या वेळी फडक्यांकडून लेख लिहून मिळाला. तो वासुदेवानेच लिहून दिला. यावरून इतक्या लहान वयात वासुदेव घरच्या व्यवहारात महत्त्वाचा भाग कसा घेत होता तेही दिसते. नाहीतर समवेतच्या कोणी वडीलधाऱ्यांनी तो लेख उपाध्येबुवांना लिहून दिला असता. या लेखात वासुदेवाने आपल्या बाळबोध लिपीतील हस्ताक्षरात म्हटले होते :–

वेदमूर्ती राजश्री रावजी फडके यांसी

विद्यार्थी वासुदेव बळवंत फडके कुरघेकर, हाली वस्ती सीरढोण, साष्टांग नमस्कार विज्ञापना विशेष. आजे आनंदराव रामचद्र, चुलते सदासीवपंत, बंधु कृष्णा, मातोश्री सौ. सरस्वतीबाई, आजी माई, आम्ही श्रीक्षेत्री गणपतराव तात्या जोसी कल्याणकर याच्या मुलाच्या व्रतबंधाकरिता येऊन गंगास्नान व देवदर्शन करून वडलांचे लेख पाहून तुम्हाला उपाध्येपण दिले आहे. आम्ही व आमचे वतीने येतील ते तुमची पूजा करतील. मिती फाल्गुन वा॥ ८ सोमवार शके १७७८ वळनाम संवत्सरे दस्तुरखुद्द.

या तिथीला येणारा दिनांक त्या वर्षीच्या पंचांगात मी शोधला. तेव्हा मला आढळले की, त्या दिवशी १९ मार्च १८५७ हा दिनांक येतो. वासुदेवाच्या हातातील या लेखाचे छायाचित्र दुसरीकडे दिले आहे, त्यावरून त्यांनी आपणास कुरघेकर म्हटले आहे हे दिसेलच. बाराव्या वर्षी आपल्या मताने लेख लिहिताना वासुदेवाने त्यात साष्टांग, विक्षेप, श्रीक्षेत्री, देवदर्शन, उपाध्येपण, येतील, व्रतबंध हे शब्द कसे अशुद्ध लिहिले आहेत ते पहाणे मजेशीर ठरेल. त्या काळी लेखनात कित्येकदा 'श' च्या ठिकाणी 'स' लिहीत असत हे शिरढोणच्या जागी सीरढोण, सदाशिवपंतच्या ठिकाणी सदासीवपंत, जोशी च्या स्थळी जोसी ही त्याने लिहिलेली अक्षरे पाहता दिसून येते. परंतु हा लेख विद्यार्थी वासुदेवाने लिहून दिला म्हणून वासुदेव बळवंतांच्या बालपणीचे हस्ताक्षर आपल्याला पाहावयाला तरी मिळाले. या लेखात त्यांचे व आजोबा इत्यादींची नावे मात्र अचूक दिली आहेत. त्यावरून हे पत्र वासुदेव बळवंतच्या हातचेच आहे याविषयी शंका राहात नाही. पुढे एके ठिकाणी त्यांच्या हस्तलिखित पोथीचा उल्लेख केलेला आहे. आणि त्या पोथीतील त्यांच्या हस्ताक्षराचाही ठसा मुद्रित केलेला आहे. त्या पोथीतील हस्ताक्षराशी वरील लेखातील हस्ताक्षर तज्ञांनी ताडून पाहावे.

या काळातही सुट्टीत वासुदेव शिरढोण येथे जाई. १० मे १८५७ ला सत्तावनचे स्वातंत्र्ययुद्ध सुरू झाले. ते अठराशे सत्तावनचे बंड म्हणून महाराष्ट्रात उल्ले-

रले जात असे. उत्तर हिंदुस्थानातील या बंडाच्या नित्य नव्या नव्या वार्ता दक्षिणेत येत आणि कित्येक दिवस त्यांची चर्चा हा येथील प्रौढांच्या तोंडात एकच विषय झाला होता. अशावेळी बळवंतरावांनी 'बंडा'च्या वातम्या उत्साहाने सांगाव्या आणि बारा वर्षांच्या वासुदेवाने त्याची दृष्टी कल्पनांनी भारावलेली आहे आणि कान दादांच्या रसाळ वृत्तकथनासाठी टवकारलेले आहेत अशा स्थितीत त्यांच्या तोंडाकडे पाहत बसल्या बसल्या गुडघ्याभोवती हात फेकून बसत त्या तासन तास ऐकाव्या असे पुष्कळदा घडे. देश स्वतंत्र करण्यासाठी चाललेली ही लढाई आहे या कल्पनेने नानासाहेब आणि तात्या टोपे प्रभृतींचे पराक्रम आणि त्यांच्या युद्धकथा ऐकताना वासुदेवाला अननुभूत आनंद होई. आणि इंग्रज सरकारविरुद्ध अशी लढाई आपणही करू शकू का? अशा बालमनाला सहज सुचणाऱ्या विवचनेने तो अस्वस्थ होई!

वासुदेव बारा वर्षांचा झाला, तेव्हा फडक्यांच्या कुटुंबात एक शोकजनक मृत्यू घडला. अनंतरावांचे वय आता पंच्याण्णव वर्षांचे झाले होते. एक पाय गेल्याने ते आधीच असहाय्य झाले होते. पुढे तीन वर्षांत वृद्धपण त्यांना अधिकच असमर्थ करून गेले. शेवटी त्यांना ऐहिक जीवनाची विरक्ती आली. संन्यास घेऊन इहलोक सोडण्याचे त्यांनी ठरविले. त्यांच्या इच्छेप्रमाणे तो त्यांनी घेतला आणि थोडयाच दिवसात मार्गशीर्ष शुद्ध ७ शके १७७९ या तिथीला पंच्याण्णव वर्षेपर्यंत उलाढालीच्या काळात जगाची स्थित्यंतरे पाहिलेला हा पुरुष इहलोक सोडून गेला. त्यांनी संन्यास घेतला असल्यामुळे त्यांच्या पार्थिव देहास समाधिस्थ करावे लागले. त्याच्या समाधीची ही जागा शिरढोणला फडक्यांच्या वाडयाजवळ थोडया अंतरावर तळ्याच्या काठी होती. पुढे बऱ्याच वर्षांनी बळवंतरावांनी तेथे काळ्या कुळकुळीत दगडाची उत्तम समाधीही बांधली. ती अजून तेथे दिसते. अनंतरावांच्या मृत्यूने वासुदेवाला सर्वात अधिक वाईट वाटले. प्रेमाने आपला नेहमी कैवार घेणारे आपले आजोबा आता नाहीसे झाले या विचाराने त्याने फार शोक केला! त्या वर्षाच्या पंचांगावरून मी वरील तिथीचा दिनांक काढला. तो २३ नोव्हेंबर १८५७ हा होय.

कल्याण येथील प्राथमिक शिक्षण संपवून १८५९ मध्ये आपल्याला इंग्रजी शिक्षण देण्यासाठी वासुदेवाने वडिलांचे मन वळविले आणि त्यासाठी मुंबईला प्रयाण केले. मुंबईचे सुप्रसिद्ध दानशूर नागरिक नाना शंकरशेट यांच्या परिश्रमाने चाललेल्या शाळेमध्ये त्याचे नाव घालण्यात आले. मुंबईला तो कुठे रहात असे हा मला प्रश्न पडला होता. पण नंतर त्याचे निवासस्थान कळले. त्याचे जवळचे नातेवाईक तेथे कोणी नव्हते. पण फणसवाडीत जगन्नाथाच्या ज्या अतिशय जुन्या चाळी आहेत त्यांतील एका चाळीत गोविंद गोपाळ करमरकर नावाचे फडके कुटुंबाचे ऋणानुबंधी राहात. त्याच्याकडे वासुदेव बळवंत राहू लागले.[११] या गोष्टीला तत्कालीन घटनांच्या

[११] गो. ह. फडके वकील यांनी माहिती.

न्यायालयीन कामाच्या प्रतिवृत्तांतात भक्कम पुरावा मिळाला. तो पुढे एके ठिकाणी दिला आहे. जगन्नाथाच्या चाळीत जाऊन ही विवक्षित जागा कोठे होती त्याचा मी पत्ता लावला.तेव्हा ती १२६ सी जगन्नाथाच्या चाळीत तिसऱ्या माळयावर,टोकाच्या खोलीत होती असे मला आढळले. वरील शाळेत वासुदेवाने इंग्रजीचा पुढील अभ्यास चालू केला. परंतु तो फार काळ त्या शाळेत राहिला नाही. चारच महिन्यात त्या शाळेला त्याने रामराम ठोकला. आणि शिक्षणासाठी पुण्याला जाण्याचे ठरविले. त्या शाळेच्या मुख्याध्यापकाचे स्थानावर त्यावेळी गोविंद विष्णू भिडे या नावाचे शिक्षक होते. " हे पंतोजी नेहमी हसतमुख असत. ते स्वभावाने शांत असून शिकवण्याचे काम त्यांस माहीत होते," अशा शब्दात त्यांच्या शांत स्वभावाची, हसतमुख वृत्तीची आणि शिकविण्याच्या हातोटीची वासुदेव बळवंतांनी 'आत्मचरित्रा'त स्तुती केली आहे.

पुण्याला गेल्यावर वासुदेवाने पूना हायस्कूलमध्ये पुढील शिक्षणासाठी नाव घातले. ही पुण्यातीलच काय, पण हिंदुस्थानातीलही जुन्यातल्या जुन्या शाळेतील एक शाळा होती. तिची स्थापना १८४२ मध्ये झाली. 'पूना ट्रेनिंग कॉलेज' ही तिचीच संलग्न संस्था होती. ती विश्रामबाग वाड्यात भरे. प्रथम ती शास्त्री पंडितांच्या हाती होती. १८५८ मध्ये प्रथमतःच ती 'डिरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन' यांच्याकडे दिली गेली आणि १८५८ मध्ये एडविन अर्नोल्ड नावाचे पहिले युरोपियन प्राचार्य त्या संस्थाचे मुख्य झाले. या शाळेत वासुदेव पावणेदोन वर्षे होता. त्या शाळेत त्या वेळेस अतिशय प्रमाण ग्रंथ समजली जाणारी हॉवर्ड मालिकेतील दोन पुस्तके त्याने पूर्ण केली आणि तिसऱ्याची शभर पाने पूर्ण केली. परंतु या काळात अभ्यासक्रमातील पुस्तके सोडून इतरही बरीच पुस्तके आपल्या स्वतःच्याच मनाने त्याने वाचून काढली. आणि या मार्गाने विशेषतः इंग्रजी भाषेचा त्याने बराच अभ्यास करून त्या भाषेत उत्तम प्राविण्य मिळवले. खरे पाहता, उत्तम इंग्रजी भाषा लिहिण्याची नवशिक्षितांना त्या काळी मोठी हौस असे. त्यांचे इंग्रजीत प्रावीण्यही तसेच असे. त्यामुळेच एडविन अर्नोल्ड यांनी त्या शाळेच्या पुस्तकात मत व्यक्त केले होते: "Most of the students are better scholars in English than in Marathi." ("बरेचसे विद्यार्थी मराठीपेक्षा इंग्रजीतच अधिक चांगले निष्णात आहेत.") इतके शिक्षण पूर्ण केल्यावर वासुदेव स्कूल फायनल परीक्षेला बसला असता तर तीत तो सहज उत्तीर्ण झाला असता. परंतु ती परीक्षा देऊन तिच्या बळावर त्या काळी सहज मिळणारी मोठ्या वेतनाची नोकरी मिळविणे आणि आपले वैयक्तिक जीवन संपन्न करणे ही त्याची आकांक्षा नव्हती. त्यामुळे त्या परीक्षेला न बसताच वासुदेवाने शाळा सोडली.

शिक्षणाचा सर्वसाधारण प्रसार त्यावेळी फार झाला नव्हता. मॅट्रिकची परीक्षाच मुळी १८५९ मध्ये सुरू झाली. १८६२ मध्ये सबंध मुंबई विश्वविद्यालयात

फक्त चार जण बी. ए. ची परीक्षा उत्तीर्ण झाले होते. १८७७ पर्यंत म्हणजे १८७९ मध्ये वासुदेव बळवंतांनी बंडाची उठावणी केली, त्याच्या पूर्वी फक्त दोन वर्षे त्यांची संख्या १७९ इतकीच होती. तेव्हा वासुदेव बळवंतांनी जे शिक्षण घेतले ते त्या दिवसात सर्वसाधारण हिंदी सुशिक्षित मनुष्य घेई तेवढे होते. आणि त्या काळच्या पातळीप्रमाणे पहाता ते आपल्या काळाच्या सुशिक्षित पिढीपैकीच एक होते.

स्वतःचे भावी जीवन संपन्न करूनच थांबण्याची स्वप्ने पहात बहुसंख्यांक विद्यार्थी ती शाळा सोडीत. परंतु त्याहूनही श्रेष्ठतर अशी मातृभूमीच्या स्वातंत्र्याची संपदा मिळावी म्हणून अशा वैयक्तिक संपदेकडे पाठ फिरविण्यास सिद्ध होण्याचा निश्चय करीत बाहेर पडणारा वासुदेव फडके हा पहिलाच विद्यार्थी त्या शालागृहाने पाहिला!

* * *

# प्रकरण ३ रें

## प्रथम विवाह आणि मुंबईतील वास्तव्य

Before him he sees life unroll
A placid and continuous whole—
That general life, which does not cease
Whose secret is not joy, but peace.
—Matthew Arnold

पुणे येथील शिक्षणक्रम सपवून वासुदेवराव १८६० च्या सधीस पुन्हा मुंबई येथे गेले. तेथे ते आपल्या पुढच्या आयुष्याचा विचार करू लागले, तेव्हा त्यांच्या घरात तीन मोठी कार्ये होऊन गेलेली होती. वासुदेवरावांहून सहा वर्षांनी लहान असणारा त्याचा भाऊ कृष्णा याचा व्रतबंध त्या वर्षी झाला. आणि त्यांच्या एका धाकट्या बहिणीचा विवाहही बळवंतराव दादानी लवकरच उरकून घेतला. दादांची मोठी मुलगी कल्याणास अभ्यकर यांच्याकडे दिली होती आणि ही दुसरी येमूबाई अनगाव येथे लेले यांच्याकडे. हे लेले इनामदार होते आणि म्हणून मोठे श्रीमंत होते. त्यांच्याकडेच मोठेपणी बऱ्याचदा वासुदेव बळवंतांचे धाकटे बंधू कृष्णाजी बळवंत येत आणि लेल्यांकडच्या मुलांचे ते मामा म्हणून कृष्णामामा म्हणून त्यांना लेल्याकडची मंडळी आणि इतर गावकरीही म्हणत. त्यांच्या पाठीवर वासुदेवरावांना दोन भाऊ झाले. त्यांची नावे पांडुरंग बळवंत आणि गंगाधर बळवंत अशी होती. ते आता सात आणि चार वर्षांचे होते. वरील लग्ने आणि मुंज ही कार्ये बळवंतरावांना आपल्या 'शिरढोणकर फडके' या ख्यात नामाच्या कीर्तीला साजेशा रीतीने करावी लागली आणि त्या कामी आपल्या कुटुंबाच्या आर्थिक स्थितीवर मोठे ओझे पडल्यासारखे त्यांना वाटू लागले. संयुक्त कुटुंबातील अशी ही शेवटचीच कार्ये

"आपल्यापुढे अखंड आणि शांत असे गतिमान आयुष्य पसरलेले त्याला दिसत आहे. त्या आयुष्याचे रहस्य स्वास्थ्य आहे, आनंद नव्हे।"

मॅथ्यू अर्नोल्ड

होती. कारण ही कार्ये झाल्यावर बळवंतराव आणि वासुदेवरावांचे काका सदाशिव-राव हे दोघे विभक्त झाले आणि फडके कुटुंबाची एकात्मता भंग पावली.

पुणे सोडून मुंबईला आल्यावर वासुदेवरावांप्रमाणे त्याचे वडीलही त्याच्या भावी आयुष्याविषयी विचार करू लागले. पण त्यांचे विचार जगरहाटीचे संसारी स्वरूपाचे होते. 'वासुदेव' कल्याण येथे होता, तेव्हापासूनच त्याने पुढे इंग्रजी शिकत बसू नये, तर शिक्षणक्रम संपवून स्वतः काही मिळवण्याच्या मार्गाला लागावे, असे त्यांना वाटू लागले होते. त्याच दिशेने त्यांचे आता प्रयत्नही सुरू झाले. 'वासुदेवा'ने नोकरी करावी; पण ती करतानाही त्याने आपल्यापासून लांब जावे हा विचार त्यांना मानवण्यासारखा नव्हता. तेव्हा त्याने नोकरी,तर करावी परंतु ती शक्य तर शिर-ढोणपासून जवळच्या एखाद्या ठिकाणी करावी असे त्यांना वाटत असे. ती त्याची इच्छा पुरी व्हावी अशी परिस्थितीही सुदैवाने त्यावेळी जवळ पनवेल येथेच होती. तेथील प्रसिद्ध व्यापारी आणि श्रीमंत गृहस्थ विठाप्पा खंडाप्पा गुळवे हे बळवंतरावांचे निकटचे स्नेही होते. वासुदेवराव शिरढोण येथे यानंतर आले की,येता जाताना गुळवे यांच्याकडेही जात असत. आपल्या घनिष्ट संबंधाचा लाभ घेऊन विठाप्पा खंडाप्पा यांच्याच पेढीवर 'वासुदेवा'ला चिकटवून द्यावे असे ठरवून बळवंतरावांनी त्यालाही तो विचार बोलून दाखविला.पण त्यांचा तो विचार ऐकताच वासुदेवराव आश्चर्यचकित झाले. शिक्षण संपताच इतर चार तरुणांप्रमाणे नोकरी एके नोकरी करण्याचा मार्ग चोखाळण्याचा त्यांचा कधीच विचार नव्हता. फार तर नोकरी करावयाची तर ती काही काळ आणि तीही मुंबईसारख्या मोठ्या नगरात करावी, असा त्यांचा विचार ठरला होता. त्यामुळे आपण नुसती नोकरी करावी, इतकेच नव्हे तर त्यासाठी विठाप्पा खंडाप्पा यांच्याकडे पुढील व्यवस्था करून टाकण्याच्या विचारात दादा आहेत हे कळताच वासुदेवराव अस्वस्थ झाले आणि त्यांच्यासारख्या आत्मविश्वास असणाऱ्या तरुणांच्या अंगात जो स्पष्टवक्तेपणा काही वेळा प्रकट होतो, त्याच स्पष्टवक्तेपणाने त्यांनी आपणास ती योजना मान्य नसल्याचेही दादांना सांगून टाकले.

वासुदेवासाठी आपण ठरविलेला विचार अशा प्रकारे उधळला जाईल, अशी बळवंतरावांना कल्पना नव्हती. त्यामुळे वासुदेवाने त्या व्यवस्थेला अमान्यता दर्शवि-ताच त्यांचीही मोठी निराशा झाली. वासुदेवाच्या अंगचा बालपणाचा हूडपणा त्याच्या या हेकेखोरपणामुळे त्याला पुन्हा दुसऱ्या कोठे नेणार तर नाही ना ? या विचाराने त्यांना भीतीही वाटली. ज्याच्या तरुणपणच्या सरळ मार्गाविषयी वडील माणसांना असे भय वाटते, अशा तरुण मुलाच्या संबंधात अशी वडील माणसे जी उपाययोजना करतात, तीच उपाययोजना बळवंतरावांनी या ठिकाणी करण्याचे ठरविले. आणि इथे नोकरी करायची नसेल तर नको करू, पण माझ्या या दुसऱ्या इच्छेप्रमाणे वागण्याचे मात्र तू अमान्य करू नयेस, अशा उपदेशाने त्यांनी त्याला आपला दुसरा मनोदय

कळवला. त्यात वासुदेवाच्या स्वैर वृत्तीला आळा बसावा आणि पहिल्या सुनेचे आगमनही आपल्या घरात लागलीच व्हावे, असा त्यांचा दुहेरी हेतू होता. वासुदेवरावांनी दादांच्या या इच्छेलाही घाईतच ती पूर्ण व्हावी असा रुकार दिला नाही. पण ते विवाहबद्ध होण्यातच या गोष्टीची परिणती झाल्यामुळे वासुदेवाने या विषयात तरी आपले ऐकले याचा बळवंतरावांना आनंद होणे साहजिक होते.

वासुदेवरावांजवळ बळवंतरावांनी विवाहाचा विषय आज काढला होता, तरी त्यांचे त्या विषयीचे प्रयत्न मात्र त्याच्या आधी तीन वर्षे चालले होते. त्या काळात त्यांनी काही मुलीही पाहून ठेवल्या होत्या. ते त्यांचे प्रयत्न वासुदेवरावांच्या पाठीमागे चालले होते असे म्हटले तरी चालेल. त्याचा आता गौप्यस्फोट झाल्यामुळे आता अधिक ताणण्यात अर्थ नाही, असे मानून त्या गोष्टीत वासुदेवरावांनी दादांच्या इच्छेला मान दिला.

शिरढोणकर फडक्यांच्या प्रसिद्ध घराण्याशी संबंध जोडण्यास पुष्कळ घराणी उत्सुक असणारच. उपवर वधूच्या पित्यांच्या त्यासाठी शिरढोण येथे होणाऱ्या फेऱ्या १८५९च्या हंगामात इतक्या वाढल्या की, वासुदेवरावांनाही त्याचा कटाळा आला. त्या काळच्या रीतीप्रमाणे मुलीच्या वडिलांना वासुदेवरावांना मांडी घालून पुस्ती काढून दाखवावी लागे, आणि या हंगामात हे प्रात्यक्षिक वधूपित्यापुढे पुन्हा पुन्हा करताना ते वैतागून गेले. आणि ते आपल्याला आलेला हा कटाळा सांगून वैतागाने उद्गारले "जो येतो तो सासरा!"[१] त्यांना सांगून आलेल्या अशा मुलींची संख्या तीनशेवर गेली. या इतक्या मुली येण्याचे कारण सांगताना वासुदेव बळवंत 'आत्मचरित्रा'त म्हणतात, "इतक्या मुली आल्या याचे कारण, (आमच्या कुळात) कुळाला कलंक लावणारा कुणी (झाला) नाही. (माझ्या) आज्याचा लौकिक फारच मोठा होता. फडके शिरढोणकर म्हणजे सर्वत्रास ठाऊक. आमच्या आज्यानी लाखो रुपये धर्म केला (होता.) त्यामुळे त्याचा लौकिक मोठा (होता)" वासुदेवराव स्वतः मिळवते असल्यामुळेही त्यांच्या स्थळास आणखी एक वैशिष्ट्य प्राप्त झाले होते. पण इतक्या मुली सांगून आल्या तरी त्यातील एकही मुलगी वासुदेवरावाच्या पसतीस उतरली नाही. मुलाने मुलगी नापसत करावी असा काळ अगदी चाळीस पन्नास वर्षांपूर्वीपर्यंत नव्हता. मग त्या आधी सत्तर वर्षे त्यांनी अशी पसंती नापसंती दाखवण्याचा हक्क बजावावा हे जरा विशेष वाटते. कदाचित असामान्य व्यक्तिमत्वाच्या पुरुषाच्या व्यक्तिमत्वाचा हा प्रभाव असेल. पण ही गोष्ट त्यांनी केली असा त्यांच्या हातचाच पुरावा आहे एक एक मुलगी बळवंतरावांनी त्यांना दाखवावी आणि त्यांनी तिला नकार द्यावा आणि तो मिळताच बळवंतरावांनी तो मुलीच्या वडिलांना कळवावा असे चालले होते. या प्रकाराने बळवंतराव चिंतेत पडले. हे असे होण्याचे कारण, वासुदेव-

१ वासुदेव बळवंताचे 'आत्मचरित्र.'

रावांसारख्या महत्त्वाकांक्षी तरुणात आपली सहचरी निवडताना जी दृष्टी असते तीच वासुदेवरावांची होती आणि त्यांना हवे असणारे गुण त्या मुलीमध्ये त्यांना आढळले नाहीत की तिला ते नकार देत होते. त्यांनीच ही दृष्टी आत्मचरित्रात दिली आहे. ते म्हणतात, "वरील पाहिलेल्या मुलीत काही माझ्या पसंत पडणाऱ्या नव्हत्या, काहींची जात कुळी वाईट होती. काहींची गणमैत्री जमत नव्हती. आणि काहींमध्ये माझ्या जीवन सहचारिणीना त्या पात्र ठराव्या असे (उच्च कुळातले) रवत नव्हते."

बऱ्याच मुलींना नकार मिळाला की, मुली सांगून येत नाहीशा होतात असे घडते. ते वासुदेवरावांच्या संबधांत न घडण्याचे कारण त्यांनीच वर दिले आहे. पण तरीही अशा वराचे लग्न त्वरेने जमले नाही तर त्या स्थळाविषयीच लोकांमध्ये टीका होते असा अनुभव आहे. फडक्यांच्या मोठ्या मुलाचे लग्न लवकर जमले नाही तेव्हाही तशी चर्चा लोकांमध्ये होऊ लागली. त्यामुळे आणि आलेल्या इतक्या मुलीतून एकही मुलगी आपल्या पसंतीस पडू नये आणि त्या संबंधात इतका घोळ पडावा याचे स्वतः वासुदेवरावांनाही वैषम्य वाटले आणि त्यांच्या मनात विचार आला, "आपल्या आजोबांचा लौकिक मोठा. तोच बुडविण्यास आपण पुतळे जन्मलो काय? त्या आपल्या घराण्याला काळीमा फासण्यास आपण जन्मलो काय?"

परंतु वासुदेवरावांनाही त्रासदायक वाटणारी ही परिस्थिती पालटण्याचा संभव लवकरच दिसू लागला. इतक्या मुलींना नकार मिळाल्यानंतर त्यांना एक मुलगी अशी सांगून आली की, फडके घराण्यातील सर्वांना ती पसंत पडली. शिरढोणजवळच्या पालेगावचे त्र्यंबक गणेश किंवा दाजीबा सोमण[२] यांची ही मुलगी होय. हे सोमण हे मूळचे मुरूडचे राहाणारे. पण पुढे ते पाले येथे स्थायिक झाले. दाजीबा सोमण पाले येथेच भिक्षुकीचा धंदा करीत असत.[३]

फडके यांचे घराणे चांगले श्रीमंत होते. त्या मानाने हे सोमण घराणे समान योग्यतेचे नव्हते. असे असूनही सोमणांची ही मुलगी वासुदेवरावांनी पसंत केली. याचे कारण पैसा ही त्यांच्या दृष्टीने निर्णायक गोष्ट नव्हती. व्यक्तिमत्व आणि गुण यांच्या दृष्टीने ही मुलगी त्यांनी सुयोग्य वाटताच त्यांनी तिची शेवटी निवड केली. या मुलीचे विवाहापूर्वीचे नाव सई होते.

वासुदेवरावांच्या या विवाहासाठी शिरढोण येथे दादांनी आपल्या प्रतिष्ठेला साजेसा थाट ठेविला होता. पंचक्रोशीतील झाडून सारे ऋणानुबंधी तर त्यांनी या समारंभासाठी बोलाविले होतेच. पण पुण्यामुंबईच्या स्नेह्यानांही त्यांनी या कार्यासाठी शिरढोणास जमविले होते. मग आप्तांपैकी सर्वांनाच आठवून आठवून त्यांनी त्या कार्याचे आमंत्रण दिले होते हे सांगावयासच नको. या विवाहासाठी आणलेल्या

२ वासुदेव बळवंताच्या विवाहाची एक उपलब्ध निमंत्रण पत्रिका
३ "सोमण कुलवृत्तान्त", प्र. ३ रे, पृ. १९४१

सामानाच्या आणि दिलेल्या निमंत्रणाच्या दोन टिपण्या अजून उपलब्ध आहेत. त्या कार्यासाठी किती जाजमे, लोड, बैठकी, भांडी यांची जमवाजमव शिरढोणास झाली होती ते त्यांच्यापैकी एका टिपणीवरुन दिसून येते. या विवाहाच्या आमंत्रणाच्या नावाच्या टिपणीत आपटे, कराडे, तुराडे, अलिबाग, गुळसुंदे, कल्याण, ठाणे, मुंबई इत्यादी ठिकाणच्या निमंत्रितांची नावे आढळतात. कल्याण या मथळ्याखाली वासुदेवरावांचे शाळेतील शिक्षक तात्या गंनोजी यांचेही नाव आढळते.

वासुदेवरावांचा हा विवाह त्यांच्या वयाच्या पंधराव्या वर्षी झाला. त्यांच्या या विवाहाची एक कुंकुम पत्रिका सुदैवाने माझ्या हाती लागली. ती मोडीत लिहिलेली असून बळवंतराव फडके यांनी कोणा 'श्रीमंत रावजी गणेश माधवेव' माना धाडलेली आहे. ही पत्रिका पाहाता हा विवाह शुक्रवारी माघ वद्य ४ या तिथीस शके १७८१ मध्ये झाला, हे निश्चित होते. त्या तिथीस १० फेब्रुवारी १८६० हा दिनांक होता, असे त्या वर्षाच्या पंचांगावरुन पाहाता दिसते.४

शिरढोणचे हे कार्य साजरे करुन फडक्यांचे ऋणानुबंधी लोक आणि नातेवाईक आपापल्या घरी परतले आणि वासुदेवरावही पुणे सोडण्याच्या आपल्या निश्चयाप्रमाणे आता मुंबईस राहण्यास गेले. तेथे पुढे शिकण्याचे सोडून देऊन नोकरी करण्याचे त्यांनी ठरवले. 'ग्रेट इंडियन पेनिन्शुला रेल्वे'च्या म्हणजे आताच्या मध्य रेल्वेच्या कार्यालयापैकी लेखापरिक्षक विभागाने (ऑडिट ऑफिसने) त्याचे लक्ष वेधले आणि तेथे आवेदन करुन प्रतिमासी वीस रुपये वेतनावर लेखनिकाची नोकरी त्यांनी मिळवली. सुरुवातीचे वेतन म्हणूनही हे वेतन त्या काळी चांगलेच समजले जात असे. कारण लेखनिकांचे प्रारंभीचे सर्वसाधारण वेतनच त्यावेळी मासिक सहा सात रुपये असे. लेखनिकाच्या नोकरीचा हा व्यवसाय वासुदेवरावांनी पत्करला खरा. पण त्या नोकरीत त्यांच्यासारख्या नोकराच्या मन:स्वास्थ्याला आवश्यक असणारी पराकोटीची विनम्रता त्यांच्यासारख्या तारुण्याच्या धुंदीत असणाऱ्या महत्त्वाकांक्षी तरुणाच्या अंगी कोठून असणार? त्यामुळे तशा परिस्थितीत वटळ असणारे खटके त्यांच्यात आणि त्यांच्या वरिष्ठात तेथे लवकरच उडू लागले!

सडेघाशांच्या या जगात ज्यानी आपले स्वाभिमान गुंडाळून ठेवले आहेत, त्याना निर्लज्ज सुखाने जगता येते. किंवा दुसरे जे कोणत्याही सत्तेच्या नोकरीवर लाथ मारण्यास सिद्ध असतात त्याना खऱ्या सुखाने त्यात विजय गाठता येतो. मोठा मासा लहान माशास गिळतो हे सत्य मनूने कोणत्या चमत्काराने होऊन सांगितले असेल ते असो! पण लेखनिकांच्या या विश्वात मात्र ते अगदी ढळढळीत प्रत्ययास येते. सर्वश्रेष्ठ अधिकाऱ्यांनी आपल्या सहाय्यक अधिकाऱ्यांना ताणावे, त्यांनी हाताखालील मुख्य लेखनिकांवर आग पाखडावी, आणि मुख्य लेखनिकांनी मग दुय्यमच्या लेखनिकां-

४ गणपत कृष्णाजी याचे पंचांग, शके १७८१

ना धारेवर धरावे, हा अशा जगात नित्याचा नेम असतो. या शेवटच्या वर्गात बहुधा उसळत्या रक्ताच्या तरुणांचा भरणा असल्यामुळे शेवटच्या दोन वर्गात खटके उड-विणाऱ्या झटापटीस पुष्कळदा जो रंग चढतो तो काही बहारदार असतो.

वासुदेवरावांनी लेखनिकाचा पेशा पत्करला होता. पण तो पत्करल्यामुळे इतरांप्रमाणे त्यांनी आपले सारे स्वाभिमान गुंडाळून ठेवले नव्हते. खर्डेघाशीत सर्वस्व मानणाऱ्या तरुणांपैकी ते नव्हते. लेखनिकांच्या व्यवसायात तात्पुरता प्रवेश करूनही ज्यांनी उच्च आकांक्षा हृदयात बाळगलेल्या असतात, अशा तरुणांपैकी ते एक होते. त्यामुळे त्यांची करारी वृत्ती त्या ठिकाणीही गाजू लागली.

आणि होता होता तेथे असा प्रसंग लवकरच आला. त्यांच्या कार्यालयातील मुख्य लेखनिक (हेड क्लार्क) इतर ठिकाणच्या मुख्य लेखनिकाप्रमाणेच अधिकारी वृत्तीचे होते. पण त्यात बळवंतराव नावाच्या मुख्य लेखनिकांनी त्या क्षेत्रात विशेष नाव कमाविले होते. हे गृहस्थ भंडारी जातीचे होते. त्या काळात त्यानी मुख्य लेख-निकाचे पद गाठले यावरून त्यांची कर्तबगारीच दिसून येते. पण आपल्या हाताखाल-च्या लोकांना संभाळून घेऊन गोडीगुलाबीने काम करून घेणे हे त्यांच्या स्वभावात नव्हते. हाताखालच्या लोकांना त्यांचे मूल्य खरे किती कमी आहे या विषयावर वारंवार स्वतःची भाष्ये ऐकविण्यात बळवंतरावांचा फार वर क्रमांक लागत असे. वासुदेवरावांसारखे काही लेखनिक तेथे स्थिर करण्यात आले तेही त्यांना आवडले नाही. "येथल्या कारकुनाची खरी किंमत महिना पाच रुपये सुद्धा नाही. त्यास कोणी बाहेर पाच रुपयेसुद्धा देणार नाही, येथेच म्हणून हे लोक टिकले आहेत. येथील कार-कुनांपैकी कोणीही कायम होण्याच्या लायकीचा नाही," अशी मुक्ताफळे त्यांच्या तोंडून नेहमी बाहेर पडत असत. त्यांची ही मुक्ताफळे त्यांचे काही कनिष्ठ सहकारी अगतिकत्वाने ऐकत. दुसरे काही खालच्या आवाजात प्रतिटोले हाणीत, छद्मी हसत. वासुदेवराव हे त्या कार्यालयात जरी ठाम झाले होते आणि त्यामुळे त्यांच्यावर अशा बोलण्याचा काहीच प्रत्यक्ष परिणाम होण्यासारखा नव्हता तरीही बळवंतरावांची ही मुक्ताफळे त्यांच्या स्वाभिमानी वृत्तीमुळे त्यांना सहन करविली नाहीत. तडका-फडकी प्रत्युत्तरे देणारा हा लेखनिक आपल्या या वेळच्या बोलण्यावरही शांत कसा रहात आहे, याचे बळवंतरावांना अशा एका प्रसंगी आश्चर्य वाटले आणि आपले म्हणणे फडकेसुद्धा इतरांप्रमाणेच आता ऐकून घेतो अशी त्यांची निश्चिती होऊ लागली. पण त्यांची अशी निश्चिती होते न होते तोच एक दिवस वासुदेवरावांनी त्यांना आश्चर्याचा चांगलाच धक्का दिला. ती नोकरी सोडून दुसरीकडे जाण्याची त्यांची आधी काही दिवस खटपट चालली होती आणि दुसऱ्या ठिकाणचे नोकरीचे एक निमंत्रणपत्र त्यांच्या लवकरच हातीही पडले. ते खिशात टाकून ते बळवंतरावा-पुढे जाऊन उभे राहिले. त्यांचा तो आवेश पाहून नित्याप्रमाणे पुन्हा स्वारीच्या

तापटपणाला आज वळ पडले आहे, असे वळवंतरावांना वाटले. त्यांनी बोलण्याच्या भरात आपल्या हाताखालील लेखनिकांच्या योग्यतेविषयी काही उद्गार काढताच वासुदेवराव त्यांना म्हणाले, " तुमच्या मताप्रमाणे माझी महिना पाच रुपये किंमत नाही, असं जरी तुम्हाला वाटत असलं, तरी बाहेर माझी दरमहा तीस रुपये किंमत झाली आहे. सर्वच जण सारख्याच योग्यतेचे असतात, असं समजत जाऊ नका. मला तुमच्या सर्टिफिकेटाची जरुरी नाही आणि माझ्या पगाराविषयी आणि भत्याविषयी म्हणाल तर तो आधीच बुडाला आहे. बरं आहे! आता तुम्हाला आमचा रामराम!" असे म्हणून वासुदेवराव आपल्या पहिल्या नोकरीच्या त्या कार्यालयातून बाहेर पडले.

रेल्वे कंपनीमधील ही नोकरी वासुदेवरावांनी बारा महिने केली. ती नोकरी सोडण्याच्या आधी वासुदेवरावांनी काही काळ तेथे अधिक काम (ओव्हरटाईम वर्क) केले होते. त्याचे आणि त्यांच्या वेतनाचे काही मिळून साठ रुपये रेल्वे कंपनीकडून त्यांना येणे होते. त्यांच्यावर नव्या नोकरीच्या पायी त्याना पाणी सोडावे लागले.

दुसऱ्या दिवशी रेल्वे कंपनीच्या बोरीबंदरच्या कार्यालयाकडील रस्ता सोडून ठाकुरद्वार येथून त्यांनी विरुद्ध दिशेला तोंड वळविले. मुंबईतील सर्वात जुन्या आणि सुसज्ज वैद्यकीय महाविद्यालयाच्या कार्यालयाकडे म्हणून त्यांनी ग्रँट मेडिकल कॉलिजच्या कार्यालयाकडे मोर्चा वळविला. त्या कार्यालयात त्याना प्रतिमास तीस रुपये वेतनावर घेण्यात आले होते. ते तेथे यापुढे लेखनिक म्हणूनच कामाला होते. ग्रँट मेडिकल कॉलिज हे विद्यार्थ्यांना रोगविद्या आणि शल्यचिकित्सा शिकवणारे महाविद्यालय होते. त्यामुळे वासुदेवराव त्या महाविद्यालयात होते असे माहीत होताच, त्यांनी तेथे काही काळ रोग विवेचनाचा अभ्यास केला असा काहींची समजूत झालेली आहे. पण ती खरी नव्हे. १८६१मध्ये ते येथे नोकरीला लागले ते पुढे दोन वर्षे तेथे होते. १८६२च्या शेवटी मात्र त्याना या कार्यालयात वरेच दिवस कामावर जाता आले नाही.

आपली प्रकृती सुधारण्यासाठी ते मुंबईबाहेर जाऊन राहिले. यावेळी त्यानी वाई, सातारा इत्यादी ठिकाणी पुष्कळ दिवस काढले आणि पंढरपूरसारख्या क्षेत्राच्या गावीही जाऊन ते काही दिवस राहिले आणि मग ते नोकरीवर पुन्हा जाण्यासाठी मुंबईला परतले.

ग्रँट मेडिकल कॉलेजमध्ये नोकरी करीत असताना वासुदेवराव मागे उल्लेखिलेल्या गोविंदराव गोपाळ करमरकरांकडे फणसवाडीत जगन्नाथाच्या चाळीत राहात. हे करमरकर अनंत नीळकंठ अर्थात दाजिबा पिटकर यांचे मावस भाऊ होत. अनंत पिटकर म्हणजे 'अनंत' या नावाने टिळकांच्या वेळी 'केसरी' मध्ये मुंबईहून बातमीपत्रे लिहिणारे पिटकर होत. ही पत्रे तेव्हा फार खळबळजनक समजली जात. पिटकर होते शासकीय नोकर. पण हे त्याचे पत्रलेखन अशा गुप्तपणे होत असे की, शासकीय सेवा त्यांनी त्याच्या आड येऊ दिली नाही. सरकार त्यांचे काही एक वाकडे करू शकले नाही. पिटकराच्याच खोल्यात करमरकरांचे वास्तव्य असे. करमरकरांच्या बिऱ्हाडात आणखीही काही तरुणांची येजा चालू असे. करमरकरांच्या बिऱ्हाडात पहिल्या खोलीत एक कोनाडा होता. त्यात मुंबईत कोठेतरी राहून दिवस काढणाऱ्या तरुणाची आलेली पत्रे ठेवलेली असत. कारण त्यांनी पत्रव्यवहारासाठी म्हणून इतराना आपला पत्ता करमरकर याच्या बिऱ्हाडाचा दिलेला असे. प्रत्यही जो तो आपले टपाल तेथून घेऊन जाई. या ठिकाणच्या गाठीभेटीमुळे करमरकराकडे राहणाऱ्या आणि वरील इतर तरुणांचा संलग्न गट निर्माण झाला होता. वासुदेवरावांचे धाकटे बंधू कृष्णराव मुंबईत आले तर करमरकराकडेच उतरत. वासुदेवरावांनी अज्ञातवासात असतानाही जी पत्रे बंधूना धाडली ती या करमरकरांच्याच पत्त्यावर होत.[५]

करमरकरांप्रमाणेच दुसरेही एक गृहस्थ मुंबई येथे वासुदेवरावाना निकटवर्ती वडिलधारे म्हणून झाले. त्यांचे नाव विनायकराव पराडकर असे होते वासुदेवराव ग्रँड मेडिकल कॉलेजमध्ये होते, त्यावेळी पराडकर मुंबईत एका युरोपियन कंपनीत मोठ्या अधिकारावर होते. त्यांच्या कंपनीचा मुख्य जॉन्स्टन म्हणून एक युरोपियन होता. पराडकराचे एक स्नेही जगन्नाथ विसाजी पेंढरकर हे त्या वेळी कॉमिसारियट एक्झामिनरच्या कार्यालयात नोकरीला होते. त्या कार्यालयाचा मुख्य सहाय्यक (हेड असिस्टंट) मॅलिन्स नावाचा युरोपियन होता. जॉन्स्टन आणि मॅलिन्स याचा निकटचा स्नेह होता आणि ते एका बंगल्यात राहत होते. पेंढरकराच्या मनात आपल्या भावाला आपल्या कार्यालयात नोकरीला लावावयाचे होते. त्यामुळे जॉन्स्टन यांनी मॅलिन्सकडे या प्रकरणात तसा शब्द टाकला तर आपल्या भावाला तेथे नोकरी

५ 'राणीचा माफीदार' रघो मोरेश्वर महाजन याची दंडाधिकारी केमर याच्यापुढील साक्ष; दि. २३ ऑक्टोबर १८७९

मिळेल अशी असे पेंढरकराना वाटले आणि त्यामुळे त्यानी पराडकराना जॉन्स्टन याजकडून मॅलिन्स यास देण्यासाठी म्हणून तसे अनुरोधपत्र मिळवण्याची विनंती केली.

पण त्यांची ही विनती ऐकताच पराडकराच्या मनात आले की, आपण दुसऱ्याच्या नातलगाला त्या ठिकाणी चांगली नोकरी मिळवून देत आहोत तर मग वासुदेवासाठीच ती का मिळवू नये? आणि मग त्यानी वासुदेवरावानाच बोलावून विचारले, "तू कॉमिसारियट खात्यात नोकरी करण्यास तयार आहेस काय? असशील तर सांग म्हणजे मी जॉन्स्टनसाहेबांच्या मार्फत मॅलिन्ससाहेबाला सांगतो आणि ती जागा तुला मिळेल."

या सूचनेला वासुदेवरावानी संमती दिली. त्यांचा होकार मिळताच पराडकरानी जॉन्स्टनसाहेबाला तसे सांगितले आणि ते काम नीट जुळून आले. वासुदेवरावांनी मग ग्रॅंट मेडिकल कॉलेजमधील आपली नोकरी सोडली आणि "कॉमिसायट एक्झामिनर"च्या (सेनासामुग्री निरीक्षकाच्या) कार्यालयात दुसरी नोकरी धरली. या ठिकाणी त्याना प्रारंभवेतन प्रतिमास तीस रुपये मिळाले. तेथे दोनच महिन्यात त्यांनी आपल्या कामाने वरिष्ठांवर चांगलीच छाप पाडली. त्याने संतुष्ट होऊन मॅलिन्सने त्याची पुण्याला पाठवणी करण्याचे ठरवले आणि १८६५ च्या संधीला पुण्याला सैनिकी लेखानियंत्रक (कंट्रोलर ऑफ मिलिटरी अकाऊंटस) यांच्या हाताखाली असलेल्या सैनिकी अर्थ (मिलिटरी फायनान्स) विभागात नवीन जागेवर जाण्यासाठी वासुदेवरावानी मुंबई सोडली. यानंतर चिरंतन वास्तव्यासाठी ते मुंबईस पुन्हा कधीच आले नाहीत. कारण, पुण्यास गेल्यावर त्यांचे भावी जीवन क्रांतिकारक उलाढालींनी व्याप्त झाले आणि त्या क्रांतिकारक प्रयत्नांच्या दाहक ज्वालेमध्येच अंती त्यांनी आपल्या सर्वस्वाची आहुति दिली.

* * *

## प्रकरण ४ थे

# मातृवियोगाचे असह्य दुःख!

प्रेमस्वरूप आई! वात्सल्यसिंधु आई
बोलावु तूज आता मी कोणत्या उपायी?
सारे मिळे परंतु आई पुन्हा न भेटे,
तेणे चिताच चित्ती माझ्या अखंड पेटे!

—माधव ज्यूलियन

१८६५ मध्ये वासुदेव बळवंत ज्या पुण्यात गेले, त्या पुण्याची आजच्या पुणेकरांना सहज कल्पना येणार नाही. पुण्याच्या पश्चिम भागात आज जी श्रीमंत लोकांच्या प्रासादांची वसाहत झाली आहे, ती त्या वेळी अस्तित्वात नव्हती. नरसिंहाच्या देवळाच्या भागाला त्यावेळी कारकोळपुरा म्हणत. त्या देवळापासून फर्ग्युसन टेकडीपर्यंतचा पश्चिमेकडील सर्व भाग गर्द रानाने भरलेला होता. इतका की, सायंकाळनंतर त्या बाजूला कोणी फिरकू नये. त्या बाजूला झालेला राजमार्गही तेव्हा नव्हता. गुप्त कट करणाऱ्यांना आणि एकातात बोलणी करणाऱ्या गुप्त मंडळाच्या सदस्यांना त्या भागात हवे तसे वातावरण त्यामुळे मिळत असे.

गावातील घरे आता दिसतात तशी अद्यावत पद्धतीची फार प्रमाणात दिसत नसत. जुन्या वाड्यांनीच पुण्याचा सर्व भाग भरून गेलेला होता. त्या वाड्याची भक्कम दारे हीसुद्धा अलीकडील काळातील आहेत. बहुधा वाड्यांच्या बाहेरच्या बाजूला गाईचे आणि दुभत्या गुरांचे गोठे असत. ही गुरे आता कोठेच दिसत नाहीत. विजेचा झगझगाट घरातून दिसावयाचा नाही. त्याच्या जागी अंधुक प्रकाश फेकणाऱ्या तेलाच्या दिव्याच्या हंड्या आणि झुंबरे आणि जुन्या तऱ्हेचे इतर दिवे असत. ओटीवर स्वच्छ पांढऱ्या चादरी आणि अभ्रे घातलेल्या गाद्यातक्क्याची बैठक असे. टेबल खुर्च्या फारच थोड्या घरात विशेष लोकांसाठी असत. वाड्यातच किंवा बाहेर लागून विहिरी असत. त्याचे पाणी पिण्यास आणि इतर व्यवहारांसाठी वापरत असत. नळ फार निवडक श्रीमंत घरांतून असत. अंगणात त्या बाजूची फुलझाडे आणि फळझाडे किंवा औषधी वनस्पती लावलेल्या असत आणि अंगणात स्वच्छ सारवलेली भुई मोठी सुंदर दिसे. श्रीमंत घरातून फरसबंद जमीन दिसे.

पुण्यातील रस्ते तर अगदी अलीकडे अलीकडे नवीन बांधणीचे झाले आहेत.

त्यावेळी गावात संलग्न राजमार्ग असा एखादाच होता. आता जसे आपण कोणत्याही रस्त्यातून निघालो की, अडथळा न ओलांडायला लागता, गल्ल्या ओलांडीत वाटेल त्या रस्त्यावर पुण्यात जाऊ शकतो, तशी स्थिती त्यावेळी पुण्यात नव्हती. कारण गावात रुंद रस्ते फार नव्हते. आणि अरुंद रस्ते आणि गल्ल्या याही दुबाजूस उघड्या नव्हत्या. गल्ल्याची तोंडे वेशीनी बंद केलेली असत. प्रत्येक गल्लीच्या दोन्ही तोंडाशी एक लहान दार असे. त्याला फटका म्हणत. या वेशी नि फटके लाकडाचे बनविलेले असत. त्यावेळी पोलीस चौक्याही मोक्याच्या जागा साधून बसवलेल्या असत. त्यांना गेट किंवा मुख्य ठाण्यास चावडी म्हणत. उदाहरणार्थ अप्पा बळवंताचे गेट, बुधवार गेट, मुरलीधराचे गेट, कोतवाल चावडी. या ठाण्यावरच शस्त्रसज्ज शिपाई असत. आताप्रमाणे फक्त मुख्य पोलीस केंद्रावरच ते नसत. पुण्यातून हिंडताना हे अडथळे बाजूला सारून हिंडावे लागे. पुण्यात येताना ज्या चार मुख्य वाटा होत्या त्यांच्या तोंडाशीही ही ठाणी होती. त्या वेळचा लकडी पूल, (आताचा संभाजी पूल) वंड गार्डनचा रस्ता, स्वार गेट आणि साचापीर रस्त्याचे नाके या त्या चार वाटा होत. एवढा बदोबस्त होता तरी गावात चोऱ्या करणारे भामटे असतच. ते बहुधा गावा-बाहेरच रहात. पण दिवस उजाडल्यावर गावात येत. रात्री सहसा ते गावात रहात नसत. गाव लहान, तेव्हा त्याचे अस्तित्व कळणे सोपे असावे. पण ते आपल्या कलेत पारंगत असत. त्याकाळी असलेल्या जरीच्या पागोट्याचा अस्सल जर, मनगटी किंवा कडी, बिंदल्या, हसळ्या, साखळ्या असले दागिने ते हातोहात लांबवत. या त्यांच्या कौशल्याची अप्रत्यक्ष प्रशंसा म्हणूनच पुणेरी भामटा हे शब्द अट्टल भुरटा चोर अशा अर्थाने दुसऱ्या महायुद्धापर्यंत सर्वत्र वापरले जात !

अशा रस्त्यावरून पुण्याचे सर्वसाधारण वाहन म्हणून प्रसिद्धी पावलेली दुचाकी चालणे शक्य नव्हते आणि ती तेव्हा अस्तित्वातही नव्हती. दुचाक्या पुण्याच्या रस्त्या-वर यावयाला बरीच वर्षे जावयाची होती. मग त्यांच्याहूनही अधिक आधुनिक स्वयं-वाहिका (मोटारी) तेथे धावू लागलेल्या नव्हत्या हे सांगणे नकोच. गावात सर्वोत्तम वाहन म्हणजे बैलाचे छकडे आणि त्याहून अधिक श्रीमंती वाहन म्हणजे घोड्याचे टांगे किंवा शिग्रामी होत. श्रीमंतांनी चार चाकी एका घोड्याची उंची गाडी ठेवावी किंवा अधिक वैभवसंपन्न लोकांनी दोन घोड्यांची चार चाकी ठेवावी. तिला धमणी किंवा फैटणही म्हणत. यापेक्षा अधिक वैभवातील लोक मेण्यातून किंवा पालख्यातून मिरवत असत. नुकत्याच सुरू झालेल्या रेल्वेच्या पुणे स्थानका बाहेर बैलांच्या पाचपन्नास छकड्यांचा ताडा गावात भाडे करण्यासाठी उभा असे आणि त्यानीच गावात वा स्थानकावर सर्वसाधारण लोक ये जा करीत.

पुण्याचे नागरिकही त्या काळातील प्रचलित पोषाख करीत. सरदाराचे फेटे किंवा पगड्या सोडल्या तर शिरोभूषणे म्हणून पागोटी किंवा डोक्याला बांधण्याचे

रुमाल प्रतिष्ठित समजण्यात येत. तारुण्याच्या भरातील रुवाबदार तरुण लोक फेटेही डोययाला बांधत. त्या वयापर्यंत कादिमरी टोप्या चौफेर वापरात होत्या. बोडक्याने हिंडणे म्हणजे काही अशुभ घटना घडली तरच होत असे. मुलांच्या अंगात सदरे आणि आखुड कोट नि मोठया माणसांच्या अंगात अंगरखे किंवा बंडाच्या बाराबंद्या असत. सर्व प्रौढ लोक धोतर नेसत. पाटलोण, शर्ट आणि जाकीट हा अगदी हातावर मोजण्याइतक्या प्रौढ सुधारकांचा वेष असे. पण तेही त्यावर टोपी किंवा पगडी घालीत किंवा रुमाल बांधत. ते बूट मोजे वापरीत. पण इतर प्रतिष्ठित लोकांच्या पायात लाल भडक पुणेरी जोडा अजून बराच काळ मिरवणार होता. तरुणांपैकी काही वहाणा वापरीत. बायकांनी घराबाहेर पडून फिरणेच फारसे दिसत नसे. मग त्यांनी पायात चपला घालून फिरण्याचा प्रश्नच नव्हता.

मनगटी घड्याळे कुठेच दिसत नसत. होती ती खिशात ठेवण्याची जरा मोठ्या आकाराची साखळीची घड्याळे. ती निवडक प्रतिष्ठितांच्या खिशात असत. बूट, पाटलोणवाले लोक त्यांचा छडा रुबाबदारपणे छातीवर वागवीत, ती खिशात ठेवीत आणि ऐटीने बाहेर काढून त्यात वेळ पाहत. बाकी वेळ समजण्यासाठी प्रत्येक पोलिस ठाण्यावर दोन कप्पे असलेली वाळूची घड्याळे असत. अर्धा तास झाला की ती उलटी करून ठेवण्यात येत. कारण वरच्या कप्प्यातील वाळू खालच्या कप्प्यात घसरत घसरत पूर्णपणे पडावयाला अर्धा तास लागे. मग ती पुन्हा उलटी करून ठेवण्यात येत. अशा प्रत्येक तासाला ठाण्यावरचा शिपाई एका तासावर टोले देऊन किती वाजले ते नागरिकांना घोषित करी. दुपारी १२ वाजता आणि रात्री ९॥ वाजता मोठी तोफ उडे. त्यामुळे सगळ्या गावाला ती वेळ मात्र कळत असे. दुसऱ्या महायुद्धापूर्वी विजेचे दिवे बारीक होऊन नऊ वाजले हे पुणेकर समजत असत आणि आपापली घड्याळे नीट लावत असत. पण ते काम रात्री ९॥ ची तोफच त्या काळात करी. ही तोफ पहिल्या महायुद्धानंतर बंद झाली. काही घरांत, ओटीवर, टोले देणारे प्रत्यही किंवा आठ दिवसांनी किल्ली देण्याचे घड्याळ असे. त्याचा जवळजवळ त्या टापूतील सर्व लोक वेळ पहाण्यासाठी उपयोग करीत. जीवन घाईचे नव्हते, संथ होते. त्यामुळे बहुधा उन्हाच्या चढउतारावरूनच लोक अदमासाने वेळ ओळखीत.

सकाळी उठताच चहासाठी कपबश्यांची खणखण फारच थोड्या घरात होई. मग दुपारी कुठे ऐकू येणार? शाळेत जाणाऱ्या मुलांना किंवा कामावर जावयाचे असेल त्यांना तसे पेय न घेताच बाहेर पडावे लागे. कारण मुलांना आणि इतरांना पहाटे उठूनच सर्व दिनक्रम सुरू करावा लागे. म्हणाइत लोक सोडले तर पहाटेनंतर अंथरूणात लोळत पडणारे लोक दिसणे कठीणच होते. मुलांच्या शाळा सकाळी आणि दुपारी भरत. अकरा ते पाच नव्हे. अभ्यासाची घोकंपट्टी आणि पाठांतरे पहाटे उठून त्यांना करावी लागत. त्यात ईशस्तुतीपर पदांपासून तो कविता आणि पुढे रूपावली, समासचक्र, अमरकोश, रघुवंश, वाढत्या वयाप्रमाणे पाठ करावी लागत. स्नानाला

ऊन पाण्याची सुखसोय पाहिली जात नसे. गल्लोगल्ली त्यावेळी हौद असत. त्यातील सदाशिव पेठेच्या हौदासारखे अजून काही प्रत्यक्षात आहेत. त्या हौदावर बारा महिने गार पाण्याने स्नान करून स्वत ची धोतरे पंचे आणि इतर कपडे स्वतः धुण्याची शिस्त बहुतेकांना असे. धोब्याकडे देऊन भट्टीचे कपडे वापरणारा अपवादात्मक श्रीमंत किंवा उच्चपदस्थच असे. शाळेत जाताना मुले वाळवाटी खाऊन जात. दुपारी घरी आल्यावर जेवण करून पुन्हा शाळेत जावे लागे. मौजीबंधन झालेल्याना स्नानानंतर संध्या पूजा करावी लागे. जेवणाचे वेळी वैश्वदेव होई. या लोकांच्या मुलाना रुद्र, सौर, पवमान शिकवीत. त्याच्या अंगावर कपडे असले तर सदरा, टोपी आणि लंगोटी नि पुढे पंचा असे. प्राथमिक शाळा बहुधा तात्या पंतोजीच्या असत. दसरा किंवा पाडवा या मुहूर्तावर लहान मुलाना शाळेत घालत. धूळपाटीवर शिक्षण सुरू होई. पुढे खड्यांवर अक्षर गिरवले जाई. संस्कृतच्याही पाठशाळा असत. इंग्रजी शिक्षणाने मुले बिघडतात अशीच बहुतेकांची समजूत असे. त्यामुळे इंग्रजी शिक्षणाचा प्रसार बेताबाताचाच होता. खालच्या इयत्तात शाळेत परवचा म्हणून पाढे ठेक्यात म्हणण्यात किंवा सुस्वर स्वरावर कविता म्हणण्यात एकादा तास जाई! खड्यांवर अक्षर गिरवण्यास पुस्तीची मांडी घालून मुलाना बसावे लागे. म्हणजे डाव्या पायावर उजव्या पायाचा गुडघा मुडपून उजवा पाय वाकवून मागे नेऊन त्याच गुडघ्यावर पुष्टीपत्रावर कागद ठेवून लिहिण्याचा परिपाठ असे. मोडी लिपी ही शिकावीच लागे. त्या लिपीत सुंदर अक्षरात मराठी भरभर लिहिता येत असे. त्यामुळे कार्यालयातून आणि न्यायालयातून तिचा बराच वापर असे. पुस्तीमुळे मुलाचो अक्षरे वळणदार होत. अकरक्या एकोत्र्यापर्यंत पाढे पाठ असल्यामुळे मुले तोंडी हिशेब अचूक करण्यात पटाईत असत. नाठाळ, मठ्ठ किंवा अभ्यास चुकवणाऱ्या विद्यार्थ्यांना गुरुजींचा कडक मार बसे. तोही पचवणारे निगरगट्ट विद्यार्थी असत. पण त्याविरुद्ध पालकांकडे गाऱ्हाणे नेण्याची मुलांची छाती नसे. कारण, पालकच मुळी 'छडी लागे छमछम् विद्या येई घमघम्' ही तत्कालीन म्हण म्हणून दाखवणारे असत. आणि गुरुजीना मानही तसाच असल्यामुळे ते काही अयोग्य करतील असी कुणाचीही भावना नसे.

पुण्यात त्या काळी इंग्रजी शाळा अशी एक बाबा गोखल्यांची आणि १८४८ पासून पुढे महात्मा ज्योतिबा फुल्यांनी काढलेली मुलींची आणि अस्पृश्य मुलांची शाळा होती. नंतर मग 'पूना हायस्कूल' ही सरकारी शाळा सुरू झाली. त्या शाळेत क्रमिक पुस्तके कित्येक वर्षे बदलत नसत. त्या पुस्तकात राजनिष्ठेचे धडे असत. मिशनऱ्याच्या शाळेत तर शिवाजीविरुद्ध तो लुटारू होता किंवा गायीला आत्मा नसतो अशी शिकवण उघड उघड उघंड दिली जात असे..

सायंकाळी शाळा सुटल्यावर मुले खेळायला जात किंवा तालमीत जात. खेळात क्रिकेटसारखा विदेशी किंवा महागडा खेळ त्यावेळी सर्रास झालेला नव्हता. आट्यापाट्या, हुतुतू, खोखो, चेंडूफळी, बदाबदी, लगोरी, सूरपारंब्या हे पैसा न लागणारे

पण भरपूर व्यायाम देणारे खेळ मुले खेळत. आखाड्यांत जोरबैठका, जोडी, मल्लखांब हे व्यायाम आणि लाठीकाठी, बोथाटी, फरीगदगा (तलवार, बीटा त्याचेच प्रकार होते.) यांचे हात तरुण लोक करीत. पण यात फार प्रावीण्य दाखविणे बंडखोरपणाचे समजले जाई. तलवारीचे हात किंवा निशाण मारणे हे सरकारच्या डोळ्यावर येई. फार काय, अतिशय सुदृढ असणे आणि धोतराचा काचा मारून फिरणे हे पोलिसांना आक्षेपार्ह वाटे. हे खेळ आणि व्यायाम आटोपून मुलांना दिवे लागणीच्या आत घरी परतावे लागे.

करमणुकीच्या साधनात चित्रपट बोलपट हे कल्पनेतही नव्हते. नाटकाची चलती अजून व्हावयाची होती. देवळांत सायंकाळी प्रवचने आणि रात्रीची कीर्तने यांत लोकांना प्रबोधनही होई आणि त्यांचा त्यांच्यामुळे करमणुकीतही वेळ जाई. देवादिकांचे उत्सव वेळोवेळी होत. त्यांचा आनंद सर्वांना फार वाटे. पुण्यात देवळांना तोटा नसे. त्यामुळे हे उत्सव फार गाजत. तरीपण लोक काही विचित्र करमणुकीचा आनंद उपभोगत असतच. उदाहरणार्थ, एके शनिवारी रामेश्वराच्या देवळापासून 'ज्ञानप्रकाश'च्या कार्यालयापर्यंत भर वस्तीत बोकडांच्या जोड्यांच्या टकरा लावण्यात आल्या. लोकांचा मोठा जमाव त्या पहाण्यास जमला. नि रस्त्यावरील बहातुकीस अडथळा झाला. शेवटी मारामारीही झाली. तेव्हा हा वृत्तांत प्रसिद्ध करून त्यावेळी पोलीस मात्र कुठेच दिसले नाहीत, असे गाऱ्हाणे 'ज्ञानप्रकाश'ने केले.

आताप्रमाणे पुण्यात ठिकठिकाणी टपालपेट्या नव्हत्या. पत्रे टाकण्यासाठी एकच टपालपेटी होती. प्रथम तेही एकाच ठिकाणी शारपिरावर घेण्यात येत असे. लोकांना पिरावर जाण्याचा त्रास नको म्हणून ते आता बुधवार गेटावर घेण्यात येईल आणि त्यासाठी एक लेखनिक ठेवला आहे असे १८५४ मध्ये घोषित करण्यात आले. कार्डाला टपाल तिकीट आता दहा पैशाचे लागते. त्यावेळी कार्ड पैशात जाई. पुण्यात एकच प्रमुख एतद्देशीय वर्तमानपत्र होते—'ज्ञानप्रकाश'. त्याचे कार्यालय शुक्रवार पेठेत बारामतीकरांच्या वाड्यात असे. रस्त्यावर दिवे असे असत की, ते पहावयालाच दिवा घ्यावा लागावा. संभावित लोक आपले मशालजी घेऊनही रात्री बाहेर पडत.

गावाला जावयाचे तर आताप्रमाणे राज्यपरिवहनाच्या स्वयंवाहिका नव्हत्या. बैलगाड्यातून प्रत्यही सात आठ मैल प्रवास करीत, चोरदरोडेखोरांचे भय बाळगीत लोक प्रवास करीत. नाही म्हणायला टपालाचे टांगे पुण्याहून जवळच्या गावी माणसांना नेत. पुणे ते महाबळेश्वरला शुक्रवार पेठेतील एका टांग्याचे भाडे त्या वेळचे रु. १६ असे. त्या वेळचे १६ रुपये म्हणजे आताचे रु. १६० तरी होतील. हे टांगे टप्प्याटप्प्यावर घोडी बदलीत जात.

१८६५ मध्ये वासुदेव बळवंतांनी अशा पुण्यात पदार्पण केले. पुण्यातील त्यांच्या

निवासस्थानाविषयी निरनिराळ्या वाड्यांची नावे प्रचलित आहेत. ती सर्व साधार आणि विश्वसनीय आहेत. पुण्यात आल्यावर त्यांचे बिऱ्हाड प्रथम भट गुरूंच्या वाड्यात होते.[1] भिकारदास मारुती रस्त्यावरचा सध्याचा ६६२ अ आणि ६६२ ब जुना किंवा १३७२ नवा या क्रमांकाचा सदाशिव पेठेतील सध्याचा वाडा तोच हा वाडा होय. हे भट गुरू देवीभक्त होते. त्यामुळेच अध्यात्मनिष्ठ वासुदेव बळवंतांची पुण्यात आल्यावर निवासस्थानासाठी त्या वाड्याकडे दृष्टी वळली असणे शक्य आहे. या वाड्यात वासुदेव बळवंतांचे बिऱ्हाड काही दिवसच होते. भट गुरू बुवा असतील. पण राजकीय विचारात क्रांतिकारक म्हणून प्रख्यात नव्हते. आणखी म्हणजे त्यांच्याविषयी दुसरे बरेच मजेचे वृत्तांत लोकांच्या तोंडून ऐकायला मिळत. त्या वृत्तांतात वासुदेव बळवंतांना काही रस नव्हता. इतकेच नव्हे तर पक्की अरुचि होती. त्यामुळे असेल, किंवा आपल्या गूढ क्रांतिकारक कृत्यांसाठी तशीच सोयीस्कर जागा त्यांना हवी असेल म्हणूनही, पण त्यांनी नंतर आपले बिऱ्हाड चारकोळपुऱ्यातील नरसोबाच्या देवळात हालविले. या देवळाचा बहुतेक थाट त्या काळात होता तसाच अजून आहे. पण त्याच्या आवारात मात्र आता बरेच नवे बांधकाम झालेले आहे आणि मोकळी जागा फारशी दिसत नाही. आपण या देवालयाच्या प्रवेश द्वारापाशी उभे राहिलो की, देवालयाच्या मंडपाच्या उजव्या बाजूला दिसणाऱ्या बिऱ्हाडांच्या जागेवर त्या वेळी असणाऱ्या दोन खोल्यात वासुदेव बळवंतांचे वास्तव्य होते. १९४५ मध्ये मी या जागेला भेट दिली तेव्हा तेथे त्या खोल्यांची जुनी एकच भिंत उभी होती. पण मला अगत्याने तेथे नेऊन देवालयाचे त्या वेळचे एक वृद्ध धनी विश्वनाथ सदाशिव किंवा तात्या जोशी यांनी ती जागा मला दाखविली. आणि ते म्हणाले, "इथेच ते (वासुदेव बळवंत) बरीच वर्षे राहात असत." त्यांनी वासुदेव बळवंतांना आणि त्यांच्या दुसऱ्या पत्नीला त्या बिऱ्हाडात राहाताना पाहिलेले होते. वासुदेव बळवंतांच्या पत्नी बाई फडके तर त्यांना जवळच्या वाटत.[2] त्याकाळी शेजाऱ्याशेजाऱ्यात किंवा धनी बिऱ्हाडकरूमध्ये अशी जवळीक असे. या निवासस्थानाचा वासुदेव बळवंतांनी स्वतःच उल्लेख करून ठेवलेला आहे.[3] त्या खोल्यात त्यांचे बिऱ्हाड होते आणि देवळात शिरताच उजव्या हाताला जी काहीशी काळोखी खोली दिसते त्या खोलीत त्यांच्या सवंगड्यांशी किंवा भेटीला येणाऱ्याशी गप्पा गोष्टी किंवा गुप्त सल्लमसलते करण्याची बैठक असे. आताच्या क्रांतीवीर वासुदेव फडके रस्त्यावर पुणे विद्यार्थी गृहाच्या समोर ४०९/४ सदाशिव पेठ येथील नृसिंहमंदिर

---

१ बाईसाहेब फडके यांच्या व त्यांच्या स्नुषा उमाबाई फडके यांनी सांगितलेल्या आठवणी.

२ विश्वनाथ सदाशिव किंवा तात्या जोशी यांची आठवण.

३ वासुदेव बळवंतांचे 'आत्मचरित्र', बाई फडके यांची आठवण; बुधवारवाडा आणि विश्रामबाग वाडा यांच्या जळिताच्या अभियोगातील आरोपी केशव रानडे यांची पहिल्या वर्ग दंडाधिकाऱ्यापुढील स्वीकारोक्ती; दि. ८ जून १८७९.

हेच ते नरसोबाचे देऊळ होय. या बिऱ्हाडात वासुदेव बळवंत बरीच वर्षे राहात होते. याचे कारण तो भाग त्यावेळी गावाच्या एका टोकाला आणि त्याला लागूनच निर्जन भाग सुरू होत असल्यामुळे त्यांच्या क्रांतिकारक हालचालींना ते निवासस्थान सोयीचे होते. वासुदेव बळवंतांचे पुण्यास तेरा चवदा वर्षे वास्तव्य होते. त्यापैकी बारा वर्षांवरचा काळ त्यांनी या निवासस्थानात काढला.

पुण्याच्या सैनिकी लेखानियंत्रक. (कंट्रोलर ऑफ मिलिटरी अकाऊंट्स्) यांच्या कार्यालयाला मिलिटरी फायनान्स ऑफिस किंवा फायनान्स ऑफिस म्हणत. तेथे आल्यावर लवकरच वासुदेव बळवंतांनी आपले नोकरीतील आसन चांगलेच स्थिर केले. इंग्रजीवर त्यांचे चांगले प्रभुत्व होते. त्यांची इंग्रजी आणि मराठी दोन्ही हस्ताक्षरे वळणदार होती आणि मराठीत बाळबोध आणि मोडी लिपीतही ते सुंदर हस्ताक्षरात लिहीत. त्यांनी आपल्या कामाने वरिष्ठ युरोपियन अधिकाऱ्यांवर चांगली छाप पाडली. त्यांना ते विश्वासू लेखनिक वाटत आणि त्यामुळे त्यांचे वरिष्ठ त्यांना फार चाहत असत.[४]

वासुदेव बळवंतांना या काळात काहीतरी मानसिक अस्वास्थ्य त्रस्त करीत होते. ते नाहीसे व्हावे म्हणून ते निवृत्तिमार्गाकडे वळले. ध्यानधारणेत ते मग्न होत. अध्यात्मिक विचारात गुंग होत. ज्ञात आणि अज्ञेयाविषयी विचार करीत. आपल्याला सिद्धी मिळावी म्हणून त्यांना ओढ लागली. क्रांतिकारक हे भावनाप्रधान मनाचे असतात. अशा प्रवृत्तीमुळे ते अध्यात्मिकतेकडे वळतात. बाबा सावरकरांचा पूर्ववयात त्या मार्गाकडे ओढा होता. मानवेंद्रनाथ रॉय यांचीही त्या मार्गाकडे वृत्ति वळलेली होती. सुभाषचंद्र बोस यांना त्याच विचाराने हिमालयात पळून जाण्याची लहर आली होती. या क्रांतिकारकांचेच वासुदेव बळवंत राजकीय पूर्वज होते. त्यांचीही गत तशीच झाली. नरसिहाच्या देवळात विनायकभट वझे नावाचे विद्वान रहात असत. त्यांच्याजवळ वासुदेव बळवंतांनी आपली संध्या आणि पुरुषसूक्त सुधारली. सौर, रुद्र आणि पवमान इ. ब्रह्मकर्माचे मंत्र ते शिकले. संस्कृतचा त्यांनी अभ्यास केला. आणि वेदपठण केले. त्यांचे आराध्य दैवत श्री दत्त होते. त्याची तर त्यांनी खूप उपासना प्राप्त करून घेतली. दत्ताच्या नामाचा रोज पाच सहस्त्र जप ते करीत. स्नानसंध्या झाल्यावर गुरुचरित्राचा एक तरी अध्याय वाचल्यावाचून ते अन्नग्रहण करीत नसत.[५] या काळात त्यांचे मन पवित्र आणि धार्मिक विचारांनी भरून गेलेले असे. आणि

४ "This man, we are informed, was for a long time a trusted and a pampered clerk in the office of the Military Finance Department"
("हा मनुष्य बराच काळपर्यंत सैनिकी वित्त विभागाच्या कार्यालयात (वरिष्ठांचा) विश्वासू आणि (त्यांनी) लाडावून ठेवलेला असा लेखनिक होता असे आम्हाला सांगण्यात आले आहे")
'डेक्कन हेरल्ड,' दि. ५ मे १८७९

५ ल. ना. जोशी यांची आठवण.

परमेश्वराच्या प्रार्थनेत ते मग्न असत. ते नियमाने ध्यान लावून बसत. त्यावेळी त्यांना स्वतःचेही भान रहात नसे. त्यांच्या या ध्यानमग्न वृत्तीमुळे आजूबाजूचे लोक चकित होऊन जात आणि ते भ्रमिष्ट तर नाहीत ना असे म्हणत.

दत्ताच्या या उपासनेमुळे वासुदेव बळवंतांना दत्ताचा साक्षात्कार झाला होता असे समजते. या साक्षात्कारामुळेच त्यांनी आपल्या कार्यात यश येईल का हे समजून घेण्याची उत्कंठा आपल्या आराध्य दैवताकडे व्यक्त केली असली पाहिजे. पण त्यात त्यांना उत्साहवर्धक उत्तर मिळाले नाही. त्यांच्या संघटनेतील एक सदस्य गणपुले यांनी यासंबंधी 'अनामिक' यांना सांगितले की, वासुदेव बळवंतांनी आपणास सांगितले होते की, "मला स्वप्नात दत्ताचा दृष्टांत झाला. पण दत्तगुरुंनी मला सांगितले की, या कार्यात तुला यश यावयाचे नाही. ही वेळ अनुकूल नाही." अशा भविष्यानेही वासुदेव बळवंतांनी संकल्पित योजना सोडल्या नाहीत. त्यांची बंडाची उर्मी एवढी दुर्दम्य होती.[६]

एखाद्या उपासकाला असा साक्षात्कार होणे ही अशक्य गोष्ट नाही. अरविंद घोषांचे अध्यात्मिक गुरु विष्णु भास्कर लेले महाराज यांनी हा साक्षात्कार व्हावा हा आपणास छंद असल्यामुळे गिरनारला जाऊन पडेल ते मूल्य मोजून ते फळ आपल्या कसे हाती आले ते सेवानंद बाळूकाका कानिटकरांना सांगितलेच आहे. लेले यांना साक्षात्कार झाला होता काय ? असा प्रश्न एकाने प्रत्यक्ष अरविंदांना विचारला तेव्हा त्यांनी उत्तर दिले, "निश्चित झाला होता."[७]

दत्त हेच त्यांचे एकमेव दैवत होते असे मात्र नव्हे. इतर देवांचीही ते भक्ती करीत. आणि त्यांच्या दर्शनाला जात. पुणे येथे विठ्ठलवाडी रस्त्यावर विठ्ठलवाडीच्या अगदी जवळ असलेले गणपतीचे मंदिर हे त्यांचे तसेच आवडते स्थान होते. आणि ते त्या मंदिरातील गणपतीच्या दर्शनाला नेहमी जात. ते देऊळ दगडी बांधणीचे असून ते त्यावेळी भक्कम आणि मजबूत होते. या गणपतीला जाण्याचे दुसरे कारण असेही असेल की, ते त्या काळी अगदी निर्जन भागात होते आणि सहकाऱ्यांच्या किंवा रामोश्यांच्या सांकेतिक भेटीसाठी आणि जवळच जाऊन क्रांतिकृत्यांना उपयोगी पडणारे खेळ त्यांना शिकविण्यासाठी त्याचा परिसर त्यांना अनुकूल भासे. हे मंदिर आता जीर्ण झाले आहे. हा गणपती वासुदेव बळवंत फडके स्मृती गणेश म्हणून प्रसिद्ध आहे.[८]

मुंबईला असताना किंवा पुण्याला आल्यावरही वासुदेव बळवंत वेळोवेळी शिरढोणला जात. अशा वेळी वासुदेव बळवंत शिरढोणला कधी आले तर "बाकवी पाहा भूमी हा चालताना" असाच थाटात वागत. ते वाटेने निघाले की इतरांनी वाटल्यास बाजूने जावे. पण त्यांना हटकण्याची कोणाची प्राज्ञा नसे. ते आपल्या

६ 'अनामिक' यांच्या आठवणी
७ बा. म. दीक्षित "श्री. लेले महाराज : जीवन दर्शन," पृ. ८, १८
८ 'श्री गणेश कोश," (संपा. अमरेंद्र गाडगीळ) खंड ३, पृ. ४८

वाटेने तसेच सरळ जाणार हे ठरलेले होते. कोणी प्रतिवाद केलाच तर परिणाम वाईट होतो हे इतरांना माहीत होते. कारण पट्टा तर नेहमी त्यांच्याजवळ असे, हे प्रसिद्धच होते. पण त्यांच्या हाताची एक थप्पडही ती खाणाऱ्याला पाणी मागण्यास लावी.[९]

पुण्यात आल्यावर दोन वर्षांनी वासुदेव बळवंताच्या संसाराला एक गोड फळ आले. आपल्या प्रथम पत्नीपासून त्यांना एक मुलगा झाला. पण पुत्रजन्माचा त्यांचा आनंद मात्र अल्पकाळच टिकला. कारण, तो मुलगा दोन महिन्याचा होताच बालपणीच मृत्यू पावला. वासुदेव बळवंतांना यानंतर पुत्रसंतान झाले नाही. पण त्यानंतर दोन वर्षांनी १८६८ मध्ये एक कन्यारत्न मात्र झाले. त्या मुलीचे नाव मथुताई! वासुदेव बळवंतांची वंशवेल अशी तीच होय. ती मात्र आपल्या वडिलांच्या पश्चात बरीच वर्षे विद्यमान होती.

मुंबईला वासुदेव बळवंतांनी बिऱ्हाड केले नव्हते. पुण्यास आल्यावर मात्र प्रथम पत्नीसह त्यांनी बिऱ्हाड केले. आपल्या प्रथम पत्नीचा सहवास त्यांना प्रिय होता. आपल्या आवडीनिवडी पुऱ्या करून घेण्यास तिलाही तो काळ अनुकूल होता. तिच्या जिवंतपणी वासुदेव बळवंत क्रांतिकारकाच्या प्रत्यक्ष जीवनात पडले नव्हते. त्यामुळे आपल्या संसाराची ही वर्षे त्या दोघांनी आनंदात घालविली. त्यांच्या या सुस्थितीचा लाभ घेऊन दागदागिन्यांची आपली हौसही त्यांच्या प्रथम पत्नीने पुरी करून घेतली.

मानसिक स्वास्थ्यासाठी मंत्रतंत्राच्या आणि उपासनाच्या बाजूला वळूनच वासुदेव बळवंत थांबले नाहीत. त्यांनी त्या उद्दिष्टाने सत्पुरुषांच्या गाठीभेटीही त्या काळात घेतल्या. अक्कलकोट स्वामी महाराज हे सत आणि सहस्रावधी भक्तांचे आदरणीय गुरू होते. त्यांच्या चरित्रकारांनी वासुदेव बळवंतांच्या अशाच एका भेटीची नोंद करून ठेवली आहे. ते म्हणतात, " प्रसिद्ध बंडखोर वासुदेव बळवंत फडके पुण्यास नोकर असता, रजा घेऊन दोन तीन वेळ महाराजांचे येथे आले होते. आपले हेतू शब्दांनी न कळविता मनोमय महाराजांची विनंती त्यांनी केली. सर्वसाक्षी समर्थांनी त्यांचे हेतू जाणले. "[१०]

अध्यात्मिकतेच्या आसक्तीमुळे वासुदेव बळवंतानी बरीच व्रते धरली आणि ते ती धार्मिक निष्ठेने पाळीत असत. श्री दत्त हे वासुदेव बळवंतांचे आराध्य दैवत होते. त्याच्या श्रीपाद वल्लभ नामक ध्यानाचे चित्र कसर इत्यादीमुळे खराब होऊ नये म्हणून तुरटीच्या पाण्यात वाळवून सिद्ध केलेल्या कागदावर त्यानी एका चित्रकाराकडून काढून घेतले. त्यात श्री दत्ताच्या नेहमी दिसणाऱ्या शांत ध्यानाच्या

९ वासुदेव बळवंतांचे जामात रामभाऊ कर्वे यांनी सांगितलेली आठवण.

१० ग. ब. मुळेकर "श्री. अक्कलकोट निवासी स्वामी महाराज यांचे चरित्र," पृ. ७४,७५

स्थळी एकमुखी आणि रौद्र ध्यानाची त्यांनी निवड केली होती. या चित्राची चौकट उठावणीसाठी बाहेर पडेपर्यंत त्यांच्या बिऱ्हाडात प्रमुखपणे दिसत असे. स्नानानंतर त्याची पूजा केल्यावाचून आणि गुरुचरित्राच्या पोथीचा अध्याय वाचल्यावाचून ते अन्नग्रहण करीत नसत. त्यानी त्याच दत्तभक्तीमुळे हाताच्या तळव्याच्या आकाराइतकेच मोठे असे चांदीचे संपुष्ट बनवून घेतले. त्याला घट्ट बसणारे कळसाच्या आकाराचे टोक असलेले झाकण होते. त्यात रहातील अशा चांदीच्या पादुकाही त्यांनी विकत घेतल्या. वरील प्रकारचे झाकण का? तर ते काढून घेऊन उपडे करून त्यात उदक सोडून त्यातून पादुकांवर अभिषेक करता यावा म्हणून संपुष्ट या पादुकांसह धोतराच्या कणवठीलाही खोचून ठेवून जवळ बाळगता येत असे आणि त्यामुळे प्रवासातही एखाददोन मिनिटात त्यांना त्या पादुकांची पूजा करता येत असे. त्या वस्तू पुढे बाई फडक्यांच्या हाती गेल्या आणि फडक्यांच्या घराण्यात त्या राहिल्या.

वासुदेव बळवंतांच्या जीवनामध्ये अशी आंदोलने चालली असता पाच वर्षे गेली. त्यानंतर त्यांच्या आयुष्यात असा एक प्रसंग आला की ज्याच्यामुळे त्यांच्या आयुष्याला निराळी कलाटणी मिळाली. त्या प्रसंगामुळे आपला स्वाभिमान दुखावला गेला आहे असेच त्यांना नुसते वाटले नाही, तर त्याच्या स्मृतीने त्याना सतत मरणप्राय दुःख वाटत राहिले. त्याचा मानबिंदू चाळवला गेला. असे मानबिंदू चाळवले गेल्यावरच राष्ट्राच्या किंवा निश्चयी पुरुषाच्या आयुष्यात क्रांती घडून येत असते.

१८७० मध्ये त्यांना शिरढोणहून एक वृत्त समजले. ते ऐकताच ते अस्वस्थ झाले. त्यांची आई सरस्वतीबाई या शिरढोण येथे रुग्णाईत झाल्या होत्या. असेल साधे दुखणे, होईल बरे चारसहा दिवसात, अशा आशेने वासुदेव बळवंत दिवस मोजत होते. पण सरस्वतीबाईच्या दुखण्यास उतार पडण्याचे काही चिन्ह दिसेना. वासुदेव बळवंतांचे आपल्या आजोबावरील प्रेमाप्रमाणेच किंबहुना त्यांच्यावरील प्रेमापेक्षाही अधिक प्रेम आपल्या आईवर होते. त्यामुळे तिच्या दुखण्याने ते चिंताग्रस्त झाले. शेवटी, "सरस्वती अत्यवस्थ आहे आणि आपण लवकर इकडे निघून यावे," असा निरोप त्यांना आला. त्यामुळे त्यांच्या मनात भावनांचा कल्लोळ उडाला. आपल्या आईची रुग्णशय्येवरील अनुकंपनीय अवस्था लक्षात घेऊन तिला भेटण्यासाठी शिरढोणला जाण्यासाठी आपल्याला सुटी मिळावी असे निकडीचे आवेदन त्यांनी कार्यालयात केले.

झटकन् सुटी संमत होऊन आईला भेटण्यासाठी आपण शिरढोणला धावत जाऊ अशा विचारात ते गर्क होते. सुटी न मिळाल्यामुळे मानसिक व्यथा अनुभवित बसण्याचा त्यांना अनुभव नव्हता. पण त्यांच्या कार्यालयातील तांबड्या फितीने प्रथम त्यांच्या आवेदनाच्या निर्णयाला विलंब लावला. त्यांनी रुद्रावतार

धारण केला तेव्हा तो निर्णय नंतर केला. पण तो असा होता की, तुमची सुटी नाकारण्यात आली आहे.

ते ऐकताच त्यांचा संताप अनावर झाला. हे घडेपर्यंत आणखी दोनचार दिवस गेले. रुग्णाईत आईला भेटण्याला जाता येत नसेल, तर या नोकरीचे आपल्याला मूल्य काय? त्यानी नोकरी पत्करली होती तरी ते नुसते सर्डेघाशे झालेले नव्हते. आपली उच्च जीवितध्येये त्यांनी सोडली नव्हती. त्यामुळे काय होईल ते होवो, पण आईच्या भेटीसाठी लागलीच शिरढोणला जावयाचेच, असा निश्चय करून आपल्या विभागवरिष्ठांच्या अरेरावीला आव्हान देण्याचे ठरवून त्यांनी आपण रुग्णाईत आईला भेटण्यासाठी शिरढोणला निघून जात आहोत, अशी नुसती चिठी कार्यालयात धाडली आणि मिळाली त्या पहिल्या गाडीने कर्जतला जाण्यासाठी त्यांनी पुणे सोडले!

त्यांनी गाडीत पाऊल टाकले आणि आई आपल्याला भेटेल ना? का तिचे शेवटचे दर्शनही आपल्याला होणार नाही, अशा शकांकुशंकानी त्यांच्या मनात थैमान मांडले. धावत्या गाडीत भोवतालच्या प्रदेशाकडे पाहत ते या विचारांच्या कल्लोळात गढून गेले.

कर्जतला उतरून डोंगरदऱ्या पार करीत नद्या शेते पायाखाली घालीत द्रुतगतीने, उत्कंठेने, विषण्णतेने ते शिरढोणला पोचले. धुळीने भरलेल्या गावच्या मुख्य रस्त्यावरून जवळ जवळ धावतच ते आपल्या वाड्याच्या पुढे असलेल्या मांडवात पोचले. त्यांनी ओटीवर पाऊल टाकले असेल नसेल, तोच त्याना धक्का देणारे जे वृत्त समजले त्यामुळे त्यांच्या हृदयाच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडाल्या!

त्यांची शेवटची भेट न होताच त्यांची आई हे जग सोडून गेली होती! ते ऐकताच ते स्तंभित मनाने ओटीवरच मटकन खाली बसले. 'सरस्वती गेली' या कल्पनेने दुःख अनावर होऊन तिच्या नावाने त्यानी हंबरडा फोडला आणि ते ओक्साबोक्शी रडू लागले! बराच वेळ दुःखाचे कढ बाहेर पडून गेल्यावर त्यांचे मन हलके झाले आणि विषण्ण मनाने ते तसेच काही वेळ बसून राहिले. आपल्याला शिरढोणला येण्याला त्वरेने सुटी न देऊन विलंब करणाऱ्या युरोपियन इंग्रज अधिकाऱ्याविषयीचा पराकाष्ठेचा संताप त्यांच्या मनात उसळला आणि त्यांच्यावर निकराचा प्रतिशोध घेण्याचा त्यांनी निश्चय केला. त्या रात्रभर आईच्या प्रेमळ स्मृतीमुळे त्याना जवळजवळ झोपही आली नाही. शेवटी थकून जाऊन अश्रू ढाळतच त्यांचा थोडा वेळ डोळा लागला.

शिरढोणचे पुढील विधी संपल्यावर त्याच दुःखित मनाने ते पुण्यास परतले. त्या प्रकारास उत्तरदायी असलेल्या वरिष्ठ अधिकाऱ्याची त्यांनी लागलीच खूप खरडपट्टी

काढली." त्यांचा रुद्रावतार पाहून एवढ्यावरच हे प्रकरण संपले म्हणजे मिळवली, 'असा विचार त्यांच्या वरिष्ठांनी केला. पण मातृवियोगाच्या शल्याची टोचणी वासुदेव बळवंतांना इतकी असह्य होत राहिली की, त्यांनी ते सर्व प्रकरण संगतवार लिहून काढून वरिष्ठांविरुद्धचे आपले गाऱ्हाणे थेट मुंबई सरकारपर्यंत नेऊन भिडविले आणि आपल्यावरील अन्यायाची चौकशी होऊन दोषी वरिष्ठांना शिक्षा झाली पाहिजे असा आग्रह धरला. चौकशीअंती मुंबई सरकारला वासुदेव बळवंतांचे गाऱ्हाणे न्याय्य आहे असे आढळून आले. त्यांनी आपल्या वरिष्ठाची अशी खरडपट्टी काढली तरी त्यांच्या वरिष्ठांना सरकारने एका शब्दानेही उघडपणे काही विचारले नाही. त्यांनी त्या विभागाच्या मुख्यास गुप्तपणे दोष दिला. पण अधिकाऱ्यांचा वोज नावाची जी भावना अशा कार्यालयातून असते, तिच्यामुळे त्यांच्या वरिष्ठाना आतून जरी त्या प्रकरणात बऱ्याच कानपिचक्या सरकारने दिल्या तरी त्यांची उघडउघड खरडपट्टी काढली नाही. कारण न्याय जर लेखनिकासारखा केला, तर इतर लेखनिकही सरकारकडे तशीच आवेदने धाडण्यास पुढे येतील, असे सरकारला वाटले.[12] परंतु वासुदेव बळवंतांच्या या लढ्याची अपेक्षित प्रतिक्रिया मात्र घडून आली. त्यांचा मुख्य सहाय्यक (हेड ॲसिस्टंट) त्यांच्याशी पुढे सहा महिने नीट बोलत नसे. आणि त्यांची ही बंडखोर कृती इतर भित्र्या लेखनिकांनाही आवडली नाही. लेखनिकांच्या जगात हा नेहमीचाच अनुभव आहे.

या घटनांनी वासुदेव बळवंतांची मनःस्थिती प्रक्षुब्ध असताच ते त्याच वर्षी विषमज्वराने पुन्हा तीन महिने रुग्णाईत होते.[13]

पुढील वर्षी १८७१ मध्ये आईच्या वर्षश्राद्धाच्या वेळीही त्यांना विधी करण्यासाठी सुटी मिळाली नाहीच. त्या घटनेने त्यांचा प्रक्षोभ अधिकच वाढला. आपल्या प्रेमळ मातेच्या स्मृती त्यांच्या मनःचक्षुपुढे उभ्या राहात आणि एकदा गेलेली आई आपल्याला पुन्हा कधीच भेटणार नाही या विचाराने ते देहभान विसरत. त्यांच्या हृदयात द्वेषाची अखंड चिता पेटत राहिली. तिचे शेवटचे दर्शन ज्या युरोपियन अधिकाऱ्यांमुळे अशक्य झाले त्यांच्याविषयी त्यांचा संताप तसाच धुमसत राहिला. गुलामगिरीच्या नोकरीच्या रुपेरी बेड्यांचा नाद त्यांना दुःसह वाटू लागला. कार्यालयातले निर्जीव यांत्रिक काम आणि भावनाहीन शिस्त यांचा वीट येऊन त्या

---

११ "या रागानें आमच्या मुख्य कामगाराची व त्याचे वरिष्ठाची (मी) खूप धूळ काढली," वासुदेव बळवनाचें 'आत्मचरित्र'.

१२ कित्ता.

१३ वासुदेव बळवंताच्या सेवा पुस्तकात (सन्हिस बुकात) १८७० मध्ये प्रकृतीच्या कारणावरून त्यांनी घेतलेल्या ९४ दिवसांच्या सुटीची नोंद होती न्याय विभाग क्र. ५८-[illegible] (१८७१-८०); मुंबई सरकारचे कागदपत्र.

पद्धतीला कारणीभूत असणाऱ्या इंग्रज सरकारविरुद्ध प्रतिशोध उगविण्याचे विचार ते बोलू लागले. ते ऐकून त्यांच्या काही मित्रांनी, "वासुदेव, तू हे करू नको हो!" म्हणून त्याना चेतावणी दिली की, ते त्याना म्हणत, "हे करू नको? तुम्हाला माझ्या दुःखाची काय कल्पना येणार? मी सूड घेणारच"[१४]

* * *

१४ पुण्यातील तत्कालीन प्रख्यात सार्वजनिक कार्यकर्ते गणपतराव घोटवडेकर यांनी त्याच्या पुनण्याने धाडलेली आठवण गणपतराव घोटवडेकर वासुदेव बळवंताचे सहकारी होते.

## प्रकरण ५ वे

# नवे वारे-नवे विचार

सामान्य माणसाचा कठीण निश्चय दिवसगतीने काही वेळा निवळून जातो. पण सामान्य माणसांपेक्षा जे निराळे असतात त्यांचा असा निश्चय दिवसानुदिवस अधिक अपरिवर्तनीय होतो आणि परिस्थितीची दाहकता किंवा मित्रपरिवाराकडून त्याच्याविरुद्ध होणारा साळमूद उपदेश यांच्यामुळे तो उलट अधिक पक्का होतो.

वासुदेव बळवंताचा इंग्रज लोकाविरुद्ध प्रतिशोध घेण्याचा निश्चय या दुसऱ्या असामान्य लोकांच्या निश्चयाप्रमाणेच दृढतर होत गेला. याला कारण त्यांचा निग्रही स्वभाव तर होताच. पण दुसरे म्हणजे १८७० पासून पुण्यातील बदलत्या राजकीय परिस्थितीचे प्रोत्साहक वातावरण हेही त्याचे कारण होते.

कारण, १८७०मध्ये महाराष्ट्राच्याच नव्हे तर हिंदुस्थानाच्याही आधुनिक राजकारणाची पहिली आघाडी पुण्यामध्ये उघडली गेली. कारण, याच वर्षी पुण्याला लकडी पुलाजवळ पर्तांच्या गोटात 'सार्वजनिक सभे'ची स्थापना झाली. या संस्थेचे महत्त्व टिळकांच्या आयुष्याची पहिली काही वर्षे ही सभा हस्तगत करण्यात गेली हे लक्षात घेतले म्हणजे स्पष्ट होईल. 'पर्वती संस्थाना'च्या कारभारातील घोटाळा दूर करण्यासारख्या 'महान' ध्येयाने जरी ही सभा स्थापन झाली होती तरी लवकरच लोकमत प्रकट करणारी प्रबळ संस्था म्हणून तिची ख्याती झाली. इतकेच नव्हे, तर इतर प्रांतातील लोकानाही सार्वजनिक कार्याच्या पद्धतीचा तिने नवा आदर्श दाखवून दिला. प्रारंभी त्या संस्थेचे कार्य सदाशिवराव गोवंडे प्रभृतींनी चालविले होते, तरी तिच्या कार्यात सिंहाचा वाटा गणेश वासुदेव जोशी यांचा होता. 'सार्वजनिक सभे'-च्या आणि इतर जनहिताच्या कार्याशी ते इतके एकरूप झाले की, लोक त्यांनाच 'सार्वजनिक काका' म्हणून म्हणू लागले. आणि 'सार्वजनिक काका' म्हणूनच ते प्रसिद्ध झाले. त्यांच्या जीवनाचा वृत्तांत मनोवेधक आहे.

काकांचा जन्म पुणे येथेच १८२८मध्ये झाला. त्यांचे वडील अव्वल इंग्रजीत सदर अमीन होते. काकाना दोन मोठे भाऊ होते. पण काका दोन वर्षांचे असतानाच

मृत्यू पावले, त्यामुळे दोनतीन इयत्तांपर्यंत शिक्षण होताच काकांना शाळा सोडावी लागली. आपल्याला इंग्रजी शिकता आले नाही याचे त्यांना फार वाईट वाटले. पण निर्वाहाकरता वयाच्या १४ व्या वर्षीच ते गणपतराव शिरस्तेदार यांच्या समवेत न्यायालयात उमेदवार म्हणून नोकरी करू लागले. वयाच्या १६व्या वर्षी त्यांनी त्या-वेळची मुलकीची परीक्षा दिली. पुढे चार वर्षांनी १८४८मध्ये ते नाझर कचेरीत कारकुनी करू लागले. आणि पुढे मुन्सफ आणि असिस्टंट जज्ज यांचे शिरस्तेदार झाले. यावेळी त्यांच्यावर काही कारणावरून कुभांड येऊन खातेवार चौकशी होईतो त्यांना नोकरीवरून विलंबित करण्यात आले. परंतु चौकशीमध्ये ते निर्दोष ठरून त्या दिव्यातून बाहेर आले. पुढे मात्र पुन्हा नोकरीतच न राहता त्यांनी वकिलीची परीक्षा दिली आणि सोलापुरला वकिली सुरु केली. तीत त्यांनी अमाप पैसा आणि कीर्ती मिळविली. नंतर ते पुण्याला आले. आणि वकिली करू लागले. शाळेत इंग्रजी शिक्षण न मिळाल्याचे शल्य त्यांना सलत राहिले. त्यामुळे आपल्या स्वत:च्या अभ्यासाने या काळात त्यांनी इंग्रजी भाषेवर उत्तम प्रभुत्व मिळविले पुण्याला फसवणुकीचा एक महत्त्वाचा पहिलाच दावा विरोधाला न जुमानता चालवून त्यांनी जिंकला आणि विरोधी पक्षकारांना न्यायालयास शिक्षा ठोठावण्यास लावले इतकेच नव्हे तर त्या कामी लाच खाण्याचा आरोप असणाऱ्या इंग्रज न्यायाधीशानाही नोकरी-तून कमी करावयास लावले, नि:स्पृह, बाणेदार आणि निर्भय वकील म्हणून त्यांचे त्यामुळे नाव गाजू लागले.

वकिलीच्या धंद्यात त्यांनी खूप पैसा मिळवला. परंतु त्यातील बराच जन-हितासाठी अगदी सढळ हाताने दिला. १८६८ मध्ये निराधार लोकांना आश्रय मिळावा म्हणून त्यांनी श्री विष्णूचे मंदिर बांधले. आणि लोकांच्या सोयीसाठी पाण्याचा सार्वजनिक हौद बांधला. हे मंदिर नव्या विष्णूचे मंदिर म्हणून प्रसिद्ध झाले.

धंद्यात त्यांनी पैसा खूप मिळवला आणि नाव कमावले. त्या प्रतिष्ठेला साजेसाच असा छानछोकीचा त्यांचा प्रथम पोषाख असे. सैनाचा पाढरा शुभ्र आणि इस्त्री केलेला कडकडीत अंगरखा, उंची शुभ्र धोतर आणि अंगावर रेशीमकाठी श्रीमंती उपरणे आणि चक्रिदार पागोटे ते वापरीत.

परंतु 'सार्वजनिक सभे'च्या स्थापनेनंतर १८७१ मध्ये मकरसंक्रांतीच्या दिवशी त्यांनी आपल्या उच्च ध्येयप्रणालीला साध्या आणि देशभक्तीच्या रहाणीची जोड देण्याचा निश्चय केला. थोर सार्वजनिक नेत्याला आवश्यक असणारा असा त्यांचा लहरी पण धीट आणि करारी स्वभाव होता. त्यामुळे वरील दिवशी गोवंडयांसह त्यांनी प्रथमच जाडाभरडा खादीचा पोषाख केला आणि त्याच पोषाखात मित्र परिवारात तिळगूळ वाटला ! त्यामुळे या त्यांच्यातील बदलाचे नाट्य वाढले.

सार्वजनिक सभेच्या कार्याविषयी आणि भिन्न भिन्न प्रकरणी सभेच्या वतीने लोकांना द्यावयाच्या सहाय्याविषयी ते इतके जागृत असत की, कोठेही तशी आवश्यकता उत्पन्न झाली की, सहाय्यासाठी काका तेथे उपस्थित झालेच, हे ठरल्यासारखे होते. दिवसाच्या प्रत्येक क्षणाला हाती घेतलेले काम तडीस कसे जाईल याची चिंता काकांना लागून राहिलेली असे. अशा वेळी व्यग्र मुद्रेने पुण्याच्या रस्त्यावरून धाईधाईने जाताना ते लोकांना दिसत. त्यांच्या पावलांचा वेगही त्यांच्या डोक्यातील विचारचक्राच्या वेगाप्रमाणे वाढत जाई असे दृश्य त्या काळात पुणेकरांना नित्याचे झाले होते.

काकांनी देशकार्याला असे वाहून घेतले. कारण त्यांचा पिंडच महाराष्ट्राच्या ध्येयनिष्ठ आणि धाडसी परंपरेतील होता. त्यांना कशाचे भय म्हणून माहीत नव्हते. सैन्यात आपले लोक शिरले पाहिजेत ही सगळ्या तेजस्वी महाराष्ट्रीय नेत्यांची आकांक्षा असे. आणि ते शिक्षण संधी मिळाली तर लढाईवर जाऊन आपण मिळविलेच पाहिजे अशी त्यांना ओढ असे. १८७७ मध्ये जेव्हा रशियाचे आणि तुर्कस्थानचे युद्ध सुरू झाले तेव्हा इंग्रजांच्या रशियाविरोधी वृत्तीला ते पचेल असे अनुमान बांधून आपले हे उद्दिष्टही साध्य करण्याचा प्रयत्न करण्यास काकांनी मागेपुढे पाहिले नाही. तुर्की बांधवांस सहाय्य करण्यासाठी मुंबईच्या अंजुमान इस्लाम या संस्थेच्या वतीने त्यांनी सुरस व्याख्यान तर दिलेच; पण शेरअल्लीच्या लढाईत आपण स्वत ही रणांगणावरील युद्धावर जाण्यास सिद्ध आहोत असे घोषित करून तशीही सिद्धता दाखविली. पुढे सयाजीराव गायकवाडांच्या विवाहप्रसंगी सार्वजनिक सभेच्या वतीने त्यांना मानपत्र त्यांनीच समर्पण केले आणि 'सुबोध' नावाची तरुण हिंदी राजपुत्रांना मार्गदर्शक उपदेश करणारी अशी एक पुस्तिका काढून ती सयाजीरावांना आणि जमलेल्या इतर राजपुत्रांना वाटली !

काकांच्या या सार्वजनिक कार्याला १८७१ मध्ये चांगलाच आधार मिळाला. १८७१ मध्ये माधवराव रानडे यांचे पुण्याला स्थानांतर झाले. राजकारणाच्या पटावर पडद्यामागून सूत्रे हलविण्याची रानडयांची हातोटी विलक्षण होती. "महाराष्ट्र देश म्हणजे त्यावेळी एक थंड गोळा होऊन पडला होता. त्या थंड गोळयास पुन्हा सजीव करण्याची" कर्तबगारी माधवरावांनी केली,[१] असे टिळकांनी रानडयांच्या ज्या कार्याविषयी म्हटले होते, ती रानडयांची राजवट आता पुण्यात सुरू झाली.

रानडयांनी लोकांत आत्मसंशोधनाचे नवीन वारे निर्माण केले. त्यांच्यामध्ये नवीन तत्वज्ञानाचे विचार रुजवले. आपले गतवैभव परत मिळविण्याचा त्यांचा प्रयत्न होता. इंग्रजी सत्तेच्या कृपाप्रसादाने ते हे साधू पहात होते हे अर्थातच जरा विचित्र होते. इंग्रज सरकारविरुद्ध शत्रुत्वाची काहीही भावना बाळगण्यास ते सिद्ध नव्हते. खरे

१ लोकमान्य टिळक - "सर्वज्ञः स हि माधवः", 'केसरी,' दि २२जानेवारी १९०१

म्हणजे हिंदुस्थानवरील इंग्रजी सत्ता हा एक ईश्वरी संकेत (डिव्हाईन डिस्पेन्सेशन) आहे ही गर्हणीय विचारसरणी त्यांनीच प्रसृत करण्याचा प्रयत्न केला. इंग्रजाचे राज्य त्यांना परमेश्वरी कृपा वाटे. ही विचारप्रणाली उफाळत्या राष्ट्रीय वृत्तीच्या लोकांना तिरस्करणीय वाटे. राजकीय स्वातंत्र्याच्या क्रांतिवादी कल्पनेपर्यंत रानड्यांची विचारसरणी घुमटतीही कधी पोचली नाही. परंतु आपल्या विचारसरणीला आणि आकाक्षांना नवीन वळण देण्याच्या अपरिहार्यतेवर मात्र त्यांनी लोकांचे निःसंशय लक्ष वेधले. अगाध वाचन, इंग्रजीवर उत्तम प्रभुत्व आणि पारतंत्र्यात झालेल्या हिंदुस्थानाच्या आर्थिक हानीचे सखोल ज्ञान, यामुळे या देशाच्या तेजस्वी पुरस्सरांमध्ये (पायोनिअर्स) रानड्यांची गणना व्हावी असेच त्यांचे व्यक्तिमत्व होते.

१८७२ च्या डिसेंबरमध्ये रानड्यांनी स्वदेशी व्यापारावरील आपले व्याख्यान पुण्यात दिले. विदेशी वस्तूंचा स्वैरपणे आणि ताळतंत्र न ठेवता बहुसंख्यांक हिंदी लोकांनी वापर केल्यामुळे स्वदेशी वस्तूंचा खप कसा कमी कमी होत आहे आणि त्यामुळे देशाची किती हानी होत आहे ते रानड्यांनी आकडेवारीने सप्रमाण दाखविले. या व्याख्यानाला पुण्यातील सुशिक्षितांची खूप गर्दी लोटली.

पहिल्या व्याख्यानाचा परिणाम विरतो न विरतो तोच १८७३ च्या फेब्रुवारीमध्ये रानड्यांनी त्याच विषयावरील आपले दुसरे व्याख्यान दिले. या व्याख्यानात नव्या इंग्रजी राज्यातील भपक्याने भुलून न जाता, झालेल्या आपल्या हानीकडे लक्ष देण्याचा आणि त्या दुःस्थितीतून आपला देश सुस्थितीकडे जावा म्हणून प्रयत्न करण्याचा रानड्यांनी लोकांना उपदेश केला. ते म्हणाले, "यंत्र सामर्थ्याने सर्व सोयीचे व पोकांचे पदार्थ तयार होतात. ते आपण आवडीने भोगतो. पण आपल्या समृद्ध देशात सर्व पदार्थ करता येऊ नयेत ही मोठी दुःखाची गोष्ट आहे."

"आपल्याला असे वाटते की, पहिल्यापेक्षा आपल्या देशाचा बंदोबस्त चांगला आहे. पण या घमेंडीत आपण निःशस्त्र झालो आहोत, ही गोष्ट आपण विसरतो."

"एकंदरीत दिवसेंदिवस पराधीनपणाची आणि निःसत्वपणाची दशा देशास प्राप्त होत आहे, ही अनिष्ट गोष्ट आहे!"[२]

सार्वजनिक सभा आणि रानडे यांना मवाळ म्हटले जात असे. पण मराठ्यांचा मवाळपणाही किती जहाल असतो, ते वरील विचारांवरून आणि १८७४ मध्ये हिंदुस्थानाचे प्रतिनिधी ब्रि. लोकसभेत घेण्यात यावे. आणि त्यांच्या विचाराने हिंदुस्थानचा राज्यकारभार चालावा, अशा आशयाच्या सभेने केलेल्या ठरावावरून दिसून येईल.

प्रत्यक्ष जनतेच्या दुःखनिवारणाच्या खटपटीस वासुदेव बळवंतांनी १८७२ मध्येच प्रारंभ केला[३] त्यावेळी हिंदुस्थानात राजकीय क्षेत्रात लोक पूर्ण निद्रिस्त होते

२ प्रा. न. र. फाटक : "न्या. रानडे यांचे चरित्र," पृ. १९९-२००

३ "... तर लोक अन्नावाचून उपाशी मरू नयेत, अशाबद्दल सुमारे सात वर्षांपूर्वीपासून मी अनेकश: अनेक खटपटी केल्या" वासुदेव बळवंतांचे 'आत्मचरित्र,' (हे 'आत्मचरित्र' त्यांनी १८७९मध्ये लिहिले आहे)

आणि स्वातंत्र्यासाठी राजकीय आंदोलन असे कोणतेही झालेले नव्हते.

रानड्यांनीही अजून आपली राजकीय चळवळ परिणामकारक स्वरूपात सुरू केलेली नव्हती. १८७९ मध्ये वासुदेव बळवंतांचे उत्थान होऊन ते जन्मठेपीवर गेल्यानंतरच रानडे प्रामुख्याने पुढारी म्हणून चमकू लागले आणि तेसुद्धा सामाजिक सुधारणाचे आणि शिक्षण प्रसाराचे कैवारी आणि राजकीय सवलतीसाठी सतत पण सौम्य आवेदनांचेच काय ते पुरस्कर्ते म्हणून. पण त्यांच्या आंदोलनात परकीय सत्ताधाऱ्यांविषयी जन्मजात द्वेषाचा मागमूसही नसे.

विष्णुशास्त्री चिपळूणकर हे देशप्रेमाने प्रेरित होऊन आपले सर्व लिखाण करणारे ज्वलंत वृत्तीचे पहिले पत्रकार. पण तेही वासुदेव बळवंतापेक्षा पाच वर्षांनी लहान होते. युरोपियनांच्या प्रत्येक गोष्टीची वाहवा करण्याच्या आणि हिंदी म्हणून जे जे त्याची हेटाळणी करण्याच्या सुशिक्षित हिंदी लोकांच्या गुलामी मनोवृत्तीवर आणि परकीयांपुढे लांगूलचालन करण्याच्या मनोवृत्तीवर आपल्या 'निबंधमाले'तून कोरडे ओढण्यास त्यांनीही अजून सुरुवात केलेली नव्हती. कारण 'निबंधमाला' १८७४ मध्ये सुरू झाली. 'निबंधमाले'लाही एक जहाल राजकीय तत्त्वज्ञानाचे मुखपत्र म्हणून जे स्वरूप आले ते १८७९ मध्ये वासुदेव बळवंतांचे 'बंड' होऊन गेल्यावरच होय. दुसरे म्हणजे चिपळूणकरांच्या लिखाणानेही लोकांच्या विचारसरणीवरच काय तो परिणाम केला. १८८० मध्ये त्यांनी न्यू इंग्लिश स्कूल काढले. तोपर्यंत त्यांच्या आंदोलनातही कोणत्याही कृतीचा अभाव होता.

टिळकांचे सार्वजनिक जीवनही १८८० मध्ये सुरू झाले. ब्रि. सरकारविरुद्ध कृतिशील राजकीय आंदोलन उभारणारे तेच हिंदुस्थानातील पहिले पुढारी होते. पण त्यांचे ते आंदोलन पुढे कित्येक वर्षांनी उभारले गेले, हे लक्षात घेतले म्हणजे १८७२ मध्ये हिंदुस्थानामध्ये राजकीय क्षेत्रात कशी संपूर्ण पोकळी होती त्याची कल्पना येईल.

स्वराज्याचा नुसता विचार करण्याइतके धैर्य दाखवणाऱ्या 'अपराध्यां'ना ही इंग्रज सरकारकडून होणाऱ्या छळाने त्या काळात लोकांच्या छातीत कशी धडकी भरत असेल, त्याची कल्पना त्या छळाची १८८२ किंवा १८९७ आणि त्यानंतरच्या काळात त्याचे काम राक्षसी स्वरूप होते त्यावरून दिसून येईल. या काळात तुरुंगात टाकण्यात आलेला मनुष्य काही महिन्यातच हालअपेष्टांनी मृत्यू पावत असे. ४

१८८२ मध्ये टिळक आणि आगरकर यांना कोल्हापूरच्या दिवाणांच्या मानहानीच्या अभियोगात चार महिन्यांची तुरुंगवासाची शिक्षा होऊन डोंगरीच्या तुरुंगात

४ "नाशिक कटाच्या अभियोगातील आरोपी सखाराम गोन्हे यांनी १९१० मध्ये मुंबईच्या उच्च न्यायालयापुढे पोलिसांनी आपला असह्य शारीरिक छळ केला म्हणून गाऱ्हाणे केले. ते थोड्याच महिन्यात तुरुंगात निधन पावले." वीर सावरकर : "ॲन अको फ्रॉम द अंदमान्स." पृ. २२

ठेवण्यात आले होते. त्यांना तेथे निकृष्ट अन्न मिळे आणि तुरुंगामध्ये त्यांचे इतके हाल झाले की थोड्याच दिवसात टिळकांचे वजन चोवीस पौंडानी घटलेआणि आगरकरांचे सोळा![5] १८९७ मध्ये राजद्रोहाच्या पहिल्या अभियोगात टिळकांना अठरा महिन्याची सश्रम कारावासाची शिक्षा झाली. तुरुंगात त्यांना मिळणाऱ्या अपुऱ्या आणि वाईट अन्नामुळे थोड्याच महिन्यात त्यांचे वजन पंचवीस पौंडांनी कमी झाले. त्यांचे ओठ काळे पडले आणि घशाला सूज येऊन कोरड पडली.[6]

बऱ्याच वेळा देशभक्तांचा इतका शारीरिक छळ होई की त्यांची तुरुंगातून सुटका होई, तेव्हा त्यांची प्रकृती कोलमडून पडलेली असे आणि त्याचा परिणाम त्याना वेड लागण्यातही होई. बाहेर येताच आपल्या जवळच्या नातलगांच्या नोकऱ्या गेलेल्या त्यांना दिसत. त्यांना परिचित लोक कटाक्षाने टाळीत आणि गुप्त अनुचरांचा त्यांच्यामागे चिरंतनचा ससेमिरा लागे.[7]

१८९७ मध्ये किंवा १९१० मध्येही जर देशभक्तांची अशी अवस्था होत असे, तर १८७२ मध्ये इंग्रज सरकारकडून होणाऱ्या त्यांच्या छळाच्या भीषणतेची कोणालाही कल्पना येईल.

वासुदेव बळवंतांच्या राजकीय जीवनाचा प्रारंभ झाला त्याच सुमारास रानड्यांची वरील भाषणे झाली आणि वासुदेव बळवंताच्या मनातील देशभक्तीचे निखारे त्यामुळे आणखीनच फुलून गेले. ते दोघे जवळ जवळ समवयस्क होते. वासुदेव बळवंतांपेक्षा रानडे तीन वर्षांनीच काय ते मोठे होते. दोघांनाही परकीय सत्तेखाली चाललेल्या हिंदुस्थानाच्या शोषणाविरुद्ध त्वेष होता. परंतु त्यांची राजकीय मतप्रणाली मात्र सारखी नव्हती. इंग्रज सरकारकडे प्रार्थना आणि आवेदने करणे हाच रानड्यांचा या राष्ट्रीय दुखण्यावर उपाय होता. पण इंग्रज सरकारविरुद्ध लागलीच सशस्त्र बंड करण्यात वासुदेव बळवंतांच्या उपायांचा आविष्कार झाला. हा देश स्वतंत्र होईपर्यंत ज्या दोन स्पष्ट राजकीय पंथांचा हिंदुस्थानच्या लोकांनी अवलंब केला, त्या दोन भिन्न भिन्न पथांचे ते पहिले नेते होते. हिंदुस्थानातील वैध आंदोलनाचे रानडे हे जनक होते. हिंदी राजकारणातील क्रांतिकारक विचारसरणीचे वासुदेव बळवंत हे जनक होते.

---

५ गो. ग. आगरकर : "डोंगरीच्या तुरुंगातील आमचे एकशे एक दिवस," पृ. ८

६ न. चिं. केळकर : "लो. टिळकांचे चरित्र," पूर्वार्ध पृ. ६०४

७ स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या मोठ्या वहिनी यशोदावहिनी सावरकर यांची दुर्दशा काय झाली ते प्रसिद्धच आहे. स्वातंत्र्यवीर सावरकर तेव्हा इंग्लंडमध्ये होते. १९०९ मध्ये त्यांचे पति बाबा सावरकर यांना जेव्हा जन्मठेपेची शिक्षा झाली आणि ते अंदमानात गेले आणि धाकट्या दीरालाही राजकीय कटासंबधात अटक करण्यात आली तेव्हा यशोदावहिनींना कोणीही थारा देईना आणि म्हणून त्यांना शेवटी स्मशानातच जाऊन रहावे लागले. आपल्या पतीला भेटण्याची अनुज्ञा मिळेल म्हणून वाट पहात, त्यांच्याशी भेट न होताच खंगून खंगून १९१९ मध्ये त्या शेवटी मृत्यू पावल्या.

ब्रिटिश सत्तेखाली होणारे हिंदुस्थानचे आर्थिक शोषण आणि हिंदुस्थानातून इंग्लंडकडे चाललेल्या संपत्तीचा ओघ वासुदेव बळवंतांच्या चांगलाच ध्यानात आला होता. ते म्हणतात, "काही लोक स्वदेशी माल वापरू लागले मात्र. तोच मलकरयाचे कायदे करणारे मंडळीत (व्हाईसरॉयच्या लेजिस्लेटिव्ह कौन्सिलमध्ये) एक पाच हजार रुपये पगाराची प्रधानाची नवी जागा त्यांनी केली. त्याने इंग्लिश कापडावरची जकातच काढून टाकली... जिल्ह्यांची संख्याही १४ वरून २१ वर नेण्यात आली. ते आणखी होण्याचा संभव आहे. म्हणजे महिना दोन हजार पगारापेक्षा जास्त पगाराचे ७ नवे कलेक्टर आणि ७ नवे जज्ज आलेच." [८]

याच वेळी "ऐक्यवर्धिनी" नावाची एक संस्था काही तरुण मंडळींनी पुण्यात स्थापन केली. तिच्या बैठकी दर रविवारी नव्या विष्णुजवळच्या पूर्वीच्या घोटवडेकरांच्या वाड्यात भरत. वासुदेव बळवंत या "ऐक्यवर्धिनी" संस्थेचे प्रथमपासून सभासद होते. त्या वेळचे पुण्यात कार्यकर्ते गणपतराव घोटवडेकर यांचे मामेबंधू सखाराम चिमणाजी गोळे हे तिथे चिटणीस होते. त्या संस्थेत हिंदुस्थानच्या सर्वांगीण उन्नतीविषयी करावयाच्या प्रयत्नांची चर्चा होई." [९]

१८७३ च्या जानेवारीमध्ये सार्वजनिक काकांनी फक्त स्वदेशी वस्तू वापरण्याचे व्रत घेतले. हिंदुस्थानात स्वदेशी हे व्रत सार्वजनिक रीतीने पाळण्याचा आणि देशबांधवांना तसा सक्रिय आदेश देण्याचा मान सार्वजनिक काकांना आहे. हातमागावरील जाडयाभरडया खादीचे कपडे आता पूर्वीच्या कपडयांच्या ठिकाणी काकांच्या अंगावर दिसू लागले. खादीचे दाणकाठी धोतर, जाडाभरडा अंगरखा आणि चंदी पागोटे असा त्यांचा पोषाख आता ठरून गेला. त्यांच्या हातात सुबक पण विदेशी छत्री जाऊन बेढब असली तरी स्वदेशी बनावटीची मोठी छत्री दिसू लागली. त्यांच्या बोलण्यात आणि वागणुकीत स्वदेशीच्या प्रचाराचे निर्देश वारंवार होऊ लागले. इतकेच नव्हे तर स्वदेशी वस्तू वापरणाऱ्या लोकांची पुण्यातच नव्हे तर इतर मोठ्या नगरातून त्यांनी मंडळे स्थापली. आपल्या कष्टाळू स्वभावामुळे सार्वजनिक कार्यासाठी गावात हिंडताना ते टांगा वापरत नसत. त्यामुळे त्यांची याच कपड्यातील मूर्ती आता पुणेकरांना परिचित झाली. त्यांच्या प्रचाराचा परिणाम म्हणून पुणे, मुंबई सुरत, अहमदाबाद येथे भागधारकांकडून भाग खपवून भागमंडळ्या (शेअरकंपन्या) निघाल्या. आणि स्वदेशी माल तेथे आणि मुंबईत मोठ्या प्रमाणावर खपू लागला.

त्याच वर्षी १२ जानेवारी १८७३ ला त्यांनी पुण्यात धर्मसभा स्थापन करून हिंदुधर्माच्या संरक्षणाचे कार्य सुरू केले. त्यांचे विचार पुरोगामी होते. त्यामुळे यानंतर त्यांनी 'स्त्री विचारवती सभा' पुण्यात स्थापन केली. त्याकाळी स्त्रियांनी घराबाहेरही

---

८ वासुदेव बळवंतांचे 'आत्मचरित्र.'

९ गणपतराव घोटवडेकर यांच्या स्नेह्या पुण्याने छापलेल्या आठवणी.

पडणे टीकेला कारण होत असे, मग शाळेत जाण्याची गोष्ट सोडा. अशा त्या माग-च्या काळात २५ एप्रिल १८७३ ला सर्व हिंदू स्त्रियांचे हळदीकूंकु आपल्या पत्नीच्या आणि सदाशिवराव गोवडे यांच्या पत्नीच्या करवी त्यांनी पुण्यात घडवून आणले.

लोकहितासाठी तळमळणाऱ्या वासुदेव बळवंतांच्या स्वभावामुळे ते सार्वजनिक सभेच्या कार्यक्रमात रस घेत. रानड्यांच्या व्याख्यानांनाही ते त्याचमुळे उपस्थित होते. सार्वजनिक कामांमध्ये झालेल्या वरील बदलाचा त्यांच्या तरुण आणि भावना-प्रधान मनावर तात्काळ परिणाम झाला. त्यांनीही फक्त विदेशी वस्तू वापरण्याची शपथ घेतली. आणि ते व्रत आमरण पाळले. विदेशी कापडाच्या कपड्यांचा आणि वस्तूंचा त्यांनी त्याग केला. कोणतीही विदेशी वस्तू वापरणे म्हणजे आपल्या देशाचा घात करणे होय असे त्यांच्या मनाने घेतले. त्यामुळे त्यांचा पोषाख धोतर, अंगरखा किंवा बंडी आणि फेटा किंवा कधी कधी टोपी असा असे. पांढऱ्या शुभ्र कपड्यांची त्यांना फार आवड असे. त्यामुळे खादीच्या स्वदेशी कापडाच्या धोतरावर पांढऱ्या स्वदेशी कापडाचा अंगरखा ते घालू लागले आणि त्यांच्या मस्तकावरही खादीचे पागोटे दिसू लागले. हिंदी क्रांतिकारकांनी स्वदेशीचे व्रत घेतलेले असणे ही त्यानंतर-च्या काळात निश्चिती असे आणि विदेशी वस्तू वापरणे ते पाप समजत. हा नियम क्रांतिकारकांनी आपल्या जीवनचरित्रांनी ठरवून टाकलेला होता. वासुदेव बळवंतांनी त्यांची स्वदेशीवरील श्रद्धा प्रथमच आपल्या निश्चयाने साकार केली होती. प्रतिज्ञा म्हणून स्वदेशी वस्तू पाळण्याचा मान क्रांतिकारकामध्ये त्यांचा आहे. केवळ स्वत:च स्वदेशी वस्तू वापरण्याचा निर्णय करूनच ते थांबले नाहीत, तर आपल्या आजूबाजू-च्या कित्येक लोकांकडून त्यांनी तशी शपथ घेवविली.[१०]

त्यांच्या स्वदेशीविषयीचा हा कटाक्ष त्यांच्या कार्यालयातील सहकाऱ्यांच्या ध्यानात यावा इतका प्रखर होता. या गटाच्या तरुणांचा विदेशी वस्तूंवरील बहिष्कार मुख्यत: असे तो हिंदुस्थानावर राज्य करणाऱ्या ब्रिटिशांनी बनवलेल्या मालावर असे.

इंग्रजी मालाविषयीचा वासुदेव बळवंतांचा तिटकारा पुढील काही वर्षांत वाढतच गेला. त्यांनी उन्हाळ्यात किंवा पावसाळ्यात, त्यावेळी मिळणारी चांगली

१० ही गोष्ट वासुदेव बळवंतांच्या बंडाच्या धामधुमीमुळे त्यांच्याविषयी जेव्हा जनतेमध्ये मोठे कुतुहल उत्पन्न झाले तेव्हा त्यांच्या कार्यालयात १७ वर्षे नोकरी केलेल्या एका युरोपियन अधि-काऱ्यानेच 'बॉम्बे गॅझेट' या इंग्रजी पत्रात प्रसिद्ध केली. तो म्हणतो,

"There is a section in Poona, of Brahmins who have bound themselves by a vow never to purchase or use an article of British produce. Wassudeo Balvant was one of these. And those who knew him in Finance office say he religiously kept his vow."

("पुण्यामध्ये ब्राह्मणांचा असा एक गट आहे की ज्यांनी ब्रिटिश बनावटीची वस्तू कधीही विकत घ्यावयाची नाही किंवा वापरायची नाही अशी शपथ घेतलेली आहे. वासुदेव बळवंतही त्यांच्या-पैकीच एक होते. आणि 'फायनान्स ऑफिस'मध्ये त्यांचा ज्यांना परिचय होता ते म्हणतात की, ते ही प्रतिज्ञा धार्मिक निष्ठेने पाळीत असत.") 'बॉम्बे गॅझेट', दि. २६ जून १८७९

छत्रीही विदेशी असे, म्हणून ती वापरण्याचेच सोडून दिले. विदेशी वस्तू वापरण्याचा प्रसंग आला की, त्यांच्या तळपायाची आग मस्तकाला जात असे. एकदा कार्यालयात गेल्यावर त्यांनी लिहिण्यास आपल्या पुढ्यातला टाक उचलला आणि तो इंग्रजी बनावटीचा आहे असे त्यांच्या लक्षात आले, तेव्हा त्यांनी तो रागाने फेकून दिला. तेव्हापासून इंग्रजी बनावटीचा टाक किंवा त्या काळात प्रचलित असलेला पिसाच्या टोकाचा टाक (क्विल पेन) त्यांनी हातात धरला नाही. ब्रिटिश मालाविषयी इतका जहाल तिटकारा त्यांच्या अंगी बाणला होता."[11]

श्री दत्ताविषयींची वासुदेव बळवंताची भक्ती दिवसेंदिवस अधिक उत्कट होत गेली. तिलाही आता दृश्य स्वरूपातील एक फळ आले. तिची परिणिती त्यांच्या एकमेव प्रकाशनात याच वर्षी झाली त्यांच्या काळी मुद्रणकलाच बाल्यावस्थेत होती. ग्रंथ प्रकाशनाचे काम फार पैशाचे नि श्रमाचे होते. आणि विशेष लाभदायक नव्हते. अशा परिस्थितीतही त्यांनी हे सहस्त्रावधी प्रतींच्या आवृत्तीचे दत्तविषयक प्रकाशन अंगावर घेतले हे त्यांच्या उत्कट दत्तभक्तीचेच द्योतक होते. आपल्या आराध्य दैवताच्या गुणवर्णनपर स्तोत्रांचा लोकात प्रसार व्हावा म्हणून त्यांनी प्रसिद्ध केलेला 'दत्तलहरी' हा ग्रंथ. वे शा सं. गंगाधरशास्त्री दातार यांच्याकडून मराठीत भाषांतर करवून घेऊन त्यांनी प्रसिद्ध केला त्याची पृष्ठे त्रेपन्न असून त्यात एकशेदोन लहरी आहेत. तो वामनशास्त्री येदरकर याच्या सुविद्या प्रकाश मुद्रणालयात छापला गेला. हा ग्रंथ वासुदेव बळवंतांनी शके १७९५मध्ये श्रीमुखनाम संवत्सरे कार्तिक शुद्ध पंचमी रविवार या तिथीस आपल्या एकोणतिसाव्या जन्मतिथीच्या मुहूर्तावर प्रसिद्ध केला. अधिक शोध करता या दिवशी २६ऑक्टोबर १८७३ हा दिनांक होता असे मला आढळले. हे भाषांतरच असल्यामुळे मुळातील लहरीचा वाचनानंद वाचकांना काही ठिकाणी होणार नाही, तरी त्या ठिकाणी मूळ लहरी म्हणाव्या अशी सूचनाही वासुदेव बळवंतानी त्या पुस्तकाच्या उपोद्घातामध्ये केली आहे.

या ग्रंथाच्या प्रत्येक प्रतीच्या शेवटच्या पानावर वासुदेव बळवंतांनी "सेवक वासुदेव बळवंत फडके" अशी मोडीत स्वाक्षरी केलेली आहे.[12] त्या स्वाक्षरीखाली आपल्या जन्मग्रामाचा निर्देश त्यांनी मुद्रित केलेला आहे. आपल्या हाताने त्यांनी केलेली ही स्वाक्षरी बहात्तर वर्षांनी माझ्या हाती लागली तेव्हा त्या घटनेचा माझा आनंद किती मोठा होता!

वासुदेव बळवंतानी प्रसिद्ध केलेल्या या ग्रंथाच्या प्रती अर्थातच फार दुर्मिळ

---

११ " दि पूना ऑब्झर्वर," दि ४ ऑगस्ट १८७९

१२ हा ग्रंथ १८४७च्या २०व्या ॲक्टप्रमाणे आणि १८६७च्या २१व्या ॲक्टप्रमाणे प्रकाशित केलेला आहे. त्या निर्बंधाप्रमाणे लेखकाची अशी स्वाक्षरी या प्रतीवर आवश्यक असल्याचे कोणास माहीत.

झाल्या आहेत. त्यांपैकी एक प्रत सुदैवाने माझ्या हाती लागली. ज्याच्या चरित्राची माहितीही मिळणे कठीण झालेले आहे अशा आपल्या चरित्रनायकाचा प्रत्यक्ष हस्त-स्पर्श यतीला झालेला आहे, या भावनेने एक दुर्मिळ आणि बहुधा अप्राप्य वस्तू हाती आल्याचा आनंद ती प्रत मिळताच मला झाला.

या ग्रंथाच्या प्रती उपासनामंत्र म्हणून पुष्कळांनी जवळ बाळगल्या. त्याचप्रमाणे वासुदेव बळवंतांची आठवण म्हणूनही कित्येकांनी त्या जवळ ठेवल्या. त्यांचा प्रसार महाराष्ट्रीयांमध्ये काशीपासून गोव्यापर्यंत झालेला होता. याविषयी लिहिताना चं. पु. दा. या आद्याक्षरीखाली पुढील वृत्तांत 'केसरी'मध्ये प्रसिद्ध झाला आहे.

"वासुदेव बळवंत हे परम देशभक्त होते, तसे ईश्वरभक्तही होते. वासुदेव बळवंत यांनी आपल्या उपासनेचा एक ग्रंथ दत्तात्रेय ऋषीप्रणित 'श्रीदत्तलहरी' नावाचा मोठ्या शास्त्र्यांच्या सहाय्याने मराठीत भाषांतर सुंदर रीतीने करून पोथी-रूपाने प्रसिद्ध केला आहे. सदरहू पुस्तकाची एक प्रत प्रसिद्ध 'नामचिंतामणि' ग्रंथांचे कर्ते ह. भ. प. रामचंद्र कृष्ण कामत, श्रीदुर्गा दत्तमंदिर मार्शेल (गोवा) यांच्या संग्रहात आहे. हे दत्तलहरी स्तोत्र नुसते काव्यात्मक नसून श्रीशंकराचार्यांच्या 'सौंदर्य-लहरी'प्रमाणे मंत्रात्मक आहे." [११]

परंतु दत्तलहरी हे दत्ताच्या स्तोत्राचेच पुस्तक प्रसिद्ध करून त्यांचे समाधान झाले नाही. ही फार तर आपल्या दैवताची प्रार्थनारूप स्तुती झाली. वासुदेव बळ-वंतांची आपल्या आराध्य दैवताविषयी आस्था मोठी होती. त्याच्या चरित्राचे ज्ञानही सर्व लोकांना व्हावे अशी त्यांची याहूनही उत्कट इच्छा होती. त्यामुळे 'तो गुरूचा महिमा (सर्वत्रास) कळविणे हे माझे कर्तव्य आहे" असे वाटून हा दत्तलहरी ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. आणि जनतेचा आश्रय मिळाल्यास "दत्तमहात्म्य ग्रंथ" प्रसिद्ध करण्याचे त्यांनी याचवेळी घोषित केले. तो ग्रंथ दहा सहस्त्र ओव्यांचा होईल आणि पाच रुपयात सर्व भक्ताना तो विकत द्यावयाचा असेही त्यानी ठरविले. या ग्रंथाची सविस्तर माहिती पुढे एका प्रकरणात दिली आहे. पण त्याचा हा विस्तार लक्षात घेता त्याचे हस्तलिखित आपला इतर कार्याचा व्याप संभाळीत उत्तम अक्षरात सुबकपणे लिहून काढावयाचे तर त्याला वरीच वर्षे लागणारी होती. त्यामुळे त्यानी त्याचे हस्त-लिखित लिहून काढण्यास याचवेळी सुरुवात केली असली पाहिजे हे उघड आहे. पण त्याच्या ज्या असामान्य राजकीय जीवनग्रंथाचे दर्शन महाराष्ट्राला पुढे होणार होते, त्या जीवनग्रंथाची पृष्ठे आपल्या रक्ताने लिहून तो पुरा करण्यात त्यांना संकल्पित ग्रंथाचे हस्तलिखित जरी पुरे करता आले, तरी तो मुद्रित करून प्रकाशित करण्यास मात्र सुटवंगपणा मिळाला नाही आणि ते कार्य तसेच राहून गेले.

'दत्तलहरी' ग्रंथाच्या प्रकाशनाच्या व्यापातून वासुदेव बळवंत मोकळे झाले,

---

११ 'केसरी' दि. २ जानवारी १९४०

त्याच वर्षी वासुदेव बळवंतांच्या आयुष्यात एक शोचनीय घटना घडली. त्याचा प्रथम विवाह होऊन आता तेरा वर्षे झाली होती. ते आणि त्यांची पत्नी आपल्या संसारात एकमेकांशी समरस होऊ लागली होती. त्यांच्या पत्नीचा स्वभाव त्यांच्या क्रांतिकारक आयुष्याला कितपत सहाय्यभूत होण्यासारखा होता त्याची कसोटी लागण्याला थोडाच अवधी होता. पण अशी कसोटी लागण्याची वेळच आली नाही. कारण १८७३ च्या मध्यालाच थोडया दिवसांच्या दुखण्यानंतर त्यांची पत्नी मृत्यू पावली. तिच्या मागे मातृसुखाला पारखी झालेली त्यांची मुलगी मथुताई ही केवळ चार वर्षाची पोर होती. या घटनेमुळे वासुदेव बळवंतांना मोठा धक्का बसला. पण स्थित-प्रज्ञ वृत्तीने त्यांनी तो सहन केला. वैयक्तिक संसारसुखासाठी हळहळत बसण्यास त्यांना वेळ होता कोठे ?

आणि त्यांच्या मनःस्थितीचा विचार करण्याचे उपवर वधूच्या पित्यांना काय कारण होते ? ते त्यांच्याभोवती त्यामुळेच लागलीच घोटाळू लागले. त्यांचे वय सारे २८ वर्षांचे होते. आणि या वयात दुसरा विवाह करणे हे त्याकाळी मोठे जगा-वेगळे नव्हते. दुसरे म्हणजे आपली धाकटी मुलगी मथुताई पुढे उभी राहिल्यामुळेही पुन्हा विवाह करण्याचा विचार त्यांनाही सोडून द्यावा लागला. प्रथम विवाहाच्या वेळची चोखंदळ वृत्ती आता त्यांच्या ठिकाणी राहिली नव्हती. त्यामुळे दुसऱ्या विवा-हाच्या वेळी त्यांनी वधूपसतीविषयी घोळ घातला नाही.

पडघोलीचे काशीनाथशास्त्री कुंटे हे विद्वान पंडित आपली मुलगी गोदुबाई ही त्यांना सांगून गेले, तेव्हा त्यांनी तिला पसंत ठरविली. काशीनाथशास्त्री मूळचे त्यावेळच्या भोर संस्थानातील पडघवलीचे रहाणारे. पण नोकरीनिमित्त विजापुरास गेले होते. तेथेच १८६४ मध्ये विजयादशमीच्या दिवशी गोदुबाईचा जन्म झाला. काशीनाथशास्त्री नंतर नोकरीतून निवृत्त झाले आणि त्यांनी विजापूर सोडले. गोदुबाईचे काही बालपण पडघवलीमच गेले. पुढे काशीनाथशास्त्री पुण्यासच रहाण्यास आले. त्यामुळे बाईही पुण्यामच आल्या. त्यांना दोन लहान बहिणी आणि एक लहान भाऊ होता. त्याचे नाव गणेश काशीनाथ कुटे होते. त्याचे दुसरे नाव बल्लाळ होते. त्याची एक बहीण इंदुरास सरदार किबे यांचे आश्रित वे. शा. स. रामशास्त्री दिनकरशास्त्री सांवोटे यांस दिली होती. काशीनाथशास्त्री आपली मुलगी वासुदेव बळवंतांना सांगून जाण्याचे एक कारण असे संभवते की, त्यांची वासुदेव बळवंतांशी आधीच ओळख असावी. काशीनाथशास्त्री कुटयांचे व्यासांकडे मेहुण्याचे नाते होते. आणि या व्यासांचा वाडा भटगुरूंच्या वाडयालगतच होता. तो आता मराठ्यांचा वाडा झाला आहे. भिकारदार मारुती रस्त्यावरचा जुना ६६३ किंवा नवा १२७१ सदाशिव पेठ हा आताचा वाडा म्हणजेच त्यावेळचा व्यासांचा वाडा होय. त्यामुळे व्यासांकडे कुंटयांचे जाणे येणे होते. वासुदेव बळवंत काही दिवस भटगुरूंच्या वाडयात

रहात असत. त्यामुळेच त्याची कुंटे यांना माहिती असावी. तेव्हा या कुटुंबातील गोदुबाईंशी वासुदेव बळवंतांना दुसरा विवाह विशेष थाटमाट न होता शिरढोण येथेच १८७३ मध्ये साजरा झाला. विवाह झाल्यानंतर गोदुबाईचे नाव गोपिकाबाई असे ठेवण्यात आले. एका शूर क्रांतिकारकाच्या पत्नीपदावर अधिष्ठित होताना, आपणास आयुष्यात कोणत्या प्रसंगांना भावी काळात तोंड द्यावे लागणार आहे, त्याची गोपिकाबाईंना कल्पना नव्हती. श्रीमंत घराण्यातील पती आपल्या मुलीला मिळाला म्हणून त्यांच्या वडिलांना आनंद झाला आणि त्याच आनंदात ते मे १८७३ मध्ये आपल्या मुलीस वासुदेव बळवंतांच्या स्वाधीन करून इहलोक सोडून गेले. त्यानंतर जुन्नरचा त्यांचे मेहुणे म्हणजे आपले मामा दामले यांचाच गोदुबाईंना आधार राहिला. पण काशीनाथशास्त्र्यांची मुलगी आणि इतर कुटुंबीय मंडळी वासुदेव बळवंतांच्या 'बंडा'च्या काळात सरकारी छळाच्या संकटातून वाचू शकली नाहीत. वासुदेव बळवंतांच्या या दुसऱ्या पत्नी म्हणजेच वीरपत्नी बाईसाहेब फडके होत.

दुसऱ्या विवाहानंतर कारकोळपुऱ्यातील नरसोबाच्या देवळातील आपल्या बिऱ्हाडातच वासुदेव बळवंतांनी नवा संसार थाटला. या विवाहानंतरच्या काळात त्यांचे एक धाकटे बंधू कृष्णाजी बळवंत किंवा बाबा हे त्याच्या मागोमाग मुंबईलाच जी.आय. पी. रेल्वेमध्ये नोकरीला लागले होते हे खरे. पण त्यांचे दुसरे धाकटे बंधू पांडुरंग बळवंत किंवा आबा, आणि गंगाधर बळवंत हे शिक्षणासाठी वासुदेव बळवंतांकडे होते. बाईंचा भाऊ बल्लाळ हाही काही दिवस त्यांच्याकडे राहात असे. ते आणि मथुताई वासुदेव बळवंतांना भाऊ म्हणत. कृष्णाजी बळवंत आणि पांडुरंग बळवंत हे बाईंपेक्षा वयाने मोठे होते. पण गंगाधर बळवंत मात्र त्यांच्याच वयाचे होते. या जागेत वासुदेव बळवंतांचे पुढे चार वर्षे बिऱ्हाड होते. बाई वयाने लहान म्हणून प्रथम काही दिवस त्यांची एक सावत्र मोठी भावजय या बिऱ्हाडात राहिली होती. पण पुढे बाईंनाच बिऱ्हाडाचा सर्व भार वाहावा लागला. वर्षाविर्षाला वासुदेव बळवंतांची वृत्ती संसारात मन न लागणारी होऊन गेली. पहिली दोन वर्षे त्यांची पारमार्थिक भक्ती, आणि सार्वजनिक कार्यातील उलाढाली नंतर एक दोन वर्षे क्रांतिकारक गुप्त संघटनेसाठी चाललेली खटपट आणि धावपळ आणि त्यानंतर बंडाचा ध्वज फडकावून बाहेर पडण्याच्या आधीची बेफाम मनःस्थिती याच्यामुळे त्या अननुभवी वयात संसारशकट कौशल्याने चालविणे बाईंना अवघड होऊन बसले. वासुदेव बळवंतांचे वेतनही त्याच कार्यात व्यतीत होऊ लागले आणि तरीही दीर आणि पति यांना सुख वाटेल अशा संपन्नतेत बाईंना बिऱ्हाड चालवावे लागले. पण प्रत्येक वेळी जे काही कमी पडेल त्याचा बोभाटा करण्याचा त्यांचा स्वभाव नव्हता. त्यामुळे आपली अडचण बोलून न दाखविता गृहव्यवस्था ठेवण्याचा ताण त्यांना सोसावा लागला. परंतु बाईंची वृत्तीच सोशीक

आणि कष्टाळू असल्यामुळे त्यांनी तो संसार कर्तृत्वाने चालविला आणि वासुदेव बळवंतांची वाहवा मिळविली. त्या काळात त्यांनी हौस म्हणून स्वतःसाठी पतीजवळ कशाचीही मागणी केली नाही! त्यांची ही निग्रही आणि निरिच्छ वृत्ती वासुदेव बळवंतांच्या प्रशंसेची गोष्ट होऊन राहिली.

संसाराशी समरस होणाऱ्या बाईंच्या या वृत्तीला साजेशीच वासुदेव बळवंतांची वागणूक होती. शिक्षणाच्या संबंधात ते पुरोगामी मताचे होते. त्या काळातही स्त्रियांनी नुसते घरकाम करूनच थांबता कामा नये तर शिक्षित आणि सुसंस्कृत झाले पाहिजे असे त्यांना वाटे. खरे म्हणजे त्यांनी शिक्षण घेतले तर चालेल, असे त्याचे नुसते मत नव्हते, तर त्यांनी ते घेतलेच पाहिजे असा त्यांचा कटाक्ष होता. त्यामुळे स्वत:च शिक्षकाची भूमिका घेऊन आपल्या भावांसमवेत विशेषतः गंगाधर बळवंतांसमवेत बाईंनाही त्यांनी लेखनवाचन शिकविले. पाठांतरात त्यांना प्रगत केले. बाईंनी विष्णुसहस्रनामासारख्या संस्कृत पाठांतराने प्रारंभ करून अमरकोश पाठ करून टाकण्यापर्यंत संस्कृतात प्रगती केली. मराठीच त्या घडाघडा वाचून दाखवू शकत असे नव्हे, तर कठीण संस्कृतसुद्धा अस्खलीतपणे वाचू शकू लागल्या. वासुदेव बळवंतांना वर्तमानपत्र वाचून दाखविणे हा त्यांचा नेहमीचाच उद्योग झाला.

बाईंच्या या बौद्धिक शिक्षणानेच त्यांच्या शिक्षणाविषयीची वासुदेव बळवंतांची आस्था संपली नाही. शस्त्रकलेत आणि युद्धकलेत कोणत्याही उग्र बलोपासकाचे असावे तितके त्यांचे स्वत:चे नैपुण्य होते. त्याचा वृत्तांत पुढे एका प्रकरणात येईलच. या क्षेत्रातही शक्य ते शिक्षण बाईंना त्यांनी दिले, त्या कलांपैकी घोड्यावर बसण्यात, दांडपट्ट्याचे हात करण्यात आणि बंदूक उडविण्यात बाईंना त्यांनी तरबेज केले. बंदूक उडवून निशाण मारण्यात तर बाईंचा हातखंडा होता. नरसोबाच्या देवळाच्या डाव्या बाजूला निर्जन गर्द झाडी पसरलेली होती. वासुदेव बळवंत कार्यालयातून घरी आले की बिऱ्हाडाच्या या मागच्या परसात बाईंनी बंदूक उडवलीच पाहिजे असा त्यांनी त्यांना नियम घालून दिला होता आणि त्याप्रमाणे बाई त्या बिऱ्हाडात आणि पुढे थट्टीवाल्यांच्या वाड्यातील आपल्या बिऱ्हाडात असतानाही तशी बंदूक उडवीत आणि तिचा फाऽऽड असा आवाज त्या वेळेला दुमदुमून जाई.[१४] मर्दानी युद्धकलेत इतके शिक्षण मिळविलेल्या बाई या पहिल्याच आधुनिक महिला होत्या.

या काळात धार्मिक व्रतांमुळे आणि स्वदेशीच्या आग्रहामुळे वासुदेव बळवंतांच्या जीवनक्रमात बदल होत गेला आज काय मी ही गोष्ट सोडली, उद्या काय ती गोष्ट मी सोडली होती, ती मला कशाला वाढली, ही विदेशी गोष्ट घरात कशी आली

१४ ही बंदूक दोन नळीची त्याकाळची जुन्या तऱ्हेची फार अवजड अशी होती आणि ती उडवताच खांद्यावर उलट धक्का बसे, अशी आठवण एकदा हा विषय निघताच बाईंनी माविर्भाव सांगितली!

असे प्रश्न विचारून ते बाईंच्या आणि भावाच्या गृहव्यवस्थेवर आक्षेप घेत आणि ते निस्तरता निस्तरता बाईंना पुरेवाट होई.

आपल्या नव्या संसाराचा प्रारंभ वासुदेव बळवंतांनी केला. त्यानंतरची वर्षे महाराष्ट्रात अस्वस्थतेची आणि दुःस्थितीचीही गेली. त्या काळात देशाचे स्वातंत्र्य मिळविण्याच्या हेतूचा मागमूसही ज्यांच्या ज्यांच्या मनात आहे असे वाटेल, त्यांना त्यांना नामशेष करण्याचा प्रयत्न ब्रिटिश राज्यसत्तेकडून होणार, असे वाटावयाला लावणारे राजकीय दृश्य महाराष्ट्रात दिसले. पुण्याच्या सार्वजनिक सभेने त्या प्रकरणी जी धडाडी दाखविली ती लक्षात ठेवून वासुदेव बळवंतांच्या उठावणीचे संपूर्ण स्वरूप समजून येईपर्यंत इंग्रज सरकार सार्वजनिक सभेसारख्या संस्थेच्या नेत्यानाही त्या उठावणीचे प्रणेते समजत होते. इतकी त्या दृश्यातील सभेची निर्भय युयुत्सु वृत्ती दीप्तिमान होती.

* * *

## प्रकरण ६ वें

# दुष्काळाने उडविलेला हाहा:कार

कळवळला तो या गरिबांचा कळवळला देव
दूर पळाला काळ, घातला खोल जरी घाव

—भा. रा. तांबे

लोकहिताच्या कार्यासाठी खटपट करण्याची पावले टाकण्याचे ठरविल्यानंतर अन्यायाखाली दडपलेल्या जनतेला युयुत्सु करण्याचे मार्ग वासुदेव बळवंत शोधू लागले. त्यांना आपल्यावरील अन्यायाची जाणीव व्हावयाला हवी असेल आणि त्या अन्यायांना विरोध करण्यासाठी त्यांनी कृतीप्रवीण व्हावयाला हवे असेल तर लोक-शिक्षण आणि लोकसामर्थ्य यांची वाढ झाली पाहिजे अशी त्यांची निश्चिती झाली. अशा जीवनाचा मार्ग प्रथमच शोधताना त्यांनी त्याचे निरनिराळे टप्पे कसे शोधून काढले याचे खरोखरच आश्चर्य वाटते. त्या वेळच्या सरकारी शाळा नुसत्या पुस्तकी ज्ञान देणाऱ्या आणि म्हणून वरील दृष्टीने निरुपयोगी होत्या, असे पाहिल्यावर स्वदेश-प्रेमाचे आणि स्वराज्यभक्तीचे वारे विद्यार्थ्यांत निर्माण होईल असे शिक्षण लोकांना प्रथम मिळाले पाहिजे हे त्यांनी आधुनिक नेत्यांमध्ये प्रथम ओळखले. विष्णुशास्त्री चिप-ळूणकर आणि टिळक-आगरकरांनी न्यू इंग्लिश स्कूल काढून अशा कार्याला प्रारंभ केला. पण त्याचा पायडा वासुदेव बळवंतांनी पाडला होता. अशा राष्ट्रीय वृत्तीच्या शिक्षणा-साठी त्यांनी पुण्यात १८७४ मध्ये 'पूना नेटिव्ह इन्स्टिटयूशन' ही पहिली बिनसरकारी संस्था स्थापन केली. ते तिचे पहिले कार्यवाह आणि कोषाध्यक्ष झाले. आणि तिच्या वतीने चालणारी तशा प्रकारची पहिली शाळा पुण्यात स्थापन केली. ही शाळा न्यू इंग्लिश स्कूलच्याही आधीची म्हणून राष्ट्रीय शिक्षण द्यावयाचा प्रयत्न करणाऱ्या शाळेत तिच्याकडेच वडीलकीचा मान येतो. ही शाळा जुन्या तपकीर गल्लीत किबे वाड्यात म्हणजेच आताच्या गृहक्रमांक ५६५ बुधवार येथे सुरू झाली. त्या कार्यात त्यांचे सहकारी होते वामन प्रभाकर भावे आणि लक्ष्मणराव इंदापूरकर पण ते व्यवस्थापक म्हणून उत्तम असले तरी युरोपियन लोक किंवा अधिकारीवर्ग याच्याशी करारी वर्तन ठेवण्याच्या दृष्टीने अगदी मऊ होते. त्यामुळे ज्या वृत्तीची शाळेच्या द्वारा वाढ

व्हावी असे वासुदेव बळवंतांना वाटत होते, तिच्या संबंधात वासुदेव बळवंतांचाच प्रभाव उल्लेखनीय होता. हीच शाळा पुढे पुण्याची प्रख्यात भावे शाळा म्हणून प्रसिद्ध झाली. वासुदेव बळवंत हे याप्रमाणे भावे स्कूलचे ज्यांचे नाव सांगण्यास अभिमान वाटावा असे एक संस्थापक होते.

या शाळेतून विद्यार्थ्यांत राष्ट्रीय वृत्ती निर्माण व्हावी ही वासुदेव बळवंतांची इच्छा कशी होती ते त्या शाळेविषयी राष्ट्रीय वृत्तीच्या विद्यार्थ्यांना काय वाटत होते यावरून दिसून येईल. इतिहासाचार्य विश्वनाथ काशीनाथ राजवाडे हे त्या शाळेचे एक विद्यार्थी होते. ते त्यासंबंधात म्हणतात, " १८७६ साली मी पहिल्यांदा बाबा गोखल्यांच्या शाळेत गेलो... पाच सात महिने लोटले इतक्यात पुण्यातील प्रसिद्ध वकील काशीनाथपंत नातू... (याच्या) डोक्यात स्वतःच एक नवीन शाळा काढावी अशी शक्कल आली... माझ्या वर्गातील काही पुढारी मुले या नवीन शाळेत गेली म्हणून मीही त्याच्याबरोबर गेलो... येथे जो दोन तीन महिने काढतो इतक्यात प्रसिद्ध देशभक्त पण बंडखोर वासुदेव बळवंत फडके, रा. रा. वामनराव भावे व लक्ष्मणराव इंदापूरकर या तिघांनी एक नवीन शाळा काढली व नातूंच्या शाळेतील बरीच मुले आपल्या शाळेत फितवून नेली. त्या मुलांबरोबर मीही भाव्यांच्या शाळेत दाखल झालो... भाव्यांच्या शाळेत १८७७, १८७८ व १८७९ ही तीन साले मी काढिली..."

"...आता वीसबावीस वर्षांनी... शाळा काढणाऱ्या बहुतेक गृहस्थाविषयी फारसा पूज्य भाव मनात उद्भवत नाही. (पण)... वासुदेव बळवंत फडके, वामन प्रभाकर भावे व लक्ष्मण नरहर इंदापूरकर हे तिघेही गृहस्थ नीतिमत्तेने बरे होते. पैकी वासुदेव बळवंत फडके यांचा शाळा काढण्यात एवढाच हेतू होता की, शाळेतील मुले उत्तम देशभक्त निपजावीत. परंतु हा उदात्त विचार ज्या पद्धतीने अमलात आणावा अशी फडक्याची इच्छा होती तो...स्वीकारलो असता आपल्यासारख्या गरीब व पोटभरू माणसांना शाळा सोडून देशांतर करण्याचा प्रसंग हटकून यावयाचा, तो न यावा अशी दोघांची इच्छा असल्यामुळे फडक्यांचा ह्या शाळेशी जो काही थोडासा संबंध होता तो लवकरच तुटून गेला."[1]

या उद्गारात वासुदेव बळवंतांची शाळा १८७६ नंतर निघाल्याचे जे ध्वनित होते ते खरे नाही. हे यापुढे देण्यात आलेल्या प्रकटनाच्या प्रसिद्धीदिनावरून सिद्ध होते. पण ही शाळा स्थापन करण्यात विद्यार्थ्यांत देशभक्तीची भावना उत्पन्न व्हावी हा वासुदेव बळवंतांचा हेतू कसा होता आणि त्याचा शाळेशी असलेला संबंध वैयक्तिक जीवनाच्या चाकोरीतूनच वाटचाल करणाऱ्या लोकांना कसा आणि किती दाहक वाटत असे, त्याचे प्रत्यंतर मात्र आपणास या उद्गारांत मिळते.

---

१ भा. ऊ. भट. "इतिहासाचार्य विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांचे चरित्र", पृ. १११-१३

परंतु वासुदेव बळवंताच्या वरील दृष्टिकोणामुळेच शाळेकडे ठराविक चाकोरी-तून जाणारे लोक सावधगिरीने पाहू लागले. पुण्याच्या पांढरपेशा लोकांच्या ध्यानात एक तेजस्वी तरुण म्हणून ठळकपणे भरावे असे नाव वासुदेव बळवंतांनी गेल्या नऊ वर्षांत मिळविले होते. त्यांचे बंडखोर विचारही बऱ्याच जणांना माहीत झाले होते. तेव्हा याच्याविषयी सावध राहिले पाहिजे असे वरील लोकांनी ठरविले. स्वाभिमा-नाची शिकवणूक देणाऱ्या शाळेतील शिक्षणावर त्यांना उघड उघड आक्षेप घेता येत नव्हता. तेव्हा ते निराळयाच प्रकारचे आक्षेप घेऊन पालकांनी आपली मुले त्या शाळेत पाठवू नये असा गुप्त प्रचार करू लागले. त्या आक्षेपांमुळे लोकांचा अपसमज होऊ नये म्हणून शेवटी आपल्या स्वाक्षरीने वासुदेव बळवंतांना शाळेसंबंधी वृत्तपत्रांत एक प्रकटन प्रसिद्ध करावे लागले. ते जुन्या मराठी भाषेत आहे, म्हणूनही वाचनीय आहे. ते त्यांनी ४ नोव्हेंबर १८७४ ला म्हणजे आपल्या तिसाव्या जन्मदिनी प्रसिद्ध केले. त्यांच्या कार्यातील बऱ्याच महत्त्वाच्या गोष्टींसाठी त्यांनी आपल्या जन्म-दिनाची निवड केलेली दिसते. 'दत्तलहरी' ग्रंथाची प्रसिद्धी त्याच तिथीला आणि ही चेतावणीची घोषणाही त्याच दिवशी त्यांनी केली, यावरून हा विचार ठाम होतो. ते प्रकटन पुढील प्रमाणे होते—

## जाहिरात

संस्कृत, लॅटीन, पर्शियन आणि मराठी यापैकी एक, व दुसरी इंग्रजी, मॅट्रि-क्युलेशनच्या परीक्षेपर्यंत शिकणाऱ्या मुलांकरिता, या शाळेत मोठे अनुभविक शिक्षक असून बहुत काळपर्यंत सुरक्षित चालावी व ज्या शाळेचे तिमाही रिपोर्टावरून लोकां-ची खात्री व्हावी व मुलाचे अभ्यासाकडे लक्ष आहे की नाही, आईबापांचे सल्ल्या-शिवाय मुले विनाकारण घरी राहतात की काय व धडा करितात किंवा नाही वगैरे बद्दलची तजवीज या शाळेत चांगले प्रकारची ठेविली आहे. हल्ली ही शाळा जुने तपकीर गल्लीत किबे यांचे वाड्यात आहे. ह्या महिन्यात तारीख १५ पर्यंत मुले घेतली जातील. कित्येक मास्तर लोक आपली पुण्याई खर्च करून मुलांस या शाळेत जाऊ नये म्हणून खोटे खोटे नानाप्रकार सांगून त्यांचे मनावर ठसे उठवीत आहेत. परंतु हे त्यांचे करणे बरोबर नाही. ता. २७ ऑक्टोबर सन १८७४ इसवी

वासुदेव बळवंत फडके
सेक्रेटरी आणि ट्रेझरर पूना नेटिव्ह इन्स्टिटयूशन[२]

या शाळेच्या वंशवेलीला लवकरच देशातील सर्वांत जुनी शाळा म्हणून नवे अंकुर पुढे फुटले आणि आता बरीच महाविद्यालये आणि शाखाउपशाखांच्या द्वारा ती

२ "ज्ञानचक्षू", दि. ४ नोव्हेंबर १८७४

पुण्यात एक नामवंत शिक्षणसंस्था म्हणून उभी आहे. टिळक आगरकरांच्या म्हणून रूढ झालेल्या शिक्षण क्षेत्रातील राष्ट्रीय जागृतीच्या शिक्षणाच्या आंदोलनाचा प्रारंभ याप्रमाणे वासुदेव बळवंतांनीच त्याच्या आधी सहासात वर्षे केला होता.

याच वेळेला जनताजागृतीच्या क्षेत्रात वासुदेव बळवंतांनी उडी घेतली. ते स्वतः लेखनिक होते. त्यामुळे परकीय इंग्रजांनी त्या क्षेत्रात हिंदी लोकांची कुचंबणा आणि पिळवणूक किती चालविली आहे, त्याचा त्यांना पूर्ण अनुभव होता. मनुष्याला स्वतःच्या जगातील अन्याय लवकर समजतात. त्यामुळे आपल्या या जगातील अन्यायाची दृश्ये त्यांना ठळकपणे लक्षात येऊ लागली. हिंदुस्थानातील ऐश्वर्यसंपन्न मोठ्या वेतनाच्या नोकऱ्यांपैकी बहुतेक सर्व नोकऱ्या इंग्रजांना मिळत आहेत आणि ते ज्यांना हेटाळणीने 'नेटिव्ह' म्हणत, असे आपले लोक दरिद्री वेतनाच्या कनिष्ठ पदांचे तुकडे चघळीत बसले आहेत, हे त्यांच्या लक्षात आले. दुःख हे केव्हाही वाईट असते; पण ते भोगत असणाऱ्या मनुष्याला, आपल्याला ते भोगावे लागतच नाही, अशी लोकांची समजूत आहे असे दिसले की ते दुःख अधिकच असह्य होते. हिंदी लोकांनाही आम्ही वरिष्ठ नोकऱ्या देत आहोत, हा इंग्रज सरकारचा बकवाही वासुदेव बळवंताचे वरील दुःख वृद्धिंगत करीत होता. सरकारची ही रीत सुशिक्षितामध्ये संताप उत्पन्न करीत नाही, हे पाहून त्यांना आश्चर्य वाटले. हिंदी लोकानाही आम्ही मोठ्या नोकऱ्या देत आहोत या ब्रिटिश घोषणेचे वाभाडे काढताना ते म्हणतात– "एका मनुष्याला कोठे मोठी जागा द्यावयाची आणि डांगोरा मात्र पिटावयाचा की, हिंदुस्थानी लोकांना आम्ही मोठ्या जागा देतो. ही ब्रिटिशांची शुद्ध फसवेगिरी आहे. त्यांची बाह्य वागणूक औदार्याची आणि आतील वागणूक विश्वासघातकीपणाची आहे. अशी एक ना दोन! हजारो उदाहरणे आहेत! पण आमच्यापैकी एकाच्या तरी ही फसवेगिरी लक्षात येते का?"[२]

हिंदी लोकांवरील अन्यायाविषयी अशी माहिती गोळा करून ती क्षेप उत्पन्न करील अशा भाषेत आपल्या व्याख्यानातून रंगविण्याचे त्यांनी ठरविले. नोकरीत असतानाच सुटीच्या दिवशी ते दूरदूरच्या गावी जाऊ लागले. कार्यालयाबाहेरच्या वेळात पुण्यात सार्वजनिक कार्यात वेळ घालवावा, शनिवार आला की वरील कार्यासाठी पुण्याहून बाहेरगावी जावे आणि रविवारी व्याख्यानाद्वारा किंवा इतर मार्गाने त्या ठिकाणी प्रचार करून सोमवारी पुन्हा कामावर उपस्थित व्हावे असा त्यांचा नियम असे. आधुनिक राजकारणातील नेतृत्वाचे दौऱ्याचे उपाग वासुदेव बळवंतानी आत्मसात केले होते. प्रथम पुण्यात त्यांनी व्याख्याने दिली. नंतर पनवेल, पळस्पे तासगाव, नरसोबाची वाडी इ. ठिकाणच्या व्याख्यानांसाठीही त्यांनी दौरे काढले. पुण्यातील व्याख्यानाच्या घोषणेसाठी त्यांना स्वतःलाच प्रथम हिंडावे लागे. ते हातात थाळी घेत, चौकाचौकातून उभे राहून ती वाजवीत आणि लोकांना सागत, "आज

२ वासुदेव बळवंताचे 'आत्मचरित्र'

संध्याकाळी सगळ्यांनी शनिवारवाड्यासमोर यायचे. माझं तिथे व्याख्यान आहे. आपला देश स्वतंत्र झाला पाहिजे. इंग्रजांना हाकून लावले पाहिजे. त्यासाठी काय प्रयत्न करायचा ते मी आज माझ्या व्याख्यानात सांगणार आहे!"[१] वासुदेव बळवंतांची ही घोषणा ऐकून घाबरट वृद्धांचाच नव्हे तर बहुसंख्य तरुण सुशिक्षितांचाही धीर सुटे! केवढे साहसी वक्तव्य होते ते त्या काळात! त्यांची ती घोषणा कानी पडताच तरुणांना स्फुरण चढत असे, तरी एक समुच्चयाने ती घोषणा करण्याची मात्र त्याची छाती नव्हती. स्वतःच्या व्याख्यानाची वासुदेव बळवंतांची ही घोषणापद्धती स्वातंत्र्य मिळाल्यानंतरही पुण्यातील काही वृद्ध नागरिकांच्या आठवणीत होती.

व्याख्यानास जमलेल्या समुदायापुढे वासुदेव बळवंत उभे राहिले म्हणजे देशाभिमानाने ते देहभान विसरून जात. आणि इंग्रजांनी आपल्या राष्ट्रावर जे अन्यायावर अन्याय लादले आहेत, त्यांच्या वर्णनाने बहरलेले त्यांचे वक्तृत्व मग त्वेषाने सुरू होई. इंग्रजांच्या परमावधीच्या द्वेषाने भरलेली आणि देशभक्तीने रसरसलेली अशी त्यांची ती व्याख्याने तरुणांना स्फूर्तिदायक वाटत. त्यामुळे त्यांची ती व्याख्याने कित्येकांनी लिहून आपल्या संग्रही ठेविली होती. वासुदेव बळवंतांना स्वातंत्र्याचा एकच ध्यास लागलेला होता. तो त्यांच्या व्याख्यानात दिसे. "स्वातंत्र्य आणि स्वराज्य यांच्यावाचून तुमची दुःखं जाणार नाहीत", असे ते श्रोत्यांना स्पष्ट सांगत असत. शनिवारवाड्याच्या तटाने महाराष्ट्राच्या श्रेष्ठ देशभक्तांची व्याख्याने ऐकली, त्यांत त्याने त्यांच्यातील आद्यक्रांतिकारक असणाऱ्या या देशभक्ताचीही व्याख्याने ऐकलेली आहेत.

वैध चळवळीचा हा मार्ग अनुसरून जनतेस लढ्यासाठी सिद्ध करण्याचा प्रयत्न वासुदेव बळवंतांनी केला. पण त्यांचे हृदय शांतपणे आदळाची वाट पहात उभ्या राहाणाऱ्या पोक्त नेत्याचे नव्हते! ते क्रांतीचा वडवानल केव्हा पेटेल, अशी उत्कंठा लागलेल्या उच्छृंखल क्रांतिकारकाचे होते. महिन्यामागून महिने चालले. व्याख्यानामागून व्याख्याने त्यांनी दिली. पण 'तुमचा मार्ग अनुसरण्यास आम्ही सिद्ध आहोत,' असे सांगणारे कोणीच त्यांच्याकडे येईनात. जनताजागृतीच्या या मार्गासंबंधी त्यांची निराशा झाली. लोक उठावणी करण्यास सिद्ध नाहीत, म्हणून इंग्रजांचे राज्य असेच आपल्यावर चिरंतन रहावयाचे काय? असा प्रश्न त्यांच्यापुढे उभा राहिला.

आणि इंग्रजांविरुद्ध त्यांचा संताप वाढवणारी एक घटनाही याचवेळी घडून आली. तिचे पडसाद पुण्यात आणि महाराष्ट्रात सतत दोन वर्षे उमटत होते. आणि पुण्यात तर ती घटना जनतेच्या तीव्र आंदोलनाचा श्रीगणेशा ठरली! वासुदेव बळवंत सार्वजनिक सभेच्या कार्यात उत्साहाने भाग घेत आणि पुणेकरांच्या या आंदो-

१ बाईसाहेब फडके यांच्या, त्यांच्या स्नुषा उमाबाई फडके यांनी पाठविलेल्या आठवणी.

लनात सार्वजनिक सभेनेच पुढाकार घेतला होता त्यामुळे त्यांना या प्रकरणाची साद्यंत माहिती मिळत राहिली आणि त्या प्रकरणातील इंग्रजांच्या अन्यायाचाही त्यांना निकट प्रत्यय आला.

हे प्रकरण म्हणजे बडोद्याचे त्या वेळचे महाराज मल्हारराव गायकवाड यांच्या पदच्युतीचे प्रकरण होय. पुढे महाराज सयाजीराव गायकवाडांच्या स्वातंत्र्यप्रेमी राजवटीमुळे हिंदुस्थान सरकारच्या कर्नल बिडुल्फसारख्या अधिकाऱ्याने हिंदुस्थान सरकारला धाडलेल्या एका गुप्त प्रतिवृत्तात पुण्याचे ब्राह्मण ब्रि. सरकारविरोधी आंदोलनासाठी बडोदा संस्थानचा नेहमी उपयोग करतात असे म्हटले, ते १८७४-७५ मधल्या या आंदोलनामुळेच होय !

मल्हारराव गायकवाड हे १८७० मध्ये आपले बंधू खंडेराव गायकवाड यांच्या मृत्यूनंतर बडोद्याच्या गादीवर बसले. नंतर तीन वर्षे त्यांच्या राज्यकारभाराविषयी सरकारकडे अधिकृत अशी विशेष गाऱ्हाणी जात नव्हती. परंतु १८७३ मध्ये कर्नल फेयर हा नवीन ब्रि. राजनिवासी (रेसिडेंट) तिथे आला, तेव्हा त्याने मल्हाररावांच्या राज्यकारभारातील अंदाधुंदीची, अत्याचारांची, इप्रजांवरील अन्यायाची आणि लाचबाजीची इ. बरीच प्रतिवृत्ते मुंबई सरकारकडे पाठविण्यास सुरुवात केली. मुंबई सरकारने ती हिंदुस्थान सरकारकडे धाडली आणि ही परिस्थिती सुधारण्यासाठी उपाययोजना केली नाही तर ब्रि. सरकार आपल्या कर्तव्यात चुकले असे होईल अशी पुस्ती त्यांना जोडली. त्याचा लाभ घेऊन हिंदुस्थान सरकारने नोव्हेंबर १८७३ मध्ये त्यावेळी म्हैसूरचे सर आयुक्त (चीफकमिशनर) असलेले सर रिचर्ड मीड यांच्या अध्यक्षतेखाली मल्हाररावांच्या राज्यव्यवस्थेची चौकशी करण्यासाठी एक चौकशी आयोग (एन्क्वायरी कमिशन) नेमला. त्यात जयपूरचे बरीच वर्षे मुख्यप्रधान असलेले नबाब फैझ अली खान, मुंबईचे एक नागर सेवक (सिव्हिल सर्वंट) रेवन्‌क्रॉफ्ट, बडोद्याची विशेष माहिती असलेले लेफ्ट. कर्नल एथरीज आणि मुंबईचे दुसरे एक नागर सेवक मकेंझी हे सभासद होते. या आयोगाने बरेच दिवस पुरावा नोंदवून घेऊन मार्च १८७४ मध्ये आपले प्रतिवृत्त हिंदुस्थान सरकारला धाडले. त्यात महाराजांच्या वाईट राज्यव्यवस्थेच्या कित्येक गोष्टी सिद्ध झाल्या आहेत असे मानले आणि उपाय म्हणून ब्रि. सरकारच्या प्रत्यक्ष हाताखाली असणारा नवा दिवाण संस्थानात नेमावा असे सुचविले. जुलै १८७४ मध्ये हिंदुस्थान सरकारने मल्हाररावांना प्रतिवृत्ताची माहिती देऊन तुम्हीच नवीन दिवाण नेमून १८७५ डिसेंबरपर्यंत राजवट सुधारावी, नाहीतर तुम्हाला पदच्युत करणे हाच एक मार्ग आमच्यापुढे राहील असे कळविले. महाराज मल्हारराव गायकवाड यांच्याविरुद्ध ब्रि. सरकारच्या कारवाईची चक्रे अशा रीतीने फिरू लागली ! महाराज मल्हाररावही त्याच आवेशाने कर्नल फेयर यांच्या कारवाया उध्वस्त करण्याचे प्रयत्न आता करू लागले !

कर्नल फेयर इतक्यावरच थांबला नाही. २ नोव्हेंबर १८७४ला त्याने, मल्हार-रावांना आपला जो अनौरस पुत्र वारस म्हणून हवा होता त्या संबंधात नकार देऊन त्या भांडणासंबंधी आणखी एक लावलचक प्रतिवृत्त हिंदुस्थान सरकारकडे धाडले. महाराजानीही मग मागचा पुढचा विचार न करता फेयरयासच ब्रि. सरकारने परत बोलवावे अशी त्यावर हिंदुस्थान सरकारकडे मागणी केली.

चारच दिवसांनी ९ नोव्हेंबरला कर्नल फेयर याने, आपल्या सरबतात सोमल (आर्सेनिक) आणि हिऱ्याची पूड घालून आपल्यावर विषप्रयोग करण्यात आला, असा आरोप करणारे पत्र हिंदुस्थान सरकारला लिहिले.

कर्नल फेयर हा मल्हाररावांच्याविषयी कसा वाइटात वागे आणि त्याला छळ-ण्यासाठी त्याने कशी खोटीनाटी कपटकारस्थाने चालविली होती, हे याचवेळी त्याला मिळालेल्या सरकारच्या सूचना प्रत्यक्षात आणताना झालेले त्याचे वर्तन सरकारलाही आक्षेपार्ह वाटल्यामुळे त्याच्या जागी दुसरा राजनिवासी असावा असा निर्णय सरकारने घेतला यावरून दिसते. हिंदुस्थान सरकारने त्यालाच त्यागपत्र द्यावयाला सांगितले आणि त्याने ते अमान्य करताच त्या पदावरून त्यांना काढून टाकले आणि सर लुईस पेली याची त्याच्या जागी राजनिवासी म्हणून नेमणूक केली.

मल्हारराव महाराजांची राजवट काही निरपवाद चांगली होती असे नव्हे. इतर हिंदी संस्थानिकांची राजवट जेवढी वाईट असे तेवढीच त्यांचीही राजवट वाईट होती. सयाजीरावाची राजवटच करारी आणि सदाचारी असल्यामुळे आणि त्यांनी ब्रि. सरकारविरुद्ध ठेवलेली स्वाभिमानी वृत्ती पाहून त्यांच्याविषयी महा-राष्ट्राला कौतुक वाटले, असे मल्हाररावाविषयी वाटण्याचे कारण नव्हते. परंतु मल्हार-रावही जेव्हा ब्रि. सरकारपुढे ताठरपणे वागू लागले आणि कर्नल फेयरच्या दुष्ट कारस्थानामुळे त्यांचा सरकारशी लढा जुंपला, तेव्हा मात्र महाराष्ट्राव त्यांचा कैवार घेण्यासाठी उत्स्फूर्त आंदोलन सुरू झाले.

नवीन राजनिवासी लुई पेली याने वरील विषप्रयोगाचा पुरावा मिळविण्याचा प्रयत्न केला. एका नोकराला संशयावरून अटक केल्यावर त्याच्याकडून स्वीकारो-क्तीचे निवेदन मिळविले आणि त्याला दुजोरा देणारा पुरावा मिळताच हिंदुस्थान सरकारकडे तसे कळविले. तेव्हा या विषप्रयोगाची चौकशी करण्याचे ठरवून, चौकशी-च्या वेळी महाराज मल्हारराव हे गादीवर असणे श्रेयस्कर नाही असे ठरवून त्यांना गादीवरून निलंबित करण्यात येत आहे, अशी सरकारने घोषणा केली. राजप्रतिनिधी म्हणून लॉर्ड नॉर्थब्रुकने बडोद्याच्या राज्याचे अधिकार स्वतः धारण केले. आणि मल्हाररावांना ब्रि. सैनिकी भागातील एका प्रासादात युरोपियन रक्षकांच्या वेढ्यात नेऊन ठेवण्यात आले.

या पदच्युतीने पुणे संतप्त झाले. महाराजांच्या यशासाठी देवळात मिरवणुका

घेण्यात आल्या आणि प्रार्थना करण्यात आल्या. प्रकट सभांतून वरील आरोपांविषयी आणि पदच्युतीविरुद्ध एकच ओरड करण्यात आली आणि चौकशी आयोगात युरोपियनांच्या सत्येइतकेच हिंदी न्यायाधीश असावेत अशी मागणी करण्यात आली. पुण्यात शेवटी एक प्रचंड सभा घेऊन राजप्रतिनिधीकडे धाडण्याचे आवेदन संमत करण्यात आले. त्यात महाराष्ट्राबाहेरील मराठा संस्थानाविषयी ऐतिहासिक दृष्टयाच मराठ्यांना कशी आपुलकी वाटते, ते प्रारंभीच सांगून टाकून मल्हाररावांवरील संकटात त्यांच्या बाजूने आम्ही का उतरत आहोत त्याची पार्श्वभूमी सिद्ध केली होती.

पण महाराजांवर चौकशीचे दिव्य लादले गेले, तरी त्यांना बचावाची सर्व संधी देण्याची सरकारची लक्षणे दिसेनात. त्यांच्या लंडनमधील सॉलिसिटरनी बचावासाठी चार लक्ष बत्तीस सहस्र रुपयांचा अर्थसंकल्प केला. पण पैसे मिळाल्यावाचून आपण पुढे काम करू शकत नाही असे महाराजांना कळविले. तेव्हा शेवटी बंदिवान मल्हाररावानी राजप्रतिनिधीलाच तार केली–

"Deeply pained to learn from my solicitors that preparations for my defence are at a standstill for want of funds..............Promises of ample opportunity indicating my innocence thus practically ignored. Private purse attached. Rani's marriage ornaments and money seized. My character, liberty and kingdom at stake"

("त्यासाठी पैसे नाहीत म्हणून माझ्या बचावाची सिद्धता खोळंबून राहिली आहे असे माझ्या सॉलिसिटरांकडून कळल्यामुळे मला तीव्र वेदना होत आहेत... माझं निरपराधित्व प्रस्थापित करण्यासाठी भरपूर संधी देण्याच्या आपल्या आश्वासनाकडे प्रत्यक्षात दुर्लक्ष करण्यात आलेलं आहे. माझा वैयक्तिक पैसा गोठवून ठेवण्यात आला आहे. राणीचे दागिने आणि पैसेही लांबवण्यात आले आहेत. माझं शील, स्वातंत्र्य आणि राज्यच आता धोक्यात आलं आहे!")

परंतु मल्हाररावांची ही शोचनीय अवस्था कळताच पुणेकरांच्या वतीने सार्वजनिक काकांनी राजप्रतिनिधीला आणि बडोद्यालाही तार पाठविली की, महाराजांच्या बचावासाठी महाराष्ट्र एक लक्ष रुपयांपर्यंत वर्गणी देण्यास सिद्ध आहे. तरी त्यांना आवश्यक ते निर्बंधपंडितांचे सहाय्य द्यावे. आणि या तारेमुळे विद्युल्लतेच्या झटक्याने चमकून जावे त्याप्रमाणे ब्रि. सरकार चमकून गेले! शेवटी ब्रि. सरकारने महाराजांना बचावासाठी हवे ते पैसे दिले.

चौकशी आयोगावर सर रिचर्ड मीड इ. युरोपियनांच्या जोडीला जयपूरचे महाराज आणि ग्वाल्हेरचे विगत दिवाण दिनकरराव राजवाडे इ. हिंदी गृहस्थ होते. चौकशीचे काम शेवटी २४ फेब्रुवारी १८७५ या दिवशी बडोदा येथेच सुरू झाले. हा अभियोग वीस दिवस चालला. नंतर दिलेल्या निर्णयात युरोपियन न्यायाधिशांनी मल्हाररावांवरील दगलबाजी, विषप्रयोग इत्यादी सर्व आरोप सिद्ध झाले

आहेत असा निर्णय दिला. दिनकररावांनी आणि दुसऱ्या हिंदी न्यायाधिशांनी विष-प्रयोगाचा आरोप सिद्ध होत नाही, असे मत व्यक्त केले. जयपूरच्या महाराजांनी तर मल्हाररावांना त्याविषयी निर्दोषीच ठरवले. तरीपण युरोपियन न्यायाधिशांचा निर्णय ग्राह्य धरून विषप्रयोगाचा आरोपही सिद्ध मानून मल्हाररावांना प्रजेच्या हितासाठीच पदच्युत करावे असा हिंदुस्थान सरकारने ब्रिटिश सरकारकडे अनुरोध केला. परंतु भारतमंत्री लॉर्ड सॅलिसबरी यांनी धूर्तपणाने हिंदुस्थान सरकारला कळविले की, मल्हाररावांची पदच्युती वाईट राज्यव्यवस्थेच्या कारणांवरून करावी. विषप्रयोगाच्या आरोपासंबंधी हिंदी सभासदांनी मतभिन्नता दाखविली आहे म्हणून त्या कारणावरून करू नये आणि मग २३ एप्रिल १८७५ ला हिंदुस्थान सरकारची तशी राज घोषणा प्रसिद्ध झाली.

या घोषणेची प्रतिक्रिया तीव्र होईल अशी निश्चिती असल्यामुळे मल्हाररावांना आदल्याच रात्री बडोद्यातून मद्रासला हालविण्याची दक्षता रिचर्ड मीडने घेतली. त्यामुळे घोषणा झाली तेव्हा मल्हारराव मद्रासच्या वाटेवर बरेच लांब जाऊन पोचले होते! तरीही त्या पदच्युतीला विरोध करा आणि बंड करून उठा अशी चेतावणी निनावी पत्रकातून बडोद्यात जनतेला देण्यात आली. २८ एप्रिलला तेथे कडकडीत हरताळ पाडण्यात येऊन, लोकांना दडपण्यासाठी युरोपियन अधिकारी येताच त्यांच्यावर जनतेने दगडफेक करून युरोपियन सेनापतीची तर घोडागाडी जाळूनही टाकली. आणि त्याला लोकांवर आपले रिव्हॉल्वर झाडून स्वतःची सुटका करून घ्यावी लागली. जनतेने ही उठावणी केली. कारण, ही पदच्युती महाराजांवर अन्याय करणारी आणि आपल्या राजाचा उपमर्द करणारी तर आहेच. पण बडोद्याची गादीच अस्तंगत करण्याच्या इंग्रज सरकारच्या संकल्पाची ती सुरु-वात आहे अशी जनतेची निश्चिती झाली. तथापि शेवटी युरोपियन सैन्याच्या बळावर ती उठावणी रिचर्ड मीडने दडपून टाकली.

मल्हाररावांसारख्या अधिपतीच्या या पदच्युतीविरुद्ध रान उठविणाऱ्या सार्व-जनिक सभेशी निकटचे संबंध असल्यामुळे तर वासुदेव बळवंतांना त्या ब्रिटिश अन्यायाची तीव्रता जाणवलीच. पण त्यांना काही वैयक्तिक जवळिकीमुळेही मल्हार-रावांवरील हा घाला जाणवला असावा. कारण, राज्यक्रांतीच्या आपल्या प्रयत्नात त्यांनी बडोद्याच्या संस्थानिकाच्या संभाव्य साहाय्यासाठी घेतलेल्या ज्या कानोसाचा पुढे सरकारला पुरावा मिळाला, तो कानोसा मल्हाररावांकडून विचारणा करून त्यांनी घेतलेला असला पाहिजे. कारण, आपले स्वातंत्र्याचे आंदोलन त्यांनी सुरू केल्यावर तशी विचारणा ज्यांच्याकडे करता येणे शक्य होते असे तेच एक बडोद्याचे अधिपती होते. त्यांनी बडोद्याशी असा संपर्क साधला होता असे पुढे ब्रिटिश सरकारच्या अन्वेषण अधिकाऱ्यांनी विधान केले. वासुदेव बळवंतांनीही आपण भेट दिलेल्या मोठ्या नगरात बडोद्याचा उल्लेख केला आहे. त्यावरून त्या

विधानाला दुजोरा मिळतो. कारण, बडोदा येथे काही जिच्याकडून आपल्या 'बंडा'ला सहाय्य मिळावे अशी इंग्रज राज्यांतील हिंदी जनता नव्हती. तेथून साहाय्य मिळणारे होते ते *संस्थानिक महाराजांकडूनच होय. त्यामुळे त्यांनी वरीलप्रमाणे* उल्लेखिलेल्या बडोदा नगरीचा असाच संदर्भ लागू शकतो. अर्थात त्यांनी त्या नगरीला दिलेल्या भेटीचे हे कारण स्पष्टपणे सांगितलेले नाही. कारण तसे त्यांना ते सांगता येणेच शक्य नव्हते.

या समजुतीला पुष्टी देणारा पुढील पुरावा महत्त्वाचा आहे. प्रख्यात अभिनेते चिंतामणराव कोल्हटकर यांचे वडील त्या काळात बडोदे संस्थानात अधिकारावर होते. तेही पोलीसप्रमुख म्हणून. या संबंधात चिंतामणराव लिहितात, 'महाराष्ट्र मित्र' नावाचे वर्तमानपत्र इ. स. १८६७ मध्ये त्यांनी (वडिलांनी) सुरू केले (ते)... सुरळीत चालू असतानाच आपले आतेबंधू यांचे आग्रहावरून ते बडोद्यास काही काळ नोकरीसाठी गेले. बडोदे संस्थानात प्रथम नवसारी व नंतर खुद्द बडोदे येथे पोलीस प्रमुख म्हणून माझ्या वडिलांनी काम केले. मल्हारराव कमिशनचा तो काळ होता...ते याच नोकरीत असताना सुप्रसिद्ध क्रांतिकारक वासुदेव बळवंत हे आपल्या देशसंचारात काही काळ त्यांच्या घरी गुप्तपणे पाहुणे म्हणून राहिले होते. वासुदेव बळवंतांच्या मृत्यूनंतर त्यांच्यासंबंधी 'महाराष्ट्र मित्रा'त लिहिताना ते म्हणतात : "१८७९ पासून प्रसिद्ध; त्याची शिफारस लिहवत नाही म्हणून आम्ही दिलगीर आहोत, "[४] उघड प्रशंसा करता येत नाही तर इतकेच त्यांनी लिहिले! या सर्व वृत्तांतावरूनही वरील घटना स्पष्ट होते. या संबंधामुळेही वासुदेव बळवंतांना मल्हाररावांची पदच्युती अधिक जाणवली असेल. अशा सत्ताधिशालाही ब्रिटिश सरकार पदच्युत करते हे पाहून वैध मार्गाने त्या सरकारविरुद्ध दाद लागणे शक्य नाही हे त्यांच्या प्रत्ययास आले. त्यामुळे यापुढे सभा, समेलने, भाषणे इ. सार्वजनिक सभेच्या कार्यक्रमास ते नाममात्र उपस्थित राहात असत, तरी त्यांना त्या कार्यक्रमात पूर्वीइतके स्वारस्य वाटत नाहीसे झाले.

पुढील वर्षी महाराष्ट्रात आणखीच अस्वस्थता माजली. दक्षिणेचे दंगे या नावाने ती प्रसिद्ध आहे. परंतु १८७६-७७ च्या दुष्काळाने उडविलेल्या हाहाःकारापुढे ती अस्वस्थता फार मोठी नव्हती. त्या दुष्काळात जी मनुष्यहानी झाली आणि जो हाहाःकार उडाला, तो येथील जनतेला परकीय राज्याची अपात्रता उघडयानागडया स्वरूपात दाखवीत होता. १९४३ मधील बंगालच्या दुष्काळाची वर्णने ज्यांनी वाचली असतील, त्यांना वाहतुकीचे त्वरेचे मार्ग उपलब्ध नसलेल्या त्या काळात १८७६ च्या दुष्काळाने किती कहर उडविला असेल याची कल्पना येईल. १८७५ मधील धान्याचा हंगाम साधारण मानाचा (इंडिफरंट) गेला. पण पुढे १८७६ चा हंगाम संपत

४ चि. ग. कोल्हटकर, "बहुरूपी", पृ ७-८

आला तरी पावसाचे काहीच चिन्ह दिसेना! पुण्याच्या दुर्भिक्षाने जनता व्याकुळ झाली. त्यापूर्वीच्या ऑक्टोबरमध्ये पावसाळी वायुमानाने किंचित गडवड उडवून दिली. तरी प्रत्यक्ष पाऊस मात्र पडला नाही.

त्यावेळची दख्खनची परिस्थिती काय वर्णावी? पावसाच्या केवळ आशेवरच सर्व जनता दिवस लोटत होती. ज्या महिन्यात धान्याची भरघोस कणसे आणि लोंब्या शेतात डुलाव्या त्या महिन्यात पिकावाचून वैराण दिसणारी शेते फक्त काट्याकुट्यांनी आच्छादिलेली होती. पाण्याची तुडुंब जलाशये जेथे नेहमी वर्षाऋतूत दिसावयाची, तेथे पाण्याचा खडखडाट दिसत होता. तलाव आणि विहिरी, नद्या आणि नाले 'पाणी! पाणी!' करीत 'आ' वासून पडली होती. महाराष्ट्रातील पिके देणाऱ्या भूमीला ओसाड प्रदेशाची अवकळा आली.

शक्य तितका काळ वाट पाहून गरीब जनतेने धीर सोडला; आधीच कसेबसे अन्न मिळविणारे खेड्यातील लोक ते अन्नही न मिळाल्यामुळे मृत्यूच्या दारी येऊन ठेपले. आशा ही काही और गोष्ट असते. आपल्या येथे धान्य दिसत नाही तर दुसरीकडे तरी जाऊन पाहू या! या आशेने खेडेगावच्या गरीब जनतेने हालचाल सुरू केली. आपल्या दरिद्री झोपड्या सोडून असे सहस्रावधी लोक समुहाने देशांतर करू लागले. त्याच्यापैकी कित्येक भुकेने आणि श्रमाने वाटेतच मरून पडले. लहान लहान मुले दुधासाठी आक्रोश करीत स्वर्गलोकी गेली आणि त्यांच्या मृतदेहाकडे पहात कळवळत्या अंत:करणाने त्यांचे आईबाप अश्रू ढाळीत पुढे मार्ग आक्रमिण्याचा विचार करते झाले. सर्व दख्खनभरच ही दृश्ये दिसत होती. तेव्हा एका खेडेगावच्या लोकांनी थोडा मुलूख तुडविला, तरी त्यांना दुसरीकडे त्याच दुर्भिक्षावाचून दुसरे काय दिसणार?

स्वत:च्याच प्राणाची निश्चिती नसताना, शेतकऱ्यांना गुराढोरांची चिंता वाहण्यास वेळ कुठचा? त्यांनी आपल्या गुराढोरांना घरातील गोठ्यात मोकळे केले आणि त्यांना सोडूनच ते देशांतराला निघाले. ज्यांना घालायला आपल्याजवळ चारा नाही अशा गुरांची संख्या आठवड्याच्या बाजाराला विकता येईल त्या संख्येने कमी करण्याचा शेतकरी प्रयत्न करीत त्यामुळे ठिकठिकाणी भरणाऱ्या गुरांच्या बाजारात विक्रीस निघालेल्या गुरांची संख्या वाढत गेली. शेतकरी सुखी तर राष्ट्र सुखी, अशी समजूत बाळगणाऱ्या तत्वज्ञानी लोकांना शेतकऱ्यांची ही दुर्दशा पाहून राष्ट्रांच्या विपत्तीची कल्पना येत होती.

दुष्काळात अन्नाचे आणि पाण्याचे दुर्भिक्ष हे एकच संकट नसते. आरोग्यरक्षणाचे काम नीट न झाल्यामुळे त्या संकटाच्या पाठोपाठ रोगांचे संकट दत्त म्हणून उभे असते. हा दुष्काळही त्याला अपवाद नव्हता. पटकी (कॉलरा) आणि देवीच्या साथींनी त्या अरिष्टाच्या मागोमाग दुसरे अरिष्ट कोसळले.

महाराष्ट्रातील या दुष्काळातील प्राणहानीचे आकडे निरिक्षकांस चकित कर-

णारे होते. सोलापूर आणि विजापूर हे जिल्हे नेहमीचेच दुष्काळी जिल्हे ! एकट्या या जिल्ह्यातील मृतांची संख्याच सात सहस्रांवर गेली. रोगराईमुळे मेलेल्यांची संख्या चार सहस्रांवर होती. इतकी प्राणहानी केवळ अन्नाच्या अभावी घडलेली महाराष्ट्राने कधी पाहिली नव्हती !

ब्रिटिश राज्यात अन्न मिळाले नाही तेव्हा निजामच्या राज्यात तरी आपली सोय लागेल या उद्देशाने सहस्रावधी भटक्या शरणार्थी लोकांच्या झुंडी जगण्यासाठी निजामाच्या राज्याकडे वळल्या आणि इंग्रज आणि निजाम यांच्या राज्यांच्या सीमेवर दुष्काळाचे खरे स्वरूप ब्रिटिश राज्यातील सुखी प्रजेची दुःस्थिती उद्घोषू लागल्या.

विपन्नावस्थेत पोहोचलेल्या हिंदी जनतेवर आपली सावजे म्हणून लक्ष ठेवणाऱ्या ख्रिश्चन प्रचारकांनीही (मिशनऱ्यांनीही) आपले जाळे त्या भागात पसरले. क्षुधाग्रस्त अनाथ बालकांना पाळण्यास केवळ भूतदयेने आपण सिद्ध झालो आहोत अशी घोषणा त्यांनी केली ! पण त्यांची जन्मजात धर्मप्रसारक वृत्ती त्याना तसे करू देईना ! अनाथ हिंदू अर्भके ख्रिश्चन धर्मातच वाढविली जाण्याच्या योजना त्यांच्याकडून गुप्तपणे आखल्या जाऊ लागल्या आणि अन्न आणि धर्म या दोन प्राथमिक हक्कांनाच माणुसकी दम्यनमध्ये मुकली ! पण दम्यनचे लोक आपत्तींना डरणारे नव्हते, स्वधर्मावरील प्रेमाचा त्यांनी त्याग केलेला नव्हता! पुण्याहून 'पुणे धर्मसभा' या संस्थेचे कार्यवाह सीताराम हरि चिपळूणकर यांनी ८ नोव्हेंबर १८७६ ला दुष्काळग्रस्तांना धीर देणारी पुढील उदात्त घोषणा केली :

"हल्ली दुष्काळ पडल्याकारणाने किती एक ठिकाणी कित्येक अनाथ मुले खिस्ती धर्म स्वीकारतील. त्यांचे पालनपोषण करण्याचा ख्रिस्ती लोकांनी ठराव केला आहे. त्यास पोटाकरिता आपला धर्म सोडून परधर्मात जाणे योग्य नाही. करिता आईबापांनी किंवा पालकांनी (ती) 'पुणे धर्मसभे'चे चिटणीस याजकडे पोचविल्यास पालन चांगल्या प्रकारे होईल." [१]

इतकेच नव्हे तर त्याहीपेक्षा उदात्त पातळीची मनोवृत्ती दाखविणारी घोषणा त्यांनी केली ती अशी की, दुष्काळग्रस्त मुले दुसऱ्या कोणत्याही धर्माची असली तरी तीही आम्ही घेऊ आणि त्यांच्या धर्माप्रमाणेच त्यांचे पालनपोषण करू. दाठांनाही उदात्त भावनेने लाजविणारे हे प्रकट आश्वासन महाराष्ट्राच्या थोर परंपरेचे दैदिप्यमान द्योतक आहे.

या दुष्काळाचे मान कल्पनेने थोडे ताडता यावे म्हणून सोलापुरातील पुढील दृश्य केवळ नमुना म्हणून पाहण्यासारखे आहे. खेड्यातील लोक अन्नावाचून रस्ता तुडवीत नगरात येऊन राहात, तेव्हा त्यांचे मृत्यू मोठ्या गावात घडून येत. त्यांचे

१. 'नेटिव्ह ओपिनियन,' दि. १२ नोव्हेंबर १८७६

वर्णन करताना त्यावर्षी नोव्हेंबर महिन्यात 'टाइम्स ऑफ इंडिया'चा सोलापूरचा वार्ताहर म्हणतोः

"सोलापूर नोव्हेंबर ६ : येथील आपत्ती कल्पना करवणार नाही, इतकी भीषण आहे. काल पंचवीस जण भुकेने आणि पटकीने मरण पावले. दोन लक्षांपेक्षा अधिक लोक या जिल्ह्यातील, विशेषतः करमाळा, माळशिरस आणि सांगोला तालुक्यातील, आपली खेडी सोडून गेले आहेत. सोलापुरातून जवळ जवळ पंचवीस सहस्र लोक पुढे निजामाच्या राज्याकडे गेले आहेत. चाळीस सहस्र गुरे धान्याची आणखी निर्यात टाळण्यासाठी अधिकृत रीत्याच निजामाच्या राज्यात धाडण्यात आली आहेत. एक सहस्र लोकांना काल जिजवलेले अन्न देण्यात आले. धान्यलुटीचे प्रकार नित्याचे होत आहेत. मि. ग्रँट यांच्या घरात दोन लहान मुले मेली. बिशप साहेबांनी पुण्यास एक अनाथालय सुरु करण्याचे ठरविले आहे. परंतु त्यात येणारी मुले ख्रिश्चन बनविली जातील या अटीवर ! येथील गिरणीच्या आवारात सातशे गुरे निर्दयपणे सोडून दिलेली आढळली. आणि उद्या बाजाराला दहा सहस्र गुरे येतील अशी अपेक्षा आहे. पण ती विकत घ्यावयालाच कोणी नाहीत."

"सोलापूर नोव्हेंबर ८ : एक सहा वर्षांची मुलगी आज सकाळी मृत्यू पावली. काल रात्री एक महार स्त्री उपासमारीने मेली. माझ्या बंगल्यापासून जवळच रस्त्यावर एक माणूस केवळ भुकेने व्याकूळ होऊन भोवळ येऊन पडला आणि त्यामुळे त्याचे पुढील दात पडले."

या प्रक्षोभक शोककथेची वृत्ते वृत्तपत्रातून पुण्यास वासुदेव बळवंताच्या कानावर येऊ लागली. तेव्हा ती वाचून उत्सुकता, दया, त्वेष आणि राग या भावनांचे भाव त्यांच्या मुद्रेवर उमटले. महाजिकच दख्खनच्या दुष्काळात उपासमारीने आपल्या देशबांधवांचे अशा रीतीने प्राण जात असता, इंग्रज सरकार त्यांच्या हालअपेष्टा वाचविण्यासाठी काय करीत होते ? असा प्रश्न त्यांच्या मनात उभा राहिला. आणि त्याचे उत्तर शोधताना त्यांना दिसले ते भयंकर होते.

सर फिलिप वुडहाऊस हे यावेळी मुंबईचे राज्यपाल होते. पण दुष्काळासंबंधात योजण्यात आलेल्या उपायांशी नाव निगडीत झालेले आहे ते सर रिचर्ड टेंपल यांचे होय. ते तर त्यावेळी बंगालचे उपराज्यपाल होते. परंतु दख्खनमध्ये आणि मद्रास प्रांतामध्ये पडलेल्या भीषण दुष्काळाची वृत्ते हिंदुस्थानच्या राजधानीत कलकत्त्याला जावयाला लागताच, लॉर्ड नॉर्थब्रुक यांच्यामागून महाराज्यपाल (गव्हर्नर-जनरल) आणि राजप्रतिनिधी (व्हाइसरॉय) झालेले लॉर्ड लिटन यांनी सर रिचर्ड टेंपलनाच हिंदुस्थान सरकारच्या वतीने प्रतिनियुक्तिवर (डेप्युटेशनवर) वरील प्रांतांत जनतेच्या सहाय्यासाठी सुरु करावयाच्या कामांची व्यवस्था पाहण्यासाठी जाता का, अशी विचारणा केली. आणि ती मान्य करून ते दख्खनमध्ये आले.

त्यांनी काय केले? लोहमार्गाची आणि रस्त्यावरील वाहतुकीची व्यवस्था या प्रांतात इतर प्रांतापेक्षा अधिक चांगली असल्यामुळे धान्याची ने आण सुलभतेने होत आहे म्हणून धान्याची आयात करण्याचे कारण नाही असे त्यांनी ठरविले. आणि लॉर्ड लिटन यांच्या जेवढ्यास तेवढ्या सहानुभूतीचा अवलंब करून दुष्काळी कामे सुरू केली. परंतु त्यांच्या या उपायामागे हार्दिक सहानुभूतीचा पुरेसा ओलावा नव्हता. दुष्काळी कामे सुरू झाली तरी त्या कामावर येण्यासाठी पोटभर अन्न मिळालेले सशक्त लोक पाहिजेत ना? पण त्या संबंधात सर रिचर्ड टेंपलनी प्रतिमाणशी अर्धा शेर धान्य पुरे होते असा निर्णय घेऊन टाकला. या प्रमाणाविरुद्ध एतद्देशीय वृत्तपत्रांनी आणि पुढाऱ्यांनी खूप ओरड केली. पण त्याचा त्यांच्यावर काही परिणाम झाला नाही. त्यामुळे दुष्काळी कामावर येणारे लोक या तुटपुंज्या अन्नावर जगणारे आणि म्हणून अशक्त झालेले असत. उलट या अशक्त लोकांकडूनही चोपून काम करून घेण्याची सर रिचर्ड टेंपल यांच्या हस्तकांनी व्यवस्था केली होती. त्यामुळे दख्खन-मध्ये दुष्काळ आहे असे घोषित करणारी दुष्काळी कामावर येणाऱ्या श्रमिकांची संख्या प्रथम जरी सहस्त्रावधी होती तरी वरील स्थितीची जाणीव होताच त्यांच्या-पैकी बरेच जण आपल्या कुदळी आणि फावडी खाली ठेवून निघून गेले! आणि त्या मुळे त्यांना मिळणाऱ्या धान्य सहाय्याला ते मुकले आणि त्यांची उपासमार चालूच राहिली. रुग्णाईत किंवा काम करू न शकणाऱ्यांना प्रत्यही अर्धा शेर धान्याचा शिधा आणि कामावर येणाऱ्यांनाही प्रत्यही दीड आणा श्रममूल्य देण्याचे सर रिचर्ड टेंपल यांनी ठरविले. कारण धान्य त्यावेळी रुपयास पाच शेराप्रमाणे विकले जात असे! या तुटपुंज्या अन्नावर दिवस काढीत काही आश्चर्यार्थी भुकेले श्रमिक जगले आणि ज्यांना ते अशक्य झाले ते परकीय सत्तेच्या वरवंट्याखाली चिरडले जाऊन मरून गेले.

महाराष्ट्र या आपत्तीत भस्मसात होऊ लागला, तेव्हा वासुदेव बळवंतांना पुण्यास आपला योगक्षेम चालवीत स्वस्थ बसवेना. त्यांनी कार्यालयांतून प्रकृतीच्या कारणावरून सुट्टी घेतली.[६] आणि संकटग्रस्त देशबांधवाची दुर्दशा प्रत्यक्ष पाहण्या-साठी त्यांच्या सन्निध जाण्यासाठी ते प्रवासाला निघाले. हा प्रवास आगगाडीने न करता त्यांनी पायीच केला. कारण त्यामुळे अगदी बाजूच्याही खेड्यात त्यांना जाता येणार होते. लोकांची स्थिती जवळून पाहता यावी म्हणून त्यांनी वेषांतर केले. दाढीजटा वाढवून त्यांनी झोळी खांद्याला अडकविली. आणि तिच्यातच प्रवासात लागणाऱ्या साऱ्या वस्तू टाकून ते एखाद्या बैराग्याप्रमाणे बृहन्महाराष्ट्राच्या प्रवा-साला निघाले. या प्रवासात त्यांनी इंदूर, उज्जैनी आणि बडोद्यासारख्या लांबच्या

६ वासुदेव बळवंताच्या सेवा पुस्तकात १८७६ मध्ये रुग्णाईतपणाच्या कारणावरून त्यांनी ५८ दिव-साची सुट्टी घेतल्याची नोंद होती. न्याय विभाग, खंड ५८–५९ (१८७९-८०); मुंबई सरकारचे कागदपत्र.

राजधान्यांना भेटी दिल्या. आणि नंतर वऱ्हाड, नागपूर, खानदेशामधून नगर, नाशिक तें कोल्हापूर, सांगली, मिरजपर्यंत ते फिरले. दुष्काळग्रस्त प्रदेशात ते फिरू लागले. तेव्हा वृत्तपत्रात त्यांनी वाचलेल्या वर्णनाची दृश्ये त्यांना प्रत्यक्षात दिसू लागली.

कित्येक खेडीं ओस पडलेली होती. त्या गावांतील घरातून बोलावयला चिटपाखरूही नव्हते. मेलेल्या गुरांचे सांगाडे आणि मेलेल्या माणसांच्या हाडांचे सापळे त्यांना दिसले. ओसाड प्रदेशाचे लांबच लांब पट्टे त्यांनी पायाखाली घातले.

मृतप्राय झालेले भुकेले देशबांधव भेटताच त्यांनी त्यांची विचारपूस करावी. त्यांनी दीन वाणीने आपली कर्मकथा त्यांना सांगावी आणि त्यांनी साहाय्य मागावे असे घडू लागले. अशावेळी जवळ असलेली नाण्यांची सर्व चिल्लर त्यांनी त्यांना देऊन टाकावी. ते साहाय्य म्हणजे फाटलेल्या आभाळाला ठिगळ ठरे. पण ते साहाय्य त्यांच्या तळमळलेल्या अंतःकरणाच्या सहानुभूतीचे प्रतीक होते. आपल्या असहाय्यतेच्या जाणीवेने त्यांचे अंतःकरण रक्तबंबाळ होऊन, ते मग उद्‌गारत, "या लोकांनी प्रत्यही दोड आणा श्रममूल्यात पोट भरावे, हे सरकारने म्हणणे म्हणजे आमची किती हास्यास्पद वंचना आहे"

वसाहतवादी आणि धर्मांतराकडे काणा डोळा करणारी राजवट म्हणूनच हिंदुस्थानातील ब्रि. राज्य सुरुवातीच्या काळात प्रसिद्ध होते. त्या राज्यात नोकऱ्यांतून हिंदुस्थानची चालणारी पिळवणूक, त्याचे दारिद्र्य आणि संपत्तीचा इंग्लंडकडे जाणारा ओघ हे त्या वसाहतवादी मनोवृत्तीचेच प्रत्यक्ष परिणाम होते. ब्रिटिश सत्तेच्या या अत्याचारांवर देशबांधवांचे प्रकर्षाने लक्ष वेधणाऱ्या पहिल्या काही महापुरुषांपैकी वासुदेव बळवंत हे अग्रगण्य महापुरुष होते.

म्हणतात, "आता त्या सगळयाचा अर्थ काय ? याचा अर्थच मुळी पैसा गोळा करावयाचा. या देशाची एक वसाहत करावयाची आणि धर्म नष्ट करावयाचा !"[८] स्वातंत्र्य मिळेपर्यंत पुढील अट्ठसष्ट वर्षे सर्व राष्ट्रीय पुढाऱ्यांच्या टीकेची ज्या एका विषयावर झोड उठत राहिली त्या हिंदुस्थानातील ब्रिटिशांच्या वसाहतवादी धोरणाचा वासुदेव बळवंतांनी याप्रमाणे बुरखा केव्हाच फाडून ठेवला होता.

दख्खनचा प्रदेश आणि लोक दुष्काळात अशा रीतीने मरत असतानाही ब्रि. सरकारवर त्याचा काही परिणाम झाला होता काय ? मुळीच नाही. इग्लंडमध्ये पंतप्रधान डिझरायलीने राणी व्हिक्टोरियाचा वडेजाव वाढविण्यासाठी तिने हिंदुस्थानची सम्राज्ञी ही पदवी धारण करावी असा ठराव ब्रि. पार्लमेंटकडून संमत करून घेतला. आणि तो प्रसंग साजरा करण्यासाठी १ जानेवारी १८७७ ला दिल्लीला मोठा साम्राज्यप्रवेश मेळावा आणि दरबार भरविण्याची भव्य योजना- लॉर्ड लिटन याने आखली. तिच्यावर कोट्यावधी रुपये व्यतीत करणारे कार्यक्रम साजरे करण्याचा राजप्रतिनिधी लॉर्ड लिटन याने यानंतर धडाका लावला. हिंदुस्थानच्या दरिद्री जनतेच्या पैशाची ही उधळपट्टी तिच्यात उपासमारीचे थैमान चालू असतानाही करण्याचा जो वाह्यातपणा हिंदुस्थान सरकारने चालवला होता त्याने तर स्वातंत्र्य-भक्ताचे डोके फिरून गेले. पण ब्रि. सरकारला त्याची क्षिती नव्हती. १८७६ च्या नाताळात ताळ सोडणाऱ्या हिंदुस्थान सरकारच्या या दुष्ट उधळपट्टीमुळे वासुदेव बळवंताच्या संतापाला पारावार राहिला नाही ! या दरबाराला हिंदुस्थानातील सर्व संस्थानिकांना हिंदुस्थान सरकारने बोलावले. त्याप्रमाणे ते तेथे जमले ! काही दिवसा-नीच आपली प्रतिष्ठा अगदी विधीपूर्वक खाली आणण्याच्या ब्रि. सरकारच्या या योजनेच्या कल्पनेनेही ते क्षुब्ध झाले नाहीत.

परंतु परदास्याची ही उद्दंड पावले दिल्लीला एतद्देशीयांचा स्वाभिमान तुडवीत असता स्वाभिमानाचा विसर पडू न देता राष्ट्रीय वृत्ती उद्घोषिणाऱ्या आंदोलनाचे चौघडे वाजू लागले ते पुण्यातून सार्वजनिक सभेच्या वतीनेच होते. सार्वजनिक सभेच्या वतीने राणी व्हिक्टोरियाला एक मानपत्र देण्याची कल्पना काढून सभेच्या दहा जणांच्या एका शिष्टमंडळाला भेटण्याची अनुज्ञा सार्वजनिक काकांनी राजप्रतिनिधीकडून मिळविली. आणि सदाशिवराव गोवंड्यासह ते मानपत्र घेऊन काका डिसेंबरात दिल्लीला गेले. त्यांना तिथे उतरवून घेण्याला ग्वाल्हेरचे विगत दिवाण आणि आता राजप्रतिनिधीच्या कार्यकारी मंडळाचे सदस्य असलेले सर दिनकरराव राजवाडे स्थानकावर आले होते. शिष्टमंडळाच्या सदस्यांना आपल्या घरीच त्यांनी उतरवून घेतले. ३ जानेवारी १८७७ ला मग राजप्रतिनिधी लॉर्ड लिटन यांच्या भेटीला काका निघाले, ते खादीचे कपडे आणि खादीचे पागोटे हे आपले शंभर टक्के स्वदेशी कपडे घालूनच ! त्यांना पाहून जमलेले राजरजवाडे, सरदार आणि सर-

८ वासुदेव बळवंताचे 'आत्मचरित्र'

कारी अधिकारी यांचा तो परधार्जिणा समाज चमकून गेला ! मानपत्रात राणी साहेबांना एकनिष्ठा वाहून त्याच्या आवरणाखाली लिहिलेल्या राष्ट्रीय आकांक्षांच्या मागण्या काकांनी वाचून दाखविल्या आणि मराठ्यांचा देशाभिमानी वाण्याच्या ध्वज प्रत्यक्ष राजप्रतिनिधीसमोर फडकावला !

एतद्देशीय राजांचे इंग्रजी राज्यव्यवस्थेत सहकार्य घ्यावे. निजामाकडून घेण्यात आलेला वऱ्हाड प्रांत आणि मराठ्यांच्या छत्रपतीकडून घेतलेला सातारा प्रांत त्याना परत करावा. नागर सेवेत (सिव्हिल सर्व्हिसमध्ये) एतद्देशीयाना जागा द्याव्यात. प्रत्यक्ष विलायतेच्या पार्लमेंटात हिंदुस्थानाचे प्रतिनिधी नेमावेत. एतद्देशीयांना सैन्यात वरिष्ठ अधिकाराची स्थाने द्यावी, त्यांना निःशस्त्र केले असले तरी त्यांना शस्त्रे परत द्यावीत, सरकारी सारा कमी करावा, हिंदुस्थानाचे विधिमंडळात लोकांचे प्रतिनिधी असावेत आणि हिंदुस्थानावर असलेल्या विलायतेच्या ऋणभाराचे व्याज कमी करावे या त्या जहाल मागण्या होत्या !

त्या मागण्या एकामागून एक वाचल्या जाऊ लागल्या तेव्हा त्या ऐकताना तेथे असलेल्या राजनिष्ठ लोकांच्या छातीचे ठोके त्वरेने पडू लागले. हे शिष्टमंडळ नेऊन असे मानपत्र देण्यातील आपला हेतू सार्वजनिक काकांनीच पुढे परत येताना ठिकठिकाणी आपल्या भाषणातून सांगितला. अकोल्याच्या 'वऱ्हाड समाचार' या साप्ताहिकात प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या तेथील भाषणाच्या वृत्ताप्रमाणे त्यांनी हा हेतू सांगताना तेथे म्हटले, "आपण आपले दुःख राजास लेखी कळविल्यावाचून त्याची दाद लागणे नाही. व्यक्तिरूपाने जे दुःख आहे त्याची दाद लागण्याचा जो तो उद्योग करितो. परतु सर्व देशावर जो दुःखाचा प्रसंग आहे किंवा येईल त्याचे निवारणाकरिता सर्व लोकांकडून उद्योग झाला पाहिजे."

लॉर्ड लिटन पक्का साम्राज्यवादी आणि मराठ्यांची देशनिष्ठा आणि स्वातंत्र्यलालसा त्याला पक्की माहीत होती. पण आला प्रसंग शिष्टाचाराने साजरा करणेच त्याला भाग होते. त्यामुळे त्यांनी मागण्यांचा उल्लेख न करता आपल्या उत्तराच्या भाषणात म्हटले:

"The address was a clever production, excellent in its tone and concluded in very eloquent and clear language." ("हे मानपत्र हुशारीने लिहिलेले, उत्तम भावना व्यक्त करणारे आणि बोलक्या आणि स्पष्ट भाषेत ज्याचा समारोप केलेला आहे असे आहे.") आणि पुढे, "पुण्यातील एतद्देशीय लोकांची राजनिष्ठा पाहून मला फार समाधान वाटते. आणि तुमचे मानपत्र मी मोठ्या आनंदाने राणीसाहेबाकडे पोचते करीन," अशा शब्दात त्यांनी आपले उत्तराचे भाषण पुरे केले.

पण ही देशप्रेमी वृत्ती नसलेल्या संस्थानिकांना त्याचे काय होय? त्यांच्या पात्रतेप्रमाणेच, २१ जानेवारी १८७७ ला भर दरबारात हिंदुस्थानची सम्राज्ञी ही पदवी राणीने धारण करताच त्यांची तिच्या समानतेची प्रतिष्ठा नष्ट होऊन ते तिचे

मांडलीक बनवले गेले! त्यांना जो नवा शाही ध्वज देण्यात आला त्याच्या एका बाजूला राणीचे ध्वजचिन्ह (रॉयल आर्म्स) आणि फक्त दुसऱ्या बाजूस त्यांची स्वतःची ध्वजप्रतिमा होती! काहींना अधिक नेमणुका आणि निवृत्तीवेतने देण्याची घोषणा करण्यात आली. पण ते मांडलीक झाले ते मांडलीकच !

ब्रि. सरकारच्या प्रतिष्ठेचे प्रदर्शन करणाऱ्या परदास्याच्या प्रक्षोभक समारंभाच्या आणि त्याच्याच मध्यात दिसणाऱ्या देशभक्तांच्या विजिगीषु देशभक्तीच्या दर्शनाच्या या दोन भिन्नभिन्न चित्रांमुळे स्वातंत्र्याकांक्षी अंतःकरणांत ब्रि. सरकारविरुद्धचा राग आणखी भडकून उठला.

वासुदेव बळवंत या व्यापात असतानाच त्याच्या घरात एक मंगल कार्य घडले ते म्हणजे त्याची मुलगी मथुताई हिचे त्या वेळच्या रीतीप्रमाणे तिच्या वयाच्या ८ व्या वर्षी १८७६ मध्ये झालेले लग्न होय. आणि कदाचित वरील व्यापात असल्यामुळेच पण वासुदेव बळवंत त्या लग्नाला उपस्थितही नव्हते. मथुताईच्या विवाहाची सारी खटपट त्यांचे धाकटे बंधू कृष्णाजी बळवंत किंवा बाबा यांनी शिरढोणला असताना केली. त्या व्यापात गुंतल्यामुळेच तुम्हीच हे कार्य नीट उरकून घ्या असे वासुदेव बळवंतांनीच त्यांना सांगितले. शिरढोणजवळ पळस्प्याला रामभाऊ कर्वे नावाचे युवक होते. शरीरयष्टीने ते बलवान आणि दिसण्यात सुरेख होते. पंचक्रोशीतीलच उत्तम कुळाचा जावई पाहण्याचा त्या काळचा रिवाज होता. कर्वे घरचे गरीब असले तरी या कसोटीला उत्तमपणे उतरत होते. त्यामुळे त्यांना मथुताई सांगून जाऊन कृष्णाजी बळवंतांनी हा विवाह थाटाने पळस्पे येथेच उरकला. बाई मात्र या मुलीच्या विवाहाला गेल्या होत्या आणि फडक्यांच्या कुटुंबातील झाडून सारा गोतलगांचा आणि ऋणानुबंधी लोकांचा प्रचंड समुदाय त्या कार्याला आला होता.

विवाहानंतर चारसहाच दिवसांनी वरील दौऱ्यातून वासुदेव बळवंतांना सुटवंगपणा मिळाला असावा. कारण मग मात्र त्या प्रवासातीलच वेषात एके रात्री ते गेले. कर्व्यांच्या घरी त्यांच्या मागच्या दाराने गुपचूपपणे शिरून त्यांनी आपल्या विवाहित मुलीला आणि जावयाला आशीर्वाद दिले. आणि मग ते निघून गेले. आपल्या दौऱ्यातील इंग्रजविरोधी कारस्थानाने कार्यास विघ्न येईल असेही त्यांना वाटले असेल काय? आणि म्हणून ते त्या कार्यास अनुपस्थित राहिले? ही शक्यता नाकारता येणारी नाही. कारण, आपल्या त्या खटपटीत त्यांच्या त्यानाच माहीत होत्या.[१]

सुटीच्या शेवटी वासुदेव बळवंत पुण्यास परत आले. तेव्हा त्यांना आपल्या प्रवासात दिसलेल्या मरणाऱ्या देशबांधवांच्या दृश्यामुळे त्यांचा मनःस्ताप कळसास पोहोचला होताच त्यात ब्रि. सरकारच्या वरील राक्षसी बेपर्वाईच्या उधळपट्टीच्या

१ वासुदेव बळवंतांचे जामात रामभाऊ कर्वे याची त्यांचे चिरंजीव विनायक कर्वे यांनी सांगितलेली आठवण.

आणि साम्राज्यमदाच्या वर्तनाच्या संतापाची भर पडली. सार्वजनिक सभेच्या पुढाऱ्यां-च्यावतीने सार्वजनिक काकांनी दिल्ली येथे भर दरबारात ब्रि. सरकारपुढे हिंदुस्थाना-ची राजकीय अकांक्षा निर्भयपणे मांडल्यामुळे त्यांना बरे वाटले. पण या मार्गाने जनताजागृती होऊन वरील दु.स्थिती बदलण्यास सहस्त्रावधी लोक पुढे येण्यास किती वर्षे जावी लागणार? आपण पिळवटलेल्या अंतःकरणाने दिलेल्या व्याख्यानांनी तरी त्यांच्यावर कितीसा परिणाम झाला? असाही विचार त्यांच्या मनात येऊन ते त्या मार्गाविषयी निराश झाले. "झाडाच्या पानांवर पाणी घालून जितके झाड जिवंत राखू म्हणणे तितकेच महत्त्व (आपल्या) व्याख्यानांना आहे."[१०] अशी त्यांची निश्चिती झाली. स्वातंत्र्यासाठी करावयाच्या लढ्यात वैध मार्गावरील त्यांचा विश्वास नाहीसा झाला.

वैध मार्गाच्या आंदोलनाची इंग्रजी राज्यातील हिंदुस्थानातल्या त्या वेळच्या लोकस्थितीची गतच अशी होती. हा मार्ग फार मंद गतीने लोकजागृती करणारा होता आणि ती गती पाहून स्वातंत्र्यासाठी तळमळणाऱ्या तरुणामध्ये त्यात वारवार निराशा आणि वैफल्याची भावना निर्माण होत असे. त्यामुळे क्रांतिमार्गाकडे त्यांची मने आवेगाने धाव घेत!

वासुदेव बळवंतांचे सार्वजनिक सभेशी असलेले संबंध जिव्हाळ्याचे असल्या-मुळे ते त्यांना क्षणार्धात तोडून टाकता येण्यासारखे नव्हते. त्यामुळे आणि समवयस्क मित्रांशी त्या संस्थेत जडलेल्या मित्रत्वामुळे ते त्या संस्थेच्या कार्यक्रमांना यापुढेही उपस्थित राहत. परंतु तिच्या कार्यक्रमांचे त्यांना पूर्वीप्रमाणे अगत्य वाटत नाहीसे झाले. अशा कार्यक्रमाच्या वेळी ठळकपणे वावरणारे वासुदेव बळवंत आता एकलकोंडेपणाने एका बाजूला बसू लागताच त्यांच्या परिचितांना आश्चर्य वाटू लागले. विश्रामबागवाड्याजवळच्या नगरकराच्या वाड्यात सार्वजनिक सभेचे कार्यक्रम चालू असता दुसरीकडे वासुदेव बळवंतांचे निराळेच सभापण आपल्या मित्रमंडळीत चालू असे. देशाला चांगले दिवस यावे म्हणून अवलंबिण्याच्या मार्गा-विषयी चर्चा सुरू झाली की ते म्हणत, सार्वजनिक सभेत भाषणबाजी करून आणि बाहेर लेखनबाजी करून देशाची गाऱ्हाणी दूर होणार नाहीत.

ते मग विचारीत, "भाषणबाजीने कोणास स्वातंत्र्य मिळाले आहे ? शस्त्र उचलल्याशिवाय कधी स्वराज्य मिळाले आहे काय ?" त्यावर त्यांचे मित्र म्हणत, "सशस्त्र बंडच करावयाचे तर मरण्याचीच तयारी हवी!"

त्यावर अशा लोकांना ते उसळून म्हणत, " आपल्यापैकी बहुतेक लोक मूर्ख आहेत. त्यांच्याकडून कदाचीच अपेक्षा करू नये. त्यांना त्वरित फायदा पाहिजे. पण धीराने काम करावयास नको. कारण विचारशून्य मदत देण्याविषयी विचारताच ते

१० वासुदेव बळवंतांचे 'आत्मचरित्र'.

म्हणतील, "हो, पण हे व्हावे कसे? आमची अशी कृत्ये बाहेर पडली तर आमचे प्राण जातील. इंग्रजांचे राज्य नष्ट झालेले पहाण्यास आम्हाला आनंद वाटेल. पण त्यासाठी आमच्याजवळचा पैसा आणि आमची मदत मात्र मागू नका."[११]

१८७६–७७च्या दुष्काळात दुष्काळी कामांवर मारपीट आणि तुटपुंजे श्रममूल्य देऊन का होईना, पण शेकडो दुष्काळग्रस्तांना घेण्यात आले होते. परंतु १८७७ चा पावसाळा सुरु होताच त्या कामांवरील व्यतीत होणारे पैसे ब्रि. सरकारच्या डोळयात भरु लागले. त्यामुळे आता मुंबईचे राज्यपाल झालेले सर रिचर्ड टेंपल यांनी ही दुष्काळी कामे बंद करण्याचा विचार चालवला. याच वेळी अफगाणिस्तानच्या राजकारणात आपणास अफगाणिस्तानाशी युद्ध पुकारावे लागण्याची शक्यता ब्रि. सरकारला दिसू लागली. आणि या लढाईच्या डोईजड व्ययास पैसा हवा म्हणूनही ही कामे बंद करण्याकडे त्याचा कल झाला. वास्तविक ही कामे आणखी काही दिवस चालू ठेवणे हे जनतेला जगण्यासाठी उद्योग हवा म्हणून आवश्यक होते. पण परकीय इंग्रजांना त्याचे काय? त्यामुळे ही कामे सर रिचर्ड टेंपल यानी हळूहळू बंद करून टाकली आणि गरीब जनतेच्या हालअपेष्टात भर पडली. हे निर्दय सरकारी धोरण पाहून वासुदेव बळवंतांचे मन आपली उद्विग्न झाले.

१८७७ वर्ष संपत आले. त्यांच्या गेल्या काही वर्षांतील क्रांतिकारक हालचालीमुळे नरसोबाच्या देवळाच्या धन्यांना सरकारी अवकृपेची भीती वाटत होती. तिने आता निर्णायक स्वरूप गाठले. कमीत कमी यांचे बिऱ्हाड इथून हालले तर बरे, असा विचार त्यांच्या मनात येऊ लागला आणि पुढे तोंडावाटेही प्रकट होऊ लागला. वास्तविक नरसिंहाच्या देवळापलीकडील टापू आपल्या क्रांतिसंघटनेच्या गुप्त उलाढालींना आणि तरुणांना द्यावयाच्या शारीरिक आणि शस्त्र हाताळण्याच्या शिक्षणासाठी वासुदेव बळवंतांना सोयीस्कर होता. परंतु वरील कारणामुळे या संबंधात तंटा कशाला, असा विचार करून १८७७ च्या शेवटी त्यांनी नरसोबाच्या देवळातील आपले बिऱ्हाड हालविण्याचे ठरविले. आणि त्या वर्षाच्या डिसेंबरात ते मग शुक्रवार पेठेत पंत सचीवांच्या वाड्याच्या पिछाडीला थट्टीवाले यांच्या वाड्यात राहण्यास गेले.[१२] हा वाडा आता बऱ्याच नव्या स्वरूपात अजून पुण्यात आहे. तो पहिल्यांदा पेशव्यांच्या गाईम्हशींवर गोडबोले नावाचे अधिकारी होते त्यांचा होता. त्यांच्या या अधिकारांमुळेच त्यांचे नाव थट्टीवाले असे पडले. वासुदेव बळवंत तेथे रहावयाला गेले तेव्हा तो वाडा मोरो बाबाजी फाटक यांनी घेतला होता. त्यांचे वय त्यावेळी

११ वासुदेव बळवंतांचे 'आत्मचरित्र'.

१२ "झाडपाडूर्वी वर्ष सव्वा वर्ष वासुदेव तेथे रहाण्यास आला होता"; वासुदेव बळवंताच्या या बिऱ्हाडाच्या झडतीच्या वेळी घर असलेले मोरो बाबाजी फाटक यांची पुण्याच्या सत्र न्यायालयातील साक्ष; ४ नोव्हेंबर १८७९. वासुदेव बळवंताच्या बिऱ्हाडाची ही झडती १८७९ मध्ये मार्चच्या मध्यास घेण्यात आली.

३२ होतें. आणि त्यांचेच भाडेकरू म्हणून वासुदेव बळवंत त्या वाड्यात राहावयास गेले.[१३] त्या वाड्याच्या मागच्या बाजूला त्यावेळी एक मोठे वडाचे झाड होते. ते पुढे बरीच वर्षे तेथे होते. वासुदेव बळवंतांकडे येणाऱ्या रामोशी लोकांशी त्यांच्या वाटाघाटी याच झाडाखाली होत. आणि माजघरात किंवा वरच्या माळ्यावरच्या खोलीत क्रांतिकारक सहकाऱ्यांशी ते आपल्या योजनांचा खल करीत.[१४] या वाड्याचे धनी पुढे बदलत गेले. आणि घरक्रमांकही बदलले. त्याच्या दोन्ही बाजूचे वाडे नंतर गुजर आणि रानडे यांचे झाले आणि तो वाडा विंझे यांच्याकडे आला. बऱ्याचशा नव्याने बांधलेल्या वास्तूचा हा वाडा पुढे घर क्रमांक १२९, १३० आणि १३१ शुक्रवार पेठ याच्यामध्ये विभागला गेला.[१५] मराठीतील एक नामवंत लेखक ल. ना. जोशी हे त्या वाड्यासमोरच ५४ शुक्रवारच्या वाड्यात राहात. आताचा नवा ८८ शुक्रवार या क्रमांकाचा वाडा तो हाच होय. आपल्या लहानपणी त्यांना वासुदेव बळवंत गुरुस्थानी होते. वासुदेव बळवंतांना या वाड्यात राहाताना त्यांनी लहानपणी पाहिले होते. त्यांच्या लहान मुलांच्या संघटनेत ते प्रविष्ट झाले होते.

सार्वजनिक सभेच्या द्वारा चाललेले लोकांच्या हक्कसंरक्षणाचे आंदोलन माधवराव रानड्यांच्या प्रेरणेने चाललेले होते हे उघड गुपित होते. लोकमतानुवर्ती राज्यव्यवस्थेची मागणी, १८७५ मध्ये मल्हारराव गायकवाडांच्या बचावासाठी धरलेला आग्रह, १८७६ मधील सावकारविरोधी दंग्यात शेतकऱ्यांच्या प्रक्षोभाच्या कारणांची छाननी आणि १८७६–७७ च्या दुष्काळात जनतेच्या चाललेल्या हालअपेष्टांची चौकशी करून सरकारकडे धाडलेली आवेदने ही रानड्यांची कृत्ये मवाळांच्या दृष्टीने कितीही वैध असली तरी साम्राज्यवादी सरकारच्या म्होरक्यांना त्यात सरकारविषयीच्या अप्रीतीचा रंग दिसलाच. मल्हारराव गायकवाडांच्याविरुद्ध कर्नल फेयरने उघडलेल्या आघाडीत ते दक्षिणेमध्ये आपले हस्तक पाठवून राजद्रोहाचा प्रसार करीत आहेत, असाही एक सूर त्याने मिसळून दिलेला होता. त्यामुळे वरील घटनांच्या अनुषंगाने सरकारच्या डोळ्यात पुणे नगर खुपू लागले. पुण्यात गुप्त अनुचरांच्या फेऱ्या घडू लागल्या. आणि सरकारचा काही लोकांवर ते राजद्रोही हाल-

१३ "तो वाडा माझ्या मालकीचा होता आणि वासुदेव माझा भाडेकरू होता." वासुदेव बळवंताच्या अभियोगातील फाटक याची साक्ष.

१४ ल. ना. जोशी यांची आठवण

१५ शुक्रवार पेठेतील पंचमुखी मारुतीचे देवालय या वाड्यापासून फार लांब नाही. वासुदेव बळवंत पंचमुखी मारुतीजवळ काही दिवस रहात असावेत याचा पहिला सुगावा मला 'अनामिक' यांनी दिला. ते म्हणाले, "वासुदेव बळवंत या परिसरात रहात असावेत. कारण, शुक्रवार पेठेतील पंचमुखी मारुतीला प्रदक्षिणा घालताना त्यांच्या दुसऱ्या पत्नीला मी पाहिल्याचे मला आठवते." गमतीची गोष्ट अशी की, या ऐतिहासिक व्यक्तिमत्वाच्या बाईच आपल्या पुढे चुलत सासूबाई होणार आहेत हे 'अनामिकां'ना त्यावेळी माहीत नव्हते. बाई फडक्यांची एक पुतणी सौ. सई 'अनामिक' यांना पुढे दिली गेली.

चाली करीत आहेत असा संशय आला. त्यात माधवराव रानडयांवरही आला. आणि त्याचाच परिणाम म्हणून ते आता बरेच दिवस पुण्याला न्यायाधीश होते हे वरकरणी निमित्त होऊन सरकारने याचवेळी माधवरावांना नाशिकला स्थानांतरित केले!

सुशिक्षित पांढरपेशा लोकांच्या हातून इंग्रजसरकारविरुद्ध वैध मार्गाने काहीच होणार नाही अशी वासुदेव बळवंतांची निश्चिती झाली, त्याला ऐतिहासिक काळापासून चालत आलेली मराठयांची उच्छृंखल आणि बडखोर वृत्तीच कारणीभूत होती. हा दुसरा मार्ग चटकन् मनात यावा अशी मराठयांची मनोवृत्ती त्याच्या भोवतालच्या निसर्गाने घडविलेली आहे. मनुष्याची प्रवृत्ती भोवतालच्या निसर्गावर अवलंबून असेल तर दख्खनच्या प्रदेशातील लोकांमध्ये बडखोर प्रवृत्तीवाचून दुसरी कोणतीच प्रवृत्ती असू शकणार नाही, असे मत त्या प्रवृत्तीचा चटका बसलेले त्यावेळचे मुंबईचे राज्यपाल सर रिचर्ड टेंपल यांनी व्यक्त केले आहे. ते म्हणतात.

"If it be true that national character is formed partly by physical surroundings, climate and scenery, partly also by historical associations, then any one who sees the Deccan and reads its history will not have far to go, in order to discover the reasons why the political tendencies there, demand vigilance on the part of the British Government." ("राष्ट्रातील लोकांची प्रवृत्ती जर काही अंशी सभोवतालच्या नैसर्गिक प्रदेशाप्रमाणे, वायुमानाने आणि निसर्गदृश्याच्या योगाने, त्याचप्रमाणे काही अंशी ऐतिहासिक दृष्टया निगडीत झालेल्या स्मृतीमुळे घडविली जात असेल, तर दख्खनचा देश पाहणाऱ्या आणि त्याचा इतिहास वाचणाऱ्या कोणालाही तेथील राजकीय प्रवृत्तीकडे ब्रिटिश सरकारचे दक्षतापूर्ण लक्ष असणे का आवश्यक आहे त्याचे कारण शोधण्यासाठी फार विचार करावयाला लागणार नाही!") [१६]

वासुदेव बळवंत या मनःस्थितीत असतानाच परकीय ब्रि. सरकारने स्वातंत्र्याकांक्षी आंदोलन दडपून टाकण्यासाठी आणखी पुढे पावले टाकली. इंग्रजी राज्य बलाढय आणि हिंदी विरोधकाचा नायनाट करणाऱ्या मनोवृत्तीचे होते. तरीही येथील तेजस्वी पुरुषांनी त्याची क्षिती बाळगली नाही. त्या राज्याच्या अधिकाऱ्यांच्या अन्यायी आणि हिंदुस्थानविरोधी कृत्यांचा आणि प्रलापांचा कडक भाषेत समाचार घेण्यास त्यांनी मागेपुढे पाहिले नाही. हे लोक हिंदी वृत्तपत्रांतून आपला हा विरोध आणि हे विचार ज्या जहाल भाषेत व्यक्त करीत असत ती वाचून त्यांच्या तेजस्वीपणाचे कौतुक वाटते. राजद्रोहाच्या आरोपावरून तुरुंगाची वाट पाहावयाला लागण्याची भीती त्यांनी कशी गुंडाळून ठेवली होती ते पाहून त्यांच्याविषयी प्रशंसा वाटते. त्याचे नमुने म्हणून दोन उल्लेख येथे करण्यासारखे आहेत. त्यातील एक

१६ सर रिचर्ड टेंपल "मेन अँड इव्हेंटस् ऑफ माय टाइम इन इंडिया", पृ. ४६१

पुण्याच्या वृत्तपत्रांतील उतारा आहे आणि दुसरा बंगालमधील वृत्तपत्रातील आहे. पुढे राजकीय आंदोलनात हेच दोन प्रांत प्रथमपासून आघाडीवर राहिले. लॉर्ड नॉर्थब्रुक यांच्या त्यागपत्राचे 'रेसिग्नेशन ऑफ लॉर्ड नॉर्थब्रुक,' ('लॉर्ड नॉर्थब्रुक यांचे त्यागपत्र') या मथळ्याखालील अग्रलेखात स्वागत करताना त्यांनी लोकमत प्रकटीकरणाविरुद्ध केलेल्या दडपशाहीचा धिःकार करताना 'ज्ञानप्रकाश' पत्राने म्हटले–

"If Lord Northbrook had remained in India for one more year, no dog would have by April 1877 dared to bark in India without the permission of the Viceroy, signified in writing, through his Private Secretary." ("लॉर्ड नॉर्थब्रुक हिंदुस्थानात जर आणखी एक वर्ष राहिले असते, तर एप्रिल १८७७ मध्ये राजप्रतिनिधीच्या वैयक्तिक कार्यवाहाच्या हस्ते दिल्या गेलेल्या लेखी अनुज्ञेवाचून एखाद्या कुत्र्यालाही भुंकण्याचे धैर्य झाले नसते!")[१७] बंगालमधील बाबू अक्षयचंद्र सरकार यांच्या संपादकत्वाखाली निघणाऱ्या चिंसुरा येथून प्रसिद्ध होणाऱ्या 'साधारणी' पत्राने जानेवारी १८७७ मध्ये दिल्ली दरबारात लॉर्ड लिटन यांनी केलेल्या भाषणावर टीका करताना लिहिलेल्या अग्रलेखाला मथळाच दिला, "भीक नहीं माँगते हम। एई दुष्मन बोलाई ले!" ("आम्हाला ही भिक्षा नको आहे. या दुष्ट पशूला परत बोलावून घ्या!")

अशा जहाल टीकेला सरळ उत्तर देणे ब्रि. सरकारला शक्य नव्हते. अशा टीकेमुळे लॉर्ड लिटनच्या मनातील हिंदी देशभक्तांविरुद्धचा प्रक्षोभ कळसास पोचला आणि त्याने लागलीच हिंदी वृत्तपत्राविरुद्ध वृत्तपत्राचे मुद्रणालयसुद्धा राजहृत करण्यापर्यंत सरकारला अधिकार देणारा कुविख्यात "व्हर्नेक्युलर प्रेस ॲक्ट" ("हिंदी वृत्तपत्रांसंबंधीचा निर्बंध") घोषित करून टाकला.

हा निर्बंध मुख्यतः झाला तो पुण्यातील वृत्तपत्रातील तेजस्वी लेखांमुळेच होय हे सत्य सर व्हॅलेंटाइन चिरोलनीच सांगून टाकले आहे. ते म्हणतात,

".........It was in Poona that the native Press, mainly conducted by Brahmans, first assumed that tone of virulent hostility towards British rule and British rulers which led to the Press Act of 1879." ("१८७९ च्या [हे वर्ष १८७८ हवे] मुद्रण निर्बंध होण्यासाठी कारण झालेल्या विषारी शत्रुत्वाची भावना हिंदी वृत्तपत्रांनी आणि ती मुख्यतः ब्राह्मणांनी चालवलेली वृत्तपत्रे होती–प्रकट केली ती पुण्यातच होय.")[१८]

वैध आंदोलनाचा मार्गच या अत्याचारी निर्बंधाने दडपला गेल्यामुळे स्वातंत्र्या-

१७ 'ज्ञानप्रकाश', दि. १३ जानेवारी १८७६
१८ 'सर व्हॅलेंटाइन चिरोल', 'दि इंडियन अनरेस्ट' पृ. ३९

साठी क्रांतिकारक मार्ग अनुसरण्याचा वासुदेव बळवंतांचा निश्चय अधिक दृढ झाला. तोच या मार्गातही दडपशाही करणारे पाऊल ब्रि. सरकारने या वर्षी टाकले आणि ते म्हणजे १८७८ चा "आर्म्स ॲक्ट" होय. या निर्बंधाने अनुज्ञेवाचून कोणालाही शस्त्र बाळगण्यास बंदी करण्यात आली आणि असे शस्त्र बाळगणे हा अपराध ठरविण्यात आला. लॉर्ड लिटनने हा निर्बंध हिंदुस्थानात लावला तो फक्त हिंदी लोकांनाच. एखादा हॉटेंटॉट किंवा झिल्लूही वाटल्यास कलकत्त्याच्या किंवा मुंबईच्या रस्त्यातून अनुज्ञापत्रक न घेता असे शस्त्र घेऊन जाऊ शकला असता! पण हिंदू लोकांना मात्र तसे करता येत नाहीसे झाले. या निर्बंधाने वासुदेव बळवंतांच्या मनातील ब्रि. सरकारविरुद्धचा क्षोभ वाढीसच लागला. या निर्बंधाने ही स्थितीच कशी झाली ते सांगताना त्यावेळी तारुण्यात असलेले एक बंगाली नेते म्हणतात,

"By this measure Lord Lytton instead of reconciling political consciousness in the country to British rule helped to create and strengthen new anti-British feeling among our people."[११] ("या निर्बंधामुळे या देशातल्या राजकीय आकांक्षाची ब्रिटिश सत्तेशी सुसंवाद साधण्याऐवजी आमच्या लोकांमध्ये एक नवी ब्रिटिशविरोधी भावना मात्र निर्माण करण्यास सहाय्य केले.")

आपल्या देशातील स्वातंत्र्यवादी आंदोलनावर ब्रि. सरकारने केलेल्या या दोन प्रक्षोभक आक्रमणांमुळे क्रांतिकारक मार्गानेच स्वातंत्र्याची उठावणी करावयाची आणि तिच्यात मूठभर सुशिक्षितांवर फार विसंबून न रहाता अशिक्षित जनतेलाच तिच्यात सहभागी करून घ्यावयाचे असे वासुदेव बळवंतांनी ठरवून टाकले!

* * *

११ बिपिनचंद्र पाल : "मेमॉयर्स ऑफ माय लाइफ ॲंड टाईम्स", पृ. २६५

## प्रकरण ७ वे

# पुण्यातील संघटना

"एकटाच रात्री बसतो, मी जन्मभूस आठवतो
ढळढळा आई गे! रडतो, त्वेषानें क्षणि । सचरतो;
झोपेत देशबंधूच्या, दु:खाने दचकुन उठतो,
बोलते भवानी, " ऊठ!"
बोलते जन्मभू " ऊठ!"
"धर समशेरीची मूठ!"
अवमानुन त्या आज्ञेते, लववेना हे शिर मातें ।।

–द्दु. आ. तिवारी

पुण्यात आल्यापासूनच वासुदेव बळवंतांच्या क्रांतिकारक खटपटींना सुरुवात झाली होती. शरीरसामर्थ्य कमाविण्याची लहानपणापासून त्यांना आवड होती. पुण्यास आल्यावर त्यांना त्यासाठी अनुकूल असे वातावरण मिळाले. त्या वातावरणात वासुदेव बळवंतांनी आपल्या स्वतःची शरीरसंपदा उत्तम कमावली. तीनतीनशे जोर आणि बैठका हा त्यांचा नित्याचा खेळ होऊन बसला. त्यांची उन्नत छाती भरलेली आणि दमदार बाहू सामर्थ्यवान आणि शरीर पिळदार बनले. इतके की त्यांना उघडे पहाणाऱ्यांनी त्यांचे शरीरसौष्ठव पाहून चकित होऊन जावे. पुण्यास आल्यावर त्यांना मल्लविद्येची अधिक आवड उत्पन्न झाली. त्या विद्येचा आखाडा दिसला की तेथे जाऊन ते नवे नवे पेच शिकून घेत. अशा आखाड्याला पुण्यात तालीम म्हणत. सायंकाळी इतर तरुण जेव्हा गप्पागोष्टी करीत मजेत वेळ घालवीत असत,त्यावेळी वरील आखाड्यांत वासुदेव बळवंत शरीरबल जोपासण्यात दंग असत. त्यावेळी पुण्यास असलेला वाणेकरांचा आखाडा, आता भारत इतिहास संशोधक मंडळाची वास्तू आहे त्या ठिकाणी असणाऱ्या वैद्यांच्या बागेतील आखाडा, आणि लहुजी बुवांचा फड या सर्व ठिकाणी ती विद्या त्यांनी आत्मसात केली होती.

वासुदेव बळवंत चार जणात उठून दिसावे अशाच अक्षरशः उंचीचे होते. त्यांची

उंची पाच फूट दहा इंच होती.[१] वर्ण गोरापान होता. त्यांचे नाक सरळ आणि तरतरीत आणि डोळे निळसर होते.[२] त्यांनी जरी व्यायामाने प्रचंड शारीरिक बळ कमाविले होते तरी त्यांची गणना सडपातळातच करावी लागली असती. त्यामुळे चापल्याची आवश्यकता असणाऱ्या बंडखोराचे आयुष्य ते लीलेने कंठू शकले असावेत. ठाण्याच्या तुरुंगात आल्यावर घेण्यात आलेल्या त्यांच्या शारीरिक मापांच्या नोंदीप्रमाणे त्यांच्या छातीचा घेर ३४ इंच होता. त्या काळपर्यंत त्यांनी तुरुगात बऱ्याच हालअपेष्टा सोसल्या होत्या. आणि त्यांचे न्याण्यापिण्याचे बरेच महिने फाके पडले होते. त्यामुळे ते बरेचसे हाटले असतील. तेव्हा हे माप त्यांच्या या हाटलेल्या शरीराच्या छातीचे होते. म्हणजे ती प्रथम कदाचित ३६ इंच असेल. त्यांचे मस्तकही त्या मानाने लहान म्हणजे २० इंच आकाराचे होते. पावले मात्र भव्य म्हणजे ११ इंच लांबीची होती.[३]

लहुजीबुवांजवळ गोळीबार, पट्टा, तलवार, बोथाटी, भाला, बरची इ. शस्त्रे हाताळण्याच्या विद्या ते शिकले. घोड्यावर बसण्यात आणि निशाण मारण्यात ते पटाईत झाले. पट्टा फिरविण्यात एक मांग आणि एक महार पुण्यात त्यावेळी फार प्रख्यात होते. त्यांच्याजवळ वासुदेव बळवंतांनी या कलेतील बरेच धडे घेतले.[४] हे मांग गृहस्थ म्हणजे लहुजीबुवा होत. लहुजीबुवांचे संबंध नाव लहुजी विन राघू राऊत मांग आणि हे महार गृहस्थ म्हणजे राणबा महार होत.[५] हे वेताळपेठेत राहात असत. लहुजीबुवांच्याच आखाड्यांत महात्मा ज्योतिबा फुले आणि त्यांचे सहकारी वाळवेकर आणि परांजपे हे दांडपट्टा इ. विद्या शिकले होते. "फुल्यांच्याही अंगी लहानपणापासून स्वदेशाभिमानाचे वारे शिरले होते. वासुदेव बळवंत फडक्याप्रमाणे फुलेही फडके यांचे गुरू लहुजीबुवा यांच्या हाताखाली गोळीबार, दांडपट्टा वगैरे गोष्टी शिकले. या गोष्टी इंग्रज सरकारास पालथे घालण्याच्या उद्देशाने मी शिकलो, असे स्वतः फुले यांनीच लिहून ठेवले आहे."[६] पुण्याच्या दक्षिणेस गुलटेकडीवर एका बाजूस लहुजीबुवा आणि राणबा यांचा इतरांना या विद्या शिकविण्याचा तळ असे घोडदौड आणि मल्लविद्या यांच्याप्रमाणेच पट्टा फिरविण्यात वासुदेव

१ वासुदेव बळवंताना अटक करण्यात साहाय्यभूत होईल अशी माहिती देणाऱ्यास पारितोषिक उद्घोषिणारी मुंबई सरकारची राजघोषणा.

२ "ते सुरेख, सरळ नाकाचे, उंच, सुदृढ आणि दणकट बांध्याचे आहेत आणि भर सारण्यात आहेत." पळसपे लुटीच्या अभियोगातील प्रमुख आरोपी उम्या तुकाराम याची पहिल्या वर्गाचे दडाधिकारी कॅपबेल याच्या पुढील स्वीकारोक्ती; दि. २२मे १८७९

३ "रजिस्टर शोअिंग दि डिस्क्रिप्शन ऑफ कन्व्हिक्टेट पर्सन्स कनफाइन्ट इन दि ठाणा जेल ड्युरिंग दि इयर 1879."

४ महर्षी अण्णासाहेब पटवर्धन यांचे चिरंजीव बाबासाहेब पटवर्धन यांनी दिलेली माहिती. अण्णासाहेबांचे आणि वासुदेव बळवंतांचे सख्य कसे होते ते पुढे एके ठिकाणी सांगितले आहे.

५ डॉ. वि. भा. गोवंडे : "त्रिमूर्ती दर्शन", पृ. ६२

६ न. चि. केळकर : "लो. टिळक यांचे चरित्र", पूर्वार्ध, पृ. ७०

बळवंत पटाईत झाले होते.

खरे तर पट्टा हे वासुदेव बळवंतांचे अतिशय आवडते शस्त्र होते. ते शस्त्र अतिशय लवचिक आणि धारदार पोलादी पात्याचे असे. आणि साधारणतः एका खांद्यापासून दुसऱ्या हाताच्या बोटांच्या टोकापर्यंतच्या लांबीचे असे. त्याचे बारीक गुंडाळे करता येई आणि ते गुंडाळे सोयीस्करपणे जवळ लपवता येई. किंवा ते कमरेला गुंडाळताही येई. असा हा पट्टा हातात असला तर वासुदेव बळवंत कित्येक माणसानाही एकटे भारी होत.

गुलटेकडीवर सहकाऱ्यांना घेऊन युद्धकलेचे धडे गिरवीत. "तोंडात हत्यार धरून पाठीने भिंत चढून जाणे, घोरपडीचा उपयोग कसा करावा, दोन्ही हातात दोन पट्टे चढवून भोवताली पडलेल्या मानवी सशस्त्र गराड्यावरून उड्डाण मारून कसे जावे इ. शिक्षण तेथे देण्यात येत असे. पट्ट्याच्या फेकी करीत वासुदेवराव पुरुषभर उंचीचे निवडुंगाचे फड सहज उड्डाण मारून पार होत असत. धावत्या घोड्यावर बसून निशाणबाजी करण्यात ही मंडळी चांगली पटाईत झाली होती.

"अंधेऱ्या रात्री रानावनातल्या काट्याकुट्यातून चपलतेने भरधाव पळणे, डोंगराच्या चढणी हा हा म्हणता चढून जाणे, तुटक्या कड्यावरून उड्या मारणे आणि डोंगरपट्टीच्या बाजूच्या वाटेने बेगुमानपणे पळणे, नदीच्या भर पुरात उडी मारून पोहत जाणे, पाण्याच्या पोटातून पोहत जाऊन दूरवर निघणे वगैरे क्षात्रधर्माला व नवे राज्य स्थापन करण्यास आवश्यक त्या सर्व धाडसांच्या कामात वासुदेवराव आपल्या सवंगड्यासह पट्टीचे प्रवीण झाले होते." [७]

वासुदेव बळवंत स्वतःच म्हणतात, "निशाण मारणे, घोड्यावर बसणे, ढाल तलवार खेळणे, भाला फेकणे इ. खेळ मी शिकलो." [८] असे शरीरसामर्थ्य आणि शस्त्रे हाताळण्यातील कौशल्य आत्ममात करण्याची ओढ असल्यामुळे पुण्यात आल्यावर लागलीच वासुदेव बळवंतांनी ही शस्त्रे जवळ बाळगण्यास सुरवात केली. ते म्हणतात, "हत्यारांचा मला शोक फार. व नेहमी दोनतीन बंदुका, पाचचार तरवारी, पट्टे, भाले माझ्यापाशी असत." [९]

क्रांतिकारकांना अशी शस्त्रे मिळवून बाळगण्याची अतोनात ओढ असते. त्या पुढील काळात शस्त्र निर्बंधामुळे बंदूक मिळवून ती गुप्तपणे हाताळणे त्यांना तेवढेसे सोपे नसे. पण गुप्तपणे पिस्तुल किंवा रिव्हॉल्व्हर मिळविणे आणि त्यांनी अचूक नेम मारण्यास शिकणे हे त्यांना शक्य होत असे. असे शस्त्र मिळविल्यावर त्यामुळेच क्रांतिकारकांना अतोनात आनंद होत असे. क्रांतिकारक दामोदर हरि चापेकर यांनी

७ ल. ना. जोशी : 'स्मरण-पुराण' लेखांक दुसरा, "मौज", दि. ७ जुलै १९२९. हे लेख जोशी यांनी वासुदेव बळवंतांच्या चरित्रावरच त्या साप्ताहिकात लिहिले होते.

८ वासुदेव बळवंतांचे 'आत्मचरित्र'.

९ वासुदेव बळवंतांचे 'आत्मचरित्र'

१८९७ च्या मेच्या शेवटच्या आठवड्यात लकडी पुलाजवळच्या स्मशानभूमीतून मुंबईच्या चौदाव्या पायदळींतील सैनिकाची एक संगीन आणि दोन मार्टिनी हेन्री रायफली पळविल्या. त्याचा आनंद वर्णन करताना ते म्हणतात की, "त्या हातात आल्याचा आम्हाला फार आनंद झाला. आम्हास इतकी उमेद आली की, आम्ही फौजेबरोबरसुद्धा आता तोंड देऊ ! " ही वेळ न आल्याविषयी तुरुंगात मग ते हळ-हळले, "पण आमच्या दुर्दैवाने ते दिवस आम्ही पाहिले नाहीत."[१०]

भगतसिंगांच्या सहकाऱ्यानीही असे शस्त्र मिळल्यावर अतोनात आनंद होत असे. त्यांचे एक श्रेष्ठ सहकारी प्रख्यात लेखक यशपाल असे पहिले पिस्तुल त्यांना मिळाल्यावर म्हणतात, "यह पिस्तौल मिल जानेपर हम लोग अपने आपको सशस्त्र अनुभव करने लगे। मन में उल्हास और उत्साह अनुभव होने लगा कि अब हम व्यर्थ में नही मारे जायेंगे...हम इतने भोले नही थे कि एकही पिस्तौलसे ब्रिटिश सरकार को उखाड फेकनेका स्वप्न देखने लगते। परंतु हमारे लिये एक पिस्तौल का भी बहुत मूल्य था। पहली बात तो यह कि पुलिससे सामना होनेपर पुलिसका मुकाबला और आत्मरक्षाका प्रयत्न करते थे। हमारा ऐसा करना दूसरोंके लिए साहसका उदा-हरण होता। ...प्रत्यक्ष हथियार दिखा देनेपर लोगो में सहसा उत्साह और विश्वास उत्पन्न हो जाता था"[११]

वासुदेव बळवंतांनी शस्त्रनैपुण्य मिळवल्यावर १८७८ मध्ये शस्त्रनिर्बंध आला. तेव्हा मग त्यांनी सरळच बंदूक बाळगण्यासाठी आणि वापरण्यासाठी दंडाधिकाऱ्यांची अनुज्ञा घेऊन टाकली. आणि तीही एका बंदुकीची नाही तर दोन आणि बंदुकी-साठीच नव्हे तर तलवारीसाठीही.[१२]

वासुदेव बळवंताच्या घोडदौडीविषयी त्यांच्या लहान मुलांच्या संघटनेतील एक घटक 'अनामिक' यांनी पुढील आठवण धाडली आहे. "वासुदेव बळवंत घोड्या-वर बसण्यात पटाईत होते. काळोख पडताच घोड्यावर रपेट करण्यासाठी ते बाहेर पडत. पुण्यातील काही रस्त्यावरून ते घोडा दौडत नेत. त्याच्या ऋणानुबंधी सरदारा-जवळ घोडा बाळगलेला असे. असा एखादा घोडा ते वापरीत असत.[१३] घोडदौडीत ते इतके पारंगत झाले की, प्रत्यक्ष झटापटीत आपण शत्रूच्या हातून सहज निसटून

१० चापेकरांचे अप्रकाशित आत्मचरित्र, (मराठी) पृ. १०४

११ यशपाल : "सिंहावलोकन," भाग २ पृ. ४०

१२ "बॉम्बे गॅझेट' दि. ८ मार्च १८७९

१३ 'अनामिक' यांच्या आठवणी; या आठवणी या चरित्राच्या पहिल्या आवृत्तीत 'अनामिक' या नावानेच प्रसिद्ध झाल्या. कारण, अनामिक हे निवृत्त सरकारी सेवक होते. आणि हिंदुस्थान त्यावेळी स्वतंत्र झालेला नव्हता. त्यांचे नाव गंगाधर विष्णू जोशी. ते १९४९ मध्ये मृत्यू पावले. वासुदेव बळवंतांच्या संघटित बालचमूत ते प्रतिज्ञाबद्ध सदस्य होते.

जाऊ असा त्यांना आत्मविश्वास वाटे.[१४] त्यांच्याजवळ तरवार, पट्टे, भाले, बंदुका, चिलखते यांचा मोठा संच असे. नवीन शस्त्र पाहताच त्याची पारख करण्यात ते केव्हाच गढून जात.

लोकात आपल्या बंडखोर विचारांचा प्रसार करण्याकरिता वासुदेव बळवंतांनी प्रचार संघटना आखली. 'अनामिक' म्हणतात, "फडके यांची ही प्रचार संघटना चार प्रकारची होती. पहिल्या प्रकारात लहान मुलांच्या सभा शाळेतून घेतल्या जात. त्या मुख्यतः (पुढे उल्लेखिलेले भिकाजीपंत) हर्डीकर घेत असत. त्या सभा शिक्षकाच्या लक्षात न येतील अशा रीतीने कधी शाळेत तर कधी बाहेर सांकेतिक स्थळी घेतल्या जात. विद्यार्थ्यांपुढे या सभातून स्वराज्याच्या आवश्यकतेसंबंधी व्याख्याने दिली जात."

प्रभात फेऱ्या १९३० च्या आंदोलनापासून सुरू झाल्या असा समज आहे. पण त्यांचा जन्म वासुदेव बळवंतांच्या वेळेसच झालेला आहे. 'अनामिक' म्हणतात, "प्रभात फेऱ्यांमधूनही प्रचार केला जात असे. मनाचे श्लोक, करुणाष्टके गात लोक या फेऱ्यांतून हिंडत. त्यासाठी पुण्यातील पेठा ते आलटून पालटून वाटून घेत. त्यात गाणाऱ्या गळ्याचेही लोक असत. त्यांच्यापैकी काहींना घरी बोलावून त्यांच्याकडून लोक पदे म्हणून घेत. हे प्रचाराचे कार्य पुष्कळसे भक्तीपर जागृतीच्या मार्गाने चाले."

"सकाळी आठच्या सुमारास किंवा संध्याकाळच्या वेळी होणारा प्रचार गोरक्षणाच्या प्रचाराच्या धर्तीवर केला जाई. यावेळी अन्योक्तीवजा भाषेतून किंवा मुद्दाम रचलेल्या काव्यातून सरकारविरोधी प्रचार केला जाई.

"या प्रचाराचा एक मजेचा प्रकारही होता, गर्दीचे लक्ष विक्षिप्तपणे आपल्याकडे खेचावयाचे नि आपले सूचक शब्द बोलावयाचे, असा तो प्रकार असे. या कार्यक्रमात धारपुरे नावाचे गृहस्थ प्रमुख होते. ते भगवी कफनी आणि पांढऱ्या रंगाची किंवा अर्ध्या पपसनाची टोपी घालीत. त्यांच्या या विचित्र वेषामुळे त्यांच्याभोवती लोकांची गर्दी जमे. ती गर्दी पाहताच लोकांना ते म्हणत, "अरे चार पायांची कुत्री मी पुष्कळ पाहिली आहेत! पण त्याच जिण्याचे तुम्ही दोन पायांचे श्वान पाहून मात्र मला लाज वाटते!" या प्रचारात दातार नावाचे एक गृहस्थही भाग घेत असत."[१५]

---

१४ "वीस स्वारानी माझा पाठलाग केला तरी मी भिणार नाही", वासुदेव बळवंताचे, दंडाधिकारी मेसर याच्यापुढील निवेदन; दि. २२ ऑगस्ट १८७९.

१५ या काव्यातील बऱ्याच वर्षांनीही आठवणाऱ्या काही काव्यपंक्ती 'अनामिक' यांनी म्हणून दाखविल्या. त्यातील एका काव्याचे ध्रुवपद पुढीलप्रमाणे होते—

"गुळव्यावरे देऊनि हाती। आम्हा कशी चारली माती ऽऽ
"धोवरे देऊनि हा ऽऽ ती ।।"

यार्या वृत्तातील पुढील पंक्ती 'अनामिक' यानी म्हणून दाखविल्या—

एक— "हा हाय हिंदुस्थाना, झाली दशा तुझी काय।
हतवीर्य झाले सर्वहि जन त्याते वाटतो नको काय।।

वासुदेव बळवंत चवथ्या प्रकारचा प्रचार प्रकट व्याख्यानामधून करीत. त्यांचे निर्भय प्रौढ स्नेही त्याच प्रचारवर्गाचे प्रचारक असत. वासुदेव बळवंतांचे आपल्या व्याख्यानातील जहाल विचार ऐकून काही 'विचारी' लोक त्यांना 'वेडेही' समजू लागले होते !

परकीय ब्रिटिश सत्तेची अशी घट्ट मगरमिठी हिंदुस्थानावर बसली होती की, स्वराज्याची क्रांतिकारक चळवळ गुप्तपणेच करणे शक्य होते. या मार्गाचे समर्थन करताना मॅझिनी म्हणतो, "अशा स्थितीत 'गुप्त मंडळ्यां' शिवाय परवशतेतून सुटण्याचा दुसरा उपाय नाही. जेव्हा सत्यप्रतिपादनाची बंदी झालेली असते, जेव्हा पवित्र कार्यालाही प्रारंभ करण्याची चोरी झालेली असते, जेव्हा स्वदेश हा एक भला थोरला तुरुंग बनलेला असतो, तेव्हा त्या तुरुंगातून सुटून स्वातंत्र्याच्या पवित्र वातावरणात श्वासोच्छ्वास करण्याचा ईश्वरी हक्क शाबित करण्यासाठी आम्हा कैद्यांना गुप्त कट हा एकच मार्ग आहे."[१६]

१८७८ च्या शेवटी वासुदेव बळवंतांनी म्हणूनच पुण्यात आणि महाराष्ट्रात पहिल्या क्रांतिकारक गुप्त संस्थेची स्थापना केली. सेडिशन कमिटी नावाच्या समितीने म्हटले आहे की, पश्चिम हिंदुस्थानात क्रांतिकारक आंदोलनाची चिन्हे प्रथम दिसली ती १८९३ मध्ये होत.[१७] पण हे विधान खरे नाही. ती चिन्हे वासुदेव बळवंतांनी स्थापन केलेल्या या क्रांतिसंस्थेच्या कार्यविस्तारामुळे तेथे १८७९ मध्येच प्रथम दिसली.

विचार परिवर्तनाच्या वरील प्रयत्नांशी आपल्या विचारांशी जे सहमत होत, त्यांना या आपल्या क्रांतिसंघटनेत वासुदेव बळवंत सहभागी करून घेत. त्यांना ते ही दीक्षा फार कुशलतेने देत. यासंबंधात वासुदेव बळवंतांनी जी व्यवस्था केली होती ती पाहता त्यांच्या पुरस्सरत्वाचे कौतुक वाटते. पाश्चिमात्य देशांतील क्रांतिसंघ-

आणि दुसरी— "नव्हता हिंडत कधीही देन शिवाजी सभात लेक्चरे
वक्ता पुरे आम्हाला सरळ तुकोदासमान एकच रे ॥"

या काव्याकडे अर्थातच काव्य गुणाच्या दृष्टीने पाहावयाचे नाही. तत्कालीन वचने म्हणून त्याचे महत्त्व आहे इतकेच ! 'दि बॉम्बे गॅझेट' या मुंबईच्या इंग्रजी पत्राने वासुदेव बळवंतांच्या काळांत आपल्या एका अग्रलेखात म्हटले होते—

"A few months ago one or two mendicant Brahmins were going about streets (of Poona) preaching sedition."

("काही दिवसापूर्वी एक दोन भिक्षेकरी ब्राह्मण पुण्याच्या रस्त्यावरून राजद्रोहाचा प्रचार करीत जात असत !") ते उद्गार वरील प्रचाराच्या प्रकारालाच उद्देशून दिसतात आणि त्यांच्यामुळे या वृत्तांताला बळकटी येते.

१६ विनायक दामोदर सावरकर : 'जोसेफ मॅझिनी : आत्मचरित्र नि राजकारण" प्रस्तावना पृ. १२
१३
१७ 'सेडिशन कमिटी 1918, रिपोर्ट' पृ. ५१

टनांची सारी वैशिष्ठ्ये तर तीत होतीच. पुढे साऱ्याच क्रांतिकारकांनी आपल्या गुप्त संस्थेत पाळलेल्या तंत्राचा वासुदेव बळवंतानीच प्रथम अवलंब केला होता. पंधरावीस सभासदांचा एक गट असे. असे त्या संस्थेत कित्येक गट असत. त्यांच्या घटकांना आपल्या गटाचा फक्त नेताच माहीत असे. सर्व गटांच्या नेत्यांशी वासुदेव बळवंतांचा परिचय असे. पण एका गटातील सदस्यास दुसऱ्या गटातील सदस्यांची माहिती नसे! या तंत्रामुळे जर काही सदस्य पोलिसाच्या हातात सापडलेच तर गुप्त संस्थेची सर्वच रहस्ये स्वेच्छेने किंवा मारहाणीमुळेही पोलिसांकडे गौप्यस्फोट करून सांगण्यास ते असमर्थ असत. सावरकराच्या 'अभिनव भारत' संस्थेत, बंगालचा 'अनुशीलन समिती'-मध्ये आणि भगतसिंगाच्या 'हिंदुस्थान सोशॅलिस्ट रिपब्लिकन असोसिएशन' मध्येही हे तंत्र पुढे अवलंबले गेले!

या गुप्त संघटनेत येणाऱ्या युवकाना वासुदेव बळवंत प्रतिज्ञाबद्ध करीत. प्रतिज्ञेच्या या समारंभास त्यानी एका विधीचेच स्वरूप दिले होते. त्याप्रसंगी दही-पोह्यांचा द्रोण हातात घेऊन नवागत युवक ती प्रतिज्ञा उच्चारीत असे. ती प्रतिज्ञा, "मी माझ्या देशाच्या स्वातंत्र्यास्तव वेळ पडेल तेव्हा सर्वसंगपरित्याग करून लढ-ण्यास सिद्ध होईन," अशी होती. [१८]

या प्रतिज्ञेत सदस्यांना गुप्तपणे शस्त्रशिक्षण देण्याची व्यवस्था वासुदेव बळ-वतानी केली होती. त्या काळात ते कार्य त्यांना गुप्तपणे करावे लागे. त्यामुळे पुण्याच्या पश्चिम भागातील त्यावेळी निर्मनुष्य असलेल्या टापूत रात्रीच्या वेळी किंवा पहा-टेच्या प्रहरी अंधारात त्यांची सशस्त्र संघटना कार्य करी.

"पूना हायस्कूल" ही पहिल्या प्रतीची समजली जाणारी शाळा तेव्हा पुण्यात होती. भावे स्कूल ही तर वासुदेव बळवंतांनी स्वत:च स्थापन केलेली खाजगी शाळा पुण्यात नुकतीच नावारूपाला येऊ लागली होती. त्या शाळांचे कित्येक विद्यार्थी वासुदेव बळवंतानी आपल्या गुप्त संघटनेत ओढले आणि असे विद्यार्थी नरसोबाच्या देवळात वासुदेव बळवंताजवळ तलवारीचे हात शिकण्यास आणि निशाण मारण्याचे शिक्षण घेण्यास येत. [१९] पुण्यातील महाविद्यालयातील विद्यार्थ्यांतही त्यांच्या कार्याचे हात पोचले होते. डेक्कन कॉलेजमधील विद्यार्थ्यांना त्यांच्या बंडानंतर त्यांच्याविषयी मोठी आपुलकी वाटत असे ती याच कारणामुळे होय. त्याचा वृत्तांत पुढे येईल.

---

१८ 'अनामिक' याच्या आठवणी

१९ "शाळेत जाणारे विद्यार्थी त्या (वासुदेव बळवंताच्या) घरी तलवारीचे हात शिकण्यास येत." सीताराम भालचंद्र धारवाडकर याची वासुदेव बळवंताच्या अभियोगातील पुण्याच्या सत्र न्याया-लयातील साक्ष; दि. ३ नोव्हेंबर १८७९

"त्याचा (वासुदेव बळवंताचा) माझा चार वर्षांचा परिचय आहे. त्यानी मला 'बॉल फायरिंग' (गोळी उडविण्यास) आणि निशाण मारण्यास शिकविले. गोविंद महादेव करमरकर याची वासुदेव बळवंताच्याअभियोगातील, पुण्याच्या सत्र न्यायालयातील साक्ष दि. ४ नोव्हेंबर १८७९

'अनामिक' म्हणतात, "मुरलीधराचे देवळाचे पलीकडे नरसोबाचे देऊळ आहे. ते त्यावेळी कोणा जोशी आडनावाच्या गृहस्थांचे होते. त्या देवळाचे मागील बाजूस त्यावेळी ओसाड पटांगणवजा वृक्षाच्छादित जागा होती. तेथे आता वस्ती झालेली आहे. त्या निर्जन जागेतच फडके प्रत्यही पहाटे जमलेल्या साठसत्तर तरुणांना स्वतः तलवार, दांडपट्टा इ. चे हात शिकविताना मी पाहिलेले आहे. त्या मंडळीपैकी काहींची नावे मला आठवतात. त्या मंडळीत पागे, वझे (मास्तर) हर्डिकर, दुसरे एक वझे, दोन सहस्रबुद्धे, नारायणराव "फौजदार," घोटवडेकर, मोरोपंत धारपुरे, दोन गुरुजी, दादा दामले इत्यादी लोक होते. त्यात राधाबाई वझे नावाच्या एक बाईही होत्या, फडके यांच्यावर त्या बाईची फार भक्ती होती. फडके यांना शिक्षा झाल्यानंतर त्या विरक्तपणे संन्यासी वृत्तीने राहू लागल्या, सोलापूरजवळ सांगोले गावी त्यांनी पुढे एक राममंदिरही बांधल्याचे माझ्या ऐकिवात आहे."

जुन्या मुरलीधराच्या देवळात वासुदेव बळवंताची सायंकाळची बैठक असे आणि त्या प्रसंगी तरुणांचा मोठा समुदाय त्यांचे विचार ऐकण्यासाठी जमत असे. त्या वेळीही आपल्या राजकीय उद्दिष्टाने फडके त्यांची मने भारून टाकीत असत.

"अनामिक" यांच्या आठवणीस दुजोरा देणारा पुढील वृत्तांत लक्षात घेण्यासारखा आहे. पुण्याच्या राजवाडे जाळिताच्या अभियोगातील आरोपी केशव रानडे याने आपल्या दंडाधिकाऱ्यापुढील चौकशीत पुढील उत्तरे दिली– प्रश्न–"तू वासुदेव बळवंत फडके यास ओळखतोस काय ?" उत्तर – " होय, मी ओळखतो. मी चार वर्षांपासून ओळखतो. त्याच्या घरी कारणपरत्वे मी पुष्कळदा गेलेलो आहे. " प्र.– " त्याला तू शेवटचे कधी पाहिलेस? ." उ. – तो सुमारे पाच महिन्यापूर्वी नाहीसा झाला त्याच्या आदल्या दिवशी आमच्या आळीतील मुरलीधराच्या देवळात त्याची नेहमीची बैठक असे, तिथे मी त्याला भेटलो. त्यावेळी नेहमीप्रमाणे आमच्या आळीतील पुष्कळ लोक जमले होते. त्यापैकी पुष्कळ जण मुख्यत्वेकरून १८ पासून ते २५ वर्षांच्या वयाचे होते. ते थोडेबहुत शिकलेले होते.त्यांच्यापैकी पाच सहा जणांना इंग्रजी ही येत होते. ते त्या देवळात नेहमी जमत असत. तिथे त्यांच्यापुढे फडके नेहमी राजकीय विषयावर भाषण करीत असे आणि आपल्याप्रमाणे पट्टा खेळण्यास शिकवीत असे. वरील शेवटच्या दिवशी फडके म्हणाला, 'तुम्ही इंग्रजांच्या अंमलाखाली का रहाता? आणि आपलं गेलेलं राज्य परत मिळविण्यासाठी बंड का करीत नाही?' तो म्हणाला की, "मी करतो तसं करा आणि माझ्याप्रमाणे पट्ट्याचे हात खेळण्यास शिका.' "तुमचं म्हणणं आम्हाला पटतं पण आमच्याजवळ शस्त्रं नाहीत त्यामुळे तू म्हणतोस तसं आम्ही करू शकत नाही. "असे सर्वजण त्यानंतर म्हणाले."

२० जळिताच्या अभियोगातील एक आरोपी केशव रानडे याचे पहिल्या वर्ग दंडाधिकाऱ्यांपुढील २० मे १८७९ ला केलेले निवेदन ; 'दि बॉम्बे गॅझेट' दि १० जून १८७९

वासुदेव बळवंतांच्या अशा शिष्यमंडळीत पुढील प्रमुख तरुणांची नावे आढळतात. सीताराम गोडबोले, मोरो बळवंत खरे, विष्णू बळवंत खरे, बाळाजी नारायण फडके, चिंतो भिकाजी वैद्य, बळवंत सखाराम घाटे, परशुराम पाटणकर, हरि गुपचुप, गोपाळ हरी कर्वे, महादेव गोविंद करमरकर, वासुदेव कृष्णाजी भट, गोविंद भटजी दाते, नारायण रामचंद्र पोंक्षे, पुरुषोतम चिंतामण गोखले, गणेश कृष्ण देवधर आणि रामभाऊ लिमये इत्यादी. केशव रानडेही त्यात होताच. तो खुन्या मुरलीधराजवळच रहात असे.

वासुदेव बळवंतांच्या सहकाऱ्यांपैकी गणपतराव घोटवडेकर हे त्यांच्याप्रमाणेच नामांकित पट्टा खेळणारे होते. ते चांगले सुखवस्तू होते. भव्या विष्णुजवळील त्यांचा वाडा घोटवडेकरांचा वाडा म्हणून प्रसिद्ध होता. वासुदेव बळवंतांच्या सहकाऱ्यांपैकीच बरेचसे पुढे टिळकांच्या आंदोलनात सार्वजनिक कार्यकर्ते म्हणून प्रसिद्धीस आले. त्यातच घोटवडेकर हे होते. गणपतराव पुढे सार्वजनिक सभेच्या कार्यक्रमात प्रमुख भाग घेत राहिले. पुण्यातच सँक्सन प्रेस नावाचे मुद्रणालय होते. त्याचे ते व्यवस्थापक झाले. टिळकांच्या प्रभावळीतील सरकारविरोधी वृत्तपत्रांशी संबध असलेल्या किंवा त्यांना पाठिंबा देणाऱ्या लोकांची जी टिपणी पुण्याच्या दंडाधिकाऱ्याने आणि पोलीस अधीक्षकाने पुढे काढली, तिच्यात त्यामुळेच क्रमांक दोनखाली घोटवडेकरांचे नाव त्यांनी गुप्त प्रतिवृत्तांत घातले.[२१] पुण्यात रविवारपेठेत निघणाऱ्या दगडी नागोबाच्या मिरवणुकीसंबधात पोलिसांनी वाद्यबंदीचा आदेश काढला. तेव्हा त्या आदेशाला विरोध करणाऱ्या सात कार्यकर्त्यांना त्यांनी पकडले. त्यात गणपतराव घोटवडेकर प्रमुख होते. त्यांना त्या प्रकरणात दंडाची शिक्षा झाली.[२२] पुढे १८९३ मध्ये गणपतीच्या मेळघावरून पुण्यात तशीच झटापट उडाली. दारुवाल्याच्या पुलावर कुंजीराच्या मेळयाने वाद्ये बंद करावी म्हणून पोलिसांनी मेळयाच्या पुढाऱ्यांना सांगितले. पण गणपतराव घोटवडेकर प्रभृतींनी ते ऐकले नाही आणि त्यांच्यासह एकूण १४ जणांवर अभियोग चालला. पण सत्र न्यायालयात घोटवडेकर प्रभृती सर्वजण निर्दोष सुटले![२३]

जुन्नरकरांच्या दत्ताजवळ बाळकृष्णपंत किंवा आप्पा वैद्यांचा वाडा होता. त्यांच्याच उद्यानातील आखाड्यांत वासुदेव बळवंतांचा कुस्तीचा व्यायाम होई. वैद्य ठेंगणे, गोरेपान होते. त्याचे डोळे घारे होते. या वैद्यानीही वासुदेव बळवंतांच्या उठावणीत भाग घेतला. नंतर टिळकांच्या आंदोलनात त्यांनी प्रमुख भाग घेतला. बाराबंदी पागोटे, आणि पुणेरी जोडे घालून त्या काळात वावरताना ते अनेकांच्या परिचयाचे झाले. वैद्यांचे एक बंधू फौजदार होते. आणि वासुदेव बळवंतांना पकड-

२१ डॉ. पी. करमरकर - "बाळ गंगाधर तिलक, (ए स्टडी) १, पृ. ९८-९९
२२ त्र्य. र. देवगिरीकर : वासुदेवराव जोशी व त्यांचा काळ", पृ. २११
२३ कित्ता, पृ. २२१.

णाऱ्या मेजर डॅनिअलच्या हाताखालीच काम करीत होते. पण त्यांनाही वासुदेव बळवंतानी आपलेसे केले होते.

वैद्यांप्रमाणेच टिळकांच्या अनुयायात त्यांचे कट्टे भक्त म्हणून पुढे प्रसिद्धी पावलेले भिकाजीपंत हर्डीकर हेही वासुदेव बळवंतांच्या सहकाऱ्यात होते. ते नारायण पेठेत माणकेश्वरांच्या विष्णूच्या देवळाच्या शेजारच्या पंडितांच्या वाड्यात राहात. त्यांचा जन्म १८४१ मधील. म्हणजे ते वासुदेव बळवंतांहून चार वर्षेच मोठे होते. ते ठेंगणे, वर्णाने सावळे आणि इंग्रजी लिहिण्यावाचण्यापुरते येणारे शिक्षण झालेले होते. ते त्या काळच्या बाराबंदी इ. पोषाखात वावरत. निळी पगडी घालीत. घोड्यावर बसण्यात, तरवार खेळण्यात पटाईत होते. गणिताचे प्रख्यात प्राध्यापक नानासाहेब हर्डीकर यांचे ते वडील.

पहिल्या काही वर्षांत टिळकाचे सहकारी असलेले माधवराव नामजोशी हेही वासुदेव बळवंताचे सहकारी आणि मित्र होते. रामेश्वराजवळील माधवराव रानड्यांच्या वाड्यात ते राहात. त्याचा जन्म १८५३ मधील. शिक्षण मॅट्रिकपर्यंतच झाले असले तरी उत्तम संघटक आणि सार्वजनिक कार्यकर्ते म्हणून ते टिळकांच्या समानतेने गाजले. न्यू इंग्लीश स्कूल काढण्यात त्यांचाही मोठा भाग होता. त्यांनीच 'डेक्कन स्टार' हे इंग्रजी आणि 'किरण' हे मराठी साप्ताहिक पुढे चालवले 'डेक्कन स्टार'चे ते संपादक होते. ते पत्र पुढे टिळकांच्या 'मराठा' पत्रात समाविष्ट झाले.

रामचंद्र विनायक पटवर्धन हे पुढे महर्षी अण्णासाहेब पटवर्धन म्हणून प्रसिद्ध झाले. त्यांचा जन्म १८४७ मधील. म्हणजे वासुदेव बळवंतांहून ते दोन वर्षांनी लहानच होते. ते त्यावेळी भर तारुण्यात होते. त्यांची मुद्रा तेजस्वी, वर्ण गोरापान आणि शरीरयष्टी पिळदार होती. शरीरसामर्थ्य कमावण्यात त्या काळच्या ध्येयवादी तेजस्वी तरुणांप्रमाणे त्यांनी चांगलीच आघाडी मारली होती. आपल्या अंगात एका घोड्याचे तरी बळ आहे असे ते नेहमी सांगत. सैन्यातील सोजरी दिसला तर वानवडीपासून स्वाराच्या गेटापर्यंत धावण्याच्या शर्यतीचे त्याला आव्हान देण्यात त्याना मजा वाटे आणि ही शर्यत ते जिंकत आणि त्या सोजिराला लज्जित करीत. शारीरिकसामर्थ्याप्रमाणे त्याचा बौद्धिक आवाकाही मोठा असे. मुंबईस बी. ए. झाल्यावर विधिविद्यालयात ते गेले. तेथे वकिलीची परीक्षा उत्तीर्ण होतानाच डॉक्टरकीची परीक्षा त्यानी दिली. पण करारीपणामुळे पहिल्या परीक्षेत एका परीक्षकाच्याच चुका काढल्यामुळे, त्याना त्या परीक्षेस त्या परीक्षकास आव्हान देऊन सहा वेळा बसावे लागले. तरीही त्यानी त्याला निरुपाय म्हणून शेवटी आपणास उत्तीर्ण करावयास लावले.

कित्येक संस्थानिक, आणि इतर मोठे लोक याना मौलिक विधिसमादेश देऊन कित्येक दावे जिंकण्यास सहाय्य केल्यामुळे त्यानी वकिलीत पैसा खूप मिळविला वैद्यकीचा पैसा म्हणून घ्यायचा नाही असे ठरविल्यामुळे, शेकडो रुग्णाईतांना बरे

करण्याचा सतत पराक्रम करूनही, त्यांनी त्या धंद्यात मात्र पैसा मिळविला नाही.

शनिवारवाड्याच्या फुटक्या बुरुजापलीकडे पटवर्धनांचा वाडा दिसतो, तोच महर्षी अण्णासाहेब पटवर्धनांचा वाडा होय. वासुदेव बळवंतांच्या संघटनेच्या कार्यात ते सहभागी होते. मागे उल्लेख केलेले लहूजीबुवा आणि राणबा यांच्याकडे दांडपट्टा शिकण्यास वासुदेव बळवंत जात, त्यांच्या समवेत अण्णासाहेबांनीही त्या लोकांकडून ती विद्या आत्मसात केली होती. [२४] वासुदेव बळवंतांच्या अण्णासाहेबांकडे बैठकी होत. [२५] त्या वेळी बंडाच्या कितीतरी योजनांची वासुदेव बळवंतांनी त्यांच्याजवळ चर्चा केली असेल.

वासुदेव बळवंतांच्या इतर सहकाऱ्यात सीतारामपंत गोडबोले नावाचे सहकारी होते. ते त्यांचे अगदी तुल्यबळ सहकारी शोभत. ते सदाशिव पेठेतल्या जोहाऱ्याच्या महादेवाच्या देवळाचे धनी होते. त्यामुळे त्यांना जीवनात स्वास्थ्य होते. शारीरिक बळात ते चार जणात उठून दिसत. पाठीने भिंती चढण्यात, घोरपडीचा उपयोग करण्यात, गोफणगुंड्यांचा मारा अचूकपणे करण्यात ते पटाईत होते. वासुदेव बळवंतांचे ते उजवे हातच शोभत अंगाने धट्टेकट्टे तसेच ते चपळ होते. घोडदौडीत त्यांचा हातखंडा असे. मोठ्या घोड्याला शेपटीकडून ओढून ते सहज ढुंगणावर बसावयाला लावू शकत, असे बलवान होते. पळण्याच्या कलेत ते पधरा मैल वेगाने पळू शकत. आडदांड बंडखोरीच्या जीवनात वासुदेव बळवंतांना हा सुयोग्य सहकारी लाभला होता. [२६]

विष्णू बळवंत खरे आणि त्यांचे धाकटे बंधू मोरो बळवंत खरे हे जुन्या मुरलीधराच्या देवळाचे धनी खरे यांचे चिरंजीव. त्या देवळाच्या मंडपाचा इतिहास मोठा रहस्यमय आहे. त्या देवळाचा जुना मंडप विशेष लक्षणीय नव्हता. पण पुढे गाय आळीतील केळकर सावकारांनी देवालयाचा जीर्णोद्धार करण्याचे ठरविले. आणि उंची नक्षीदार कलापूर्ण लाकडी साहित्याने त्या देवळात आज दिसणारा नवा सुंदर सभामंडप उभारला. [२७] वरील दोघे खरे बंधू वासुदेव बळवंतांचे निकटचे सहकारी होते. विष्णू बळवंत ठेंगणे पण गोरेपान, घाऱ्या डोळ्यांचे युवक होते. त्यांची प्रकृती ठणठणीत असे. ते फार शिकलेले नव्हते. पण त्यांनी जुन्या पद्धतीचे शास्त्राध्ययन चांगले केले होते. मुरलीधराच्या देवळात पूजेचे काम ते करीत. मोरो बळवंत उंच होते. त्यांचा वर्ण गोरापान आणि डोळे घारे होते. लहानपणी गाईने शिंग मारल्यामुळे त्यांचा एक डोळा गेला होता. त्यांचे शिक्षण मराठी चार इयत्तेपर्यंत झाले होते. दोघेही खरे तालीमबाज होते. [२८] वासुदेव बळवंतांच्या हाताखाली युद्धकलातही ते प्रवीण झाले. बाळाजी

२४-२५ महर्षी पटवर्धनांचे चिरंजीव बाबासाहेब पटवर्धन यांची माहिती.

२६ ल. ना. जोशी : 'स्मरण-पुराण', लेखांक ३ रा, "मौज", दि. २४ जून १९२९.

२७ ल. ना. जोशी : 'स्मरण पुराण', लेखांक ९ वा, "मौज", दि. २ ऑक्टोबर १९२९.

२८ मोरो बळवंत खरे यांचे नातू नाना खरे यांनी दिलेली माहिती.

नारायण फडके हे वासुदेव बळवंतांच्या आडनावाचे असले तरी त्यांचे त्यांच्याशी काही नाते नव्हते. ते तशाच बंडखोर वृत्तीचे होते. ते त्याच आळीत राहात. परशुराम पाटणकरांचे संबंध नाव परशुराम नारायण पाटणकर असे होते. ते त्यावेळी पूना हायस्कूलमध्ये शिकत होते. आणि वासुदेव बळवंतांजवळच ते दांडपट्टा, आणि तलवार फिरविण्यास शिकले. वासुदेव बळवंतांशी असलेल्या संबंधामुळे त्यांना वासुदेव बळवंतांना अटक होण्याच्या आधीच कच्चा बंदिवास भोगावा लागला. महादेव गोविंद करमरकर हे पुण्यास बरेच दिवस राहात होते. ते प्रथम ठाण्याच्या दुय्यम न्यायाधीशांच्या (सबजज्जांच्या) कार्यालयात आणि पुढे पुण्यास लघुवाद (स्मालकॉज) न्यायालयात नोकरीस होते. गणेश कृष्ण देवधर हे त्यावेळी विद्यार्थीच होते. आणि भावे स्कूलमध्ये शिकत होते. गोपाळ हरि कर्वेही विद्यार्थीच होते. -रामभाऊ लिमये यांचे घर लोणीविके दामले यांच्या घराजवळ होते. ते शरीराने बलिष्ठ पहेलवान होते. आणि पुढे पुण्यात मोठे वकील म्हणून प्रसिद्धीस आले.

नरसोबाच्या देवळाच्या बाजूला झाडीमध्ये वासुदेव बळवंतांची शस्त्रशिक्षणाची शाळा चालत असे; त्या शाळेमध्ये येणाऱ्या वरील शिष्यांच्या व्यतिरिक्त आणखी दोन उल्लेखनीय शिष्य होते. एक त्यांच्या द्वितीय पत्नी बाई फडके या होत्या. तो वृत्तांत मागे आलेलाच आहे. आणि त्यांचे दुसरे शिष्य म्हणजे वासुदेव बळवंतांच्या नंतरच्या काळातील, परकीय सरकारविरुद्ध चेतविल्या गेलेल्या 'हिंदी असंतोषाचे जनक' असलेले लोकमान्य बाळ गंगाधर टिळक होत!

तरुणांना आपली शस्त्रविद्या शिकविण्यास वासुदेव बळवंत नेहमी उत्सुक असत. त्यामुळे तरुणांचा तांडा रोज सुप्रभाती आणि कधी कधी रात्रीही त्यांच्याकडून दांडपट्टा, लाठी, तरवार, निशाणवेध, बंदुकीचा नेम इ. शिकण्यास वरील देवळाच्या मागील झाडीत जमत असे. शस्त्रविद्या शिकणाऱ्या या तरुणात लोकमान्य टिळक कित्येक वेळा आलेले आपण स्वतः पाहिलेले आहेत, अशी वासुदेव बळवंतांच्या द्वितीय पत्नीची आठवण होती. [२१]

टिळक त्या वेळी तारुण्यात पाऊल टाकीत होते. शरीर कमाविण्यासाठी आपल्या अभ्यासाचे एक सबंध वर्षच त्यांनी फुकट घालविलेले होते. शरीरबल वाढविण्याची त्यांना आवड असे. शस्त्र हाताळण्याची त्यांना आतुरता असे. पिस्तुल बंदूकच काय, पण पुढे बाँबविषयी त्यांना अशीच आस्था होती. त्या आस्थेतूनच त्यांनी त्याचे एक प्रात्यक्षिक पुण्यास पाहिले आणि गोविंदराव चापट या एका तरुण महाराष्ट्रीय तज्ञाची अरविंद घोषांशी गाठ घालून दिली. स्फोटकांवरील पुस्तकांची नावे असलेले जे एक पत्र त्यांच्या १९०८ मधील अभियोगात गाजले, ते याच तरुण

२१ बाई फडके यांच्या त्यांच्या स्नुषा उमाबाई फडके यांनी पाठविलेल्या त्यांच्याआठवणी. बाई म्हणाल्या, तुमचे हे टिळक ना? हे टिळक आमच्याकडे आलेले मी कित्येकदा पाहिलेले आहेत. तलवार इ.चे हात त्यांना हे शिकवीत असत."

केले होते." १२

टिळकांच्या तरुणपणी क्रांतिकारक आंदोलन असे एकच नि ते म्हणजे वासुदेव बळवंतांचे हें लक्षात घेतलें म्हणजे त्यांनीं तरुण असताना तसले प्रयत्न जे केले ते म्हणजे वासुदेव बळवंताच्या उठावणीतलेच होत. या आठवणीतील वृत्तांतानेही बाईंच्या आठवणीतील वृत्तांत चांगलाच विश्वासार्ह ठरतो.

प्रत्येक गुरुवारी या यंत्रणेतून गुप्तसंस्थेत नव्याने येणाऱ्या घटकांच्या प्रतिज्ञेचा कार्यक्रम होत असे. परंतु असा सर्वात मोठा मुख्य समारंभ होई तो दसऱ्याच्या दिवशी! त्या दिवशी होणाऱ्या समारंभाची स्मृती जागृत होताच त्याचा वृत्तांत सांगताना 'अनामिक' यांच्या डोळ्यांत आनंद ओसंडला. ते म्हणाले, "दसऱ्याच्या दिवशी आमचा शस्त्रपूजनाचा जंगी कार्यक्रम असे. त्यावेळी जमणारा आमचा शस्त्रसंच आठवताच अजूनही मजा वाटते त्या प्रसंगाची. आमच्या त्या शस्त्रसंग्रहात आधुनिक शस्त्रांचा विशेष भरणा नसे. परंतु देशात बनवलेल्या जुन्या पद्धतीच्या, पण उत्तम स्थितीतील शस्त्रांचा भरणाही मोठा प्रेक्षणीय असे.

" त्या समारंभाची जागा रास्ते यांच्या वाड्यात आतल्या दालनात असे. सावधगिरी म्हणून त्या वाड्याच्या बाहेर रस्त्यावर, त्याच्या मुख्य दरवाजाच्या दिंडीवर समारंभ होई. त्या आतल्या दालनाच्या वाटेवर आणि त्या दालनाच्या दारावर अंतरा-अंतरावर आमच्यापैकी काहींची टेहळे म्हणून नेमणूक होत असे. कोणी परका मनुष्य तिकडे वळत आहे असे दिसताच त्यांनी ठरलेली खूण करावयाची असे. आणि ती होताच समारंभस्थानामधील दिसणारी शस्त्रे अदृष्ट करून येणाऱ्या माणसाला दिसू न देण्याची व्यवस्था केलेली असे! त्यावेळी आम्ही फुले वाहून शस्त्रपूजन करीत असू आणि स्वातंत्र्यदेवीची पूजा करीत असू. नंतर प्रार्थना म्हणत असू. त्यानंतर जी भाषणे होत, त्यात बंडखोर वृत्तीचा परिपोष झालेला असे. बऱ्याच वेळी १८५७च्या बंडाविषयीच माहिती सांगण्यात येई. ती ऐकण्यात सर्वांना मजा वाटे.

" वासुदेव बळवंतांच्या या संघटनेत निपुण झालेले त्यांचे सहकारी त्या कलेची कसोटी पाहण्यास अर्थातच उत्सुक होत. 'फर्ग्युसन' टेकडीच्या मध्याला किल्ला कल्पून आपल्या दोन प्रतिस्पर्धी टोळ्या करून चढाईची आणि बचावाच्या लुटुपुटीच्या लढाईची प्रात्यक्षिके आम्ही त्या टेकडीवर करत असू. त्या टेकडीवर किंवा पर्वतीवरील अरण्यात बंदूक घेऊन जाऊन स्वतः वासुदेव बळवंत तरुणांना ती उडविण्यास शिकवत असत." १३

नंतरच्या क्रांतिकारकांनी सैन्यात जाऊन सैनिकी शिक्षण मिळविण्याचे प्रयत्न केले. कारण सैन्यात प्रवेश मिळाला की, बंदुका पिस्तुले हाताळता येतीलच पण

१२ "लोकमान्य टिळक यांच्या आठवणी व आख्यायिका," (संग्रा. स. वि. बापट.) खंड १ ला, पृ. ७४-७५.

१३ "अनामिक" यांच्या आठवणी.

सैन्यात स्वातंत्र्याचा प्रचार करून सैन्यही क्रांतीपक्षास फितवता येईल अशी त्यांना आशा वाटत असे. त्यांची ही आवड प्रथम वासुदेव बळवंतनीच प्रत्यक्षात आणली होती. नंतरच्या क्रांतिकारकांपैकी चापेकरांनी देशी संस्थानाच्या इंग्रजांच्या सैन्यात शिरण्याचाही प्रयत्न केला. ते जमले नाही तेव्हा गोवा सरकार हे निराळे सरकार म्हणून तिकडेही तशी खटपट त्यांनी केली. पण व्यर्थ! [३४] त्यानंतर बंगालचे ज्येष्ठ क्रांतिकारक राशबिहारी बोस आणि अरविंद घोष यांनीही तशीच खटपट केली.[३५] स्वातंत्र्यवीर सावरकरांचे तर सैन्यात आपली माणसे पाठविणे हे ते युरोपात असल्यापासून ध्येय होते. क्रांतिरत्न पिंगळे यांनी इंग्रजांच्या सैन्यपथकातच विद्रोही प्रचार करण्यात यश मिळविले होते. वासुदेव बळवंतांना तशी खटपट करावी लागली नाही. कारण ते नोकरीलाच मुळी 'मिलिटरी फायनान्स' विभागात होते. त्यामुळे त्यांना सैन्यविषयक आणि सैन्य संघटनेतील माहिती आणि त्यांचा लाभ आपोआपच मिळाला. [३६]

त्यांचे विचार प्रत्यक्ष बंड करावयाच्या सर्वांगीण सिद्धतेच्या दिशेने चालत. सैन्यविषयक कार्यालयात असल्यामुळे सैन्यातील कित्येक अधिकाऱ्यांनाही त्यांनी स्वातंत्र्यप्रेमी विचारांनी भारून टाकले होते. [३७] त्याचप्रमाणे सैन्यातील मोठमोठ्या अधिकाऱ्यांशी ओळख करून घेणेही त्यांना शक्य झाले. आणि त्यांच्या मध्यस्थीने त्यांनी आपल्या सहकाऱ्यांपैकी निवडक लोकांना शस्त्रांची माहिती व्हावी अशी व्यवस्था केली. त्याचप्रमाणे सैनिकी तळांना भेटी देऊन ती शस्त्रे वापरली जाताना दाखविण्याची व्यवस्था केली. आळंदी रस्त्यावरच्या 'सॅपर्स आणि मायनर्स' पथकाच्या मुख्य तळाला त्यांनी दिलेली अशी भेट 'अनामिक' यांनी उल्लेखिलेली आहे.

आपल्या कार्यालयातीलही कित्येक अधिकाऱ्यांना त्यांनी स्वातंत्र्यप्रेमी विचारांनी भारून टाकले होते. सरकारी नोकरीतील इतर मर्मस्थानावरील अधिकारीही त्यांच्या व्यक्तिमत्वाच्या जादूने भारले गेले होते. प्रत्यक्ष मेजर डॅनिअलच्या हाताखाली काम करणारे गणपुले नावाचे गृहस्थ आणि वैद्य नावाचे फौजदारही त्यांचे असे अंकित झाले होते. हे वैद्य मागे उल्लेखिलेल्या अप्पाराव वैद्यांचे बंधू होते. पुढे वासुदेव बळवंतांचे 'बंड' गाजू लागल्यावर त्यामुळेच त्यांनी वासुदेव बळवंतांना निसटून जाण्यात एकदा चांगले सहाय्य केले. 'मिलिटरी क्वार्टर मास्टर'च्या कार्या-

---

३४ चापेकरांचे अप्रकाशित आत्मचरित्र (मराठी), पृ ८, ५०, ५५, आणि ५६

३५ हेमंतकुमार सरकार : "रेव्होल्यूशनरीज ऑफ बेंगॉल", पृ. ६१; शिशिरकुमार मित्र : "दि लिबरेटर," पृ. ४६

३६ "मी मिलिटरी फायनान्स ऑफिसात पुष्कळ वर्षे नोकरीस असल्यामुळे दुसऱ्या कुणाहीपेक्षा लष्करी गोष्टींची मला बरीच अधिक माहिती आहे." वासुदेव बळवंतांचे प्रथम वर्ग दंडाधिकारी केसर यांच्यापुढील निवेदन; दि. २२ ऑगस्ट १८७९

३७ वासुदेव म्हणाला की, "सैन्यातील घोडदळात हाताखाली दोनदोनशे लोक असणारे नित्येक रजपूत अधिकारी आपले घनिष्ठ स्नेही आहेत." दंडाधिकारी केसर यांच्यापुढील रागोबा माळीदार रगनाथ मोरेश्वर महाजन याची साक्ष, दि. २३-१०-१८७९.

केले होते." ११

टिळकांच्या तरुणपणी क्रांतिकारक आंदोलन असे एकच नि ते म्हणजे वासुदेव बळवंतांचे हे लक्षात घेतले म्हणजे त्यांनी तरुण असताना तसले प्रयत्न जे केले ते म्हणजे वासुदेव बळवंताच्या उठावणीतलेच होत. या आठवणीतील वृत्तांतानेही बाईंच्या आठवणीतील वृत्तांत चांगलाच विश्वासार्ह ठरतो.

प्रत्येक गुरुवारी या यंत्रणेतून गुप्तसंस्थेत नव्याने येणाऱ्या घटकांच्या प्रतिज्ञेचा कार्यक्रम होत असे. परंतु असा सर्वांत मोठा मुख्य समारंभ होई तो दसऱ्याच्या दिवशी! त्या दिवशी होणाऱ्या समारंभाची स्मृती जागृत होताच त्याचा वृत्तांत सांगताना 'अनामिक' यांच्या डोळ्यांत आनंद ओसंडला. ते म्हणाले, "दसऱ्याच्या दिवशी आमचा शस्त्रपूजनाचा जंगी कार्यक्रम असे. त्यावेळी जमणारा आमचा शस्त्रसंच आठवताच अजूनही मजा वाटते त्या प्रसंगाची. आमच्या त्या शस्त्रसंग्रहात आधुनिक शस्त्रांचा विशेष भरणा नसे. परंतु देशात बनवलेल्या जुन्या पद्धतीच्या, पण उत्तम स्थितीतील शस्त्रांचा भरणाही मोठा प्रेक्षणीय असे.

" त्या समारंभाची जागा रास्ते यांच्या वाड्यात आतल्या दालनात असे. सावधगिरी म्हणून त्या वाड्याच्या बाहेर रस्त्यावर, त्याच्या मुख्य दरवाजाच्या दिंडीवर समारंभ होई. त्या आतल्या दालनाच्या वाटेवर आणि त्या दालनाच्या दारावर अंतरा-अंतरावर आमच्यापैकी काहींची टेहळे म्हणून नेमणूक होत असे. कोणी परका मनुष्य तिकडे वळत आहे असे दिसताच त्यांनी ठरलेली खूण करावयाची असे. आणि ती होताच समारंभस्थानामधील दिसणारी शस्त्रे अदृष्ट करून येणाऱ्या माणसाला दिसू न देण्याची व्यवस्था केलेली असे! त्यावेळी आम्ही फुले वाहून शस्त्रपूजन करीत असू आणि स्वातंत्र्यदेवीची पूजा करीत असू. नंतर प्रार्थना म्हणत असू. त्यानंतर जी भाषणे होत, त्यात बंडखोर वृत्तीचा परिपोष झालेला असे. बऱ्याच वेळी १८५७च्या बंडाविषयीच माहिती सांगण्यात येई. ती ऐकण्यात सर्वांना मजा वाटे.

" वासुदेव बळवंतांच्या या संघटनेत निपुण झालेले त्यांचे सहकारी त्या कलेची कसोटी पाहण्यास अर्थातच उत्सुक होत. 'फर्ग्युसन' टेकडीच्या मध्याला किल्ला कल्पून आपल्या दोन प्रतिस्पर्धी टोळ्या करून चढाईची आणि बचावाच्या लुटुपुटीच्या लढाईची प्रात्यक्षिके आम्ही त्या टेकडीवर करत असू. त्या टेकडीवर किंवा पर्वतीवरील अरण्यात बंदूक घेऊन जाऊन स्वतः वासुदेव बळवंत तरुणांना ती उडविण्यास शिकवत असत." ११

सैन्यात स्वातंत्र्याचा प्रचार करून सैन्यही क्रांतीपक्षास फितवता येईल अशी त्यांना आशा वाटत असे. त्यांची ही आवड प्रथम वासुदेव बळवंतनीच प्रत्यक्षात आणली होती. नंतरच्या क्रांतिकारकांपैकी चापेकरांनी देशी संस्थानाच्या इंग्रजांच्या सैन्यात शिरण्याचाही प्रयत्न केला. ते जमले नाही तेव्हा गोवा सरकार हे निराळे सरकार म्हणून तिकडेही तशी खटपट त्यांनी केली. पण व्यर्थ! "त्यानंतर बंगालचे ज्येष्ठ क्रांतिकारक रासबिहारी बोस आणि अरविंद घोष यांनीही तशीच खटपट केली." स्वातंत्र्यवीर सावरकरांचे तर सैन्यात आपली माणसे पाठविणे हे ते युरोपात असल्यापासून ध्येय होते. क्रांतिरत्न पिंगळे यांनी इंग्रजांच्या सैन्यपथकातच विद्रोही प्रचार करण्यात यश मिळविले होते. वासुदेव बळवंतांना तशी खटपट करावी लागली नाही. कारण ते नोकरीलाच मुळी 'मिलिटरी फायनान्स' विभागात होते. त्यामुळे त्यांना सैन्यविषयक आणि सैन्य संघटनेतील माहिती आणि त्यांचा लाभ आपोआपच मिळाला."

त्यांचे विचार प्रत्यक्ष बंड करावयाच्या सर्वांगीण सिद्धतेच्या दिशेने चालत. सैन्यविषयक कार्यालयात असल्यामुळे सैन्यातील कित्येक अधिकाऱ्यांनाही त्यांनी स्वातंत्र्यप्रेमी विचारांनी भारून टाकले होते. "त्याचप्रमाणे सैन्यातील मोठमोठ्या अधिकाऱ्यांशी ओळख करून घेणेही त्यांना शक्य झाले. आणि त्यांच्या मध्यस्थीने त्यांनी आपल्या सहकाऱ्यांपैकी निवडक लोकांना शस्त्रांची माहिती व्हावी अशी व्यवस्था केली. त्याचप्रमाणे सैनिकी तळांना भेटी देऊन ती शस्त्रे वापरली जाताना दाखविण्याची व्यवस्था केली. आळंदी रस्त्यावरच्या 'सॅपर्स आणि मायनर्स' पथकाच्या मुख्य तळाला त्यांनी दिलेली अशी भेट 'अनामिक' यांनी उल्लेखिलेली आहे.

आपल्या कार्यालयातीलही कित्येक अधिकाऱ्यांना त्यांनी स्वातंत्र्यप्रेमी विचारांनी भारून टाकले होते. सरकारी नोकरीतील इतर मर्मस्थानांवरील अधिकारीही त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या जादूने भारले गेले होते. प्रत्यक्ष मेजर डॅनिअलच्या हाताखाली काम करणारे गणपुले नावाचे गृहस्थ आणि वैद्य नावाचे फौजदारही त्यांचे असे अंकित झाले होते. हे वैद्य मागे उल्लेखिलेल्या अण्णाराव वैद्यांचे बंधू होते. पुढे वासुदेव बळवंतांचे 'बंड' गाजू लागल्यावर त्यामुळेच त्यांनी वासुदेव बळवंतांना निसटून जाण्यात एकदा चांगले सहाय्य केले. 'मिलिटरी क्वार्टर मास्टर'च्या कार्या-

लयातील सहस्त्रबुद्धे याना आपल्या मतप्रणालीकडे वळविण्यात वासुदेव बळवंतांनी यश मिळविले होतें. पुढे बंड फसल्यावर त्यांच्या अशा सहकाऱ्यानी नोकरीतच आपलं अंतरंग गुप्त ठेवून काळ काढला. गणपतराव साठे हे पुण्याच्या जिल्हाधिकाऱ्याच्या कार्यालयातील लेखनिक वासुदेव बळवंतांकडे क्रांतिकार्यामध्ये येत!

आपल्या उठावणीच्या टापूंतील टेंकड्यांची, गावांची, तलावांची, नद्यांची, किल्ल्यांची आणि गुहांची त्यांनी खडान् खडा माहिती मिळविली होती आणि ते स्थलनिर्देश आणि जिल्ह्यांचे रस्ते दाखविणारे सविस्तर आलेख्य त्यानी आपल्या संग्रही ठेविले होते.

नरसोबाच्या देवळातील आणि पुढे थट्टीवाल्यांच्या वाड्यातील त्यांच्या निवासस्थानाला एखाद्या योद्धयाच्या मुख्य ठाण्याचे स्वरूप येऊ.लागले. शिवाजी महाराज हे त्यांचे स्फूर्तिस्थान होते. त्यांच्या चित्राची चौकट वासुदेव बळवंतांच्या खोलीत असे. शिवाजीप्रमाणेच बंड करून आपण आपला देश स्वतंत्र केला पाहिजे असे त्यानी ठरविले होते. त्यांच्या खोलीच्या भिंतीवर वरील आलेख्य आणि कित्येक शस्त्रे झळकत असत. [३८] त्यांच्याकडे पाहात आपल्या भावी युद्धयोजनाचे विवेचन ते आपल्या सहकाऱ्यांजवळ करीत. 'बंडा'च्या या योजनाची त्यांची चर्चा कित्येकदा अंधार पडेपर्यंत किंवा रात्रीही चाले.

त्या काळात राष्ट्रीय विचारांच्या तरुणांच्या आवडीचे असलेले आणि इंग्रजीत आणि मराठीत निघणारे पुण्याचे वृत्तपत्र 'पूना हेरल्ड' वासुदेव बळवत घेत. 'ज्ञानचक्षू' नावाचे पत्रही त्याच्याकडे येई. याच पत्राचे अंक पुढे ते अज्ञातवासात असताना नेहमी त्यांच्याकडे येत आणि आपल्या अनुपस्थितीतील पुण्याची वार्ता त्याना समजे. वरील क्रांतिमंडळात या पत्राचे अंक नेहमी वाचले जात. अशावेळी इंग्रज सरकारविरुद्ध बंड करण्याचा आपला निश्चय वासुदेव बळवंत या सहकाऱ्यांना उघड उघड सागत आणि पुढे पुढे तर आपला हा सकेत त्यांनी गुप्त ठेवावा अशीही चेतावणी ते त्यांना देत नसत. [३९]

१८७८ च्या शेवटी या मार्गातील यशाविषयीचा त्यांचा आत्मविश्वास दुर्दम्य झाला. त्यावेळी सशस्त्र बंडाच्या श्रेयस्करतेविषयी त्यांचा काही लोकांशी वाद-विवाद झाला, तेव्हा त्यांना एकाने प्रश्न केला, "पण हे सर्व व्हावं कसं?" तेव्हा

---

३८ ("वासुदेव बळवंताच्या) घरात बंदूक, तलवार, एक पिस्तुल, दोन दांडपट्टे आणि एक उत्तम कट्यार मी पाहिली होती." गणेश काशिनाथ कुटे याची पहिला वर्ग दंडाधिकारी मेसर याच्या पुढील साक्ष; दि. २२ आक्टोबर १८७९.

३९ "वासुदेवाने मला एकदा सांगितले की, मी इंग्रज सरकारविरुद्ध बंड करणार आहे आणि त्याने ही गोष्ट तू गुप्त ठेव असेही मला सांगितले नाही." धामारी लुटीच्या अभियोगातील गोविंद महादेव करमरकर यांची पुण्याच्या सत्र न्यायालयातील साक्ष; दि. २१ एप्रिल १८७९.

आपल्या सिद्धतेच्या आनंदात ते त्याना म्हणाले, "मूर्खांनो! तुम्हाला मी ते करूनच दाखवीन. आपली गाऱ्हाणी आणि आपल्या आपत्ती एका क्षणात कशा नष्ट करून टाकायच्या ते मी तुम्हाला प्रत्यक्ष दाखवूनच देईन!" [४०]

४० वासुदेव बळवंताच्या एका परिचिताने पाठविलेला हा वृत्तात त्यांच्या बंडाच्या काळात 'टाइम्स ऑफ इंडिया'ने आपल्या अग्रलेखातच प्रसिद्ध केला होता.

## प्रकरण ८ वे

# रामोश्यांशी संधान

वैध मार्गाच्या आंदोलनाने जनताजागृती करून इंग्रज सरकारला हिंदुस्थानातून हाकलून लावता येणार नाही, तर सशस्त्र बंड करूनच इंग्रज सरकार उलथून पाडावे लागेल, या निश्चितीप्रमाणे पांढरपेशा लोकांकडून त्या कार्यात आपल्याला पुरेसे सहाय्य मिळणार नाही, अशीही निश्चिती झाल्यामुळे वासुदेव बळवंतांनी त्या लोकांचा नाद सोडला आणि ते खेड्यापाड्यातील अशिक्षित जनतेकडे वळले. हे लोक अशिक्षित असले तरी स्वामिनिष्ठ राहातील म्हणून त्यांनाच त्यांनी हाताशी धरण्याचे ठरविले. पुणे आणि सातारा जिल्ह्यांतील आडदांड, बेडर, पण मृत्यू आला तरीही स्वामिनिष्ठ राहण्याऱ्या रामोशी लोकांचा त्यांच्यात विशेष भरणा होता.

हे रामोशी आपणास रामवंशी म्हणविण्यात गर्व बाळगीत आणि त्यांची संख्या वरील जिल्ह्यात सहस्रावधीनी पसरलेली होती. आपल्या प्राणापेक्षाही आपल्या शब्दाला ते जागत. ज्याचे मीठ खाल्ले त्याच्याशी कधीच द्रोह करावयाचा नाही आणि खाल्ल्या मिठाला जागावयाचे हा त्यांचा बाणा प्रसिद्ध असे. वासुदेव बळवंतांनी त्यांच्या या बाण्याचा राष्ट्रकार्यात उपयोग करून घेण्याचे ठरविले. त्यांचे निकटचे विश्वासू प्रतिनिधी या लोकामध्ये फिरू लागले. वासुदेव बळवंतांनी त्यांच्याशी संबंध प्रस्थापिले आणि त्याना शपथा देऊन त्यांचा मानाचा शब्द घेऊन आपल्या कार्याशी त्याना एकरूप करून टाकले. वासुदेव बळवंतानी वरील प्रदेशांतील आणि खानदेश, आणि नाशिक जिल्ह्यातील आणि वऱ्हाडपर्यंतच्या प्रदेशातीलही कोळी, भिल्ल आणि धनगर जमातीच्या लोकांना तसेच शपथबद्ध करून टाकले.

रामोशी लोकांचे काळ्याकुट्ट वर्णाचे देह अरण्यातील जीवनक्रमामुळे काटक आणि बलवान बनलेले असत. त्यांची झोपडीवजा आणि गुहांमधील निवासस्थाने ही मनुष्याच्या अत्यंत साध्या जीवनाची प्रतीके होती. मराठा सत्तेखाली त्यांच्या शरीरसामर्थ्यास साजेसे गडरक्षणाचे काम त्यांच्याकडे असे. परंतु स्वराज्य जाऊन इंग्रजांचे राज्य आल्यावर त्यांची ही अधिकारस्थाने नष्ट झाली. तेव्हापासून श्रीमंत

लोकांच्या मिळकती आणि मत्ता रासण्याचे त्यांच्या नशिबी आले. किल्लेदारीचा हक्क आणि किल्लेदारीची मिळकत नष्ट झाल्यामुळे इंग्रज सरकारविरुद्ध त्यांच्यात असंतोष धुमसत होताच. परंतु तो त्यांचा असंतोष त्यांचा दुसरा पोटधंदा गेल्यामुळे आणखीच भडकून उठला. फावल्या वेळात अरण्यात लाकडे तोडून ती विकण्याचा आणि अरण्यातच आपली गुरे फुकट चारण्याचा त्यांचा शिरस्ता असे. परंतु नवीन अरण्यनिर्बंधाप्रमाणे (फॉरेस्ट लॉज) सरकारी अनुज्ञेवाचून त्यांना अशी लाकडे तोडण्याची आणि गुरे फुकट चारण्याची चोरी झाली आणि त्यांचे हे उपजीविकेचे साधनही नष्ट झाले. त्यामुळे त्यांना जीवन जगणे अशक्य झाले. पुढे दक्षिणेतील सावकारविरोधी दंग्यात त्यांच्यापैकी कित्येकांना संशयावरून पकडण्यात आले, त्यांना कोठड्यात डांबण्यात आले आणि चोऱ्या, लूटी आणि मारामाऱ्या यांच्यासंबंधांत माहिती काढण्यासाठी त्यांचा छळ करण्यात आला. त्यामुळे हे लोक सरकारवर पराकाष्ठेचे संतप्त झाले होते. दंग्याच्या काळात पोलिसांना प्रत्यही उपस्थिती कळविण्याचे निर्बंध त्यांच्यावर लादले गेले आणि नंतरच्या भीषण दुष्काळात उपासमारीने त्यांच्यापैकी कित्येकजण मृत्यूही पावले. इंग्रजसरकारविरुद्धचा या सर्व संतापाचा दाह त्यांच्या अंतःकरणात खदखदत होता.

आणि अशा जळफळणाऱ्या आणि धुमसत्या मनांच्या लोकसमूहात १८७७ मध्ये वासुदेव बळवंत एखाद्या ज्वालामुखीच्या स्वेपाने जाऊन उभे राहिले. त्यांच्या म्होरक्यास त्यांनी पागोटी बांधली. त्यांना दारूसाठी पैसे दिले. त्यांना जेवणेही घातली. आणि आपल्या सांगण्याप्रमाणे वागण्याची वचने त्यांच्याकडून विधिपूर्वक घेतली. नगरात रहाणारा एक सुसंस्कृत उच्चवर्णीय पुरुष आपल्यात इतक्या मनमोकळेपणाने मिसळतो आणि आपणास सन्मानाने वागवतो हा त्यांना नवा अनुभव होता. आणि तो पहाताच रामोश्यांच्या मनात वासुदेव बळवंताविषयी पहिल्यापहिल्या भेटीतच आपुलकी निर्माण झाली. त्यांनी केलेल्या आस्थेच्या विचारपुसीमुळे आणि धीराच्या शब्दांमुळे ते त्यांना आपले उद्धारकर्ते मानू लागले. वासुदेव बळवंत त्यांना आपल्या योजना सांगत. त्यांची मने आणखी भडकावी अशी भाषणे करीत. आपले राज्य जाऊन इंग्रजांचे राज्य आल्यामुळेच तुम्हाला असे वाईट दिवस आले आहेत आणि तुम्हाला चांगले दिवस हवे असतील तर हे इंग्रजांचे राज्यच आपण उलथून पाडले पाहिजे असे ते त्यांना सांगत. ते त्यांच्याच भाषेत त्यांच्याशी बोलत. त्या भाषेत त्यांनी आपल्या दुःस्थितीविषयी केलेल्या प्रांजळ विवेचनामुळे प्रमुख रामोश्यांची मने ब्रिटिश सरकारविरुद्ध पेटली आणि ते सांगतील ते करण्यासाठी त्यांच्यामागोमाग जाण्यास सिद्ध झाली !

वासुदेव बळवंत हे सारे उद्योग करीत होते; पण ते अगदी गुप्तपणे करीत होते. त्यांच्या या उद्योगांची बाहेरच्या कोणालाच माहिती नसे. कुटुंबातील कोणालाही

त्याची वार्ता नसे. शनिवारी कार्यालयातून आल्यावर ते पुण्याबाहेर जात असत; रविवारी किंवा सुटीच्या दिवशी ते तेथे वरील कार्य करीत आणि सायंकाळी किंवा कामाच्या दिवशी सकाळी पुन्हा पुण्यास परत येऊन कामावर उपस्थित होत. सरकारी नोकरीत राहूनही सरकारविरोधी उठावणीच्या कारवाया गुप्तपणे करावयाच्या या भारतीय क्रांतिकारकांच्या परंपरेचे ते अध्वर्यु होते. हाच चमत्कार पुढे अनेक क्रांतिकारकांनी केला. दिल्ली कटाचे नेते रासबिहारी बोस पुढे 'गदर बंडा'चे नेते झाले. ते डेहराडूनच्या वनसंशोधन संस्थेमध्ये (फॉरेस्ट रिसर्च इन्स्टिट्यूट) मुख्य लेखनिक होते. पण त्या नोकरीत असतानाच त्यांनी सारी 'बंडा'ची कारस्थाने केली.[१] याच गुप्ततेमुळे वासुदेव बळवंतांच्या कार्यालयातील अधिकाऱ्यांनाही त्यांच्या 'बंडा' च्या हालचालीचा सुगावा लागला नाही. सरकारच्या पक्षपात्यांना त्याचे जेवढे आश्चर्य वाटले तेवढाच त्वेषही वाटला. आणि ते उद्गारले,

"We cannot exonerate the officers of the (Military Finance) Department from all blame for having permitted him (Wasudeo Balwant Phadkey) to hatch his evil machinations while working at their very elbow."[२]

(" तो आपल्या अगदी निकट काम करत असतानाही वासुदेव बळवत फडके याला आपली वाईट कारस्थाने रचू देण्याविषयीच्या दायित्वातून 'मिलिटरी फायनान्स' खात्याच्या अधिकाऱ्यांना सर्वस्वी निर्दोष म्हणून आम्ही मुक्त करू शकत नाही. ")

पुढे त्यांच्या गुप्त संघटनेची आणि बंडाची खरी माहिती कळल्यावर प्रत्यक्ष मुंबईचे राज्यपाल सर रिचर्ड टेंपल हेही या त्यांच्या गुप्ततेच्या कौशल्याने चक्रावून गेले आणि म्हणाले :

"Lastly, did Wasudeo Bulwant make any open preparations? No. He engaged men in the most secret way. The fact of his doing so at all, undiscovered by the police is not creditable to their vigilance and observation."[३]

( " शेवटी, वासुदेव बळवंतांनी उघडपणे (बंडाची) काही सिद्धता केली काय? नाही. त्याने अत्यंत गुप्त पद्धतीने माणसे नोकरीस ठेवली. पण त्याने हे पोलिसांना मुळीच न समजता केले, हेच मुळी पोलिसांच्या दक्षतेला आणि टेहेळणीला भूषणावह नाही. "

आपल्या याच भ्रमंतीत वासुदेव बळवंतांनी पुण्याजवळचे गड, पर्वत आणि दऱ्या पाहण्यास प्रारंभ केला. आणि त्यांच्या सान्निध्यात त्यांच्या मनात निराळीच

१ सेडिशन कमिटी 1918 "रिपोर्ट", पृ. १४८
२ "डेक्कन हेरल्ड," दि. ५ मे १८७९
३ सर रिचर्ड टेंपल यांचे राजप्रतिनिधी लॉर्ड लिटन यांना पत्र (गोपनीय), ३ जुलै १८७९

आंदोलने उठू लागली. चाणाक्ष आणि पराक्रमी पुरुषाच्या मनाची त्या प्रदेशाच्या सान्निध्यात तशीच स्थिती होणे सहाजिक होते. वासुदेव बळवंतांच्या 'बंडा'च्या काळात मुंबईचे राज्यपाल असलेले सर रिचर्ड टेंपल हें म्हणतात,

"And there are few parts of India, more worthy of the attention of politicians than the Deccan. I was careful to inspect the Western Ghat mountains, which form the backbone of that region. Anyone who tries "rerum cognoscere causas" will perceive that it was the existence of these mountains which enabled the Mahrattas to overthrow the Mogul empire. The lairs retreats and strongholds in this mountain range, sustained Mahratta resistence and baffled the armaments of the Afghan horse or the artillery of the great Mogul."[४]

("दख्खन सोडले तर हिंदुस्थानाचे दुसरे असे थोडेंच प्रदेश आहेत की राजकारणी लोकांनी ज्यांच्याकडे विशेष लक्ष द्यावे. त्या प्रदेशाचा जणू कणाच असलेल्या पश्चिम घाटाचे मी दक्षतेने निरीक्षण केले. जो कोणी यांचे कारण शोधण्याचा प्रयत्न करील त्याला दिसून येईल की, याच पर्वतांच्या अस्तित्वामुळे मोगलांचे साम्राज्य उलथून पाडणे मराठ्यांना शक्य झाले. या पर्वताच्या रांगेतील डोंगराचे स्तर, आश्रयाची ठिकाणे आणि गड यानीच मराठ्यांच्या प्रतिकाराला आधार दिला आणि अफगाण घोडदळाची किंवा बलिष्ठ मोगलाच्या तोफखान्याची मती गुंग करून टाकली.") सर रिचर्ड टेंपल पुढे म्हणतात.

"With the history book in my hand, I used to scan the old fortress lifting its head among the surrounding peaks, camber up its steep sides, mount the jagged and broken steps to the postern, admire the traprock precipices, and the ledges on giddy heights, mark the defences skillfully constructed for the warfare of that age, note the glories of the landscape prospect and observe how carefully the position would command the valleys lying below or the passes by which we had come."[५]

("इतिहासाचे पुस्तक हातात घेऊन सभोवतालच्या पर्वतशिखरामधून डोकावणाऱ्या त्या प्राचीन गडाचे मी निरीक्षण करीत असे. तुटलेल्या कड्याच्या बाजूवर धडपडत जात असे. मागील बाजूच्या चोरवाटांकडे जाणाऱ्या खडकाळ आणि फुटक्या पायऱ्या चढून जात असे. दृष्टी फिरवून टाकणाऱ्या उंच डोंगरावरच्या चिंचोळ्या

४ सर रिचर्ड टेंपल : "मेन अँड इव्हेंटस ऑफ माय टाइम इन इंडिया," पृ.४७१

५ कित्ता, पृ. ४७१

पाऊल वाटेंची आणि डोंगरी दगडांच्या सुळक्यांची प्रशंसापूर्ण मनानें पाहणी करीत असे. त्या काळातल्या युद्धासाठी कौशल्यानें बांधलेली संरक्षकस्थानेंच लक्षपूर्वक पाहत असे. तेथील नयनरम्य देखाव्याची मौज अनुभवीत असे आणि आम्ही ज्या खिंडींतून आलो त्या किंवा खाली असणाऱ्या खिंडींवर ही स्थळे किती दक्षतापूर्ण स्वामित्व गाजवू शकली असती ते पाहत असे.")

एका इंग्रजावर त्या प्रदेशाची अशी प्रतिक्रिया झाली तर वासुदेव बळवंतां-सारख्या मराठ्यावर त्याची दुसरी काय प्रतिक्रिया होणार? मागे एकदा परकीय मोंगल सत्ता उलटून पाडण्यास आम्हां सहाय्य केले आहे! आमचा तोच उपयोग पुन्हा करून घेण्याची महाराष्ट्रात कोणाची इच्छा आहे काय? असे प्रश्न तेथे त्यांच्या कानावर आदळू लागले. त्यामुळे इंग्रजांविरुद्ध युद्ध करावयाचे ते गनिमी काव्यानेच लढले पाहिजे आणि या प्रदेशाचाच त्या युद्धकलेत फार उपयोग होईल, असे त्यांच्या प्रत्ययास आले. त्यांनी त्याच प्रदेशात तसे सशस्त्र बंड पुकारण्याचे ठरविले. वासुदेव बळवंतांची ही बंडाची तत्वप्रणाली मराठ्यांमध्ये परंपरेने वसत आली आहे हे त्या भोवतालचा वरील नैसर्गिक प्रदेश पाहता साहजिकच होते. मराठ्यांची स्वातंत्र्य-प्रीती आणि बडखोर प्रवृत्ती यांचा नीट परिचय असलेल्या इंग्रज राज्यकर्त्यांनीही त्याची हीच कारणपरंपरा लावलेली आहे सर रिचर्ड टेंपल यांनी हेच सत्य ओळखून म्हटले आहे:

"If it be true that national character is formed partly by physical surroundings, climate and scenery, partly also by historical associations — then any one who sees the Deccan and reads its history will not have far to go in order to discover the reasons why the political tendencies there demand vigilance on the part of the British Government." [६]

("भोवतालच्या नैसर्गिक प्रदेशामुळे काही अंशाने राष्ट्रीय प्रवृत्ती घडविली जात असेल, काही अंशाने जर ती ऐतिहासिक परंपरांनीही घडविली जात असेल, तर दख्खनचा प्रदेश जो पाहील आणि त्याचा इतिहास जो वाचील, त्याला तेथील राजकीय प्रवृत्तीकडे ब्रिटिश सरकारचे सूक्ष्म लक्ष असणे का आवश्यक आहे ते शोधून काढण्यासाठी फार लांब जावयाला नको.")

वासुदेव बळवंतांच्या उठावणीची भरारी आणि स्वरूप न्यायालयात बाहेर आलेल्या माहितीवरूनच केवळ पाहता वाटतात, तेवढी किरकोळ आणि साधी नव्हती. त्यासाठी त्यांनी फार भव्य प्रमाणात खटपट केलेली होती आणि झेप घेतलेली होती.

६ सर रिचर्ड टेंपल : "मेन अँड इव्हेंट्स ऑफ माय टाइम इन इंडिया" पृ. ४६१

त्यासाठी याच संधीला त्यांनी कार्यालयातून तीन महिन्यांची लांब सुटी घेतली[७] आणि सबंध दख्खनभर दौरा केला. दख्खनबाहेरही बऱ्याच नगराना आणि संस्थानाना भेटी दिल्या. याच दौऱ्यात आपल्या उठावणीत त्यानी साहाय्य द्यावे म्हणून ते दख्खनमधील आणि बाहेरच्या सर्व हिंदी संस्थानिकांना भेटले होते.[८] पण त्या काळात कोणत्याही क्षुल्लक सरकारविद्रोही कृत्याकडेही ब्रि. सरकार मुळीच काणा डोळा करीत नसे. मग त्यांच्या अंकित असलेल्या हिंदी संस्थानिकांच्या अशा कृत्यांची तर गोष्टच सोडा. तेव्हा वरील हिंदी संस्थानिकांना वासुदेव बळवंतांना तसे साहाय्य करण्याचे धैर्य कोठचे येणार? त्यांच्यापैकी मनातून इंग्रज सरकारविरुद्ध जळफळणाऱ्या आणि बंडखोर वृत्तीच्या काही संस्थानिकांना वासुदेव बळवंतांच्या ध्येयाविषयी सहानुभूती होती, हे शक्य आहे. पण आपली गादी आणि जीवित धोक्यात आणील अशी कोणतीही गोष्ट ते करणे शक्य नव्हते. त्यामुळे, त्यानी तुमचा प्रयत्न यशस्वी होण्याची चिन्हे दिसली तर तुम्हाला आम्ही साहाय्य देऊ अशी वचने देऊन वासुदेव बळवंतांना परत पाठविले असेल. तरीही या हिंदी संस्थानांशी वासुदेव बळवंतांनी जे संबंध जोडले त्यावरून, त्यांच्या योजना बाहेरच्या जगाला माहीत झाल्या त्यापेक्षा अधिक खोल होत्या हे मात्र दिसून येते.

त्याच संधीस वासुदेव बळवंत नरसोबाचे देऊळ सोडून थट्टीवाल्यांच्या वाड्यात राहाण्यास गेले. आपल्या उद्योगात त्यांचे बरेचसे पैसे आता व्यतीत होऊ लागले. त्यामुळे त्यांची कुटुंबियांसंबंधात केविलवाणी स्थिती झाली. बाईंना तर दागदागिने करण्याचे सोडाच. पण त्यांच्याकडे जे दोन धाकटे भाऊ शिक्षणासाठी होते त्यानाही ते आता आपल्याजवळ ठेवून घेऊ शकले नाहीत. आणि म्हणून त्यांनी त्यांना घरी परत पाठवून दिले. त्यांच्या पाठीवरचे त्यांचे धाकटे बंधू कृष्णाजी बळवंत मुंबईला होते. पण त्यांच्याशी होणारा त्यांचा पत्रव्यवहार जवळ जवळ बंद झाला आणि वडिलानाही काहीही पैसे ते पाठवू शकत नाहीसे झाले. त्यांच्या इतर उलाढालीचांही बळवंतरावदादांना काहीतरी सुगावा लागला होता. परिणामी दादांशी

---

७ वासुदेव बळवंतांच्या सेवा पुस्तकात त्यानी ९ डिसेंबर १८७७ ते १० मार्च १८७८ पर्यंत वैयक्तिक कारणावरून सुटी घेतल्यामुळे ते कामावर अनुपस्थित होते अशी नोंद होती. जे. डी. व्हॉल्यूम 58-59 (1879-80) मुंबई सरकारचे कागदपत्र.

८ " वासुदेव म्हणाला की, आपण इंदूरला गेलो होतो, हिज हायनेस महाराज होळकर यांनाही भेटलो आणि त्यांच्याजवळ आपण सहाय्य मागितले, पण महाराज होळकरानी साहाय्य करण्याचे नाकारले 'राणीचा साक्षीदार' रंगोपंत मोरेश्वर महाजन याची पुण्याचे पहिला वर्ग दंडाधिकारी केसर याच्यापुढील साक्ष, दि, २३ ऑक्टोबर १८७९. अटकेनंतर निजामच्या अधिकाऱ्यांना दिलेल्या निवेदनात महाजनने या भेटीविषयी आणखी म्हटले आहे की, "इंग्रज सरकार फार प्रबळ आहे. असे सांगून (इंदूरच्या) महाराजांनी मदत देण्याचे नाकारले," सेतु माधवराव पगडी : "हैद्राबादेतील स्वातंत्र्याच्या चळवळीचा इतिहास," पृ. १०७

त्यांचे संबंध दुरावले. ९ त्यामुळे त्यांच्या हृदयाला बऱ्याच वेदना होऊ लागल्या आणि ते उद्गारले, *"यालाच कुटुंबवैरी म्हणतात. मी जगून त्यास काहीच उपयोग नाही!"* [१०]

पुष्कळ सिद्धता झाली तरी आपल्या चळवळीस भगवंताचे अधिष्ठान मिळविण्याची वासुदेव बळवंतांची मनीषा नष्ट झाली नाही. त्यासाठी त्यांनी त्यावेळी बऱ्याच संत पुरुषांच्या भेटी घेतल्या. याच संधीस ते पुन्हा एकदा तलवार घेऊन श्री अक्कलकोट स्वामी महाराजांच्या दर्शनास गेले. "महाराजांपुढे तरवार ठेवून, चरणी वंदन करून दूर जाऊन बसले. त्यांचा हेतू असा होता की, महाराजांनी स्वहस्ताने आपणास तरवार द्यावी व मग ती वरदा तरवार घेऊन अजिक्य व्हावे." पुढे काय घडले ते सांगताना स्वामी महाराजांचे चरित्रकार म्हणतात, "परंतु सर्व शक्तिमान श्रीस्वामी समर्थ असे भलतेच करण्यास आज्ञा कोठून देणार ? (त्यांनी) फडके यांचे हातात तरवार न देता जवळ असलेल्या एका सेवेकऱ्यास हाक मारून, त्याचे हातात तरवार देऊन, जवळच एक तरटीचे झाड होते त्यावर नेऊन ठेवण्यास सांगितले. त्याप्रमाणे त्यांनी केले. फडके पुष्कळ वेळ बसले. पण महाराजांनी त्यांचे हातात तरवार मुळीच दिली नाही. मग वासुदेवराव निराश होऊन तरटीचे झाडावरील तरवार घेऊन पुण्यास निघून गेले." [११] वासुदेव बळवंत आपल्या कार्यास सत्पुरुषांचे असे आशीर्वाद मागण्यास गेले हे त्या काळातील श्रद्धा निष्ठेला आणि त्यांच्या अध्यात्मिक वृत्तीला साजेसेच होते.

पण अक्कलकोट स्वामी महाराजांना भेटून वासुदेव बळवंत थांबले नाहीत. याचवेळी त्यांनी श्रीनृसिंह सरस्वती श्रीमाणिक प्रभु आणि श्री काळबोवा यांचीही त्या हेतूनेच 'दर्शने' घेतली. त्या महापुरुषांवरही वासुदेव बळवंतांच्या ज्वलंत जनताहितैशी व्यक्तिमत्वाचा प्रभाव पडलेला होता. त्यामुळे त्यांनीही त्यांना अगत्यपूर्वक वागविले. श्री काळबोवांच्या दर्शनास ते गेले असता काळबोवांनी त्यांचा हात हातात घेतला. त्यांचे उद्दिष्ट चांगले आहे हेही मान्य केले. पण हट्टास पेटून असे करणे म्हणजे भिंतीवर डोके आपटण्यासारखे असून फुकट मरावे लागेल अशी शक्यता सूचित केली. [१२] परंतु स्वातंत्र्यलालसेने बेहोष झालेल्या क्रांतिकारकाना असा स्थितप्रज्ञाचा समादेश रुचला असता तर ते साधूच झाले असते; राज्यक्रांतिकारक नव्हे.

श्री गोंदवलेकर महाराज तर वासुदेव बळवंताचे समवयस्कच. तेव्हा त्यांच्याही शुभेच्छा मिळविण्यासाठी ते गोंदवल्यास गेले. ते तेथे पोचले तेव्हा संध्याकाळ

९ वासुदेव बळवंतांचे 'आत्मचरित्र'
१० किता
११ ग. ब. मुळेकर "श्री अक्कलकोट स्वामी महाराज यांचे चरित्र" पृ. ७५
१२ प्रा. के. वि. बेलसरे : "श्री गोंदवलेकर महाराज यांचे चरित्र आणि वाङ्मय" पृ. ८१

झाली होती. महाराज त्यावेळी शेतात काही मंडळींसमवेत होते. त्यामुळे तेथे वर-वरचे बोलणे होऊन श्रीमहाराज मग त्यांना घरी घेऊन गेले. सर्वांची निजानीज झाल्यावर झालेल्या बोलण्यात वासुदेव बळवंतांनी आपल्या बंडाचा निश्चय महा-राजांना सांगितला. महाराजांना वासुदेव बळवंतांविषयी प्रेम आणि आपुलकी होती. रात्रभर त्यांनी त्यांना बंडाच्या मार्गापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला पण व्यर्थ. दुसऱ्या दिवशीही महाराजांनी त्यांना सांगितले की, "सध्याचा काळ अनुकूल नाही. आपली शक्ती फुकट दवडू नका. भगवंतांची उपासना करीत राहा... अनुकूल काल येण्यास जरा अवकाश आहे." पण केवळ अशा गूढ मार्गाने स्वातंत्र्य मिळेल असे प्रयत्नवादी कृतिशील क्रांतिकारकांना पटणे शक्य नसते. आणि नुसत्या साधुपुरुषांच्या अशा मार्गांनी हिंदुस्थानचे स्वातंत्र्य जवळ आले असा प्रत्यय पुढेही सत्तर वर्षांच्या त्याच्या स्वातंत्र्यलढ्यात आला नाही. त्यामुळे वासुदेव बळवंतांची अशी प्रतिक्रिया योग्य होती हेही सिद्ध होते ! महाराजांचा हा समादेश ऐकून वासुदेव बळवंत उद्गारले, "अहा रे साधू ! " त्यांनी महाराजांच्या तोंडापुढे हात ओवाळले आणि ते तडक पुण्याला निघून गेले." असे झाले तरी स्वातंत्र्यासाठी प्राण पणास लावणाऱ्या वासुदेव बळवंतांसारख्या ज्वलंत क्रांतिकारकाच्या व्यक्ति-मत्त्वात असे तेज असते की, मी मी म्हणणाऱ्यांवरही त्यांची तशीच छाप पडते. त्यामुळेच वासुदेव बळवंतांचे बंड फसल्यावर त्यांना अटक झाली, हे कळताच महाराजांना फार वाईट वाटले आणि ते कळवळून उद्गारले, "अरे, रे ! आपल्या-पैकी चांगल्या माणसाचा घात झाला. भगवंताने यापुढे त्यांचे फार हाल करू नयेत !" [१३]

संतपुरुषांचा असा जरी अनुभव आला तरी भगवंतांच्या अधिष्ठानाच्या प्राप्तीसाठी त्याच निष्ठेने हाती घेतलेले एक कार्य वासुदेव बळवंतांनी पुरे करीत आलेले. ते म्हणजे मागे उल्लेखिलेल्या "दत्तमाहात्म्य" ग्रंथाची हस्तलिखित प्रत होय. त्यांच्या स्वतःच्या हस्ताक्षरातील फडक्यांच्या घराण्यात असलेला हा ग्रंथ या पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तीच्या वेळी अज्ञात राहिला होता. वासुदेव बळवंतांचे मराठी सलग हस्ताक्षरही मला मिळाले नाही. त्यांच्या "दत्तलहरी" या प्रकाशना-वरील मोडी स्वाक्षरीवरच त्या गोष्टीत मला समाधान मानावे लागले. त्यामुळेच हा हस्तलिखित ग्रंथ येताच एखादा मौल्यवान ठेवा हाती आल्याचा आनंद मला झाला.

या हस्तलिखिताने अर्ध्या बंदाची लंबरेषेवर दुमडलेली ५१८ पृष्ठे व्यापलेली असून ते गुरुचरित्राच्या एकावन्न अध्यायांचे आहे. बोरूच्या लेखणीने काळ्याभोर शाईत त्यांनी ते लिहिलेले आहे. त्यात ७१७४ ओव्या असून त्यात अध्यायांचे, पृष्ठांचे आणि ओव्यांचे क्रमांक क्रमवार घातलेले असून विशिष्ट महत्त्वाचा भाग तांबड्या शाईत लिहिलेला आहे. त्याच्या शेवटच्या पृष्ठावर "हे पुस्तक धर्मस्थापना

१३ प्रा. के. वि बेलसरे : "श्री गोंदवलेकर महाराज यांचे चरित्र आणि वाङ्मय," पृ. ८१-८२-८३

व्हावी एतदर्थ वासुदेव बळवंत फडके, राहाणार शिरढोण, तालुके पनवेल, जिल्हा ठाणे 'याणी' लिहिले आहे. मिती कार्तिक कृष्ण षष्ठी, शके १८०० बहुधान्यनाम संवत्सरे ते दिवशी सकाळी समाप्ती" असा लेख आहे. त्यामुळे त्याच्या लेखकाविषयी आणि समाप्तीच्या काळाविषयी संशय रहात नाही. वरील दिवशी येणाऱ्या दिनांकाचा शोध घेता मला असे आढळले की, त्या दिवशी १६ नोव्हेंबर १८७८ हा दिनांक येतो तेव्हा हे हस्तलिखित वासुदेव बळवंतांनी या दिनांकाला १८७८ मध्ये आपल्या ३४ व्या वाढदिवसाच्या संधीला पुरे करून टाकले हे उघड आहे. पण तो ग्रंथ प्रसिद्ध करण्याची त्यांची मनीषा मात्र त्यांना अधिक मोठ्या सशस्त्र बंडाच्या कार्याच्या व्यापात पूर्ण करता आली नाही. कदाचित, त्याची ही पूर्तीच त्यांचा लागलीच बंड करण्याचा निश्चय या वेळेस ठाम झाला होता, असे दाखविते.

ज्या रामोश्यांशी आणि शेतकऱ्यांशी त्यांनी संधाने बांधली होती, त्यांना ते आता आपल्याकडे बोलावून घेत आणि पुण्यातील सहकाऱ्यांच्या देखत ब्रि. सरकारविरुद्ध बंड करण्याच्या आपल्या योजनांचा त्यांच्याशी खल करीत. त्यावेळी रामोश्यांचे निरोप ऐकणे आणि त्यांना नवे निरोप देणे ही कामे ते करीत. रामोशी लोकांशी त्यांची बोलणी सुरू झाली की, आलेल्या पांढरपेशा तरुणांना ते माडीवर जाऊन बसण्यास सांगत. आपल्या संघटनेत येणाऱ्या रामोश्यांनाही त्यांनी एक प्रतिज्ञाविधी ठेवला होता. रामोश्यांचा हा प्रतिज्ञाविधी बनेश्वर येथे होई. रामोश्यांपैकी दोन रामोशी स्त्रियाही त्या खटपटीत त्यांच्या अनुयायी बनल्या होत्या. ही सर्व मंडळी वासुदेव बळवंतांचे निरोप घेऊन आपल्या गावी परतत आणि 'महाराजांचे' आदेश आपल्या जमातीला कळवीत.

स्वराज्य हे वासुदेव बळवंतांना नुसते राजकीय ध्येय वाटत नव्हते. त्यांच्या मनात त्या ध्येयास आता धार्मिक उच्चता प्राप्त झाली होती. मॅझिनीप्रमाणे त्यांना वाटे की आपला देश पारतंत्र्यात असेपर्यंत आपणही सुतकातच आहोत. इटाली पारतंत्र्यात होती म्हणून मॅझिनीने ती स्वतंत्र होईपर्यंत सुतकाचे काळे कपडे वापरले.[१४] वासुदेव बळवंतानीही उंची कपड्यांचा त्याग केला. आपण पारतंत्र्याच्या सुतकात आहो असे समजून त्याकाळी अत्यंत शुभ दिवसांचे निदर्शक असे गंध कपाळावर लावण्याचे सोडून दिले. कोणीही शिरस्त्राण घातलेले नसणे हेही त्याकाळी सुतकाचेच लक्षण समजले जात असे. त्यामुळे शिरस्त्राण घालण्याचे टाकून देऊन धोडक्यानेच ते हिंडू लागले. त्यांच्या मनात किती तीव्र, उदात्त भावना उचंबळून येत होत्या, ते

१४ "Early in life he determined to wear mourning for country and throughout his life he wore nothing."

(आयुष्यात सुरुवातीलाच त्यांनी सुतकाचे काळे कपडे वापरण्याचे ठरविले आणि आयुष्यभर दुसरे कोणतेच कपडे घातले नाहीत") मिसेस हॅमिल्टन किंग "लेटर्स अँड रिकलेक्शन्स ऑफ मॅझिनी" पृ. ११५

त्यांच्या पुढील उद्‌गारांवरून दिसेल. "मी आजपर्यंत परस्त्री माझी माता समजत आलो आहे. आणि दुसऱ्याचं द्रव्य मला धमनासमान आहे. कदाचित् (त्याचा) काही अंश (मजकडे) आला असल्यास त्याचा उपयोग पुण्यमार्गाकडेच केला असेल."[१५]

वीर पुरुषास स्त्री ही नित्य अशी आदरणीय वाटत असते. स्त्रियांविषयीचा हा आदर त्यांच्या ठायी अमर्याद प्रमाणात होता. पुण्यामध्ये त्यांची बलोपासना चालली असता त्यांच्या आळीतील एका अनाथ अबलेची विटंबना करण्याचा काही टवाळ लोकांनी घाट घातला. वासुदेव बळवंतांना ते समजले, तेव्हा त्यांनी तेथे जाऊन त्या लोकांचे पारिपत्य केले आणि बाईस निर्भयतेचे आश्वासन दिले.

स्वातंत्र्यासाठी उभारावयाच्या सैन्यासाठी द्रव्य तर हवे. तेव्हा ते मिळविण्यासाठी बऱ्याच श्रीमंत लोकांशी त्यांनी वाटाघाटी केल्या. ते पैसे मिळविण्यात त्यांचा काहीच स्वार्थ नसल्यामुळे आपणास हे पैसे कशासाठी हवे आहेत, ते त्यांनी त्यांना अगदी स्पष्टपणे सांगितले. " मला स्वत:ला हे पैसे नको आहेत. स्वराज्यासाठी मला ते हवे आहेत. तुम्ही स्वराज्यासाठीच हे पैसे द्या. त्याची पावती आणि वचनचिठी तुम्हाला देऊ. आणि स्वराज्य मिळताच तुमचे पैसे तुम्हाला परत करू ! " असे त्यांना ते म्हणाले. स्वराज्यासाठी असे पैसे घेण्याची आणि त्यासाठी वचनचिठ्या देण्याची कल्पनाच अभिजात आणि क्रांतिकारी होती. त्यांनी सुरू केलेली ही परंपरा पुढे बंगाल–पंजाबच्या क्रांतिकारकांनी स्वातंत्र्यलढ्यात चालविली! त्यांच्या अशा चिठ्या पुढे काही ठिकाणी निराळ्या परिस्थितीतही लोकांना मिळाल्या. त्यावरून त्यांनी अवलंबिलेल्या या कल्पनेचा पुरावा मिळतो. त्यांनी अशा चिठ्या तसे पैसे त्यांना स्वतः होऊन न देणाऱ्या श्रीमंतांनाही दिल्या. कारण असे पैसे ते स्वराज्यासाठी घेतलेले ऋण समजत होते. आणि वेळ येताच त्यांना ते परत करावयाचे होते. परंतु लोभी श्रीमंतांना त्यांची स्वराज्य मिळविण्याची ही कल्पनाच अतर्क्य होती आणि त्यांची आपल्या तिजोरीवरील कंजूष पकड अशी घट्ट होती की, त्यांच्यापैकी कोणीही स्वेच्छेने त्यांना तसे पैसे देईना !

या कामी अशी निराशा होताच, स्वराज्यासाठी पैसे पाहिजेत आणि ते ज्यासाठी मिळवावयाचे ते पवित्र ध्येयच ते मिळविण्यासाठी अवलंबिलेल्या मार्गाचे मूल्य ठरवीत असते, असा विचार करून ते धन मिळविण्यासाठी श्रीमंत लोक जर स्वतः होऊन ते देत नाहीत, तर त्यांना लुटून आणि त्यांच्या घरावर दरोडे घालूनही ते घेण्यात आणि स्वराज्याचा खजिना भरण्यात आक्षेपार्ह काय, असा विचार करून त्यांनी मग श्रीमंत लोकांच्या घरांवर त्यासाठी छापे घालण्याचे ठरविले.

अशा विचारसरणीने या मार्गाने पैसे मिळविण्याचे ठरवण्यात वासुदेव बळवंतांनी मागाहून येणाऱ्या क्रांतिकारकांनाच एक परंपरा घालून दिली. त्यांच्या नंतरच्या

१५ वासुदेव बळवंतांचे 'आत्मचरित्र'

क्रांतिकारकांनी या मार्गाचे निकराचे समर्थन करीतच तिचा अवलंब केला. अरविंद घोषांचे 'युगांतर' पत्र म्हणाले, " या कार्यास पैसा पुष्कळ हवा आहे. तो 'स्वेच्छेच्या देणग्यांनी' किंवा 'बळाचा वापर करून' मिळवता येतो. बळाचा वापर हा सर्वस्वी समर्थनीय आहे. कारण असा पैसा हा समाजाच्या हितासाठीच द्यावयाचा आहे आणि व्यतीत करावयाचा आहे. चोऱ्या किंवा दरोडे हे नेहमीच्या परिस्थितीत अपराध ठरतात. कारण, ते सामाजिक स्वास्थ्य नष्ट करतात. परंतु सर्वोच्च जनहितासाठी ते स्वास्थ्य नष्ट करणे काही पाप नाही; तर धार्मिक पुण्याचेच कार्य आहे!"

त्यानंतर 'हिंदुस्थान रिपब्लिकन असोसिएशन' या सचींद्रनाथ संन्यालांच्या गुप्त संघटनेचे तसेच एक प्रमुख सदस्य मन्मथनाथ गुप्त म्हणतात, "धनी व्यक्ती पार्टी को रुपया देना नहीं चाहता, पार्टी उनके धनकी माँग करती है। पार्टी जानती है कि वो खुशीसे धन नहीं देगा, तब उससे जबरदस्ती धन ले लिया जाता है। कोई भी संदेहवाला इसपर मुस्कराकर यह कह सकता है कि यह तो डकैती है और कुछ नहीं। अवश्य यह डकैती है इसमें सन्देह नहीं।"[१६] या मार्गाने पैसे मिळविण्याच्या धोरणालाच या संघटनेच्या लोकांनी 'जबरदस्तीका धंदा' असे नाव दिले. आणि पुढे गूढ नावाने ते आणि भगतसिंगांचे सहकारी त्याला 'मनी ॲक्शन' असेही म्हणत. हा मार्ग वासुदेव बळवंतांनीच हिंदुस्थानात अवलंबला असे नव्हे. याच तत्वज्ञानाने पुढे आयर्लंडच्या क्रांतिकारकांनी आणि रशियातील बोल्शेव्हिकांनी दरोडे घालून आपल्या संघटनेच्या क्रांती कार्यासाठी पैसा मिळविला. तेव्हा वरील गोष्टीत वासुदेव बळवंत हे जगन्मान्यच मार्ग आपल्या बंडाच्या सिद्धतेसाठी चोखाळत होते!

आपल्या कार्यासाठी पैसा मिळवावयाचा हा हेतू सोडला तरी वासुदेव बळवंतांनी दरोड्याच्या रूपानेच ब्रि. सरकारविरुद्ध बंड उभारले. याला कारण त्यांच्या काळापर्यंत परकीय सरकारविरुद्ध होणारे बंड याच स्वरूपात होत असे. मोगलाविरुद्ध शिवाजीने तसलीच उठावणी केली होती. असे करण्यात, प्रस्थापित सरकारला एक आव्हान असते की, त्याने आपली ही उठावणी सर्व बळाने दडपून टाकून दाखवावी! हे आव्हान क्रांतिकारकांच्या देशबांधवांना त्यांच्या पक्षाकडे ओढी. तसे दरवडे एकसारखे पडत राहिले आणि प्रस्थापित सरकारला ते बंद पाडता आले नाहीत, की या परकीय सरकारलाही बंडखोर दाद देत नाहीत आणि ते त्यांच्या कृत्यांपुढे हतबल होऊन पडले आहे, असे जनतेला दिसून येते. तिचा सरकारच्या सामर्थ्यावरचा विश्वासच उडून जातो. या गोंधळांतच पुढे लाबलांबच्या ठिकाणी बंड बळावत जाते असा अनुभव होता. त्यामुळे वासुदेव बळवंतांकडूनही त्याच मार्गाचा अवलंब केला गेला. "फडके यांचे बंड हा शिवचरित्रापासून स्फूर्ती घेऊन केलेला जुन्या पद्धतीच्या राज्यक्रांतीचा शेवटचा प्रयत्न होय," हे माडखोलकरानी एके ठिकाणी केलेले

१६ मन्मथनाथ गुप्त : "भारतमें सशस्त्र क्रांतिके प्रयत्नका इतिहास," पृ. १९९

विधान त्या दृष्टीने अगदी सुयोग्य आहे."

त्यांचा हा हेतू इंग्रजांच्या चांगलाच लक्षात आला होता. त्यावेळचे राज्यपाल सर रिचर्ड टेंपल म्हणतात,

"It was in imitation of the tactics pursued by Shivaji .........against the Mogul Empire and on exactly the same field of action. Destructive raids were being undertaken against the villages lying in or near the Western Ghat Mountains, and the plunder was being carried off to fastnesses inside the mountain range. Thus strangely enough history was beginning to repeat itself."
("मोगल साम्राज्याविरुद्ध शिवाजीनें ज्यांचा अवलंब केला होता. त्याच डावपेचांचे अनुकरण करणारा (हा कट होता) आणि अगदी थेट त्याच रणक्षेत्रावर होता. पश्चिम घाटाच्या डोंगरातील किंवा त्याच्याजवळच्या खेड्यांवर नासधूस करणारे छापे घालण्यात येत होते आणि मिळालेली लूट पर्वतराजीच्या आतील गुहात पळवून नेण्यात येत होती. अशा रीतीने मोठ्या आश्चर्यकारक रीतीने इतिहासाची पुनरावृत्ती होण्यास सुरवात होत होती")

रामोशी प्रभृती लोकांची संघटना करण्यात त्यामुळेच वासुदेव बळवंतांचे दोन हेतू होते. एक तर त्यांनी लहान लहान पथके करून डोंगराळ प्रदेशात राहून लुटी मारताना त्याना लढाईचे शिक्षण द्यावयाचे नि त्या बळावर सरकारला हैराण करावयाचे. आणि दुसरा म्हणजे हे लोक विश्वासाने शेवटपर्यंत आपल्यासमवेत डोंगराळ प्रदेशात राहतील. कालांतरानें त्या सेनेची वाढ होईल आणि बंडखोर पक्षाचे सामर्थ्य शेवटी अजिंक्य होऊन ब्रि. सरकार नामोहरम होईल.

१८७८ च्या शेवटी आधीच्या पाचसहा वर्षातील सर्व मनःस्ताप वासुदेव बळवंतांच्या मनात एकवटून आले. कार्यालयातील इंग्रजाच्या निष्ठुरपणामुळे आईला मृत्यूपूर्वी ते शेवटचे भेटू शकले नव्हते. तिच्या प्रेमळ हाकेची आठवण होताच तिचा आपल्याला असा वियोग होण्याचे कारण आपली भारतमाता परतंत्रतेत आहे हे होय असे त्यांना वाटले. दुष्काळातील सहस्त्रावधी देशबांधवांचे मृत्यू आणि वाताहात आठवून ते कळवळून जाऊ लागले. 'स्वराज्य! स्वराज्य ! ' याचाचून त्याना दुसरे काही सुचेना. आपल्या धार्मिक विधीवर परदास्याचे सुतक पसरले आहे, असे त्याना वाटे. अन्नग्रहण करताना त्याना ते गोड लागे ना! ज्या अन्नावर परतंत्रतेचा शिक्का होता, ते त्यांना कसे रुचावे? कोणत्याही करमणुकीत त्यांचे मन रमेना. दिवसाची ही मनःस्थिती रात्रीही त्यांना सोडीना. रात्री मध्येच ते उठून बसत आणि मातृभूमीची 'ऊठ! ऊठ! ' ही हाक ऐकून परकीयांच्या नाशाचा विचार करीत बसत!

१७ ग. त्र्यं. माडखोलकर आणि श्री. ना. बनहट्टी : "विष्णु कृष्ण चिपळूणकर," पृ. ९९. सर रिचर्ड टेंपल : "दि स्टोरी ऑफ माय लाईफ", पृ. २९

परकीय सत्तेच्या छळांची उदाहरणे देऊन आपल्या या मनःस्थितीचे सम्यग् वर्णन करताना ते म्हणतात, "या आणि इतर हजारो गोष्टींचा विचार करता करता माझे मन हिंदुस्थानातील इंग्रजसत्तेच्या नाशाविषयी उद्युक्त होऊन गेले. मला दुसरा कसलाही विचार सुचत नव्हता. मी शौचास गेलो असता, स्नान करीत असता, (धार्मिक) कर्म करीत असता, जेवत असता आणि झोपेतही आणि केव्हा केव्हा तर प्रहर न् प्रहर या विचारांमुळे मला झोपही आली नाही–तीच गोष्ट माझ्या मनाला सतावत असे. मध्यरात्री मी उठून बसत असे आणि इंग्रजांचा नाश कसा करता येईल याचा विचार करीत बसत असे! या विचाराने मी अगदी वेडा होऊन गेलो!"[१८] मातृभूमीच्या दुःखाने आणि स्वातंत्र्याच्या तळमळीने त्यांची तहानभूक आणि झोप अशी अक्षरशः नाहीशी झाली! वासुदेव बळवंतांची ही मनःस्थिती आणि त्यांचे हे शब्द बाई फडके यांनीही आपल्या आठवणीत सांगितले आहेत. त्या म्हणाल्या की, "मध्यरात्रीसुद्धा हे बाहेर ओट्यावर जाऊन बसत आणि बंडाच्या आणि इंग्रज सरकार उलथून पाडण्याच्या योजनांवर विचार करीत रहात असत."[१९]

ध्येयवादाने बेभान होऊन गेलेल्या कोणाही मनुष्यास धीराचा उपदेश कसा रुचावा. वासुदेव बळवंतांनाही कोणी तसा उपदेश करू लागले की त्याचा त्यांना संताप येई आणि ते त्याला त्वेषाने म्हणत, " छे! छे! आता थांबणं शक्य नाही! विचार कसला करता? हीच वेळ, हाच मुहूर्त, घे तलवार नि हो पुढे! अशी वेळ आता आली आहे."[२०]

१८७९ चे वर्ष उजाडले, तेव्हा वासुदेव बळवंतांनी उठावणीचा मुहूर्तही निश्चित केला होता. स्वराज्यासाठी उभारावयाच्या सेनेसाठी लागणाऱ्या पैशासाठी आणि ब्रि. सरकारविरुद्ध दरोड्याच्या रूपाने उभारावयाच्या बंडाच्या सुरुवातीसाठी ते आपली शस्त्रे परजू लागले!

* * *

---

१८ वासुदेव बळवंतांचे 'आत्मचरित्र'

१९ बाई फडके यांच्या स्नुषा रमाबाई फडके यांनी सांगितलेल्या त्यांच्या आठवणी

२० कित्ता; बाईंनी वासुदेव बळवंताचे हे [illegible] तसे म्हणून दाखविले होते.

# प्रकरण ९ वे

## बंडखोर जीवनास आरंभ

"Oh Freedom! There is something dear, in thy very name,
That lights the altar of the Soul, with everlasting flame,
Blessed be the generous hand, that breaks the chain a tyrant gave,
And feeling for the degraded man, gives freedom to the slave."[1]

बंडासाठी बाहेर पडण्याचा निर्णायक क्षण जवळ येत चालला. पुण्याचे बिऱ्हाड वासुदेव बळवंतांना लवकरच बंद करावयाचे होते. त्यांच्या बाहेरच्या कामाचा व्याप अलीकडे फार वाढल्यामुळे ते रात्री अपरात्रीपर्यंत घरी येत नसत. त्यांची चिंता करीत बाई घरी बसत. पण ते काम सोडून द्या असे सांगण्याचा त्यांना धीर होत नसे. त्यांचे हाल वासुदेव बळवंतांना समजत होते. घरी असले म्हणजे ते तसे बोलूनही दाखवीत. पण त्यांचा निरुपाय होता. बाईंची पुढील व्यवस्था करण्याची वेळ आली तेव्हा त्यांना शिरढोणची निवड करणे अशक्य होते. कारण, वडिलांचे आणि त्यांचे संबंध आता विचित्र झाले होते. बाईंचे वडील वारल्यानंतर त्यांच्या माहेरी त्यांचा सांभाळ करण्यास कर्ते माणूस नव्हते. तेव्हा जुन्नर येथे त्यांचे मामा दामले हे होते.त्यांच्याकडेच त्यांना पाठविले तर सर्व व्यवस्था नीट होईल असा विचार करून त्यांना तिकडेच पाठविण्याचे त्यांनी ठरविले.

बाई तेव्हा नुकत्याच कोठे तारुण्यात पदार्पण करीत होत्या. जिचे सारे आयुष्य आनंदात जावयाचे अशा आपल्या पत्नीवर आपल्या कदाचित चिरंतन ठरणाऱ्या वियो-

---

१ "हे स्वतंत्रते तुझा नामोच्चार होताच अंतःकरण एका अखंड तेवत राहणाऱ्या ज्योतीने उजळून यावे, अशी तुझ्या नावातही गोडी आहे ! म्हणूनच अरेरावी राज्यकर्त्यांच्या शृंखला तोडून टाकणारा आणि पददलित मनुष्यासाठी हळहळ वाटून गुलामांना स्वतंत्रता देणारा हात धन्य होय"

गाचे दु:ख कोसळणार हे पाहून वासुदेव बळवंतही दुःखी झाले. त्यामुळे काहीशा खिन्न्‌ वरातच थट्टीवाल्याच्या वाड्यातील आपल्या बिऱ्हाडातील वस्तूंकडे शून्य दृष्टीने पहात त्यांना जुन्नरला पाठविण्याचा आपला विचार त्यांनी त्यांना सांगितला.

त्यासाठी पहिले पाऊल म्हणून त्यानी १३ फेब्रुवारी १८७९ ला कार्यालयातून आठ दिवसाची नैमित्तिक सुटी घेतली.[२] बाईंचे त्यांच्याशी शेवटचे संभाषण झाले तेव्हा त्यांच्या भावना काय वर्णाव्या? बलाढ्य ब्रिटिश सत्तेला आव्हान देणाऱ्या या पुरुषाच्या डोळ्यातही भीषण भवितव्याने अश्रू उभे राहिले आणि ते पहाताच बाईंच्या धीरगंभीर वृत्तीचाही बांध फुटून त्याच्या डोळ्यातूनही घळाघळा अश्रू वाहू लागले. " घाबरू नकोस. मी काही कायमचा जात नाही. थोड्याच दिवसात आपला देश स्वतंत्र होईल! आणि मग पुन्हा आपण भेटू! " अशा काहीशा शब्दांनी त्यांनी बाईंना धीर दिला. बाईंना जुन्नरला त्यांनी पोचविले, तेव्हा बाईंनी तेच शब्द मनातल्या मनात उच्चारीत त्यांना निरोप दिला! पण ती त्यांची आशा सफल व्हावयाची नव्हती.

बुधवारी १९ फेब्रुवारीला वासुदेव बळवंतांची स्वतंत्रतेतील पुण्यातील शेवटची सध्याकाळ होती. त्या दिवशी ते खुन्या मुरलीधराच्या देवळात शेवटचे गेले. आणि त्यांनी आपल्या सहकाऱ्यांचा निरोप घेतला. त्यावेळी खरे बंधूंच्या मातोश्री लक्ष्मीबाई याच्या हृदयात त्यांच्या संकल्पाची चाहूल लागून कालवाकालव झाली. त्यामुळे त्यांनी प्रेमाने त्यांना आपल्या घरात बोलाविले. ते येताच त्यांनी त्यांना गूळ, दाणे आणि पाणी यांचा उपहार दिला. आणि भावनावश होऊन त्या त्याना निरोप देताना म्हणाल्या : "तू जातोसच आहेस. तर जाताना सुखानें जा! " त्याच्या मायेनें सद्गदित होऊन त्यांना नमस्कार करून त्यांच्या त्या आशीर्वादाचा वासुदेव बळवतांनी स्वीकार केला आणि त्यांचा आणि इतर सहकाऱ्यांचा त्यांनी निरोप घेतला.[३]

'बंडा'च्या प्रारंभासाठी दुसऱ्या दिवशीचा मुहूर्त धरून वासुदेव बळवंतानी आपल्या जवळच्या तीन चांगल्या तलवारी आणि इतर शस्त्रे एका विश्वासू माणसाच्या हाती रात्रीच्या गाडीने लोणीकंदला पाठवून दिली. कारण दुसऱ्या दिवशी गुरुवारी २० फेब्रुवारी १८७९ ला रात्री आपल्या ध्वजाखाली येण्यास सिद्ध असलेले आपले सर्व एकनिष्ठ अनुयायी आपल्या सेनेचा जन्मोत्सव साजरा करण्यासाठी त्यांनी एकत्र बोलाविले होते. या संमेलनाचे स्थान लोणीलाच होते. लोणीकंद पुण्याजवळ आठ कोसार्धावर होते. त्या मेळाव्यासाठी त्या गावाच्या बाहेरच्या एका प्रशस्त शेताची निवड करण्यात आली होती. त्या संमर्दात रामोश्यांप्रमाणे विष्णु विनायक गद्रे, गोपाळ मोरेश्वर साठे, गणेश कृष्ण देवधर आणि गोपाळ हरी कर्वे हे वासुदेव बळवंतांचे पुण्याचे पांढरपेशे अनुयायीही होते. त्या संमेलनाची व्यवस्था जानकू शिंदा आणि गणू रामोशी हे लोणीचे गावकरी पाहात होते. या वेळी जमलेल्या दोनशे उद्दाम

२ जे टी. व्हॉल्यूम, ५८-५९ (८७९-८०), मुंबई सरकारचे कागदपत्र.

३ मोरो बळवंत खरे याचे नातू नाथ खरे यानी सांगितलेली माहिती.

लोकांमध्ये वासुदेव बळवंतांचे उजवे हात असलेले सरदार दौलतराव नाईक आणि स्वयंपाकी सीताराम गोकाक हेही होते. त्याचप्रमाणे चिमा आणि भवानी या दोन रामोशी स्त्रियाही होत्या. गद्रे आणि साठे यांना घेऊन गुरुवारी संध्याकाळीच वासुदेव बळवंत लोणी येथे गेले.

या लोकांना हा प्रसंग साजरा करण्यासाठी वासुदेव बळवंतांनी मिष्टान्नाचे भोजन दिले. रात्रीच्या काळोखात जागरूकतेने ते सर्व भोजनास बसले असता वासुदेव बळवंतांनी त्यांच्यात हिंडून सर्वांची आस्थापूर्वक चौकशी केली. नंतर ते स्वतःही त्यांच्याच समवेत जेवले. भोजनानंतर त्यांनी त्यांच्यापैकी कोणास पागोटी, कोणास उपरणी, कोणास पैसे दिले. आपल्यात मिळूनमिसळून वागण्याच्या त्यांच्या या वागणुकीमुळे त्या लोकांचा आनंद द्विगुणित झाला. त्यांना अशी मानाची वागणूक क्वचितच मिळत असे. नंतर त्यांच्यापुढे केलेल्या भाषणात वासुदेव बळवंत म्हणाले की, "स्वराज्यासाठी करावयाच्या बंडासाठी बाहेर पडण्याची वेळ येऊन ठेपली आहे. आपल्या पहिल्या लुटीच्या छाप्यानंतर आपणास आणखी पुष्कळ शस्त्रं आणि आणखी पुष्कळ पैसा मिळेल. त्यांच्या सहाय्यानं आपणास पोलिस आणि सरकारविरुद्ध लढावं लागेल."

आपल्या भाषणाचा जमलेल्या लोकांवर काय परिणाम झाला आहे ते पाहण्यासाठी वासुदेव बळवंतांनी त्यांना विचारले, "काय, तुम्हाला कसं काय वाटतं?" आणि त्यांचा तो प्रश्न ऐकताच तो सर्व समुदाय एकदम उभा राहून एक आवाजात म्हणाला, "आम्हाला शस्त्रं आणि पैसा द्या आणि आम्ही बंड करून उठतो!" त्यांच्या या उसळत्या उत्साहाचे स्वागत करून वासुदेव बळवंतांनी त्यांना सांगितले की, "दौलतराव ती सर्व व्यवस्था करतील. मी आता पुण्याला जातो आणि ठरल्याप्रमाणे उद्या येथे येईन." वासुदेव बळवंत नंतर त्या रात्रीच तीन वाजता बैलगाडीने पुण्यास परतले. जवळजवळ दहा वर्षांनी ते आता पुन्हा बैलगाडीत बसत होते. आणि ही गोष्ट त्यांच्या विशेष लक्षात राहिली.

दुसऱ्या दिवशी शुक्रवारी २१ फेब्रुवारी १८७९ ला वासुदेव बळवंतांनी आपल्या कार्यालयाच्या अधीक्षकाला एक चिठी पाठविली. त्या चिठीत त्यांनी लिहिले होते :

"I am sorry to inform you that I am sick with fever, cold and head-ache and consequently unable to attend office."[४]

("आपणास कळविण्यास मला खेद होतो की, मी तापानं, सर्दीनं, आणि डोकेदुखीनं रुग्णाईत झालो आहे आणि त्यामुळे आज कामावर येण्यास मी असमर्थ आहे.") त्यांची ही सर्वांच्या परिचयाच्या कारणाची रुग्णचिठी (सिक् नोट) होती. गेल्या शंभर वर्षांपर्यंत लेखनिकांनी आणि चाकरीवाल्यांनी अशी चिठी पाठविताना

४ जे. डी. व्हॉल्यम ५८-५९ (१८७९-८०) : मुंबई सरकारचे कागदपत्र

वापरावयाची भाषा कशी सारखीच राहिली आहे ते त्या चिठीतील वरील शब्दांवरून दिसून येते आणि मानवीमनोवृत्तीच्या सारखेपणाची मौज वाटते!

त्या दिवशी दुपारी दोन वाजता पुण्याहून बाहेर जाण्यासाठी वासुदेव बळवंतांनी एक बैलगाडी बोलाविली होती. त्याप्रमाणे दुपारी ती आपल्या दारापुढे येऊन उभी राहाताच, आपली शस्त्रे त्यांनी त्या गाडीत चढविली. त्याच्यावर कडब्याचा भारा पसरला. त्यावर बैठक घातली आणि ते पुन्हा आपल्या बिऱ्हाडात परतले. आपल्या घरातल्या देवांपुढून त्यांनी आपली आवडती तलवार उचलली आणि देवाचे नाव घेऊन आणि आपले बिऱ्हाड बंद करून त्याला कुलूप ठोकून त्यांनी गाडीत उडी मारली. ते गाडीत बसताच ती चालू झाली. आताच्या नव्या मंडईच्या मागील बाजूच्या पुण्याच्या रस्त्यावरून ती गाडी लोणीकडे निघाली, तेव्हा कित्येक वर्षांच्या परिचयाचे पुण्याचे टापू त्यांच्या दृष्टीपुढून जाऊ लागले. आपण परत कधी उघडपणे येथे येऊ काय, असा विचार त्यांच्या मनात आला. पण गाडीने लवकरच पुणे मागे टाकले आणि ते रात्री लोणीस पोहोचले.

ती रात्र त्यांनी तेथेच काढली. लोणीजवळील चिचूशीच्या जंगलात एका गुहेमध्ये कानोबाचे देऊळ आहे. त्या देवळापुढे दुसऱ्या दिवशी सकाळी सर्वजण जमले. नंतर त्या गुहेतच त्या दिवशी त्यांनी जेवण केले आणि सायंकाळपर्यंत गुहेतच वेळ काढून त्या देवळात सर्वजण परतले. रात्री त्यांनी त्या गुहेतच झोप काढली.

रविवारी २३ फेब्रुवारीला पहिल्या लुटीचा मुहूर्त ठरला होता. त्या दिवशी सकाळी उठून त्यांनी दुसऱ्या एका गुहेचा आश्रय घेतला. त्या दिवशी लोणीचे वतनदार पाटील रविराव शिंदे यांच्या मुलीने त्यांच्या जेवणाची व्यवस्था केली. ते जेवण करून सायंकाळी वासुदेव बळवंतांनी ते ठिकाण सोडले. एक डोंगर चढून पुन्हा ते कान्होबाच्या देवळात आले आणि संध्याकाळी सातच्या सुमारास आपल्या लोकांना त्यांनी 'पुढे चलण्याची' आज्ञा दिली. ती मिळताच त्यांचे लोक धामारी नावाच्या गावाकडे चालू लागले. या वेळी वासुदेव बळवंतांच्या लोकांच्या हातात त्यांनी वाटलेल्या बंदुका, भाले, तलवारी, काठ्या, गोफणी आणि दांडपट्टे होते. त्यांच्यापैकी दोघांजवळ घोडे होते. बंडखोरीच्या आयुष्याला वासुदेव बळवंतांनी सुरुवात केली होती.

धामारी गावाचे लोक दिवसाचे काम संपवून सायंकाळी घरी परतले होते एकाएकी त्यांना कोणीतरी फुंकलेल्या शिंगाचा आणि शंखाचा आवाज ऐकू आला. आणि त्याच्या पाठोपाठ उडविलेल्या बंदुकांच्या गोळ्यांचे धाड्धाड् आवाजही त्यांना ऐकू आले. ते ऐकताच त्यांची भीतीने गाळण उडाली. वासुदेव बळवंतांचे लोक धामारीला पोहोचले. त्यांनी गावाबाहेर पहारा करणाऱ्या धामारीच्या रावजी रामोश्यास पकडले आणि ते पाहताच आजूबाजूचे गावकरी ते वृत्त आपल्या गावकऱ्यांना सांगण्यासाठी गावात पळाले. बंडखोरांनी रावजीस वासुदेव बळवंतांपुढे उभे केले.

त्यानी त्याला गावातल्या सावकारांची घरे दाखविण्यास सांगितले. त्याने तसे केले आणि त्यांच्या हातून आपली सुटका करून घेऊन जीव मुठीत धरून तोही पळून गेला.

रावजीने दाखविलेल्या घरांवर बंडखोरानी मग चढाई केली. ती सुरू होताच गावचे सर्व लोक घरे सोडून गावाबाहेर पळून गेले. वासुदेव बळवंतांच्या लोकानी क्रमवार चढाईत दौलतराव किल्लाचंद या धामारीच्या सगळ्यात श्रीमंत मारवाड्याचे घरही लुटले. आणि इतर सावकारांच्या घरांचीही यथेच्छ लूट मारली. यावेळेपर्यंत वासुदेव बळवंत एका घराच्या आडोशाला मोक्याच्या जागी दबा धरून बसले होते. आणि गावावर आपल्या सेनेचा धाक बसविण्यासाठी त्यांनी आपल्या बंदुकीने चारसहा आवाजही काढले. रामोश्यानी मग मारलेली सर्व लूट धामारीच्या मुख्य चौकात एकत्र करून ती वासुदेव बळवंतांपुढे ठेवली.[5] त्यांनी ती दौलतराव नाईकांच्या स्वाधीन केली. ती जवळजवळ तीन सहस्र रुपयांची होती. ती एका पोत्यात नीट बांधण्यात आल्यावर खुणेची सूचना होताच वासुदेव बळवंतांचे लोक अरण्यातील आपल्या तळाकडे निघून गेले. सारे काम तासाभरातच आटोपले.

हल्लेखोर निघून जाताच चौकीवरील पोलीस नाईकास घेऊन रावजी रामोशी धामारीच्या गावकऱ्यांसह त्यांच्या पाठलागावर निघाला. दक्षता म्हणून वासुदेव बळवंतांनी काही लोक मागे ठेवले होते. त्यानी जाऊन ती बातमी त्याना दिली. त्यासरशी जी टेकडी ते चढत होते त्या टेकडीवर आपले लोक वासुदेव बळवंतांनी पांगवून ठेवले. आणि तेथून पाठलाग करणाऱ्यांवर गोळ्यांचा वर्षाव केला. तेव्हा पाठलाग करणाऱ्यांचा निभाव न लागता ते निरुपायाने धामारीकडे पळून गेले.

सोमवारी सकाळी लुटीतील कपडे जाळून टाकून तिच्यातील पैसे देऊन नवीन दारूगोळा आणण्यासाठी वासुदेव बळवंतानी आपले हस्तक पुण्याला धाडले. आपल्या लोकांना थोडे वेतनही देऊन टाकले. जेवणाची सिद्धता होत होती, तोच त्यांच्या टेहेळ्यानी बातमी आणली की, पोलिसांचे लोक टेकडी चढून येत आहेत. तेव्हा त्यानी आपल्या लोकाना पांगून पांगून आणखी वरची टेकडी चढण्याचा आदेश दिला. थोडेच लोक असे टेकडीवर जाऊ लागले तर खालच्या लोकाना त्यांची संख्या बरीच दिसते आणि तो देखावा भयंकर वाटतो हे त्याना माहीत होते. त्यामुळेच त्यानी ही युक्ती योजली. झालेले जेवण दरीत टाकून त्यांचे लोक त्याप्रमाणे वर चढले आणि तेथे दबा धरून, त्यांनी येणाऱ्या पोलिसांवर गोळीबार सुरू केला. तेव्हा येणारे बहुतेक पोलीसही पळून गेले. उरलेल्या लोकांवर चाल करून रामोश्यांनी त्याना अटक केली. आणि बंदीवान म्हणून नेऊन वासुदेव बळवंतांपुढे उभे केले. परंतु त्याच्यापुढे येताच त्या लोकानी त्यांना प्रणाम केला. "राम! राम!" हे सरकारचे लोक

---

५ सरकारी साक्षीदार क्र. १४ गणू रघू रामोशी याची वासुदेव बळवंताच्या अभियोगातील सत्र न्यायालयातील साक्ष दि. ४ नोव्हेंबर १८७९, केस नं. 153 of 1879. "इंपरेटिक्स अँड V/S वासुदेव बळवंत फडके अँड 14 अदर्स"

नाहीत, हे वासुदेव बळवंत समजले. तरीपण काही अंतरापर्यंत त्याना बंदी म्हणूनच त्यानी चालविले. तेव्हा त्या बंदीवानांनी त्याना सांगितले, " आज काही भीती नाही. उद्या मात्र जपून रहा. पुण्याचे घोडेस्वार तुमच्या शोधासाठी उद्या येणार आहेत !" थोडयाच वेळात त्याना बरेच छेडून त्यांच्याकडून आणखी माहिती काढून घेऊन बंडखोरानी त्याना रानातच एकीकडे सोडून दिले.

त्याच दिवशी पुढे चिचूशीचे रान सोडून वासुदेव बळवंतांचे लोक दवडी निंबगावच्या वेशीसमोर येऊन उभे ठाकले. त्यांची धाड आलेली दिसताच दवडीचे वेशीवरील गावकरी पळू लागले. तेव्हा आपले लोक पाठवून वासुदेव बळवंतांनी त्याना परत बोलावून आणले. वासुदेव बळवत त्यांच्याशी गोड शब्दात बोलू लागलेले पाहताच इतर बरेच कुणबी गावकरी त्यांच्याभोवती जमा झाले. त्यांच्यापुढे भाषण करताना वासुदेव बळवत त्याना म्हणाले, "आम्हाला तुम्ही दरोडेखोर समजू नका. आम्ही तुम्हा गरीबांच्या कल्याणासाठी आलो आहोत. तुम्ही तुमच्या इतर गांवकऱ्यांना सांगा की, गरीबांच्या कल्याणासाठी आम्ही फिरत आहोत. तुम्ही आम्हाला घाबरण्याचे मुळीच कारण नाही. रयतेच्या सुखाचे दिवस आता आले आहेत हे नक्की समजा!"

वासुदेव बळवतांच्या भाषणाने जमलेल्या कुणब्याना आनंद झाला. त्याना कोणी दही, कोणी दूध प्रेमाने आणून दिले. आणि असे आश्वासन दिले की, "सरकारकडून कोणी इकडे आल्यास आम्ही आधी तुम्हाला कळवू आणि शक्य ते सर्व साहाय्य देऊ."[१] दवडी गावात न शिरता हे पथक मग रात्रीसाठी लोणीस परतले. त्यांच्या पहिल्या छाप्याची चौकशी पोलिसानी तेथे जाऊन सुरू केल्याचे त्यांना समजले. पुण्यास पाठविलेल्या माणसांची वाट पाहात त्यांनी ती आणि नंतरची रात्र एका विश्वासू रामोश्याच्या घराच्या माळचावर एकटयानेच काढली यावेळीच शस्त्रांसाठी पाठविलेल्या पैशात काही चूक झालेली आढळून आली. त्यामुळे वासुदेव बळवतानी सखाराम महारासमवेत सोन्याच्या तीन साखळ्या पुण्यास पाठवून दिल्या. याच माळचावर धामारीच्या हल्ल्यात दौलतरावानी दाखविलेल्या शौर्यामुळे ते रामोश्याचे पहिल्या प्रतीचे सरदार असल्याचे उद्‌गार त्यांनी काढले.

दुसऱ्या दिवशी २६ फेब्रुवारीला सकाळी मग पानमळ्याच्या शेतात ते आपल्या लोकांना जाऊन मिळाले. हेच ठिकाण आता प्रख्यात झालेले सध्याचे पानशेत असावे. संध्याकाळी त्यांची सेना जेवण्यास बसली असताच आरोळी आली की, "पोलीस येत आहेत." तेव्हा कपडे करून दुसऱ्या दिवशी अहिऱ्याच्या जंगलात जमावयाचे असे सर्वांना सांगून वासुदेव बळवंतानी ते ठिकाण सोडले.

परत लोणी येथे ते गेले. मध्यरात्री पुण्याच्या घोडदळाचे लोक तेथे शोधासाठी

१ वासुदेव बळवताची दैनंदिनी, दि २४ फेब्रुवारी १८७९.

आले.* त्यांच्या वेढ्यातच वासुदेव बळवंत पडले असते. पण दौलतरावांनी ते होते त्या घरातून मागील दाराने त्यांना दुसऱ्या एका घरात हालविले. त्या घरात ते एखाद्या बंद्याप्रमाणे राहिले. रात्री फौजदार तेथे आला, तेव्हा ते गावाबाहेर गेले. फौजदारांनी तीन रामोश्यांना अटक केली. तेव्हा त्यांच्यावर हल्ला करून आणि स्वारांना ठार मारून त्यांची सुटका करण्याचे वासुदेव बळवंतांनी ठरविले. परंतु नंतर त्यांच्या छाप्याची माहिती असलेला रामोशीच फौजदाराच्या हातावर तुरी देऊन पळून गेल्यामुळे त्यांना तसे करण्याचे प्रयोजन राहिले नाही.

शुक्रवारी २८ फेब्रुवारीला पहाटेस ते रामदऱ्याच्या विस्तीर्ण अरण्यात पोचले. तेथे जेवण्यास भात, बाजरीची भाकरी आणि मिरच्या असाच बेत होता. या जेवणाचे वर्णन करताना वासुदेव बळवंत म्हणतात की, घरी (सुग्रास अन्न) जेवणाऱ्यांनी आम्ही (अशा अन्नावर) कसे दिवस काढीत होतो त्याची कल्पना करावी!"*

रामदऱ्याच्या अरण्यात रात्र काढून दुसऱ्या दिवशी १ मार्चला पहाटेपूर्वीच सोनुरी किंवा मल्हारगड येथे कूच करण्याची आज्ञा वासुदेव बळवंतांनी आपल्या सहकाऱ्यांना केली. त्या गडाचा चढ वाईट वळणाचा होता. त्यामुळे तो चढताना त्यांचे फार हाल झाले. परंतु त्यांच्या आगमनाची वार्ता कळताच मल्हारगडचा पाटील त्यांच्या स्वागताला आला. आणि त्याने त्यांच्या जेवणाची व्यवस्था केली.

मल्हारगडच्या माथ्यावर सावळेश्वराचे शिवमंदिर होते. तेथील तलावाचे पाणी स्फटिकासारखे स्वच्छ होते आणि त्या मंदिरातील मूर्ती भव्य आणि प्राचीन होती. मंदिर म्हटले की, वासुदेव बळवंतांना त्याचे आकर्षण वाटे. त्यामुळे ते सावळेश्वराच्या दर्शनाला गेले. ते तेथे असतानाच चार पाच नवे रामोशी त्यांच्या सेनेत भरती होण्यासाठी आले. त्यांना त्यांनी आपल्या सेनेत भरती करून घेतले.

येथे वासुदेव बळवंतांना असे समजले की जवळच्याच आमली गावात तेथील इनामदाराजवळ बंदुका आहेत. त्या आणण्यासाठी राजेवाडीच्या घोंडी पाटलास त्यांनी पाठविले. परंतु मध्यंतरात त्यांचा एक कट्टर सहकारी पांडू रामोशी येऊन त्यांना म्हणाला की, आपण एक बंदूक आणली असून भरतगावाहून दुसऱ्या दोन बंदुका आणण्यासाठी पैसे पाठविले आहेत. आमलीहून बंदुका आल्या नाहीत. पण या दुसऱ्या दोन बंदुका मात्र दुसऱ्या दिवशी आल्या. तेव्हा वासुदेव बळवंतांनी सावळेश्वर सोडले.

आपणास खंडणी देण्याची आज्ञा करणारी चिठी पाठवली. पण त्यांच्याकडून उत्तर आले नाही. तेव्हा त्या रात्रीच वासुदेव बळवंतांनी वाल्हे गावावर हल्ला केला. त्यांची सेना गावात शिरताच गावात एकच गडबड उडाली. तेथील गावकरी बचावासाठी सिद्धतेत असलेले त्यांना दिसले. मौल्यवान वस्तू त्यांनी गुप्त आडोशाला आधीच लपवून ठेवल्या होत्या. गावातील घरे रामोश्यांनी धुंडाळली. पण त्यांना विशेष लूट मिळाली नाही. शेवटी गावच्या मांगाच्या घरात ते शिरले. तेथे लूट ती काय मिळणार ? पण लूट नाही तरी पाच उत्तम तरवारी मात्र त्यांच्या हाती लागल्या. त्या घेऊन मग आडवाटेने ते पांगाऱ्याच्या अरण्याकडे वळले. पोलिसांना डोंगराळ भागात झुकांडी देण्याची त्यांची ही युक्ती होती.

तेथून त्यांनी लागलीच भातमळा गाठले. तेथे एका उंबराच्या झाडाखाली त्यांनी तळ ठोकला. आणि आपल्या लोकांना प्रत्येकी रु. १० याप्रमाणे वेतन वाटले. रात्री एका कोरडया ओढयाच्या खडकाळ पात्रात ते झोपले. तेव्हा पुरंदर गडाचे कडे त्यांना दिसू लागले. त्यामुळे आपला पुढील निवास पुरंदरला ठरवून ते झोपी गेले. गनिमी युद्धात एकाच ठिकाणी बरेच दिवस राहणे धोक्याचे असते. कारण, आपल्या ठावठिकाणाविषयी शत्रूला अंधारात ठेवून त्याला हैराण करण्यावर ते युद्ध करणाऱ्याचा भर असतो. सरकारी हस्तकांना आपला माग सापडू नये म्हणून त्यामुळेच वासुदेव बळवंत जवळ जवळ प्रत्यही आपल्या निवासाचे ठिकाण बदलीत. त्याप्रमाणे एकच दिवसात त्यांनी भातमळा सोडले.

शुक्रवारी ७ मार्चला पहाटेच्या झुंजुमुंजु वातावरणात ते पुरंदरच्या पायथ्याशी पोचले. आणि त्यांनी निरगुडीच्या झाडांच्या रांगेत तळ ठोकला. पुरंदरचे नवे लोक त्यांना तेथे भेटण्यास आले. त्यापैकी कुशावा आणि बाळा यांनी सांगितले की, आमच्या गावात काही लग्ने आहेत अशा वेळी पोलीस येतात आणि आम्हाला त्रास देतात, असा अनुभवच आहे. तरी ती कार्ये पार पडेपर्यंत 'महाराजांनी' तेथे रहावे. वासुदेव बळवंतांना रामोशी 'महाराज' या नावाने हाक मारीत. कुशावा बाळांनी असेही म्हटले की, कार्ये पार पडताच आणखी ३०।४० नव्या माणसांसह आम्हीही तुमच्यासमवेत स्वारीवर निघू. त्याप्रमाणे वासुदेव बळवंत तेथे राहिले. त्यांनी काही माणसांना आपले घरी पैसे देता यावे म्हणून सुटीवर पाठविले. काही लोकांना वरील खेडयात गावकऱ्यांना सरक्षण देण्यासाठी पाठविले. रात्री जवळच्या भिवंडी गावात ते जेवले. आणि पोखरजवळच्या ओघळी गावात झोपले.

दुसऱ्या दिवशी कोळीवाडयाजवळच्या वाघदर नावाच्या नदीच्या खोऱ्याकडे ते वळले. तेथे ते पुढे चार दिवसपर्यंत राहिले. अर्ध्या एक डोंगरावर असलेल्या काले नावाच्या खेडेगावात ते गेले. कुशावा साबळे आणि कुशावा पाटील हे त्यांना तेथे भेटले. लक्ष्मण धावडेनेच त्यांना जेवण पोचवले. रात्रीही ते कृष्णा साबळेकडे जेवले. त्यानंतर जमलेल्या पाटील रामोश्यांशी रणटोळीसाठी त्यांनी चर्चा केली.

ते म्हणाले, "तीन दिवस तरी माझ्यासमवेत राहिल्यावाचून मी कुणालाही पैसे देणार नाही. आतापर्यंत विसारा देण्यातच माझे पाच हजार रुपये खर्च झाले आहेत ! " तेव्हा काही नवी माणसे त्यांना तशी येऊन मिळण्यास सिद्ध झाली आणि रात्री ते वाघदरीला परत आले.

आतापर्यंत शंभर नवी माणसे मिळण्याचे आश्वासन त्यांना मिळाले होते. त्यामुळे दुसरा दिवस त्यांनी तेथे आनंदात काढला. त्यानंतरच्या दिवशी १० मार्चला रविवार होता आणि त्या दिवशी पाचपाच लग्ने आणि दुसऱ्या दिवशी आणखी सहा लग्ने काले गावात पार पडली. विष्णुपंत गद्रेना वासुदेव बळवंतांनी सोने चांदी देऊन बंदुकीचा दारुगोळा आणण्यास पाठविले होते. ते तेथून परत आले. वासुदेव बळवंतांनी कडेपठाराच्या गुरवांना पकडले होते. त्यांनी त्यांचे जेवण करुन दिले. त्याचा आस्वाद घेत गद्रे यांच्या तोंडून त्यांच्या पाठीमागे पुण्याला घडलेल्या घडामोडींचा वृत्तांत त्यांनी मग ऐकला. तो ऐकून संबंधित लोकांच्या आणि सरकारी अधिकाऱ्यांच्या कारवायांचा त्यांना संताप आला.

पोलीस फौजदार काही शिपायांना घेऊन त्यांचे अपराधी पकडण्यास निघाले होते. वन विभागाचा एक निरीक्षक काही शिपायांसह ते होते त्या ठिकाणावरूनच त्यांच्या शोधात पुढे निघून गेला होता. सीताराम गोकाकलाही अटक झाल्याची वार्ता होती.

पुण्याला गणपतराव देवधर आणि हरिभाऊ गुरचूप यांना अटक झाली होती. वासुदेव बळवंतांच्या पुण्याच्या बिऱ्हाडाची किल्ली कुठे आहे, म्हणून गणपतरावांना पोलिसांनी विचारले. पण त्यांनी ते आपणास माहिती नाही असे सांगितले. त्यांच्या घराचे कुलूप फोडून त्याची झडती घेण्यात आली होती. त्यांच्या मागावर सक्त पाळत ठेवण्यात आली होती. महादेवराव करमरकर भिवंडीला निघून गेले होते. पण गणपतराव देवधरांच्या तोंडून त्या उलाढालीमधील त्यांचा जो भाग होता त्या विषयीची माहिती बाहेर पडली. वासुदेव बळवंत उद्गारले की, हे देवधरांना शोभणारे नाही. त्यांचा स्वतःचा भाऊ कृष्णा याला मुंबईहून पकडून पुण्यास आणण्यात आले होते. पण मला वासुदेव कुठे आहे त्याची काहीच माहिती नाही म्हणून त्याने कानावर हात ठेवल्यावर त्याला सोडून देण्यात आले नि तो मुंबईला निघून गेला. त्यांची पत्नी जुन्नरला गेली होती हे त्यांच्या घराशेजारी राहणाऱ्या दुर्गाबाईंनी पोलिसांना सांगितले होते आणि त्यानंतर त्यांच्या पत्नीला जाच चालू होता. हे शेवटचे वृत्त कळताच वासुदेव बळवंतांना राग आला आणि ते म्हणाले, "तिला (दुर्गाबाईला) माझी बायको कुठे सापडेल हे पोलिसांना सांगण्याचं काहीच कारण नव्हतं! वेळ येताच तिला त्याची योग्य शिक्षा मिळेल." या वृत्तामुळे वासुदेव बळवंत अस्वस्थ झाले. त्यामुळे भेटण्यास आलेल्या रामोश्यांना दुसऱ्या

दिवशी दवडी जवळच्या दरीत आपणास भेटण्यास सांगूनच काय तो त्यांना त्यानी निरोप दिला.

दुसऱ्या दिवशी गुरुवारी १३ मार्चला सकाळी जवळच्या ओढ्यात स्नान करून आपल्या लोकांना ते तलवारीचे हात शिकवीत असतानाच कृष्णा साबळे त्यांना भेटण्यास आला. त्याच्या सांगण्यावरून मनाई डोंगरीवर निवास हालविण्याचे त्यांनी ठरविले. पण त्याचवेळी वाडीतून माणसे आली आणि त्यांच्यासमवेत ते वाडीला जावयाला निघाले. तेवढ्यात काही रामोशी निरोपे आले. त्यांनी बातमी आणली की, पुण्याहून पायदळाचे सैनिक त्यांच्या शोधास निघाले होते. दुपारी एकाने बातमी आणली की, ते सैनिक तेथे येऊन पोचलेही होते. आता आपण त्यांच्या वेढ्यात पडणार अशी वासुदेव बळवंतांना भीती वाटू लागली. पण ते पाहून त्यांना भेटण्यास आलेला बळवी रामोशी म्हणाला, "महाराज, तुम्ही काळजी करू नका. ही माझी गाडी घ्या. माझा गाडीवान तुम्हाला (सुरक्षित ठिकाणी) घेऊन जाईल. आम्ही पोलीस पाटलाकडून सर्व माहिती काढतो आणि नंतर रात्री किंवा उद्या सकाळी येऊन तुम्हाला सर्व कळवितो." बळवीने आपण निश्चित परत येऊ असे म्हणत त्यांच्या पायावर हात ठेवून शपथ घेतली. त्याने दिलेल्या माणसासमवेत वासुदेव बळवत आणि त्यांचे लोक पुढे निघाले. थोडे अंतर चालून गेल्यावर त्यांनी डोंगर चढण्यास सुरुवात केली. आणि पायदळाला गुंगारा देण्यासाठी पंत सचिवांच्या प्रदेशात ते उतरले. रात्री अरण्यातच राहून दिवस उजाडताच ते उघड्यावर आले.

त्यांच्या वेषामुळे ते अरण्याधिकारी असावेत असा गावकऱ्यांचा समज होई. आणि हवी ती माहिती ते त्यांना देत. सचिवांच्या प्रदेशात पहिली लूट त्यांनी हर्णे गावी मारली. तेथे पांढरपेशांची फार वसती नव्हती. गावातील वाणी लोकांच्या घरांवरच त्यांनी हल्ले चढविले त्यांच्या कोठारावर धाड घालून नारळ, मुगमुगाचे दाणे आणि इतर सामुग्री बंडखोरांनी लुटली. छापा येताच गावकऱ्यांनी आपला पैसा अडका लपवून टाकला. आणि आरडाओरडा मात्र खूप केला. त्यामुळे छापेकऱ्यांना फार लूट मिळाली नाही. यावेळी एका घरात एका बाईने आपल्या असामान्य धैर्याचे दर्शन पाहुण्यांना घडविले. तिने आपले दागदागिने आपल्या ओचात लपविले आणि रामोशी जवळ येताच ती त्यांच्यावर तुटून पडली. तिचे शौर्य पाहून वासुदेव बळवंत चकित झाले. एका स्त्रीला मारहाण करण्याची रामोश्यानी खटपट चालवलेली पाहून त्यांनी संतापाने त्यांना हात आवरण्यास सांगितले. बाई "शिव शिव" म्हणत असता तिचे दागदागिने टाकूनही त्यांनी त्याना मागे फिरण्यास लावले.

जवळच मांगदरीला आगाशे नावाचे श्रीमंत गृहस्थ रहात होते. हर्णेच्या छाप्याची बातमी आल्यावर त्यांनी सारे मांगदरी गाव प्रतिकारासाठी सिद्ध केले.

आणि संरक्षणासाठी काही पोलिसही आणून ठेवले. हे आगाशे घराणे म्हणजे सावकारी धंद्यातील आताच्या प्रसिद्ध आगाशांचे घराणे होय. वासुदेव बळवंतांच्या कित्येक धैर्यशाली, पराक्रमी छाप्यांपैकी १६ मार्चला त्यांनी केलेला मांगदरीवरील हल्ला हा सगळ्यात धैर्यशाली होता आणि विजेच्या चपळतेने चढवून यशस्वी केलेला होता. त्यासाठी वासुदेव बळवंत भर दुपारीच निघाले. त्यांनी आगाशांना निरोप पाठविला की, " आता शेतसारा तुम्ही आमच्याकडेच भरला पाहिजे आणि त्यासाठी आम्ही येत आहोत! " तेव्हा आगाशे त्यांची वाट पहात राहिले. गावकऱ्यांनी आपले दागदागिने शेतात लपवून ठेवले. काहींनी बंदुका सरसाविल्या आणि त्यांच्यापैकी काही गावाबाहेर नाक्यावरही जाऊन उभे राहिले.

वासुदेव बळवंतांची सेना गावाजवळ येताच गोळ्या झाडल्या गेल्याचे आवाज त्यांना ऐकू आले. त्या आपल्याच लोकांच्या आहेत असे आपल्या लोकांच्या पाठोपाठ जात असता ते धरून चालले. पण तेवढ्यात दौलतराव आणि त्यांचे सहकारी गोळ्या लागून दुखापत होऊन रक्तबंबाळ आणि बेभान झाल्याचे त्यांना दिसले. तेव्हा स्वतः आपल्या सैनिकांचे नेतृत्व स्वीकारून वासुदेव बळवंत पुढे झाले आणि गावकऱ्यांवर बंदुकीच्या गोळ्यांचा त्यांनी मारा केला. गावकरी हतप्रभ होऊन घरे उघडी टाकून पळून गेले. रामोश्यांनी नंतर गावातील घरांची यथेच्छ लूट मारली. या लुटीत एकूण चौदा ते सोळा सहस्र रुपयांची संपत्ती लुटली गेली. वृत्तपत्रे म्हणाली की, त्यावेळी दरोडेखोरांचा जमाव बराच होता.[८]

प्रत्यक्ष आगाशांकडे वासुदेव बळवंतांनी दोन सहस्र रुपयांची लूट मारली. पण तीसुद्धा आपल्या इष्ट कार्यासाठी ऋण म्हणून आहे असे ते समजले. आपल्या पद्धतीप्रमाणे त्यांनी आगाशांकडे नीट शांतपणे बसून गप्पा मारून ही गोष्ट स्पष्ट केली. हे पैसे आम्ही आपल्याकडून स्वातंत्र्यलढ्यासाठी कर्ज म्हणून घेतले असून स्वातंत्र्य मिळताच आपली रक्कम परत करीन, अशी आपल्या स्वाक्षरीची चिठी त्यांनी याच वेळी आगाशांना लिहून दिली! ही चिठी ऐतिहासिक महत्त्वाची म्हणून बरेच दिवस आगाशांनी जपून ठेवली होती. ती पुढे बऱ्याच जणांनी कौतुकाने पाहिली.[९]

रविवारी १७ मार्चला पुण्याजवळ खडकवासल्याच्या विस्तीर्ण अरण्यात वासुदेव बळवंत शिरले. या प्रदेशातच आता स्वतंत्र हिंदुस्थानची राष्ट्रीय प्रतिरक्षा प्रबोधिका आहे. त्या ठिकाणचे युद्धाच्या दृष्टीने असलेले वैशिष्ट्य वासुदेव बळवंतांच्या तात्काळच लक्षात येऊन ते उद्गारले, " या घनदाट जंगलात दोनशे माणसं अगदी सहज लपविता येतील! " रात्री ते तेथे थांबले. त्यांच्या आगमनाची बातमी कळताच आजूबाजूचे शेतकरी त्यांना भेटण्यास आले. त्यांच्यापुढे भाषण करताना

८ 'ज्ञानप्रकाश', दि. २० मार्च १८७९.

९ प्रा. न. र. फाटक : 'नवशक्ति', दि. २८ ऑगस्ट १९६१

इंग्रजांच्या जाचाची उदाहरणे देऊन इंग्रज सरकारविरुद्ध तुम्ही बंड करून उठले पाहिजे आणि आमची खटपट त्यासाठीच आहे, असे त्यांनी त्यांना सांगितले.

खडकवासल्याच्या अरण्यात असताना सिंहगडाची प्रचंड आकृती वासुदेव बळवंताना दिसली आणि पुढील तळ तेथे ठोकण्याचा त्यानी निर्णय घेतला. सिंह-गडचा रस्ता खडकाळ आणि कठीण चढाचा आहे. रस्त्यात पाय घसरला तर माणूस कड्यावरून कोसळूनच पडण्याची निश्चिती होती. त्यामुळे त्याचे लोक सावकाश जात होते. पण वाटाड्याने त्याना चुकीच्या मार्गाने नेले. वाटेत स्वतः वासुदेव बळवंत दोनदा घसरून पडले. आपण आता मरणार असेच क्षणभर त्याना वाटले. परंतु तेवढ्यात त्यांची घसरगुंडी थांबली. ते सिंहगडाच्या दक्षिणेस असताना एका रामोश्यास विंचू चावला आणि तो वेदनानी ओरडू लागला. इतर रामोशी त्याचे सांत्वन करू लागले की, या महिन्यात विंचवाचे विष बाधत नाही. वासुदेव बळवंत सर्वांना म्हणाले, "बंधूनो, तुम्हा कोणाचेही काही वाईट व्हावे म्हणून काही मी येथपर्यंत आलेलो नाही. आतापर्यंत सर्व समर्थ ईश्वरच आपला पाठीराखा राहात आलेला आहे आणि आताही त्यालाच आपली चिंता आहे. तेव्हा घाबरू नका." त्यांच्या या उद्‌गारांनी सर्वांना धीर आला.

१८ मार्चला सुप्रभाती सर्वजण मग रामकड्याकडे चालू लागले. वरील रामो-श्याच्या दुखापतीवर गुरु महाराजांचे (दत्ताचे) नाव घेऊन वासुदेव बळवंतानी मृत्तिका टाकली आणि बेलाचे पान बांधले. अहिरवाड्याला माणसे पाठवून त्यानी आणलेला समाचार ऐकून दोन दिवसांनी वासुदेव बळवंत वडसगावच्या वाटेवर एका गुहेत थांबले. जवळच्या कोळी गावपाटलाने त्यांच्या भोजनाची तेथे व्यवस्था केली वासुदेव बळवंतानी त्याला पैसे देऊ केले. पण ते घेण्याचे त्याने नाकारले. त्याची आपल्यावरील भक्ती पाहून वासुदेव बळवंत आनंदित झाले. २० मार्चला सायंकाळी मग हवेली तालुक्यातील सोनापूर गाव त्यानी लुटले. तेथील गावकरी छाप्याच्या भीतीने पळून गेले. त्यामुळे लुटीमध्ये त्याना कोणाचाच अडथळा राहिला नाही. त्यामुळे ती लूट घेऊन चार कोशांवरील वडसगावला रात्री ते आले.

ते आपल्या गावी आलेले कळताच वडसगावच्या पाटलाने गावात त्यांच्या जेवणाची दुसऱ्या दिवशी व्यवस्था केली. ते जेवत असता गोडवाडीचा लक्ष्मण धसवडेकर त्याना भेटण्यास आला. ते जेवत आहेत असे पाहताच तो परत आपल्या घरी गेला आणि त्यांच्यासाठी घरून दही घेऊन आला. दुपारीही ते त्याने त्यांच्या-साठी पुन्हा आणले. त्या गावात बरीच शेतकरी मंडळी त्यांना भेटण्यास आली. तेव्हा त्यांना गूळ, कपडे इ. भेटी वासुदेव बळवंतानी दिल्या.

त्या भेटीतून ते मोकळे होतात तोच त्यांना बातमी समजली की पुण्यास गेलेल्या विष्णुपंत गद्र्याना पोलिसांनी अटक केली आहे. तेव्हा मुठा नदीकाठाने

अहिरवाडी आणि कोंडवा मार्गाने ते पुण्यास जाण्यास निघाले. तेथे नदीजवळच्या गणपती मंदिरातच ते झोपले. त्यांनी नंतर गणपतीची पूजा केली. त्यांनी आपल्या लोकांची चौकशी सुरू करताच लोकांना ते कोण आहेत असा संशय आला. तेव्हा रामोशी भाषेत आपण वनविभागाचे लेखनिक असून पुण्यास जात आहोत असे सांगून त्यांनी त्यांची तशी निश्चिती पटविली. नंतर वाटेत त्यांना समजले की गद्रधाना अहिरवाडीच्या पोलीस पाटील आणि कुलकर्ण्यांनी अटक केली होती, पण इतर लोक मध्ये पडल्यावर त्यांनी त्यांना सोडून दिले. तेव्हा पुण्यास न जाता २३ मार्चला ते सिंहगडला जाण्यास निघाले.

ते सिंहगडाजवळ पोचले तेव्हा घोड्यांच्या टापांचा मागाहून येणारा आवाज त्यांनी ऐकला. त्यांनी वळून पाहिले तो बरेच घोडेस्वार आणि शिपाई त्यांच्या बाजूला दौडत येताना त्यांना दिसले. तेव्हा रस्त्यालगतच्या झाडाआड होऊन त्यांनी ते संकट टाळले. घोडेस्वार निघून गेले. आपण ज्याच्या शोधात आहोत तो बंडखोरांचा पुढारी येथेच बाजूला दबा धरून आणि श्वास रोखून उभा आहे, हे त्यांना माहीत नव्हते ! ते निघून गेल्यावर वासुदेव बळवंत रस्त्यावर आले आणि मग सिंहगडला पोचले. तेथे आपल्या काही लोकांचा त्यांनी शोध घेतला आणि एकाला काही पैसेही दिले. नंतर पुण्याला जाण्यासाठी ते निघाले. गोरा येथे आल्यावर ते एका नावेत बसले आणि अंगळे येथील देवाल्यात उतरले. तेथेच ते मग झोपले.

दुसऱ्या दिवशी २४ मार्चला सकाळीच ते पुण्यास जाण्यास निघाले. नदीवर येताच कोटवाडीच्या गणोबा फाळकेसमवेत कोटवाडीचे धनगर त्यांना भेटले. त्यांच्यापुढे भाषण करताना इंग्रज सरकारने त्यांचा कसा नाश केला आहे ते सांगून वासुदेव बळवंत म्हणाले, "तुम्ही जर हिंदुस्थानातील ब्रिटिश सत्तेचा नाश करण्यात मला मदत केली नाहीत, तर तुम्हाला सुख लाभणार नाही. माझ्या कार्यात तुम्ही जर मला मदत केली नाही, तर एकदा रागावलेलं इंग्रज सरकार तुमच्या मुलाबाळांचं तळपट केल्याशिवाय राहणार नाही !"

या गावाच्या पलीकडील टेकडीवर वासुदेव बळवंत पूर्व संकेताप्रमाणे आपल्या लोकांना पुन्हा जाऊन मिळणार होते. त्या लोकांनी दोन धनगर वाटाडे त्यांच्या आगमनाची बातमी आणण्यासाठी ठेविले होते. पोलीस दिसलेच तर आमच्या घऱ्यास एखाद्या रुग्णाईत धनगराप्रमाणे पालखीत घालून आणा, अशी त्यांनी त्यांना कडक चेतावणी दिली होती. वाटाड्यांनी वासुदेव बळवंत भेटताच त्यांना आपल्या घरी नेले. त्यांनी त्यांना ताज्या मधुर दह्याचा उपहार दिला आणि त्यांचे चांगले स्वागत केले. त्या पदार्थाचा स्वाद घेताना वासुदेव बळवंतांना अत्यंत समाधान वाटले. नंतर धनगरांपुढे भाषण करताना ते म्हणाले, "ब्रिटिश सरकार

उलथून पाडण्यासाठीच माझी सारी खटपट चालली आहे. आणि त्यासाठी मी फार परिश्रम आणि हालअपेष्टा सोसल्या आहेत. जर हे सरकार उलथून पाडण्यात मला यश आलं, तर तुमची इनामं तुमच्याकडेच कायमची राहतील !"[१] तेवढ्यात काही सरकारी अधिकारी त्यांच्या मागावर आलेले त्याना दिसले. त्यांना ठार मारण्याचे त्यांच्या मनात आले. पण स्थानिक लोकांना त्याचा मग त्रास होईल म्हणून सरकारी अधिकाऱ्यांना चुकवून ते गावाबाहेर शेतात लपले.

या धनगरांमध्ये वासुदेव बळवंताविषयी फार आदर उत्पन्न झाला. "या धनगर लोकांसारखे विश्वासू लोक मी दुसरे पाहिले नाहीत," असे वासुदेव बळवंतांचेही त्यांच्याविषयी मत झाले. त्या धनगरांच्यात आणि कुणबी लोकात भांडण होते. त्याचा निवाडा करण्यासही दौलतरावांच्या धनगरानी 'महाराजांना' विनंती केली.

भोर संस्थानाच्या आणि ब्रि. हिंदुस्थानच्या सीमेवर ते फिरत असताच, २५ मार्चला केळेवाडीला जेवण करीत असताना आपल्या मागावर पोलीस येत आहेत, असे त्याना समजले. तेव्हा ते जवळच्या डोंगरात निघून गेले. वाटेत त्याना पायदळातल्या ५०।६० सैनिकांची एक तुकडी २०।२२ घोडेस्वारासह आपल्या मागावर जाताना दिसली. त्यामुळे वाटेवरच्या चौकीवर हल्ला करण्याचा विचार त्यांनी सोडून दिला.

वाटेत देवी येथे कोळी गावकऱ्यानी दुधसाखरेसह त्यांच्या भोजनाची व्यवस्था केली. त्यांना केळ्याचाही उपाहार दिला. गावच्या रामोश्याने सांगितले की, "काहीही भीती न वाळगता तुम्ही आमच्या डोंगरावर येत जावं!" तेथेच रात्र काढून २९ मार्चला वासुदेव बळवंत जानेगावला पोचले. जानेगावच्या पोलीस पाटलांनेच त्यांच्या जेवणाची सोय केली. जानेगावचे जंगल अतिशय दाट होते. आणि तेथे गुप्तपणे अगदी निर्भयपणे चारआठ दिवसही राहता येणारे होते. तेथे निरोप पाठवून शेतकऱ्याचा आणि खेडूताचा मोठा जमाव गावपाटलाने जमवला होता. त्यांच्यापुढे भाषण करताना वासुदेव बळवंत म्हणाले, "आईबापाचे (आपल्या) मुलासंबंधी काय कर्तव्य असत? तेच माझ्यासंबंधी तुम्ही ठेवा. लहान मूल आईबापांच्या मदतीवर अवलंबून असतं. ते लहानपणीच काही दोन मणाच वजन उचलू शकत नाही. पण पंचवीस वर्षांच्या माणसाला ते सांगा? तो ते सहज उचलू शकेल. परंतु ते मूल पचवीस वर्षांचं व्हायला बराच काळ लागेल. तशीच सध्या माझी स्थिती आहे. मी लहान मूल आहे. आईबाप ताप, थडीवारं आणि रोगापासून मुलाचं रक्षण करतात. आणि त्याच्याकडून वृद्धापकाळी मदतीची अपेक्षा करतात. मुलंही आपल्या आईबापाच्या म्हातारपणात आपल्या कर्तव्याला जागून त्याना मदत करतात. तेव्हा तुम्ही जर आईबापांप्रमाणे मला आपलं मूल समजून मदत केली, तर मीही आईबापां-

[१] वासुदेव बळवंतांची दैनंदिनी, दि. २४ मार्च १८७९

विषयीचं कर्तव्य म्हणून इंग्रज सरकारचं राज्य उलथून पाडल्यावर तुम्हाला मदत करून तुम्हाला याचं बक्षिस देईन. पण तुम्ही जर आज मला मदत केली नाही, तर आज तुमचा छळ करणारं इंग्रज सरकार तुमचा समूळ नाश केल्यावाचून राहणार नाही." [११] त्यांचे म्हणणे पटून जमलेले खेडूत त्यांना म्हणाले, "तुम्ही जेव्हा जेव्हा या जंगलात याल, तेव्हा तुम्ही काहीही भीती न बाळगता अगदी मोकळेपणाने इकडे या."

त्यांची मने अशी प्रक्षुब्ध केल्यावर वासुदेव बळवंतांनी सावरगाव गाठले. तेथे तेथील लोकांकडून त्यांनी शेतसाऱ्याची मागणी केली. परंतु गावकरी तो स्वेच्छेने देईनात! तेव्हा ते गाव लुटण्याची वासुदेव बळवंतांनी आपल्या लोकांना आज्ञा दिली. त्यांचे सहकारी त्या गावावर तुटून पडले. त्यामुळे गावात हलकल्लोळ उडाला. तेव्हा गावच्या स्त्रिया वासुदेव बळवंतांपुढे आल्या आणि आपल्या अंगावरचे दागिने त्यांनी त्यांना देऊ केले. पण "स्त्रियांचे धन त्यांना वमनासमान असल्यामुळे" त्यांनी ते घेण्यास नकार दिला. कारण, स्त्रियांचे दागदागिने लुटण्याचा त्यांना नेहमी तिटकारा असे. त्यांची आणि दौलतरावाची आपल्या लोकांना सक्त चेतावणीच होती की छापे घालताना स्त्रियांचे दागदागिने कोणीही लुटता कामा नयेत [१२] आजपर्यंत ज्याच्या नावाची अमर्याद भीतीने त्यांची गाळण उडाली होती, त्या या बंडखोर पुढाऱ्याची ही वागणूक पाहून त्या स्त्रियांना मोठे आश्चर्य वाटले आणि त्यांच्याविषयी आदर वाटला.

तथापि गावच्या पोलीसपाटलाला आणि गाव पाटलाला पकडून आणून गावातील बनिये कुठे आहेत म्हणून त्यांनी त्यांना विचारले. परंतु त्यांनी थापाथापी सुरू केली. ते जेव्हा निश्चित माहिती सांगत ना, तेव्हा त्यांची नाके कापण्याचाच वासुदेव बळवंतांनी आपल्या लोकांना आदेश सोडला. तेवढ्यात एक गावकरी पुढे येऊन म्हणाला, "हा, पहा! या गल्लीत कोण आहे ते पाहा!" त्या पाटलांनीही मग ज्या घरात दोन बनिये लपले होते ते घर दाखविले. तेव्हा रामोश्यांनी बनियांना अटक करून बाहेर काढले. "तुमच्याजवळ काय असेल ते देऊन टाका," असे वासुदेव बळवंतांनी त्यांना सांगितले. पण त्यांनी ते केले नाही. तेव्हा पांडू रामोश्याने त्यांना मारण्यास सुरुवात केली. त्यांची ती कुतरओढ पाहून गावकऱ्यांना आनंद झाला. त्यांपैकी नामा नावाच्या बनियाने आपल्यावर फार जुलूम केला आहे असे म्हणून "त्याचा तुम्ही सूड घेतलात तर आमच्यावर तुमची मेहेरबानी होईल," असेही गावकरी वासुदेव बळवंतांना म्हणाले.

त्या बनियांना शिक्षा करून बंडखोर परत जाणार तोच नामाच्या कागद-

---

११ वासुदेव बळवंतांची दैनंदिनी दि २९ मार्च १८७९

१२ "दौलतराव आणि वासुदेव बळवंत यांची ठाम आणि सक्त आज्ञा होती की, स्त्रिया आणि लहान मुलांच्या अंगावरचे दागिने (लुटीमध्ये) कधीही घ्यावयाचे नाहीत." पळस्पे लुटीच्या अभियोगातील मुख्य आरोपी उम्या तुकाराम यांची पहिला वर्ग दंडाधिकारी एफ सी. कॅंपबेल यांच्यापुढील स्वीकारोक्ती दि २२ मे १८७९.

पत्रांची गावकऱ्यांनी वासुदेव बळवंतांना आठवण केली. तेव्हा त्यांनी त्यांचे सारे कागदपत्र बाहेर आणले. त्यात ऋणभाराचे पुरावे, हिशेबाच्या वह्या इ. कागद होते. त्यांना आग लावण्यास वासुदेव बळवंतांनी आपल्या लोकांना सांगितले. त्यांनी तसे केले. ती आग पाहून गावकरी आनंदाने नाचू लागले. त्यांना त्याच आनंदात सोडून वासुदेव बळवंत एका डोंगरदरीत निघून गेले.

तेथे ते पोचले, तेव्हा उन्हाचा कडाका फार भासत होता. तेव्हा झाडांच्या फांद्या छाटून आणून त्यांची त्यांनी सावट उभारली. जंगलातील धनगरांनीच त्यांना भाकरी, दूध इ. जेवण आणून दिले आणि पिण्यास पाणीही दिले. त्याचा समाचार घेत असतानाच आपल्या लोकांनी मिळविलेल्या पोलिसांच्या हालचालीचे वृत्त त्यांनी ऐकले. नंतर डोंगरवाटेने ते पुसानाच्या जंगलात पोचले. पुसानाच्या जंगलात त्यांना कळले की, चांदखेडचे हरि वाणी, तुकाराम आणि विठू तेली हे फार पैसेवाले आहेत. तेव्हा त्यांची घरे दाखविणाऱ्या वाटाड्याची व्यवस्था करून ३० मार्चला ते चांदखेडला निघाले. त्या आडरस्त्यावर धनगरांची घरे होती. वासुदेव बळवंतांच्या पथकाच्या आगमनाचे आवाज ऐकून ते घराबाहेर आले. त्यांना अभय देत वासुदेव बळवंत सकाळी चांदखेडला पोचले. अरण्यात राहून ३१ मार्चला रात्री चांदखेडवर त्यांनी हल्ला चढविला. वाटाड्यांनी त्यांना घरे दाखविली. पाहुण्यांनी त्या घरांवर चढाई केली. आणि मारहाण न करताच गावातील संपत्ती बंडखोरांच्या हातात पडली. चांदखेडची चांदण्या रात्री वासुदेव बळवंतांनी मारलेली ही लूट कित्येक सहस्र रुपयांची होती. ती घेऊन तासाभरात वासुदेव बळवंतांनी चांदखेड सोडले.

वासुदेव बळवंतांचा दुखावलेला पाय चांदखेडहून परत जाताना वाटेत ठेचा लागून आणखी ठणकू लागला. त्याचा परिणाम म्हणून त्यांना तापही आला. गोपाळराव साठे यांचे पायही वाटेत पडल्यामुळे दुखू लागले. आणि त्यांनाही दुखापती झाल्या. चांदखेड लुटल्यावर थोडी विश्रांती घेण्याचे वासुदेव बळवंतांनी ठरविले. त्यांच्या सेनेतील बहुतेकजण आपल्या माणसांना भेटण्यासाठी घरी निघून गेले. दौलतरावांशी विचारविनिमय करून त्यांचाही त्यांनी तात्पुरता निरोप घेतला. आणि ते वाटेतच विसाव्यासाठी थांबले. त्यानंतर घडलेल्या घटनांमुळे वासुदेव बळवंतांना डोंगराळ प्रदेशांतील आपल्या वास्तव्याचा त्याग करावा लागला. आणि त्यांच्या उठावणीच्या इतिहासाचे एक नवे पान उघडले गेले.

# प्रकरण १० वे

## वासुदेव बळवंतांची उत्थानसेना

"त्यांचे अनुयायी शेतकरी वर्गातील निम्नस्तराचे लोक होते. पण ते काटक आणि धीट होते. ज्यावेळी कामधंदा दुर्मिळ होता अशा काळात मिळणाऱ्या लाभाच्या आशेने ते उद्युक्त झाले होते. तरी पण छायेप्रमाणे अस्तित्व भासणाऱ्या आणि काहीशा गूढ अस्तित्वाच्या आपल्या नेत्याच्या हाकेला मधाच्या पोळ्याभोवती घोंघावणाऱ्या मधमाश्यांप्रमाणे ज्या सहजसिद्धतेने ते 'ओ' देत असत ती सिद्धता, बऱ्याच खेड्यातील लोकांची उदासीनतेची आणि असमाधानकारक वागणूक आणि वरच्या वर्गातील लोकांमध्ये असणारी आणि कधी कधी अगदी उघडपणे प्रदर्शित करण्यात येणारी सहानुभूती या गोष्टी, ज्यांचा आम्ही नीट विचार करावा, अशाच गोष्टी होत्या."[1]

—सर रिचर्ड टेंपल
(मुंबईचे तत्कालीन राज्यपाल.)

१८७९ च्या फेब्रुवारी आणि मार्चमध्ये वासुदेव बळवंतांच्या नेतृत्वाखाली पडलेल्या लुटीच्या छाप्याचे खरे स्वरूप ओळखण्यासाठी सगळा हिंदुस्थान देश धडपडू लागला. छाप्यांच्या वेळी वासुदेव बळवंतांनी लोकांना दिलेल्या आश्वासनांमुळे हे छापे राजकीय स्वरूपाचे होते, या समजुतीची छटा दाट झाली. मुंबईच्या राज्यपालांना त्यांचे उद्दिष्ट अचूक कळून आले. ते म्हणतात:

" 'The crime of dacoity being merely robbery would be ordinarily regarded as a deed of violence and nothing more. But in Deccan which is the heart of the country, it is apt to assume a political significance. It was the weapon

---

1 "Their ignorant followers, peasants of humble caste but of hardihood and courage, were actuated by the hopes of gain in times, when employment and labour had proved scanty. Still the readiness with which they answered the mandate of their shadowy and half-mysterious chief like bees hiving, the apathetic and unsatisfactory behaviour of the people in many villages, and the sympathy known to be *felt* if not openly evinced, by many of the upper classes were grave circumstances demanding reflection on our part."

सर रिचर्ड टेंपल : "मेन अँड इव्हेंट्स् ऑफ माय टाइम इन इंडिया," पृ. ४७०

whereby the Mahrattas of the old encountered their Muhammedan conquerors and with which they would encounter the British tomorrow, if they had the chance...... There is move of national feeling in the peasantry there than elsewhere." [२]

("दरोड्याचा अपराध केवळ एक चोरीच असल्यामुळे सामान्यतः तो एक अत्याचाराचे कृत्य म्हणूनच मानला जाईल ; अधिक काही नाही. देशाचे हृदयच असलेल्या दख्खनमध्ये मात्र त्या गोष्टीला राजकीय स्वरूप येणे हे साहजिक असते. मागील काळातील मराठ्यांनी आपल्या मुसलमान जेत्यांना त्या शस्त्राने तोंड दिले आणि त्याना मोका मिळाला तर ब्रिटिशाशी उद्या ते त्याच शस्त्राने लढतील... तेथील शेतकरी वर्गात इतर कोणत्याही ठिकाणच्या शेतकरी वर्गापेक्षा राष्ट्रीय भावना अधिक जागृत आहे. ") आता 'टेंपल कलेक्शन' नावाच्या त्यांच्या पत्र-संग्रहातून जे कागदपत्र प्रसिद्ध झाले आहेत, त्यात त्या वेळचे राजप्रतिनिधी लॉर्ड लिटन याना टेंपल यानी लिहिलेली दोन सविस्तर पत्रे आहेत. त्यात ते म्हणतात :

"What could have been Wasudeo Bulwant's design? Many think he was crazed. This idea is not safe. There may have been method in his madness." [१]

("वासुदेव बळवंतांचे उद्दिष्ट काय असणे शक्य असेल ? कित्येकांना वाटते की, ते वेडे होते. पण ही समजूत चांगली नाही. त्यांच्या वेडातही एक प्रकारची पद्धत असेल. ") हे छापे फक्त जनतेचे वित्त आणि मत्ता यानाच हानि-कारक होते असे नाही. तर सरकारी सत्तेलाही त्यांच्या रूपाने आव्हान मिळालेले होते. त्यांच्या त्या उठावणीचे हे गंभीर स्वरूपच या प्रकरणाच्या सुरुवातीला दिलेल्या मुंबईच्या राज्यपालाच्या शब्दात प्रतिबिंबित झालेले आहे.

वासुदेव बळवंताच्या सेनेतील बहुतेक लोक गरिबीने आणि उपासमारीने हैराण झालेले होते. त्यांच्या अवदशेला इंग्रज सरकारच उत्तरदायी होते ही गोष्ट वासुदेव बळवंतानी त्यांना स्पष्ट करून सांगितली होती. त्यामुळे त्यांच्यापैकी कित्येकजण लवकरच मनानेही इंग्रजाच्या राजसत्तेविरुद्ध ज्वलंत द्वेषाने जळफळू लागले. अशा लोकात वासुदेव बळवंत ज्यांना सरदार दौलतराव नाईक म्हणून गौरवाने म्हणत त्यांचा समावेश होता.

दौलतराव मूळचे पुण्याजवळच्या कोरेगावच्या जंगलातील. ते तेथे इतर रामो-श्यांप्रमाणेच स्वतंत्र वृत्तीचे जीवन जगत होते. ते त्या वेळी विशीच्या घरात भर तारुण्यात होते. त्यांची आत्मविश्वासपूर्ण वागणूक, काळपाभोर मुद्रेवरील तीक्ष्ण

२ सर रिचर्ड टेंपल : "मेन अँड इव्हेंटस ऑफ माय टाइम इन इंडिया" पृ. ४९९

१ सर रिचर्ड टेंपल यांचे लॉर्ड लिटन याना पत्र (गोपनीय) दि. ३ जुलै १८७९

आणि भेदक तेजस्वी डोळे. आणि आडदांड पिळदार देह पाहताच, वासुदेव बळवंतांनी त्यांची आपल्या लढाऊ पथकात भरती केली.

कोरेगाव सोडल्यावर निरनिराळ्या ठिकाणी राहात ते लोणीस आले आणि वासुदेव बळवंताची त्यांच्याशी भेट झाली. त्यांच्या बंडखोर वृत्तीची धार वासुदेव बळवंतानी सातत्याने प्रतिपादन केलेल्या राजकीय बंडाच्या विचारांनी अधिक तीक्ष्ण झाली. आणि त्याना ढोबळ परंतु एका देशाभिमानी ध्येयप्रणालीने शेवटी भारून टाकले. वासुदेव बळवंत कित्येकदा त्यांच्याकडे त्यांच्या झोपडीत जाऊन राहात आणि सुटीचा काही काळ घालवीत. अशा एका भेटीतच कोरेगावच्या युद्धस्तंभापुढे ते गेले. तो स्तंभ १८१८ मध्ये इंग्रजांच्या बाजूने लढलेल्या सैनिकांचे स्मारक म्हणून इंग्रजांनी उभारलेला आहे. ते स्मारक खरे म्हणजे इंग्रजाना देश विकणाऱ्या लोकांचे आहे. हे त्यांचे खरे स्वरूप वासुदेव बळवंतांनी दौलतरावांना समजावून दिले. वडील माणसे त्यांना 'दौलत्या' या नावाने हाक मारीत. पण त्यांचे आपल्या लोकांमधील महत्त्वाचे स्थान पाहून वासुदेव बळवंत त्याना सरदार दौलतराव नाईक असे म्हणत! वासुदेव बळवंतानी त्याना बंदुकीने आणि पिस्तुलाने निशाण मारण्याचे, दांडपट्टा फिरविण्याचे इ. शिक्षण दिले. 'साहेबा'ला आपल्या देशातून हाकून लावण्यासाठी आपणास बंड करावयाचे आहे हे ध्येय त्यांच्या मनावर आता ठसले. वासुदेव बळवंताना दौलतरावही 'महाराज' म्हणून संबोधीत. एकदा वासुदेव बळवंताना येऊन मिळाल्यावर दौलतरावानी त्याना कधी सोडले नाही. आणि रणांगणातच शेवटी लढता लढता त्यांनी देह ठेवला.

वासुदेव बळवंताच्या लढाऊ सेनेत भरती झालेल्या लोकांची संख्या तीनशेवर होती. त्यात रामोशी, कुणबी, मांग, कोळी, धनगर, चांभार आणि ब्राह्मण असे सर्व थराचे लोक होते. पहिल्यांदा त्यांच्यात काही परदेशी आणि मुसलमानही होते. परंतु त्यांनी लवकरच ते सैन्य सोडले. त्यांच्या उठावणीच्या वृत्तातात चमकणाऱ्या निरनिराळ्या जातीची ही नावेच पहा ना! पिलाजी रामोशी, कुशाबा साबळे, रामा कोळी, गणोबा फाळका, कोंडाजी न्हावी, सखाराम महार, बाबाजी चांभार, कोंडू मांग!

वासुदेव बळवंतानी ज्या खेडेगावांना भेटी दिल्या त्या गावांच्या जवळजवळ सर्व वतनदार पाटलांना त्यांच्या उठावणीविषयी सहानुभूती होती. उदाहरणार्थ लोणीचे बाबाजी आणि जानराव शिंदे, पुरंदरचे कुशाबा पाटील, सोनुरीचे राघोजी पाटील आणि राजेवाडीचे घोडी पाटील! काही वेळा लोणीच्या शिंद्यांच्या संबंधात घडले, त्याप्रमाणे या घराण्यातील आजा, बाप आणि मुलगा असे एक किंवा दोन पिढ्यांचे लोकही त्या उठावणीत सहभागी होते. या कुटुंबातील स्त्रियानीही वासुदेव बळवंतांच्या आणि त्यांच्या लोकांच्या भोजनाची व्यवस्था करून किंवा त्यांचे निरोप योग्य ठिकाणी पोचवून त्यांना साहाय्य केले.

पुणे आणि इतर गावच्या वासुदेव बळवंतांच्या पांढरपेशा सहकाऱ्यांनीही त्यांच्या उठावणीत भाग घेतला. ते तर त्या ध्येयासाठी आपल्या घरावरच तुळशी पत्र ठेवून बाहेर पडले होते. त्याच्यामध्य गोपाळ मोरेश्वर साठे आणि विष्णु विनायक गद्रे हे प्रमुख होते.

गोपाळ मोरेश्वर साठे हे शेवटपर्यंत वासुदेव बळवंतांसमवेत राहिले. ते मूळचे त्या वेळच्या भोर संस्थानातील जांभूळपाड्याचे राहणारे. परंतु पुण्यास वारवार जात. तेथे वासुदेव बळवंतांशी त्याची घनिष्ट मैत्री जमली. वासुदेव बळवंताप्रमाणेच ते बळकट शरीरयष्टीचे आणि आडदांड वृत्तीचे होते. तेही ज्वलंत ध्येयनिष्ठेचे होते. आणि वासुदेव बळवंतांचे सहकारी होऊन आयुष्यातील आपल्या सुंदर भविष्य-काळाचा त्यांनी होम केला. उंचीने ते ठेंगणे होते. त्याचा वर्ण गोरा होता आणि त्यांच्या तोंडावर देवीचे अस्पष्ट वण होते. बडासाठी बाहेर पडल्यावर त्यांनी तुरळक दाढी राखली होती. ते अंगात अंगरखा घालीत. आणि डोक्याला लाल फेटा बांधीत. साठ्यांनी उत्कर्षाच्या आणि अपकर्षाच्या अशा दोन्ही काळात आपल्या नेत्याला साथ दिली.

विष्णु विनायक गद्रे हे पुण्याजवळच्या खेड या गावाचे रहिवासी होते. सरदार भगतसिंगाचे सहकारी शिवराम हरी राजगुरू यांच गावचे होत. प्राथमिक शिक्षणा-नंतर ते पुण्याच्या प्रशिक्षण महाविद्यालयात (ट्रेनिंग कॉलेजात) शिक्षण घेऊ लागले. पुण्यास वासुदेव बळवंतांच्या सान्निध्यात येताच त्यांच्या क्रांतिकारक विचारा-च्या प्रतिपादनामुळे ते क्रांतिकटाच्या सदस्याच्या उत्साहाने सक्रिय बंडखोर बनले. गद्रे उंच आणि सडपातळ होते. आणि अजून विशीजवळच रेंगाळत होते. त्यांनीही वासुदेव बळवंतांच्या महत्वाकांक्षी योजनेत आपल्या वैयक्तिक सुखाची होळी केली. त्यांनी वासुदेव बळवंतांच्या गुप्त संस्थेतच युद्धकलेचे शिक्षण घेतले. ते शूर आणि धैर्यवान होते. मांगदरीवरील हल्ल्यात त्यांनी फक्त आपल्या लाठीने आपल्या प्रति-स्पर्ध्यांना आपल्या तलवारी टाकून देण्यास लावले होते. वासुदेव बळवंत पकडले गेल्यावर आणि बंड फसल्यावर गद्रे अज्ञातवासात निघून गेले. परंतु ब्रि. सरकार-जवळ त्यांनी कधी क्षमेची याचना केली नाही. सितारामय्या गोकाक हा वासुदेव बळवंतांचा स्वयपाकी होता. तो बनेश्वरचा राहणारा. तेथे तो प्रार्थनेत वेळ घाल-वीत असे. वासुदेव बळवंताची गाठ पडल्यावर तो त्याच्यासमवेत बंडाच्या खटपटी-वर निघाला. तो कानडी होता. त्याचा वर्ण काळा होता आणि तो बडबड्या स्वभावाचा होता. तो असला म्हणजे वासुदेव बळवंतांना आपल्या स्वयंपाकाची आणि जेवणाची चिंता नसे. वासुदेव बळवंत कित्येकदा पकडून आणलेल्या गाव-पाटलाकडून शिधा घेत आणि इतर वेळी उघड बाजारात धान्य सामुग्री विकत घेत. गणेश कृष्ण देवधर हे वीस वर्षांचे असून विद्यार्थी होते. लोणी येथील प्रारंभी-च्या बंडखोरांच्या संमेलनालाही ते उपस्थित होते. पण धामारीच्या पहिल्याच

लुटीनंतर त्याना अटक झाली. आणि नंतरच्या अभियोगात एक महिन्याची सश्रम कारावासाची शिक्षा झाली. गोपाळ हरी कर्वे हेही वरील प्रसंगी उपस्थित होते. आणि त्या रात्री वासुदेव बळवंत पुण्यास गेले तरी ते लोणीसच राहिले. त्यांनीही पहिल्या पहिल्या सगळ्या छाप्यांत पुढे भाग घेतला. भास्कर जोशी हे ज्योतिषी होते. त्यामुळे त्यांचे नावही पुढे भास्कर ज्योतिषी असे पडले. छाप्याच्या वृत्तांतात त्यांचे नाव कधी आढळत नाही, तरी ते एक धूर्त राजकारणी होते. वासुदेव बळवंतांच्या लांबलांबच्या दीर्घसूत्री योजनांमध्ये ते त्यांचे विश्वासाचे हस्तक म्हणून काम करीत आणि बंडाला सहाय्यभूत होण्याचा संभव असणाऱ्या दूरवरच्या आणि मोठ्या पदावरच्या लोकांना, संस्थानिकांना आणि प्रख्यात पुरुषांना भेटून त्यांच्याशी घाटाघाटी करीत. बंडाच्या प्रपंचात भाग घेतला, म्हणून त्यांनासुद्धा आपले सर्वस्व गमवावे लागले. पुण्याचे आणि दुसऱ्या ठिकाणचे बरेच तरुण लोक वासुदेव बळवंतांच्या गुप्त संस्थेचे सदस्य होते. एकदा बंड फसल्यावर ते अज्ञातच राहिले. या उत्थान सेनेचे शिंग फुंकणारा एक बुरूड शिंगवाला होता. काही वेळा बदल म्हणून तो शंखही वाजवीत असे. प्रथम त्या सेनेत दोन उत्तम घोडे होते नंतर मात्र सर्व पायदळच तीत राहिले.

बंडखोराच्या पेशाला सोयीचा पडेल असाच आपला वेष वासुदेव बळवंतांनी ठेवला. ते धोतर नेसले असले तर काचा मारीत आणि उपरण्याची घडी छातीवर लपेटून घेत. परंतु धावपळीच्या आयुष्यक्रमात सोयीस्कर म्हणून त्यांनी पुढे सुरवार आणि मुटमुटीत लहान अंगरखा वापरण्यास सुरुवात केली त्यांनी जटा वाढविल्या, आपले रुंद ओठ झाकून टाकणाऱ्या भरपूर मिशा राखल्या आणि गालावर कल्ले ठेवून दाढी राखली. ते सुपीत आले म्हणजे कानात रुद्राक्षाची कुंडले घालीत. आणि गळ्यात रुद्राक्षाची माळ. प्रवासात केसभार आटोक्यात ठेवण्यासाठी ते डोक्याला फेटाही बांधत. आपली आवडती तलवार ते नेहमी जवळ बाळगीत. तिच्या मुठीवर मौल्यवान लाल बसविलेले होते. आणि तिचे पोलादी पाते अत्यंत पाणीदार होते. त्यांची भरलेली बंदूक किंवा रिव्हॉल्वर त्यांच्या निकटच्या सहकाऱ्याजवळ सिद्ध असे. दांडपट्टा तर त्यांचे आवडते शस्त्र असे. दोन दांडपट्टे ते नेहमी जवळ ठेवीत. अटक होण्यापूर्वी वेळ पडली तर वैयक्तिक द्वंद्वयुद्धात उपयोगी पडतील अशी शस्त्रे त्यांच्याजवळ होती.

अशा ऐश्वर्यात आणि पोषाखात आणि शस्त्रांच्या वैभवात त्यांच्या विलोभनीय व्यक्तिमत्वाभोवती निराळेच तेजोवलय झळकू लागले.[4] त्यांची उंची असाधा-

---

4"Vasudev Phadake was Koknastha Brahmin of Shirdhon, a stoutly made man, above 6 feet high."
("वासुदेव फडके हा शिरढोणचा कोकणस्थ ब्राह्मण असून दणकट शरीरयष्टीचा आणि जवळ जवळ ६ फूट उंच होता.") कमिशनर ऑफ सेंट्रल डिव्हिजन पोलीस रिपोर्ट फॉर 1879; पृ. ९

रण म्हणजे पाच फूट दहा इंच होती. भरदार छातीमुळे आणि निर्भय भाषणांमुळे त्यांची आकृती अधिक आकर्षक दिसे. इंग्रज सत्ताधाऱ्याविरुद्ध ते त्वेषाने बोलू लागले म्हणजे त्यांच्या तेजस्वी भेदक दृष्टीच्या डोळयांमधून संतापाचे अंगार उडू लागत. नव्या योजनांच्या विचारात आणि चिंतेत ते गढून गेले म्हणजे त्यांच्या रुंद कपाळावर सुस्पष्ट आठया उमटत. पण गरीब जनतेच्या आणि देशबांधवांच्या हाल अपेष्टांची ते चिकित्सा करू लागले म्हणजे त्यांच्या मुद्रेवर अनुकंपा आणि दया यांची छटा पसरत असे. त्यांच्या कीर्तीमुळे छलग्रस्त जनतेत त्यांच्या नावाचा एक प्रकारच्या जादूप्रमाणे प्रभाव पडे आणि वेळ पडली तर साहेबांशी 'महाराज' आपल्यासाठी मरेपर्यंत लढण्यास मागेपुढे पाहाणार नाहीत, असे वाटून त्यांच्यावर त्यांच्या सहकाऱ्यांची गाढ भक्ती बसली.

वासुदेव बळवंताच्या अनुपस्थितीत सरदार दौलतराव नाईक त्यांच्या सेनेचे नेतृत्व करीत. लुटीमध्ये मिळणाऱ्या पैशानेच आपल्या युद्धाच्या नसा त्यांच्या हातात येत. मिळणारी सर्व लूट अगदी न चुकता नियुक्त मनुष्याला देऊन टाकण्याचा सक्त आदेश रामोश्यांना होता. आपले बंड ही नैतिक अधिष्ठान असलेली उठावणी आहे, अशी वासुदेव बळवंतांची निष्ठा होती, त्यामुळे त्यांनी आणि दौलतरावांनी रामोश्यांना कटाक्षाची आज्ञा दिली होती की, छाप्यांमध्ये स्त्रियांवर अत्याचार होता कामा नयेत. त्यांना आणि मुलांना त्रास पोचता कामा नये. त्यांचे दागदागिने कोणी कधी घेता कामा नये. लुटीच्या पैशानेच आपल्या लोकांना लागणारी शस्त्रे नि दारूगोळा ते विकत आणत.

सेनेतील सर्व लोकांना दर पंधरवडयास वेतन देण्यात येई. त्यांच्यात बंदूकधारी, तलवारवाले, गोफणवाले आणि लाठी चालविणारे असे वर्ग होते. आणि त्यांना महिना सोळा रुपयांपासून चार रुपयांपर्यंत वेतन मिळे. १८७९ मध्ये हे वेतन चांगलेच समजले जात असे.

पुण्यात असतानाच वासुदेव बळवंतांनी दऱ्याखोऱ्यांची आणि सातारा, पुणे, नगर, सोलापूर, ठाणे, कुलाबा इ. जिल्ह्यातील आणि भोर संस्थान आणि निजामचे राज्य यातील रस्त्यांची, आडवाटांची आणि गावांची माहिती आणि त्या प्रदेशांचे आलेख (नकाशे) मिळविले होते. प्रांतातील श्रीमंत लोकांची एक टिपणीच त्यांच्याजवळ होती. ह्या सर्व माहितीमुळे पोलीस किंवा सैन्य आपल्या मागावर आहेत असे कळताच, ते त्यांच्या हातून निसटत आणि दऱ्याखोऱ्या पार करून आपल्या पाठीवरील लोकांना नकवून सोडीत. लुटलेली संपत्ती गुप्तपणे काही ठिकाणी नेऊन ठेवण्याचा किंवा काही विश्वासाच्या लोकांजवळ ठेवण्यास देण्याचा वासुदेव बळवंतांचा प्रघात असे. पुण्यात त्या वेळेला राजिन्याच्या विहिरीपलीकडे थेट पर्वतीपर्यंत ओसाड जागाच होती. त्या बाजूने वाहणाऱ्या अंबिल ओढयाच्या काठाकाठाने पुण्याच्या ठिकाणी निमडुंगाच्या झुडपात, दागदागिने पुरल्यावर त्यांची

खराबी होऊ नये म्हणून त्यांच्या भोवती संरक्षक वेष्टनाची व्यवस्था करून ही संपत्ती त्यांनी ठेवलेली होती, आणि मागे उल्लेख केलेल्या त्यांच्या विश्वासातील सीताराम गोडबोल्यांवाचून दुसऱ्या कोणास त्या जागा विशेष माहित नव्हत्या अशी समजूत होती.[५] अशा लुटीतील दागदागिन्यांची व्यवस्था श्रीमंत सावकारच गुप्तपणे सहजरीत्या करू शकतात. त्यांचे पैसे देऊन टाकणे त्यांना शक्य असते. त्यामुळे पुण्यातील काही सावकारांकडेही अशी लूट वासुदेव बळवंतांनी ठेवली होती अशी पुण्यात समजूत होती. अप्पाराव वैद्याकडेही असा व्यवहार झाला होता असे म्हणतात.[६] याच गोष्टीच्या अनुरोधाने पुढे जून महिन्यात, वासुदेव बळवंतांनी लुटून आणलेले दागिने पुणे येथील काही लोक गहाण ठेवून त्यास पैसे देतात, अशा संबंधाची पोलिसात कोणी बातमी दिली आहे असे कारण देऊन, पोलिसांनी तसा शोध चालविला होता.[७]

त्यासंबंधी 'अनामिक' म्हणतात, "तुळशीबागेसमोर एक कौलारू सावटी होती. तेथे शिवराया इ. मुद्रा विकण्यास विळणकर नावाचे एक गृहस्थ आणि त्यांचे एक सहकारी बसत. त्यांनी आपल्यासमोर लावलेल्या पैशाच्या चळती अजून मला आठवतात. ते दोघेही वासुदेव बळवंतांच्या संघटनेतील तरुणच होते. त्यांच्याकडे वासुदेव बळवंताची काही लूट होती. ते पुढे एकाएकी चांगलेच सावरले. त्यावरूनही हा समज रूढ झाला."[८]

दौलतराव तर त्यांचे सहकारीच. तेव्हा त्यांच्या सासऱ्याकडे लुटीतील काही भाग ठेवण्यात आला होता. वासुदेव बळवंतांच्या घराजवळच राहणारे विनायकराव दामले आणि गोगले हे त्यांच्या विश्वासातले होते. त्यांचे वरील दोघांशी सूत्र असे. वेळ पडल्यास दामले किंवा गोखले आवश्यक ते पैसे वरील लुटीतूनआणून देतील असे वासुदेव बळवंत त्यामुळेच म्हणाले होते.[९]

वासुदेव बळवंतांच्या संघटनेचे पुण्यात बरेच लोक होते, अशी सरकारची निश्चिती होती. या लोकांसंबंधी सर रिचर्ड टेंपल म्हणतात,

"Had Wasudeo Bulwunt any accomplices of his own class? Certainly he had some men of note, whose names are hardly discoverable.. .. He must have had sympathisers in the city of Poona — perhaps many numerically.... .. .It is almost certain that there were in Poona

५ ल. ना. जोशी . 'स्मरण-पुराण,' लेखांक ३ रा, 'मौज,' दि. २४ जुलै १९२९
६ अ. ज. करंदीकर "क्रांतिकारक टिळक आणि त्यांचा काळ पृ. ९७
७ 'नेटिव्ह ओपिनियन,' दि. १५ जून १८७९
८ 'अनामिक' यांच्या आठवणी.
९ राणोबा सासीदार रणो मोरेश्वर महाजन यांची वासुदेव बळवंतांच्या अभियोगातील पहिला दर्जाधिकारी केसर यांच्या पुढील साक्ष; दि. २३ ऑक्टोबर १८७९

City some receivers of the plundered property." [10]

(" वासुदेव बळवंताना आपल्या समाजातील सहकारी होते का? निश्चितच काही नामांकित लोक त्यांचे सहकारी होते. त्यांची नावे बाहेर येणे कठीण आहे. पुण्यात त्यांचे सहानुभूतिक होते. त्यांची संख्या कदाचित बरीच असेल. लुटीची मालमत्ता हस्तगत करणारे काही जण पुणे गावात होते हे तर जवळजवळ निश्चित आहे.")

वासुदेव बळवंताच्या सहकाऱ्यांपैकी एकाने सांगितले आहे की, ही लूट घेऊन वासुदेव बळवंत किंवा त्यांचे पुणेकर सहकारी पुण्यास जात. वासुदेव बळवंत स्वत ही दर दहापधरा दिवशी पुण्यास जात.

वासुदेव बळवंतांचे छापे सरकारी खजिन्यावर पडले नाहीत. याचा काही जणांना विस्मय वाटतो. परंतु त्यांनी तसे छापे घालण्याचा विचार चालविला होता. तथापि तशा घटना न घडण्याचे कारण सरकारने त्यासंबंधात सक्त दक्षता घेतली होती हेच होते. सर रिचर्ड टेंपल स्वतःच म्हणतात :

"Some say.........they (dacoits) never attacked any of the small Government treasuries scattered over the country, nor any one of the European travellers resorting to the hill. But we had guarded every one of these things and places with troops, and the guarding was none the less effectual because it was kept so quiet." [11]

(" काही जण म्हणतात की त्यांनी कधीही देशभर पसरलेल्या लहान लहान खजिन्यांवर छापा घातला नाही किंवा थंड हवेच्या ठिकाणी गेलेल्या युरोपियन प्रवाशांवर हल्ला केला नाही. पण आम्ही अशा प्रत्येक ठिकाणी सैनिकांचे संरक्षण ठेवलेले होते. आणि ते संरक्षण अज्ञातपणे ठेवलेले होते, म्हणून काही कमी परिणामकारक होते असे नाही. ")

मार्च १८७९ मध्ये वासुदेव बळवंत एका बंडवाल्या तुकडीचे नेतृत्व करीत होते. पण तशा त्यांच्या दोनतीन तुकड्या होत्या, असे त्यांच्या एका सहकाऱ्याने न्यायालयात सांगितले आहे. एक तुकडी सोडून ते दुसऱ्या तुकडीतील लोकांना भेटत आणि काही दिवसांनी पहिल्या तुकडीस येऊन मिळत.

महाराष्ट्रात मार्चमध्ये पडलेले छापे राजकीय स्वरूपाचे होते आणि सुसंबद्ध योजना आखणारे हात त्या छाप्यांच्यामागे असावे, असे सरकारच्या तात्काळ ध्यानात आले. काही छाप्यांच्या वेळी गावकऱ्यांना फसविण्याकरिता लुटारूंनी पोलिसाचे पोषाख आणि पट्टे घातले होते. ही योजना केवळ रामोशांच्या हातून कशी होऊ शकली असती. रामोशी झाले तरी सर्व साधारण सावकारांनाच लुटतील. पण

१० सर रिचर्ड टेंपल यांचे राजप्रतिनिधी लॉर्ड लिटन यांना पत्र (गोपनीय), दि. ३ जुलै १८७९

११ कित्ता

पुण्याच्या खजिन्यावरच हल्ला करून तो लुटण्याचा काही दिवसांपूर्वी झालेला एक कट याच वेळेला उघडकीस आला, त्यावरूनही वरील छाप्यांचे राजकीय स्वरूप सरकारच्या ध्यानात आले.

एका मुसलमान खबऱ्याने ती माहिती सरकारला कळविली होती. स्वराज्या-साठी पैसे मिळविण्याचे ठरविल्यावर पहिला हल्ला सरकारी खजिन्यावरच चढवा-वयाचा डाव वासुदेव बळवंतांनी रचला. परंतु या माणसाने त्या कटाचा परिस्फोट सरकारकडे केला आणि त्याना तो विचार सोडून द्यावा लागला. वासुदेव बळवंतांचे नाव त्या अडाणी माणसास सांगता आले नाही. पण पुण्याच्या पांढरपेशा लोकांनी तो कट रचला होता, इतके मात्र सरकारला तो सांगू लागला.

वासुदेव बळवंतांनी या सर्व खटपटी प्रयत्नांचे नेतृत्व घेतले आहे ही गोष्टही फार काळ गुप्त राहिली नाही. धामारीवर छापा पडल्यानंतर जिल्हा पोलीस अधी-क्षक मेजर डॅनिअल याने बऱ्याच जणांची निवेदने घेतली. त्यांतील एकाने त्याला सांगितले की, नुकत्याच पडलेल्या काही छाप्यात पुण्याच्या एका 'महाराजां'च्या हाताखाली आपण भाग घेत होतो आणि ते 'महाराज' पुण्याच्या कॉम्बे ऑफीसमध्ये (मिलिटरी फायनान्स ऑफीसमध्ये) नोकरीला होते.

दुसऱ्या दिवशी दुपारी त्या रामोश्यासह मेजर डॅनिअलची स्वारी सैनिकी वित्त कार्यालयात (मिलिटरी फायनान्स ऑफीसमध्ये) खाड् खाड् बूट वाजवीत प्रविष्ट झाली आणि त्या कार्यालयातील सर्व लेखनिकांना त्याने त्या रामोश्यापुढून रांगेने जावयास लावले. परंतु वरीलप्रमाणे आपण ज्याच्या हाताखाली छापे घालत होतो, तो यात नाही, असे तो रामोशी म्हणाला. त्यावर असे आढळून आले की, वासुदेव बळवंत फडके या नावाचा एक लेखनिक १३ फेब्रुवारीपासून नैमित्तिक सुटी घेऊन जो गेला होता, तो अजून कामावर परत आलेला नव्हता. त्यामुळे त्या रामो-श्याचे 'महाराज' म्हणजेच वासुदेव बळवंत फडके अशी डॅनिअलची निश्चिती झाली.

वासुदेव बळवंतांचे बडावे विचार त्या वेळी पुण्यात बऱ्याच जणांना माहीत होते. कित्येकदा ते रस्त्याने जावयाला लागले की, वरील माहिती असणारे लोक त्यांच्याकडे बोट दाखवत, हा वासुदेव बळवंत फडके, सरकारविरुद्ध बंड करण्याचा याचा विचार आहे, असे दुसऱ्याना सांगत.[12]

मेजर डॅनिअलने मग वासुदेव बळवंतांच्या अटकेसाठी आणि घराच्या झडती-साठी अधिपत्र (वॉरंट) मिळविले. आणि मार्चच्या दुसऱ्या आठवड्यात तो पोलीस पथक घेऊन यट्टीवाल्याच्या वाड्यातील त्यांच्या बिऱ्हाडावर गेला. त्यांच्या बिऱ्हाडाला कुलूप आहे असे दिसताच त्याने आजूबाजूच्या शेजाऱ्यांजवळ त्या बिऱ्हाडातील माणसां-

12 "His great life ambition was to head a rising against the British power."

विषयी चौकशी केली. गणपतराव देवधरांनी त्या लोकांविषयी आपणास काही माहिती नाही म्हणून कानावर हात ठेवले. पण शेजारच्या दुर्गाबाई नावाच्या बाईंनी वासुदेव बळवंतांची पत्नी जुन्नरला गेलेली असून ते स्वतः बरेच दिवस बिऱ्हाडात आलेले नाहीत असे डॅनिअलला सांगितले.

तेव्हा मग त्या बिऱ्हाडाचे कुलूप फोडूनच त्याची झडती घेऊन टाकावयाची, असे ठरवून डॅनिअलने घराचे धनी मोरो बाबाजी फाटक याना पंच म्हणून बोलावून आणले. फाटक वैद्यकीचा धंदा करीत असत आणि वयाने बत्तीशीचे होते. त्याच्याच शेजारचे सखारामशेट सोनार आणि विष्णु आत्माराम जोगळेकर यानाही त्याने पंच म्हणून बोलावून घेतले. परंतु ते वासुदेव बळवंतांच्या बिऱ्हाडापाशी जाण्याच्या आधीच डॅनिअलने कुलूप फोडून त्या ठिकाणची झडती घेण्यास प्रारंभही केला होता. ती दुपारपर्यंत बराच वेळ चालली होती त्या झडतीत दोन बंदुका, दोन चांगल्या तलवारी, साखळीचे एक चिलखत, काही दाटपट्टे, दाडपट्टयाचे खोवले, थोडी बंदुकीची दारू, बंदुका साफ करण्याची किल्ली, शिशाच्या गोळ्या, घोड्याच्या खोगिरात शिवलेली पिस्तुलाच्या चामड्याची घरे आणि नकाशे या वस्तू पोलिसांना सापडल्या.

या झडतीची आणि तीत सापडलेल्या भयंकर शस्त्रांची बातमी कळताच सगळीकडे एकच खळबळ उडाली. पुण्याच्या 'डेक्कन हेरल्ड' आणि 'पूना ऑब्झर्वर' या दोन अर्धांग्ल वृत्तपत्रांनी वरील बातमीला ठळक प्रसिद्धी दिली आणि पुढे त्या संबंधातील वृत्त स्तंभचे स्तंभ भरुन देण्यास सुरुवात केली.

लोकांच्या विचारांचा प्रक्षोभ आणि राजकीय आकांक्षा वाढत जाव्या असेच राजकीय वातावरण त्यावेळेस हिंदुस्थानात होते. मार्चच्या मध्यास मद्रास प्रांतात रंपा येथे सरकारविरोधी उठावणीची पहिली चकमक झडली. तेथील बंडखोरानी राजमहेंद्री येथील सरकारी सामर्थ्य पंगु करुन टाकले. चोडवरम् खेड्यात तर त्यानी जिल्हाधिकाऱ्यालाही घेरले. नि पळवून नेले आणि सरकारी नौका लुटल्या. या उठावणीचे नेतृत्व पल्लाळा अबुल आणि कारम तम्मन या दोन बडखोरांकडे होते. नव्यानेच बसविल्या गेलेल्या अनुज्ञाकरा (लायसेन्स टॅक्स) विरुद्ध त्यांची उठावणी होती. या बंडाची 'वृत्तं' मद्रासच्या 'मद्रास मेल' पत्राने लागलीच प्रसिद्ध केली. आणि ती उठावणी निर्दयपणे दडपून टाकण्यासाठी इंग्रज अधिकाऱ्याची निकडीने नेमणूक व्हावी अशी मागणी केली.

महाराष्ट्रातील उठावणी दडपून टाकण्याचे काम मात्र तेवढेसे सोपे नव्हते. ही गोष्ट मुंबईच्या राज्यपालांना पटली होती. हिंदुस्थानचे राजप्रतिनिधी लॉर्ड लिटन यांना या संबंधात लिहिलेल्या गुप्त पत्रात त्यानी म्हटले :

".........We deemed these robberies as warnings requiring us to take military precautions lest the dacoity mischief should spread. We thought that if once the Evil

were to gain head, its eradication might be difficult in such mountains as ours We feared, too, that ordinary civil police might man to man fail to beat down a Deccan dacoit on his native hillside, who is a resolute fellow and armed withal." "

("दरोडयांचे अरिष्ट अधिक पसरेल या भीतीने या लुटालुटी म्हणजे सैनिकी उपायांचीच दक्षता आम्ही घेण्याची आवश्यकता आहे असे दाखवणाऱ्या चेतावण्या आहेत, असेच आम्ही धरून चाललो. आम्हाला वाटले की जर एकदा का या आपत्तीने मूळ धरले की तिचे निर्मूलन करणे हे आमच्याकडे असणाऱ्या डोंगरपर्वतामध्ये कठीण होऊन बसण्याची शक्यता होती. निर्धाराच्या आणि वर सशस्त्र असणाऱ्या दख्खनच्या दरोडेखोरास त्याच्याच प्रदेशातील डोंगरप्रदेशात नामोहरम करून टाकण्यात मनुष्यासमोर मनुष्य या दृष्टीने पाहता सर्वसाधारण नागरी पोलिसाला अपयशच येईल, अशी भीतीही आम्हाला वाटली.") तेव्हा पुणे जिल्ह्यातील वासुदेव बळवंताच्या छाप्याचा शोध करीत असणाऱ्या मेजर डॅनिअलचीच ती उठावणी दडपण्याच्या विशेष कामगिरीवर मुंबई सरकारने नेमणूक केली.

या कामासाठी तेव्हाच्या अधिकाऱ्यांत मेजर डॅनिअलच्या तोडीचा दुसरा अधिकारी नव्हता, हे मात्र मान्य केलेच पाहिजे. इंग्लंडच्या सैन्यात काही काळ नोकरी करून तो मेजरच्या अधिकारपदापर्यंत पोहोचला होता. आणि हिंदुस्थानातील पोलीस दलांतील नोकरीतही नंतर त्याला चांगला अनुभव होता. काही वर्षे आधी दख्खनच्या दंग्याच्या वेळी निर्बंधयाह्य चळवळ दडपून टाकण्यात त्याने यश मिळविलेले होते. तो आता एकेचाळीस वर्षांचा होता. या प्रांतातील कठीण प्रदेशाची आणि सैनिकी हालचालीचीही त्याला माहिती होती.

मेजर डॅनिअल याचा बांधा ठेंगणा आणि स्थूल होता. आपले निळे डोळे विस्फारून लालबुंद मुद्रेने कोणत्याही प्रकरणाचा शोध त्याने एकदा सुरू केला की, त्याचा पुरता पाठपुरावा केल्यावाचून तो राहात नसे. त्या कामात आपल्या स्वास्थ्याची किंवा प्राणांचीही तो पर्वा करीत नसे. वासुदेव बळवंताच्या शोधात त्याचे हे सारे गुण कसोटीस लागले. आणि त्यात तो शेवटी यशस्वी झाला. नोव्हेंबर १८८० ला तो इंग्लंडला परत गेला, तेव्हा तेथील लोकांनी त्याचा मोठा सत्कार केला. सेंट अल्बान्स येथे भरलेल्या न्यायपालांच्या त्रैमासिक सत्रात त्याची मुख्य आरक्षक म्हणून ६७ स्पर्धकांतून निवड झाली. त्या पदाचे वेतन वार्षिक ४०० पौंड होते. आणि त्या पदाला घोड्यासाठी नि प्रवासासाठी १०० पौंड भत्ता होता. पुढे चापेकरांच्या वेळेला हॅरि ब्रुइनला जे महत्त्व पुण्यात प्राप्त झाले ते १८७९ च्या या बंडात डॅनिअलला प्राप्त झाले.

१३ सर रिचर्ड टेंपल यांचे लॉर्ड लिटन याना पत्र, (गोपनीय) दि. ३ जुलै १८७९

डॅनिअलने बंड दडपण्यासाठी नवनवीन उपाय योजले. रामोशी लोकांचे उपस्थितीपट अधिक कडक केले. गावात न सापडणाऱ्या रामोश्यास छळ सोसावा लागू लागला. गावाकडून मुख्य ठाण्याकडे जाणारा पैसा संरक्षणात पाठविण्याची व्यवस्था त्याने केली. बंडखोरास पकडण्यात सहाय्य देणाऱ्याना त्याने पारितोषिके घोषित केली. त्या वेळी सरकारने जिल्हाधिकारी आणि त्याचे सहाय्यक यांची संयुक्त बैठक बोलावून बंडाविरुद्ध कडक उपाय योजनेचा निर्णय घेतला.

परंतु छाप्यांची वृत्ते वाढत्या प्रमाणावर येतच राहिली. एप्रिलच्या प्रारंभी भोर संस्थानातील चौल गावी पंचाहत्तर लुटारूनी श्रीमंत मारवाड्यांच्या घरांवर छापे घालून लूट मारली नि त्याचे कागदपत्र जाळले. पुण्याहून दहा कोसावरच्या दवडी गावी वेशीवरील महारास, आम्ही सरकारी लोक आहोत, बंडखोर पकडून आणले आहेत, असे सांगून वेस उघडण्यास त्यानी भाग पाडले. नि ती उघडली जाताच गावात घुसून सहस्त्रावधी रुपयाची लूट त्यानी लांबवली. एकदा तर पुण्याजवळ अविल ओढ्यापाशी ते येऊन गेल्याची बातमी येऊन थडकली.

हळूहळू वासुदेव बळवंताचा दरारा पुण्यासच नव्हे तर सर्व महाराष्ट्रात पसरला. खेड्यापाड्यात आबालवृद्धाच्या तोंडी त्यांचे नाव झाले. कोणीही दाढी राखलेला दणकट बांध्याचा फिरस्ता दिसला की, लोकाना आणि सरकारला दोघानांही संशय यावा की, हे वासुदेव बळवंत तर नाहीत ना? त्याच्याविषयी नित्य नव्या नव्या कड्या उठू लागल्या. आज काय वासुदेव बळवंतांनी अमुक गावच्या लोकाना आपण तिकडे येणार असल्याची आधीच वर्दी देऊन ठेवली आहे. नि त्याप्रमाणे ते तिकडे जाणार आहेत. उद्या काय तर म्हणे वासुदेव बळवंतानी आपण शिवाजीचे अवतार आहोत, आणि इंग्रज लोकांना हाकून देऊन महाराष्ट्राला स्वातंत्र्य मिळवून देण्याचा आपला हेतू प्रकट केला आहे, अशा वदता उठत होत्या. आज एका गावी छापा तर उद्या त्या गावापासून शेकडो कोस दूर असलेल्या गावावर तो पडे. सारेच छापे त्यांच्याच नावावर खपत होते. त्यामुळे त्याचे लोक किती, त्याचा फौजफाटा किती, इत्यादी गोष्टीचा सरकारला पत्ता लागत नाहीसा झाला आणि त्याच्या तोंडचे पाणी पळाले. खेडेगावचे प्रतिष्ठित लोक त्यांना सहाय्य करीत.[14] सरकारी लोकांच्या हालचाली त्याना आधी कळत. त्यामुळे अधिकारी अगतिक झाले.

त्यांच्या नावाचा असा दरारा पसरला होता. पण त्यासाठी त्यांना कसला त्रासदायक जीवनक्रम काढावा लागत असे, ते त्याच्या पुढील आत्मकथनावरून दिसेल. ते म्हणतात: "रामोशी लोकाबरोबर फिरत असता पाचसहा वेळा डोंगराच्या कड्यावरून खाली पडलो. पुन्हा दृष्टीसच पडलो नसतो अशातून वाचलो. साप वगैरे विषारी

14 'Villagers of good position were found to be implicated in Vasudeo's movements"
("खेड्यातील प्रतिष्ठित गावकरी वासुदेवाच्या हालचालीत सहभागी होत असे आढळले.")
'गॅझेटिअर ऑफ दि बॉम्बे प्रेसिडेन्सी,' खंड १८ वा, भाग ३, पृ. ३८

जनावरांच्या दंशातून दोनतीनदा वाचलो. आंघोळ तर पुष्कळदा दोनतीन दिवसांनी केली. उपासही पुष्कळ घडले. डोंगरावर पिण्यास पाणीही नाही अशा स्थितीत उन्हात बसण्याचा आणि करवंदीच्या जाळ्यात, किंवा निवडुंगाच्या आडोशास छपून बसण्याचेही प्रसंग आले. अंगावरचे कपडेही आठ आठ दिवसात धुतले नाहीत. अंगावर उवा पडल्या!" [१५]

पुण्याभोवती सोजिरांची आणि गुप्त अनुचरांची पोलादी साखळी होती. तरीही सुटवंगपणा मिळताच वासुदेव बळवंत तीतून पुण्यात गुप्तपणे शिरतच होते. त्यांच्या दैनंदिनीतील पुढील नोंद या दृष्टीने वाचनीय आहे. ते म्हणतात, "सकाळी लवकर उठून पुण्यास गेलो. आणि एका मित्राच्या घरी उतरलो. तो म्हणाला, 'माझ्यामागे माझा कसून शोध चाललेला आहे. दररोज चौकशी चालू आहे. माझ्या बायकोकडे चौकशी करण्यासाठी माणसे पाठविण्यात आलेली आहेत. तेव्हा पुण्यास मी फार वेळ थांबू नये आणि तेथून लागलीच निघून जावे हे बरे! मी पुण्याला गुपचूप येतो जातो, त्याची पुण्यात बरीच चर्चा चालू आहे.' त्याप्रमाणे मी त्याच्याकडून निघालो, दुसऱ्या एका मित्राला भेटलो, गुप्तपणेच गावात भटकलो आणि दमूनभागून रात्री... (भवानी पेठेतील) गणपतीच्या देवळात झोपलो." [१६]

लुटारूच्या आयुष्यात दीड महिना घालविल्यावर वासुदेव बळवंतांनी आपले सर्व लोक सुटीवर घरी पाठविले. सुटीवर गेलेले लोक परत येताच आपण नवलाख उंब्रे या गावी भेटू असे दौलतरावाना सांगून त्यांनी मग पुण्यास जाण्यासाठी म्हणून त्यांचा निरोप घेतला. त्यानी आखलेल्या आपल्या उठावणीचे दुसरे पर्व प्रत्यक्षात येऊ लागले, तेव्हा त्यांच्या बंडाने अधिक रौद्र स्वरूप धारण केले आणि त्यांच्या उठावणीची चर्चा महाराष्ट्राबाहेर हिंदुस्थानभर होऊ लागली.

* * *

१५ वासुदेव बळवंतांचे 'आत्मचरित्र',
१६ वासुदेव बळवंताची दैनंदिनी ; दि. २ एप्रिल १८७९

## प्रकरण ११ वें

## आव्हान !

ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम् ।

—श्रीमद्भगवद्गीता

१८७९ च्या मेच्या पहिल्या आठवड्यात वासुदेव बळवंतांनी आपली प्रख्यात राजघोषणा (जाहीरनामा) प्रसिद्ध केली. त्या वेळच्या वृत्तांतातून किंवा न्यायालयाच्या कामकाजाच्या प्रतिवृत्तांतून वासुदेव बळवंतांच्या या राजघोषणेचा उल्लेख आढळतो. मुंबईचे राज्यपाल सर रिचर्ड टेंपल यांनीही तिचा निर्देश केला आहे. ते म्हणतात :

"......Emboldened by casual successes they threatened even highroads near Poona the Capital and issued a proclamation in the name of a Brahmin leader declaring that their proceedings were really directed against the Government."

("योगायोगाने मिळालेल्या यशाने अधिक धीट बनून त्यांनी पुण्याच्या राजधानी जवळच्या राजमार्गावरही भय उत्पन्न केले. आणि आपले प्रयत्न प्रस्थापित सरकारविरुद्ध आहेत, असे घोषित करणारी राजघोषणा एका ब्राह्मण नेत्याच्या नावाने प्रसिद्ध केली !") "लंडन टाइम्स"च्या एका अंकात त्या पत्राच्या कलकत्त्याच्या वार्ताहराने पाठविलेल्या तंत्री संदेशातही त्या घोषणेचा थोडा भाग येऊन गेला होता.

या राजघोषणेत हिंदुस्थानच्या आर्थिक शोषणाच्या ब्रिटिश सरकारच्या धोरणाचा धिःकार करण्यात आला होता. येथील रयतेला निसर्गदत्त हक्क म्हणून आर्थिक साहाय्य मिळाले पाहिजे, अशी मागणी केलेली होती. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्य लढ्यात ब्रिटिश सरकारला अशा प्रकारचे ते पहिलेच निर्भय आव्हान असेल. ती घोषणा मुंबईच्या राज्यपालांना धाडण्यात आलेली होती. आणि तीत म्हटले होते, " दख्खनच्या सभोवतालची सेटी लुटून आम्ही शेवटी आता पुण्यास आलो आहोत. तुमचे सैनिक मात्र आमच्या शोधासाठी दुसरीकडे गेलेले आहेत.

"आम्ही सरकारला कळवू इच्छितो की, या वर्षी आताच्या भरपूर पिकाच्या हंगामातही धान्य दुष्काळी दरानेच विकले जात आहे. आणि काही जिल्ह्यात भीषण दुष्काळ असून (श्रीमंत लोक सोडले) तर जवळजवळ सर्वच्या सर्व मराठा प्रदेशातील जनतेला रोजगार किंवा कामधंदा नाही आणि ती सर्वनाशाच्या उंबरठ्यावर उभी आहे.

"सरकारने सगळ्या लोकांची संपत्ती लुटून नेलेली आहे, आणि त्यांना भिकेस लावले आहे. परंतु सरकारने फक्त दुष्काळग्रस्त लोकांसाठीच अगदी तुटपुंजी दुष्काळी कामे सुरू केली आहेत. आणि इतर जनतेपुढे लुटालूट करूनच आपले पोट भरण्याचा मार्ग मोकळा ठेवलेला आहे.

"बऱ्याच लोकांना सरकारविरुद्ध जळफळत राहणे आणि अन्नाच्या अभावी मरून जाणे हाच मार्ग ठेवलेला आहे.

"पुढील वर्षी १८७७ च्या दुष्काळापेक्षाही अधिक भीषण दुष्काळ हिंदुस्थानात पडणार आहे, असे आमच्या हिंदू भविष्यवेत्त्यांचे म्हणणे आहे. म्हणून आम्ही सरकारला इशारा देतो की, सर्वसाधारण जनतेकरता या प्रांताच्या कानाकोपऱ्यातून मोठमोठी दुष्काळी कामे सुरू केली गेली पाहिजेत आणि तिला निरनिराळ्या व्यापारात नि उद्योगधंद्यात प्रवेश मिळाला पाहिजे. सरकारच्या करांचे ओझे कमी झाले पाहिजे! लठ्ठ पगाराच्या युरोपियन लोकांच्या वेतनात कपात झाली पाहिजे. देशी उद्योगधंदे, व्यापार आणि रोजगार याना उत्तेजन मिळाले पाहिजे आणि आम्हाला कामधंदा किंवा अन्न मिळाले पाहिजे.

"असे जर झाले नाही तर आतापर्यंत फक्त येथील श्रीमंत लोकांविरुद्ध चाललेली आमची मोहीम आम्ही युरोपियनांविरुद्धही सुरू करू! (देशभर) अव्यवस्था करून सोडू. युरोपियनांची सापडेल तेथे कत्तल करू आणि (१८५७ च्या बंडासारखे) दुसरे बंड उभारू."

मुंबईच्या राज्यपालांचा आणि पुण्याच्या सत्र न्यायाधीशांचा आपले वधाचे पुढील उद्दिष्ट म्हणून निर्देश करून, त्या घोषणेत म्हटले होते : "खेड्यातील गरीब लोक जंगलात आपल्या उपजीविकेसाठी म्हणून लाकडे तोडून आणण्यास' जातात, तेव्हा पोलिसांकडून पकडण्यात येतात. परंतु आम्हाला तोंड देण्याची मात्र पोलिसांची छाती होणार नाही. पुढच्या वर्षी जर दुष्काळ पडला तर अन्नावाचून जवळजवळ सगळी जनता मृत्युमुखी पडेल."

या देशातील निरनिराळ्या भागात बरेच जण एकाच वेळी बंड करून उठतील, असे म्हणून त्या घोषणेत औरंगजेबाच्या राजवटीत शिवाजीचा जय कसा होत गेला त्याची आठवण ठेवून हिंदुस्थान सरकारने जागे व्हावे, आपल्या इशाऱ्याचा शांत चित्ताने विचार करावा आणि सत्यालुच्या ख्रिश्चन वृत्तीने कृती करावी असे सुचविले होते.

" असे जर झाले नाही तर राज्यपाल इत्यादींच्या मस्तकांसाठी पारितोषिक घोषित करण्यात येईल आणि आमचे उद्दिष्ट साध्य होईपर्यंत आमचा लढा चालू राहील, " असेही शेवटी त्या घोषणेत म्हटले होते.

वासुदेव बळवंतांच्या या घोषणेच्या प्रती राज्यपालांपासून जिल्हाधिकाऱ्यां-पर्यंत आणि इतर सरकारी अधिकाऱ्यांना पाठविल्या गेल्या. त्यांच्याखाली 'दुसऱ्या शिवाजीचा मुख्य प्रधान' म्हणून स्वाक्षरी केलेली होती. या राजघोषणेमुळे हिंदु-स्थानभर देशभक्तांच्या अंगात आनंदाची लकेर उमटली आणि इंग्रज सत्ताधारी हादरून गेले. मध्यंतरी एप्रिलच्या तिसऱ्या आठवड्यात धामारी लुटीच्या अभि-योगात साक्षीदारांनी वासुदेव बळवंतांच्या पुण्यातील बंडखोर दिनक्रमाची माहिती सांगून पुण्याबाहेरच्या चोकस लोकांना जी माहिती पुरवली होती, तिलाच या घोषणेने आता दुजोरा दिला.

परंतु या गोष्टींनी न डगमगता बंड दडपण्यासाठी सरकारने आणखी पुढे पावले टाकली. आणि बंडाच्या प्रदेशात शेवटी सैन्याची पाठवणी केली. ४ मे ला कर्नल क्रिस्पिन आणि दुसरे दोन युरोपियन अधिकारी यांच्या हाताखाली ४ थ्या बंदुकवाल्या सेनेची दोन पथके (टू कंपनीज ऑफ हिज मॅजेस्टीज फोर्थ रायफल्स) जेजुरीकडे धाडण्यात आली. मेजर फुल्टन आणि इतर तीन युरोपियन अधिकारी यांच्या हाताखाली ११व्या एतद्देशीय पायदळातील (इलेव्हन्थ नेटिव्ह इन्फंट्री) तीनशे सैनिक जुन्नरला धाडण्यात आले आणि कॅप्टन बेन आणि एक दुसरा अधिकारी यांच्या हाताखाली १८ व्या एतद्देशीय पायदळातील (ॲटिथ नेटिव्ह इनफंट्री) शंभर सैनिक साताऱ्याच्या रस्त्यावर शिरवळकडे धाडण्यात आले. त्या सर्वांना प्रत्येकी दोनशे गोळ्यांचा पुरवठा करण्यात आला. बंड दडपण्यासाठी असे सैन्य पाठवण्याइतकी ती उठावणी मोठीच होती. त्यामुळे सर रिचर्ड टेंपल यांनी या सैन्य पाठवणीचे समर्थन करताना म्हटले:

"It might be thought that the military precautions we took were excessive. But such a thought, if entertained would be silliness. It was only by a strong effort that the thing was stopped."[1]

("आम्ही केलेल्या या सैनिकी हालचालींच्या उपाययोजना फाजील होत्या असे कोणाला वाटेल. पण असा विचार कोणी केला तर तो मूर्खपणा ठरेल. कारण केवळ अशा कडक उपायांनीच त्या गोष्टीला पायबंद घालता आला.")

माथेरान आणि महाबळेश्वर ही ठिकाणे मुंबईच्या उच्चपदस्थ युरोपियनअधिका-ऱ्यांची आणि मुंबईच्या राज्यपालांची उन्हाळ्यात हवा खाण्याची ठिकाणे. त्यामुळे हे कर्दनकाळ बंडखोर त्यांच्यावर हल्ला करण्यास कमी करणार नाहीत या भीतीने

१ सर रिचर्ड टेंपल यांचे राजप्रतिनिधी लॉर्ड लिटन यांना पत्र (गोपनीय), दि. ३ जुलै १८७९

या युरोपियनांच्या संरक्षणासाठी मुंबईच्या एतद्देशीय पायदळाची एक तुकडी मायेरानला धाडण्यात आली. १८ व्या एतद्देशीय पायदळाचे ७५ सैनिक महाबळेश्वरला धाडण्यात आले. ४ थ्या बंदुकधारी पलटणीच्या ७५ सैनिकांना वेळ पडल्यास महाबळेश्वरास धाडण्यात येणार आहे. तेव्हा त्याना अगदी सिद्धतेत ठेवण्याचा आदेश त्या पलटणीच्या अधिकाऱ्याना देण्यात आला. पुणे ते महाबळेश्वर या रस्त्यावर सरकारने घोडदळाचा फिरता पहारा ठेवला. तरीही त्यांच्या एका अधिकाऱ्याचे सामान घेऊन जाणाऱ्या नोकरांचे घोडे बंडखोरांनी त्या रस्त्यावर डोंगरात अडविलेच आणि त्या नोकराची उलट तपासणी घेतली. परंतु त्याच्याजवळ काही मिळण्यासारखी लूट नाही असे पाहून त्याला सोडून दिले.

बंडाच्या चकमकीचे किंवा एखाद्या दरोड्याचे वृत्त मिळताच त्या ठिकाणी त्वरेने जाता यावे म्हणून लोहमार्गाच्या अधिकाऱ्यांनी आदेश काढला की, कोणत्याही स्थानकावरून कोणत्याही स्थानकावर वरील कोणत्याही अधिकाऱ्यास गाडीने जाऊ द्यावे आणि एखाद्या ठिकाणी स्थानक नसले तरी त्यांना हवे असेल तर गाडी थांबवून त्यांना तेथे उतरू द्यावे. सरकारच्या व्यवस्थेविषयी 'नेटिव्ह ओपिनियन' पत्राने समाधान व्यक्त केले. पुण्यास निघणाऱ्या 'पूना ऑब्झर्वर' आणि 'डेक्कन हेरल्ड' या अँग्लो पत्रांनी आणि मुंबईच्या 'बॉम्बे गॅझेट' पत्राने वासुदेव बळवंतांच्या राजकीय बंडखोरीवर टीकेची झोड उठविली. तेव्हा 'टाइम्स ऑफ इंडिया' पत्राने त्यांच्या उठावणीस राजकीय कटच केवळ कारण नाही, असे प्रतिपादण्यास सुरुवात केली. "इतके लोक जिवावर उदार होऊन लुटीसाठी एकत्र येतात, त्याची कारणे तरी सूक्ष्म रीतीने प्रथम शोधा ना !" असा उपदेश त्या पत्राने दुसऱ्या पत्रांना केला.

अँग्लो–इंडियन पत्रांची मते अशी होती. परंतु 'डेक्कन स्टार'सारख्या हिंदी पत्रांनी वासुदेव बळवंताच्या देशभक्त हृदयाची स्तुती केली. आणि त्याचे अनुयायी अर्धपोटी रहाणारे गरीब लोक आहेत. त्यांच्या हालअपेष्टांकडे लक्ष देऊन त्यांची स्थिती सुधारा; म्हणजे लुटी थांबतील असा सरकारलाच उपदेश केला.

त्यांच्या अशा उद्‌गारांनी 'डेक्कन हेरल्ड' पत्र चिडून गेले आणि आपल्या स्तंभांमधून अशा उपदेशकांना उद्देशून जो पहिला मोठा अग्रलेख त्या पत्राने प्रसिद्ध केला, त्यात पुढील वाक्ये होती :

"………A contemporary has made out the dacoits of Deccan to be a set of poor miserable ill-used creatures, emaciated from famine, hopeless and helpless."

("आमच्या एका व्यवसायबंधूने दख्खनमधील लुटारू हे दुष्काळात उपासमारी होत असलेले हताश, असहाय्य आणि वाईट रीतीने वागवले गेलेले लोक आहेत, असे प्रतिपादन केले आहे.") अर्थाचा अनर्थ करणाऱ्या विधानांचा गदारोळ उठविल्यानंतर त्या पत्राने पुढे म्हटले होते :

"………We do not believe this………There are more men than Wasudew Bulwunt who have a hand in stirring up these dacoities. A contemporary blames the police. But *there are times when no police can meet the emergencies* of the crisis. When men upon whose loyalty Government had a right to depend instigate the lawless to rebellion, it has often happened that martial law has to be proclaimed before order could be restored ……..No lawless dacoits could have escaped so long, unless men of influence had lent them protection and shelter……. ."[२]

("आमचा ह्या म्हणण्यावर विश्वास नाही… वासुदेव बळवंताच्या व्यतिरिक्त या उठावणीच्या लुटीत हात असणारे आणखी दुसरे लोक आहेत. आमचे व्यवसाय बंधू पोलिसांना या कामी दोष देत आहेत. परंतु काही वेळा अशा असतात की कठीण प्रसंगाची आणीबाणीची परिस्थिती पोलीससुद्धा कह्यात ठेवू शकत नाहीत. ज्यांच्या राजनिष्ठेविषयी सरकारला निश्चित असण्याचा हक्क आहे असे लोक जेव्हा अनैर्बंधिक प्रवृत्तीच्या लोकांना बंड करण्यास चेतावणी देतात, तेव्हा शांतता प्रस्थापित करण्यासाठी सैनिकी निर्बंध (मार्शल लॉ) पुकारावाच लागतो, असे पुष्कळदा घडलेले आहे… कोणताही लुटारू त्याला प्रतिष्ठित लोकांनी संरक्षण आणि आश्रय दिल्यावाचून इतका वेळपर्यंत लपून राहू शकला नसता.")

राजनिष्ठ म्हणून मिरवणाऱ्या लोकांनाही अशा लिखाणाचा संताप आला. 'इंदुप्रकाश' हे पत्र काही जहालपणाविषयी प्रसिद्ध नव्हते. परंतु 'डेक्कन हेरल्ड' पत्राने सरसकट ब्राह्मण आणि सुशिक्षित लोकांवरच वासुदेव बळवंताच्या बंडाचे दायित्व ढकलण्यास प्रारंभ केला, तेव्हा 'इंदुप्रकाश' पत्रही चिडून म्हणाले :

"……. A Poona paper has been saying a good deal in this way of late about these dacoits and in the name of that scoundrel Phadke, who is suspected of heading the dacoits, cast many slurs upon Brahmins and educated natives of Poona."

'डेक्कन हेरल्ड' पत्राचे संपादक दादाभाई सोराबजी हे होते. आणि त्यांचा हॉटेलचा आणि या पत्राचा असा जोडधंदा होता. त्याला अनुलक्षून टोला हाणताना 'इंदुप्रकाश'ने पुढे म्हटले :

"The fact that in Poona journalism and hotels go together induces us to attach no va'ucs to that paper."[३]

---

२ 'डेक्कन हेरल्ड,' दि. ६ मे १८७९

३ 'इंदुप्रकाश,' दि. १३ मे १८७९

("पुण्याचे एक वृत्तपत्र या दरोडेखोरांविषयी या पद्धतीने अलीकडे बरेच काही म्हणत आले आहे आणि दरोडेखोरांचें नेतृत्व करण्याचा ज्याच्यावर संशय आहे त्या 'वदमाष' फडक्याच्या नावाने पुण्याच्या ब्राह्मणांवर आणि सुशिक्षित एतद्देशीयांवर त्याने बरेच शितोडे उडविले आहेत. परंतु पुण्यात वृत्तपत्राचा धंदा आणि हॉटेल एकत्रच चालविली जातात ही गोष्ट त्या वृत्तपत्राला काहीही महत्त्व न द्यावयासच आम्हास प्रवृत्त करते. ")

बरेच दिवस झाले तरी वासुदेव बळवंतांना सरकार अटक करू शकले नाही. कारण त्याना सरकारी अधिकाऱ्यांच्या हालचाली आधी कळत असत. वासुदेव बळवंत न सापडण्याचे हे कारण उघड करून सरकारला त्या संबधांत गुप्तता राखण्याचा उपदेश करताना पुण्याचे 'डेक्कन हेरल्ड' पत्र म्हणाले,

"There should be more secrecy employed in capturing these dacoits; All is done too openly and every move, and order from the Government officers, is known to them long ere different parties proceed in quest of them, from their friends in Poona." [४]

("दरोडेखोरांना पकडण्याच्या कामात अधिक गुप्तता राखण्यात आली पाहिजे. सगळे काही फार उघडपणे करण्यात येते. आणि सरकारी अधिकाऱ्यांचे प्रत्येक पाऊल आणि त्यांचा आदेश निरनिराळे अधिकारी त्यांच्या (दरोडेखोरांच्या) शोधावर निघण्याच्या आधीच पुण्यातील आपल्या मित्रांकडून त्याना (दरोखोरांना) कळून येतात.")

वासुदेव बळवंतांना मिळत असलेल्या लोकांच्या सहाय्यास पायबंद घालण्यासाठी जिल्हाधिकाऱ्यांनी परिपत्रक काढले की, "असे साहाय्य कोणी दिल्याचे सिद्ध झाल्यास त्यास शिक्षा तर होईलच. पण पुढे बंदोबस्तासाठी जे पोलीस लागतील त्यांचा व्ययही त्या गावाकडून घेण्यात येईल ! असे गावकऱ्याना कळविण्यात यावे." हिंदुस्थानातील स्वातंत्र्यलढ्यात अपराधी लोकांना हुडकून काढण्याचा प्रयत्न यशस्वी झाला नाही, तर सार्वत्रिक दंड बसविण्याच्या सरकारी पद्धतीचा श्रीगणेशा हा असा होता.

महाराष्ट्रातील लुटारूंचे छापे अजूनही तसेच चालू होते. सातारा जिल्ह्यातील खडाळा गावी टेहळ्याच्या देखतादेखत लुटीचा छापा पडला. पुरंदर तालुक्यामध्ये पांगारे गावी तीच गत झाली. पुण्याजवळ महाळुंगे गावास लुटारू भेट देऊन गेले. बार्शी गावात भर राजमार्गावर टांगे लुटण्यात आले. आणि औंध येथे लुटारूंच्या आगमनाचे इतके भय निर्माण झाले की, स्वतः पंत प्रतिनिधीना आपल्या स्वतःच्या संरक्षणासाठी विशेष संरक्षक ठेवणे भाग पडले. यातील पुष्कळ छापे वासुदेव

४ "डेक्कन हेरल्ड" दि. ८ मे १८७९

बळवंतांनी घातलेले नव्हते. पण बंडखोराचे अध्वर्यु म्हणून त्यांचे नाव झालेले असल्यामुळे त्यांच्याच उठावणीपैकी हे प्रकार आहेत, असे सरकार आणि जनता समजत होती.

प्रमुख वृत्तपत्राना आपली मते कळविण्याची संधी वाचक त्या काळात घेतच होते. त्यांच्यापैकी एका गृहस्थाने 'बॉबे गॅझेट' पत्रास पत्र लिहून विचारले, "खेडेगावातील शेतकऱ्याना स्वसंरक्षणासाठी सरकार शस्त्रे का देत नाही?" तो पुढे म्हणतो, "इंग्लंडमध्ये असले छापे अत्यल्प प्रमाणात पडतात. कारण इंग्रज माणसाच्या पिस्तुलाची लुटारूंना भीती असते." सरकार ही सूचना मान्य करणे शक्यच नव्हते. शस्त्रे मिळाली तर शेतकरी जनता काय करील, ते सरकार चांगले ओळखून होते.

भगीरथ प्रयत्नानंतर वासुदेव बळवंतांचा सरकारला पत्ता लागला नाही. तेव्हा सरकारने त्याना पकडण्यात सरकारला साह्याय्य देणाऱ्या मनुष्यास मोठ्या धनराशीचे पारितोपक देण्याचे ठरविले आणि तशी राजघोषणा प्रसिद्ध केली. वासुदेव बळवंतांच्या उठावणीची छाया महाराष्ट्रातील सात जिल्हयांवर पडली होती. त्यात वऱ्हाडचा आणि निजामच्या राज्याचाही थोडा भाग येत होता. त्यामुळे मुंबई सरकारने वरील घोषणा त्या प्रातांच्या अधिपतीच्या संमतीने काढली. ही राजघोषणा वासुदेव बळवंताच्या मागील घोषणेच्या पाठोपाठ सरकारने काढली. या राजघोषणेत प्रस्तुत बंडाचे जनक वासुदेव बळवंत फडके यांचे वर्णन प्रारंभी दिले होते. आणि "या उंच आणि सडपातळ शरीरयष्टीच्या, सरळ तरतरीत नाकाच्या, निळसर डोळयांच्या, दाट दाढी आणि मिशा राखणाऱ्या, इंग्रजी सफाईने बोलणाऱ्या बंडखोरास पकडून देणाऱ्या किंवा पकडून देण्यात सरकारला सहाय्य देणाऱ्या कोणत्याही मनुष्यास एकूण चार सहस्र रुपयांचे पारितोपिक घोषित करण्यात आले होते. ही कामगिरी बजावणारा वासुदेव बळवंतांचा निकटचा सहकारी असेल, तर त्याला हे पारितोपिक मिळविण्याच्या मार्गात आपल्या सुरक्षिततेचे भय वाटू नये म्हणून सरकारने व्यवस्था केली होती आणि अशा मनुष्यास त्याच्या अपराधाची विनाअट क्षमा केली जाईल असे घोषित केले होते.

राज्यक्रांतिकारकाला पकडण्याच्या प्रयत्नात हताश होऊन सरकारने असे पारितोषिक लावावे अशा प्रकारचा तो पहिलाच प्रसंग वासुदेव बळवंतांच्या वेळेस घडला. त्यांनी सरकारला आपल्या पुढे हात टेकावयास लावले होते. म्हणून त्यांच्या चहात्यांना आनंद वाटला. त्या वेळचे हे पारितोपिक आताच्या मूल्य प्रमाणात पाहावयाचे तर निदान वीस पट वाढविले पाहिजे. याचा सरळ अर्थ असा होता की, इतके पैसे देऊन का होईना, पण ते पकडले जाऊ देत एकदाचे, असा वैताग सरकारला आला होता.

सरकारची राजघोषणा वर्तमानपत्रातून प्रसिद्ध झालीच. परंतु तिच्या शेकडो प्रती महाराष्ट्रभर अधिकाऱ्यांच्या स्वाक्षरीने ठिकठिकाणी लावण्यात आल्या. लोक ती वाचण्यास जमले की, तीत आलेले वासुदेव बळवंतांच्या व्यक्तिमत्वाचे वर्णन वाचून त्यांना ज्यांनी पाहिले नव्हते त्यांच्यात त्यांच्या पराक्रमाविषयी उत्सुकतेने चर्चा होई. आपल्या वननिवासात सरकारची ही राजघोषणा पाहताच वासुदेव बळवंतांनी आपली प्रतीराजघोषणाही (काउंटर प्रोक्लमेशन) लिहिण्याचे ठरविले. थोड्याच दिवसात वासुदेव बळवंतांच्या या प्रतिघोषणेच्या प्रती महाराष्ट्रातील कित्येक गावी झळकू लागल्या. सरकारी घोषणा वाचणारे लोक ती वाचण्यासही घोळक्याने जमले आणि ती घोषणा वाचून वासुदेव बळवंतांच्या धैर्याची प्रशंसा तसेच करू लागले.

वासुदेव बळवंतांनी काढलेल्या या प्रतिराजघोषणेत मुंबईच्या राज्यपालांचे डोके जो आणून देईल त्याला त्यांनी अधिक मोठे म्हणजे पाच सहस्र रुपयाचे पारितोषिक देण्यात येईल असे घोषित केले. पुण्याचे जिल्हाधिकारी त्यांना पकडण्यासाठी खटपट करीत होते. आणि तेथील सत्र न्यायाधीशांनी त्यांच्या बऱ्याच सहकाऱ्यांना लुटीच्या अभियोगांत काळ्या पाण्याच्या निष्ठुर शिक्षा सुनावल्या होत्या. त्यामुळे ते दोघही त्यांच्या विशेष रोषास पात्र झाले होते. या अधिकाऱ्यांच्या मस्तकांसाठी त्यांनी तीन सहस्र रुपयाची पारितोषिके आपल्या घोषणेत घोषित केली. या राजघोषणेवर त्यांनी 'पेशव्यांचा नवा मुख्य प्रधान' म्हणून स्वतःची स्वाक्षरी केली होती— वासुदेव बळवंत फडके !

ज्या वृत्तपत्रातून आपल्याला पकडणाऱ्या माणसास पारितोषिक देणारी सरकारी घोषणा प्रसिद्ध झाली होती, त्या वृत्तपत्रांकडे त्यांनी या प्रतिघोषणेची एकेक प्रत पाठवून जनतेच्या अवलोकनासाठी ती आपल्या वृत्तपत्राच्या पहिल्या पानावर प्रसिद्ध करण्याची त्या पत्राच्या संपादकांना आज्ञा केली. आपल्या सूचनेचा अव्हेर झाल्यास ती प्रतिघोषणा न छापणाऱ्या अँग्लोइंडियन पत्रकाराचा उजवा हात उडवला जाईल अशी चेतावणीही या संपादकांना त्यांनी दिली. या धाडसातील युयुत्सु वृत्ती पाहून इंग्रज अधिकाऱ्यांचा तिळपापड झाला. पुढे न्यायालयात दंडाधिकारी केसर हे त्यामुळेच चिडून वासुदेव बळवंतांना म्हणाले की, "अशी दुष्ट राजघोषणा प्रसिद्ध करण्याचे धारिष्टय तुला झाले तरी कसे ?" पण स्वातंत्र्यासाठी तळमळणाऱ्या बंडखोराच्या या अजोड धैर्यामुळेच त्यांचे देशबांधव त्याच्यावर गाढ प्रेम करीत, हे दंडाधिकारी केसर विसरले.

मे महिन्याचे दिवस अशा तंग वातावरणात जात होते. ते अधिक तंग करणारी वासुदेव बळवंतांच्या बंडाची दुसरी लाटही मे महिन्याच्या मध्यातच महाराष्ट्रात उसळली !

* * *

# प्रकरण १२वे

## दुसरी लाट

महाराष्ट्राचे वातावरण उलटसुलट बातम्यानी कुंद झाले असताना वासुदे बळवंतांच्या बंडाची दुसरी लाट दख्खनमध्ये उसळली. घाटावरील प्रदेशात सरकारी सैन्य चोहोकडे पाठविले जाताच, गनिमी काव्याच्या युद्धात निष्णात झालेले वासुदेव बळवंतांचे सहकारी पाचसहा दिवसात कोकण प्रांतात उतरले.

ते कोकणात उतरल्याचे वृत्त काही पत्रांनी भपकेदार शब्दात रंगविले. 'बाँबे गॅझेट' च्या अंकातील या वर्णनाचा परिच्छेद म्हणतो :[१]

"Terror-stricken at the despatch of a body of the Poona Horse under Captain Westmacott from the camp at Talegaon, about two hundred dacoits crossed over the Ghauts into Panvel Taluka in which they have been committing depredations without let or hindrance from either the inhabitants or the police."

( " तळेगावच्या छावणीतून येणाऱ्या कॅप्टन वेस्टमकॉट याच्या हाताखालील घोडदळाच्या भीतीने घाबरलेल्या सुमारे दोनशे लुटारूंनी घाट ओलांडून पनवेल तालुक्यात प्रवेश केला आणि तेथील रहिवाश्याकडून किंवा पोलिसांकडून कसलाही प्रतिकार न होता त्यांनी आपले लुटीचे छापे चालू ठेवले आहेत.")

पोलिसांकडून त्याना प्रतिकार झाला नाही. कुलाबा जिल्ह्यात त्या वेळी बऱ्याच गावावर एखादा पोलीस असावयाचा! अशा बळावर बंडखोरांना पायबंद घालण्याचा विचार पोलीस तरी कसा करू शकणार ? त्यांचे नाव निघताच पोलिसाची पाचावर धारण बसे ! त्यामुळे त्यांची धाड एकदा कशी तरी पुढे निघून जाऊ दे, असे म्हणत पोलीस स्वतःची सुरक्षितता पहात. कोकण प्रांतातील सबंध स्वारीमध्ये त्याना आव्हान द्यावयाला एकही पोलीस त्यामुळेच पुढे आला नाही.

कोकण प्रांतातील लुटीचा पहिला छापा पनवेलपासून चार कोसावर

---

१ 'बॉम्बे गॅझेट' दि. १५ मे १८७९

असलेल्या नेरे या गावी शनिवारी १० मे १८७९ या दिवशी पडला. बंडखोर आता कुलाबा जिल्ह्यात उतरले, या वृत्ताने खेडेगावचे लोक भयभीत झाले होते. तेच वातावरण नेरे गावीही पसरले होते. सायंकाळी सात वाजले ! गावातील सर्व लोक सायंकाळच्या आतच घरी परत आले. त्यांनी शक्य तेवढा बंदोबस्त करावयाचा म्हणून अंगणाची फाटके लावून घतली. घराजवळील वाघा बंद केल्या आणि गोठ्यां-ची कवाडे गुरांना आत नीट बांधून बंद करून टाकली. घराबाहेरील बंदोबस्त उर-कून आपल्या घराचे मुख्य पुरुष घरातील मंडळींना सावधगिरीच्या सूचना देत आपल्या घरांचे दरवाजेही लावून घेऊ लागले.

सायंकाळचे जेवण उरकून घ्यावयाचे म्हणून नेरे गावातील माणसे स्वयंपाक-घरांकडे वळली. ती तोंडात पहिला घास टाकणार इतक्यात गावाच्या बाहेर टोकाला बंदुकीचे बार त्यांना ऐकू आले. नेरे गावच्या रहिवाश्यांना बंदुकीचे बार ऐकण्याचा सराव नव्हता. त्यामुळे ते गोंधळात पडले. थोड्याच वेळात बंदुकीचे बार जवळ जवळ येत चालल्याचे गावकऱ्यांना ऐकू येऊ लागले : 'धडाड्! धडाड्!' नेरे गावा-तील लोकांचे घास घेण्यासाठी उचललेले हात तसेच थबकले. तोच बंदुकीचे बार नेरे गावच्या मुख्य रस्त्यावर येऊन पोहोचले.

नेरे गावचे एक प्रमुख रहिवासी सीताराम सखाराम गोडबोले यांच्या घरा-समोर ते आवाज लागलीच येऊन ठेपले. गोडबोले यांनी बाहेर रस्त्यावर पाहिले, तेव्हा रात्रीच्या अंधःकारात त्यांना बाहेरच्या लोकांच्या पाजळलेल्या जळत्या मशाली दिसल्या. त्या पाहताच त्यांच्या डोक्यात लख्ख प्रकाश पडला. काळाकुट्ट अंधःकारात हातातील मशाली पाजळत, खेडेगावाच्या कुणब्यांच्या वेषात आलेले ते लोक पाहता-च गोडबोले यांचा धीर सुटला. ते माजघरात पळाले. त्यांनी आपल्या घरातील सर्व माणसे एकत्र जमविली आणि त्यांना त्वरेने आपल्या मागून चालण्यास सांगितले. लुटारूंचे धक्के पुढील दारावर बसू लागले. त्यांच्यापैकी काहीजण आरोळ्या ठोकू लागले. आणि काहींनी त्वेषाने हातातील मशालीही उंचावल्या. सीताराम सखाराम गोडबोले हे आपल्या मुलामाणसांना घेऊन मागच्या दाराकडे गेले आणि दार उघडून ते घराबाहेर पडले. घरधनी बाहेर निघून जात आहे असे पाहून दारावर कुऱ्हाडीचे घाव घालून रामोश्यांनी ते फोडले आणि मशालीच्या उजेडात ते घरात घुसले. त्यांच्या हातात तलवारी, काठ्या आणि पिस्तुले होती. त्यांनी घरातील सामानाची यथेच्छ नासधूस केली. आणि मिळालेली चिजवस्तू घेऊन दोन सहस्र रुपये मूल्याच्या लूटी-सह त्यांनी ते घर सोडले. पण त्यापूर्वी घरातील काही खेळे लांबविण्यास ते विसरले नाहीत. गोडबोले घरात परतले, तेव्हा सर्व घरभर पडलेला सामानाचा पसारा त्यांना दिसला.

गोडबोल्यांच्या घरात धामधूम झाल्यानंतर नेऱ्याचे प्रमुख व्यापारी महादेव गोविंद जोशी यांना आपल्या दारावर मोठमोठ्या थापा पडलेल्या ऐकू आल्या. महा-

देवराव जोश्यांचे दुसरे नाव मोकाशी होते. थापा ऐकून त्यांचे धाबे दणाणले. त्यांनी दार उघडण्याचे नाकारले! तेव्हा बऱ्या बोलाने दार उघडा, नाहीतर आम्ही ते फोडू अशी बाहेरील लोकांनी त्यांना तंबी दिली. महादेवराव निरुपायाने दाराजवळ गेले आणि कापऱ्या हाताने त्यांनी दार उघडले. दार उघडले जाताच बाहेरील लोक भराभर आत घुसले. हातातील काठ्यांनी आणि कुऱ्हाडीनी त्यांनी महादेवराव मोकाशी यांच्या घरातील हुडपे, लहान पेट्या आणि कपाटे फोडण्यास सुरुवात केली. घरातील लोक प्रतिकार करण्यासाठी पुढे आले. पण हातातील काठ्यांचा प्रसाद देऊन लुटारूंनी त्यांना बाजूला सारले आणि कपाटे, पेट्या यांच्यातील मौल्यवान दागदागिने त्यांनी हस्तगत केले. मोकाशी यांना त्यांनी बाजूला बसविले होते. रामोश्यांच्या हाताना हिसडा देऊन ते कपाटाकडे धावले. रामोशीही त्यांच्या पाठोपाठ धावले. आणि त्यानी मोकाशी याना परत बाजूला नेऊन त्यांच्या डोक्यावर एक लटकती तलवार ठेवली आणि बजावले की, आता पुन्हा जर हालचाल कराल, तर तुमची शंभर वर्षे भरलीच म्हणून समजा! या झटापटीत मोकाश्यांच्या डोक्यावर आणि पायावर, तलवारीची एक दुखापत झालीच. मोकाश्यांच्या घराची लूट रामोश्यांनी थोड्या वेळात संपविली.

नंतर नेरे गावच्या सोनाराच्या घराकडे ते वळले. सोनाराच्या घरी विवाह-कार्य व्हायचे होते. त्यामुळे त्याचे बरेच आप्त बेलापूर, चिरनेर, चिरकोना इ. ठिकाणांहून त्याच्याकडे आले होते. पाहुण्यांच्या बायकांनी आपले मौल्यवान दागिनेही नेऱ्यास आणले होते. ते आयतेच या घरी लुटारूंच्या हाती लागले, दहा-पंधरा क्षण पुरुषांनी लुटारूंना प्रतिकार केला. त्यात त्याना मार मिळाला. त्या सोनाराचे नाव होते बाळकृष्ण मोरशेट!

सोनार आळीतील दुसरे रहिवाशी शंकर वाच्छाशेट त्या दिवशी सकाळी कामासाठी पनवेलीस गेले होते. पनवेलचे काम आटोपून रात्री उशीराने ते नेऱ्यास जाण्यासाठी निघाले. त्यांनी आपल्या आळीत पाऊल टाकले. आणि त्यांना आरडा-ओरडा ऐकू आला. तेव्हा काही धोका आहे असे समजून ते मागे फिरले. आणि रस्त्याच्या बाजूला लपून राहिले. लुटारू निघून जाईपर्यंत त्याना तसेच दबा धरून बसावे लागले.

नेरे गावातील वासुदेव बळवंतांच्या सहकाऱ्याची धाड दहा वाजेपर्यंत चालू होती. नेरे येथील आणखी दहाबारा घरे त्यानी लुटली. त्यात मोरो गणेश लोंढे या शिक्षकाच्या घरासही त्यानी भेट दिली. आणि गावच्या पोलीस पाटलाचे घर कोठे आहे म्हणून लोंढे याना त्यानी प्रश्न केला. कारण, सर्व गाव पालथा घातल्यावर त्याना आपल्या या शेवटच्या घराची आठवण झाली होती. ते मग त्याच्या घराकडे वळले. पण ते असे करणार हे गावच्या नमू पोलीस पाटलाने आधीच ओळखले

होते. आणि ते येण्याच्या आधीच घरातून तो पसार झाला होता. त्यामुळे तो बचावला.

गावभर हा धुमाकूळ चालू असता गावकऱ्यांपैकी कित्येकजण घरे सोडून शेतातून लपून बसले. भगवान खत्री नावाचा गावकरी एका उंच झाडावर चढला. आणि तेथून सर्व प्रकार पाहू लागला. परंतु ह्या सुरक्षित ठिकाणीही लुटारू झाडाखाली येताच त्याची घाबरगुंडी उडाली, तोल सुटून तो खाली पडला आणि त्यात त्याचा एक हात मोडला!

या गावात बंडखोरांनी सहा सहस्र रुपयांची संपत्ती आणि पैसे लुटले.[२] गावकऱ्यांनी आपला पाठलाग करू नये म्हणून रामोशयांनी बंदुका उडवीत उडवीत नेरे गाव सोडले. नेऱ्यापासून थोड्या कोसांवर डोंगराळ अरण्यात लुटारूंनी पुढील तळ ठोकला. या अरण्यात त्यांच्या हेरांनी इतर गावाची काढून आणलेली माहिती त्यांनी ऐकली आणि दुसऱ्या दिवशी त्या गावावर छापा घालावयाचा निर्णय घतला.

दुसऱ्या दिवशी सकाळी उत्तम जेवण करून सायंकाळी ते बाहेर पडले. नेरे गावच्या छाप्याचे वृत्त ऐकून भोयतालचे गाव चिंतानात झाले होते. त्यापैकी चिखले गावच्या रहिवाशांना वाटणारी ही चिंता शेवटी खरी ठरली. चिखलेकर गावकरी संध्याकाळीच घरेदारे बंद करून बसले. पण तोच लुटारूंच्या टोळ्या, बंदुका, तरवारी काढ्या नाचवीत आणि आरोळ्या ठोकीत गावच्या वेशीजवळ येऊन धडकल्या. त्या ऐकताच चिखल्याच्या गणेश बाबाजी पाटणकर या गृहस्थांनी घराच्या पुढील दारास बाहेरून कुलूप ठोकले आणि त्यांच्या मागील दारी कुणब्याचे खोपट होते. त्याच्याबाहेर ते दबा धरून बसले.

लुटारू गावात सायंकाळच्या सातच्या संधीस शिरले. पाटणकरांच्या घराजवळ येताच त्यांच्या म्होरक्यांनी पाटणकर यांच्या नावाने हाका मारल्या. पण 'ओ' देण्यास आत घरात कोण होते? घरधनी पळून गेला असावा असा तर्क करून घराच्या अंगणाचे बारीक फाटक लुटारूंनी एका झटक्यासरशी मोडून टाकले. आणि त्याच्या घराच्या मुख्य दाराचे कुलूप तोडून पाटणकरांच्या घरात प्रवेश केला. ते पाहताच घरामागच्या परसात उभे राहिलेले पाटणकर दुसरीकडे पळून गेले. लुटारूंपैकी एकजण दक्षता म्हणून नागवी तलवार फिरवीत घरापुढे उभा राहिला. आत त्याच्या सहकाऱ्यांनी सबंध घर धुंडाळले आणि सहाशे रुपयांच्या लुटीचे गाठोडे बांधून त्यांनी ते घर सोडले. त्यांच्या हातातील पेटत्या पलित्यांच्या उजेडात त्यांचे निर्गमन पाटणकरांनी लांबून पाहिले.

विजयोन्मादात गावातील दुसरे सावकार विष्णुपंत पाटणकर यांच्या घरासमोर लुटारू आले. त्यांची चाहूल लागताच विष्णुपंत घर सोडून निघून गेले होते.

---

२ "गॅझेटियर ऑफ दि बॉम्बे प्रेसिडेन्सी", भाग २ खंड १९ पृ. ३३७-३८

परंतु गणेशपंत पाटणकर यांचा लेखनिक गणेश बापूजी हा घराच्या ओटीवर बसला होता. सर्व रामोशी त्यांच्याजवळ गेले. त्यालाच विष्णुपंत समजून त्यांनी त्याला 'पैसे काढा' म्हणून दरडावण्यास प्रारंभ केला. त्याने जेव्हा काही ऐकले नाही तेव्हा लुटारूंनी त्याचे हातपाय बांधले, त्याच्या छातीवर दोन मोठे दगड ठेवले आणि हातातील काठ्यांचा प्रसाद त्याला देत, ते घरात शिरले. घरातील दागदागिने तर त्यांनी घेतलेच; पण मशालीच्या भडक प्रकाशात खुंटीवर झळकणाऱ्या पाटणकरांच्या उंची शाली काढून घेऊन त्या पांघरीत ओटीवर बांधून ठेवलेल्या 'विष्णुपंतांस' 'राम राम' करून त्यांनी ते घर सोडले.

चिखल्यास पाटणकरांचीच घरे पुष्कळ होती. त्यांच्यापैकी नारायण हरि पाटणकर यांच्या घराभोवती हातातील मशाली पाजळीत लुटारू फेऱ्या घालू लागले. आपल्या घराला मशालधारी रामोश्यांचा वेढा पडलेला आहे, हे पाहून नारायणराव पाटणकरांचे धाबे दणाणले. इतक्यात पुढील दारावर धक्के बसलेले त्यांनी ऐकले. दार फुटण्यास आता वेळ नाही, हे पाहून ते त्वरेने माडीवर गेले. घराच्या मागील बाजूस असणारी खिडकी त्यांनी गाठली. आणि त्या खिडकीतून गुरांच्या गोठ्यात ते उतरले.

लुटारू घरात आले, तेव्हा घरात पाटणकरांच्या कामावर असलेला गवंडी होता. त्याला आणि पाटणकरांचा लेखनिक रामचंद्र या दोघांना माहितीसाठी बरेच छेडल्यावर रामोश्यांनी दोघांनाही ओटीवर आणले आणि त्यांच्या नाकावर आडव्या तरवारी ठेवून घरातील दागदागिने दाखविण्यास रामोश्यांनी त्यांना सांगितले. त्यांनी जी ठिकाणे सांगितली तेथे दागदागिने मिळाले नाहीत. तेव्हा त्यांना रामोश्यांनी शासन केले आणि मिळालेली लूट घेऊन ते घर सोडले.

चिखल्याची लूट लुटारूंनी अडीच तासात संपविली. जाताजाता चिखल्याचाच एक शेतकरी, जो त्यांच्या उद्योगात सहभागी झाला होता, त्याला मिळालेल्या लुटीविषयी त्यांनी धन्यवाद दिले. नेरे, चिखले आणि पुढे पळस्पे या गावात श्रीमंत कोण, मंगल कार्य असल्यामुळे तोच दिवस मोक्याचा कसा होता इ. माहिती रामोश्यांना अचूकपणे मिळालेली होती. ती पाहून आश्चर्यचकित झालेला 'बॉम्बे गॅझेट'चा वार्ताहर म्हणतो :

"The intelligence department of the dacoits seems to have been efficient." ("लुटारूंचे हेर खाते कुशल आहे असे दिसते !")

पळस्प्यावरील छाप्यासंबंधी मुंबईचे राज्यपाल सर रिचर्ड टेंपल म्हणाले :

"This was the native place of the Brahmin leader (already mentioned) (Vasudeo Bulwant) who knew the house (of Oze) and all about it. This explanation detracted

somewhat from the serious aspect of this case which even then was serious enough."[3]

("मागे उल्लेख केलेल्या) ब्राह्मण पुढाऱ्याचेच (वासुदेव बळवंतांचेच) हे जन्मगाव होते. त्याला ते घर (ओझे यांचा वाडा) आणि त्याची सर्व माहिती होती. या प्रकरणाचे गंभीर स्वरूप या गोष्टीमुळे बरेच सौम्य होते. पण तरीही ती घटना बरीच गंभीरच होती") सर रिचर्ड टेंपल यांची ही विधाने रास्त नाहीत. पळस्पे हे वासुदेव बळवंतांचे जन्मगाव नव्हते. ते शिरढोण होते. त्यामुळे त्या वाड्याचे धनी ओझे यांच्याकडे नातलगांचा जो मेळावा जमला होता त्याची आणि इतर तात्कालिक बातमी त्यांच्या हेरखात्यानेच काढलेली होती हे उघड आहे.

कल्हई खिंडीपासून शिरढोणच्या अलीकडे दोन कोशार्धावर पळस्पे हे गाव आहे. १८७९ मध्ये तेथे रामचंद्र गणेश ओझे हे कर्ते पुरुष राहत होते. ते आणि त्यांचे सर्वांत मोठे बंधू माधवराव हे त्या वेळी बडोद्यासच राहात असत. त्यांचे वडील गणेशपंत ओझे हे बडोद्याचे महाराज खंडेराव गायकवाड यांचे दिवाण होते. त्यांची दिवाणपदावर नेमणूक करण्याचा विचार खंडेराव गायकवाडांनी १८५४ मध्ये प्रकट केला, तेव्हा हा मराठा मनुष्य त्या पदावर असणे इंग्रज सरकारच्या धूर्त प्रतिनिधीस प्रशस्त वाटले नाही. आणि या कारणामुळे ती नेमणूक स्थगित झाली. हे वृत्त प्रसिद्ध करताना 'ज्ञानप्रकाश' पत्रांत म्हटले होते : "बडोद्यास नवीन दिवाण गणेशपंत ओझे यांस गायकवाड महाराज नेमीत होते. परंतु रसिदंटसाहेबांची सदरहू गृहस्थाबद्दल मान्यता होत नाही. सबब तूर्त बेत रहित झाला असे कळत आहे."[4] परंतु, करारी गायकवाड महाराजांनी आपला त्यांच्या नेमणुकीविषयींचा हेका पुढे पूर्ण केलाच. आणि गणेशपंत ओझे हे बडोद्याचे दिवाण झाले. गणेशपंतांनी आपल्या पदरी आणखी एक मोठे पुण्य संपादन केले होते. सत्तावनचे स्वातंत्र्ययुद्ध सुरू झाले. त्या युद्धांत सांकेतिक दिवशी बडोद्यांतही उठावणी झाली. ती दडपण्याच्या पुण्य कृत्यात आपल्या दयाळू ब्रिटिश सरकारला साहाय्य करण्यात गणेशपंत ओझे हेही होते. त्यांच्या कार्याचे पारितोषिक म्हणून सरकारने त्याना मोठी जहागीर दिली. सत्तावनच्या स्वातंत्र्ययुद्धात त्या कामगिरीमुळे ओझ्यांना मिळालेल्या संपत्तीवर, सत्तावनच्या बंडखोरांचे वारस असलेल्या वासुदेव बळवंतांची स्वदेशस्वातंत्र्याकरिता मिळविण्याच्या पैशासाठी १८७९ मध्ये प्रतिशोधाची दृष्टी वळली!

ओझे याना मिळालेले वैभव त्यांच्या पदरी असलेल्या रक्षकांच्या पथकामुळे डोळ्यात भरण्यासारखे होते. दहा-पंधरा सशस्त्र रक्षकांचे सामर्थ्य त्यांच्या मोठ्या वाड्याच्या रक्षणार्थ पळस्पे येथे सिद्ध असे. या रक्षकांसाठी वाड्याच्या दिंडी दरवाजावरच एक खोली होती. पळस्पे येथे ओझे यांच्या वाड्यात एक विवाहकार्य

३ सर रिचर्ड टेंपल यांचे राजप्रतिनिधी लॉर्ड लिटन याना पत्र (गोपनीय); ३ जून १८७९
४ 'ज्ञानप्रकाश,' दि. १ मे १८५४

लवकरच होणार होते. त्यासाठी त्यांचे श्रीमंत आप्त तेथे आपल्या श्रीमंती दाग-दागिन्यांसह जमले होते. त्यांच्या दागदागिन्यांच्या रक्षणाचे हे वाढते उत्तरदायित्व रक्षक गुरख्यांवर पडले होते. त्यांच्याजवळ बहुधा तरवारी आणि कटचारी होत्या. पण त्यांच्या मुख्यांजवळ बंदुकाही होत्या.

पळस्पे गावातील ओझे यांच्या श्रीमान प्रासादावर चिखले येथील लूट मारून रात्री अकराच्या संधीस वासुदेव बळवंतांचे सहकारी चाल करून गेले. ते वाड्या-जवळ पोहोचले, तेव्हा त्यांची चाहूल लागून वाड्याचा मुख्य रक्षक गणू रामजी नाईक पुढे आला. रस्त्याजवळ अंधारात बरीच माणसे बसल्याचे त्याला दिसले. त्याने आपली बंदूक पुढे घेतली. तेथे बसलेल्या माणसांना तो दरडावून काही विचार-णार, तोच त्या माणसांतून 'धडाड्' असा आवाज उमटला आणि बंदुकीची एक गोळी सूं–सूं करीत गणूच्या कानावरून पुढे गेली. त्या माणसांमधून दुसरी गोळी लागलीच उडाली. ती त्याच्या पायाला लागली. गणू आपली बंदूक रोखणार, तोच एक, दोन, तीन अशा बंदुकीच्या गोळया पाठोपाठ उडाल्या. त्या गोळया लागून गणू विव्हळत खाली पडला. तेव्हा त्याचा घायाळ देह ओलांडून आरोळया ठोकीत बंडखोर ओझ्यांच्या वाड्याकडे वळले.

वाड्याजवळ येताच त्यांच्या गोफणवाल्यांनी दगडांची आणि विटकऱ्यांची सरबत्ती वाड्यावर केली. आणि वाड्याच्या दरवाजावर आणि खिडक्यांवर धडा-धड धोंडे फेकले. वाड्यातील लोकांना पुरेशी दहशत बसली असेल, अशा कल्पनेने ते नंतर वाड्याजवळ पोहोचले. वाड्यापुढील विस्तृत अंगणाच्या बारक्या लाकडी दारापाशी ते आले. त्या दाराजवळ ओझे यांचा ओंकारसिंग नावाचा गुरखा उभा होता. त्याने सावधगिरीने रामोश्यांवर आपली बंदूक झाडली. ती पुन्हा भरण्यासाठी तो गुंतला, तेव्हा लुटारूंनी वाड्याचे आडदार मोडले. आणि अंगणातून वाड्याच्या दाराकडे ते घुसले. त्यानी वाड्याचा भरभक्कम दरवाजा फोडण्यासाठी आरंभ केला. ओंकारसिग आत पळू लागला. पण बाहेरच्या रामोश्यानी त्याला पळता पळता धरले, आणि शिक्षा म्हणून त्याचा अंगठा कापला.

थोडा वेळ रामोश्यांनी धडका दिल्यानंतर वाड्याचा दरवाजा मोडून पडला. रामोशी लोक आत घुसले. ते वाड्याच्या मधल्या चौकापाशी पोहोचले. तेथे ओझे यांचा स्वामिनिष्ठ गुरखा सबासिंग त्यांना आडवा आला. त्याच्या हातात पाणीदार तलवार तळपत होती. त्याने एकाकी चार-पाच लुटारूंशी सामना आरंभिला. बंडखोर त्याच्यावर सर्व बाजूनी घसरले. सबासिंगाने शौर्याची पराकाष्ठा केली. आणि प्रति-स्पर्ध्यांवर प्रहार करून त्यांना घायाळ केले. पण शेवटी रामोश्यांच्या तलवारीच्या प्रहारांनी घायाळ होऊन तो ;खाली पडला. मरणोन्मुख स्थितीत त्यास पुढे मुंबईस नेण्यात आले. पण तो तेथे मृत्यू पावला. सबासिंग खाली पडलेला पाहून होळकर नावाचा दुसरा सशस्त्र सैनिक ओझे यांच्या वाड्यातून चौकात उतरला. त्यालाही

लुटारूंचे प्रहार खावे लागले. आणि तोही शेवटी भुईवर आदळला.

पराभूत गुरख्यांना तेथेच टाकून बंडखोर मुख्य वाड्यात शिरले. वाड्याच्या सभागृहात आल्यावर त्यांच्यापैकी चारसहा जणांनी त्या भव्य प्रासादातील हंड्या, झुंबरे, टांगदिवे इत्यादींवर पटापट उड्या घेतल्या आणि त्यामुळे मिळालेल्या झोक्यात असतानाच हंड्यांमधील पेटत्या मेणबत्त्या त्यांनी काढून हाती घेतल्या. हातातील मशाली पेटविल्या. आणि त्यांच्या वाढत्या प्रकाशात त्यांनी वाडा धुंडाळण्यास सुरुवात केली.

वाड्यावर रामोश्यांचा छापा सुरू होताच, वाड्याचे धनी रामचंद्र गणेश किंवा आप्पासाहेब ओझे यानी धूर्तपणाने घरातील सर्व मंडळींना मागील बाजूने आपल्या मित्रांच्या घरी पाठवून दिले. त्यांचा सर्वात मोठा मुलगा देवळात गेला होता. तेथे त्याला त्यांनी बोलावणे पाठविले. इतक्यात लुटारू त्यांच्यापाशी पोहोचले.

अप्पासाहेब याच्यापुढे त्यांचा प्रमुख उभा राहिला. मशालीच्या धूरकट प्रकाशात त्याची भयानक काळीभोर, धिप्पाड आकृती पाहून अप्पासाहेबांच्या तोंडचे पाणी पळाले. त्याने आपल्या सहकाऱ्यांना अप्पासाहेबांवर तरवार उपसण्यास सांगितले. एका रामोश्याने आपली तरवार अप्पासाहेबांवर उगारली. तेव्हा रामोश्यांचा प्रमुख अप्पासाहेबांना म्हणाला, "तुम्हाला उगीच त्रास द्यायची आमची इच्छा नाही. आम्हाला तुम्ही दोन हजार रुपये द्या! आम्ही जास्त काही न करता येथून निघून जाऊ! पण हे जर तुम्ही केले नाही तर पुढे काय होईल ते मी सांगू शकणार नाही!" या रामोशी प्रमुखाचे नाव होते दौलतराव नाईक! रामोशी लोकांच्या मराठी भाषेतील ती मागणी ऐकून अप्पासाहेब उत्तरले, "माझ्याजवळ इतका पैसा कुठे आहे? मी काही या वाड्याचा मालक नाही!" त्यावर दौलतराव म्हणाले, "हरकत नाही. एक हजार द्या! तेवढे मात्र तुम्ही दिलेच पाहिजेत. ते तुम्ही दिले नाहीत, तर आम्हास हवे ते आम्ही बळजबरीने घेऊ!" दौलतरावांची आज्ञा सुटताच आपल्या तरवारी अप्पासाहेबांच्या भोवती भीषणपणे फिरविण्यास रामोश्यांनी सुरुवात केली. ते दृश्य सहन न होऊन, निरुपायाने अप्पासाहेबांनी दोन सहस्र रुपये रामोश्यांना देण्याचे मान्य केले. त्यांनी दाखविलेल्या कपाटातून लुटारूंनी सर्व दागदागिने हस्तगत केले. त्यानी तिजोरी उघडली. पण तिजोरीत दोन सहस्र रुपयांच्या इतकी रक्कम त्यांना सापडली नाही, तरी तिजोरीत होते तेवढे पैसे त्यानी तिच्यातून काढून घेतले.

रामोश्यांपैकी काहीजण ओझे ऱ्याच्या स्वयंपाकघरात गेले. त्यानी तेथील कपाटे उघडली. लवकरच होणाऱ्या विवाहकार्यासाठी बायकांनी केलेले पदार्थ त्यांत ठेवले होते. त्यातील मेवामिठाईवर रामोश्यांनी ताव मारला. मोरांबे फस्त केले. आणि पक्वानांच्या सामुग्रीवरही हात मारला. अशाप्रकारे तोंड गोड केल्यावर

ते बाहेर आले आणि अप्पासाहेबांना धरून त्यांनी माडीवर नेले. वर जाताना त्यांना ते आश्वासन देत होते : "आमचं तुम्ही ऐकलंत, तर तुम्हाला काही दुखापत करण्याची आमची इच्छा नाही." ही सर्व मंडळी वाड्याच्या माडीवर गेली, तेव्हा पळस्पे गावातील काही धैर्यसंपन्न लोक गावाच्या दुसऱ्या भागात जमले होते आणि ओझे त्यांच्या साहाय्यास जमावाने येत होते. ते दिसताच अप्पासाहेबांना लुटारूंनी माडीच्या खिडकीजवळ नेले, आणि त्यांना म्हटले : "त्या गावकऱ्यांना मागे परत फिरण्यास सांगा, नाहीतर आमच्या गोळ्यांना ते बळी पडतील! अप्पासाहेबांनी निरुपायाने गावकऱ्यांना त्या संकटाची ओरडून जाणीव दिली. पण तो जमाव मागे हटेना. ते पाहून रामोश्यांनी वाड्याच्या माडीवरून बंदुकी उडविल्या, तेव्हा मात्र तिकडे येणारे गावकरी परत फिरले.

अप्पासाहेबांना बैठकीत बसवून लुटारूंनी नंतर त्यांचे वडील बंधू तात्यासाहेब यांचा ठावठिकाणा त्याना विचारण्यास सुरुवात केली. मुंबईस ते कामासाठी गेले होते; ही माहिती मिळताच, तात्यासाहेबांच्या मंडळीचे दागिने बांधून घेत असताना लुटारू अप्पासाहेबांना म्हणाले: "बरं आहे! तात्यासाहेबांना आमचा रामराम कळवा!" रामोश्यांची ही विनंती ऐकून अप्पासाहेबांचे मन सुन्न झाले. ते काही उत्तर देणार तोच त्यांना रामोश्यांचे नाईक आणखी पुढे म्हणाले : "तुम्हीही आमच्या सैन्यात का सामील होत नाही?" त्यासरशी रामोश्यांमध्ये मोठा हंशा पिकला. अप्पासाहेब स्वस्थ बसलेले पाहून दौलतराव नाईक हसले, त्यांनी अप्पासाहेबांना पानसुपारी दिली आणि "तुमची उंची चची आठवण म्हणून मी घेऊन जातो आहे." असे त्याची चंची घेत अप्पासाहेबाना सांगितले.

दौलतराव अप्पासाहेबांना हे सांगत होते, तेव्हा दुसरीकडे त्यांचे हस्तक मिळालेली लूट बांधून घेत होते. त्या लुटीत कित्येक उंची रेशमी कपडे आणि सोन्याचे दागिने होते. तीत रेशमी कोट, पागोटी, रेशमी शेले, उंची शाली आणि इतर कपडे होते, त्याचप्रमाणे सोन्याच्या मोहरा, वाकी, बांगड्या, सऱ्या, गळसऱ्या आणि सोन्याचे इतर दागिने होते. लुटीमध्ये चांदीची शेकडो भांडी, पेले, लोटे होते. माणिकाचे, जवाहिराचे आणि मोत्याचे दागिनेही पुष्कळ होते. हिऱ्याचे, मोत्याचे, इंद्रनील मण्यांचे दागिने त्याप्रमाणेच नथी आणि वज्रटीका त्या लुटीमध्ये होत्या. जवळ जवळ तीन सहस्र रुपयांच्या नोटाही त्या लुटीत होत्या. बंडखोरांच्या दृष्टीतून ओझे यांचे लढाऊ साहित्य कसे निसटावे? त्यांनी ओझ्यांच्या दोन बंदुका आणि दोन तरवारी त्याचप्रमाणे त्यांच्या पदरी असणाऱ्या घोड्यांची उंची सोगिरे आणि चांदीचे पट्टेही लुटीत पळविले. ही सबंध लूट सव्वा लाख रुपयांची होती.

लूट बांधून झाल्याची वार्ता मिळताच अप्पासाहेबांसह दौलतराव ओटीवर आले आणि त्यांच्यासह सर्व बंडखोरांनी अप्पासाहेबांना राम राम ठोकला. वासुदेव

बळवंतांचे सहकारी लुटीच्या आशेने त्यांना येऊन मिळाले होते. पण वासुदेव बळवंतांच्या सहवासाने सरकारविषयीचा द्वेषही त्यांच्या अंगी बाणला होता. अप्पासाहेबांना 'राम राम' करताना त्यांच्यापैकी काही अधिक धीट रामोशी आपल्या घोळक्यातून पुढे आले आणि अप्पासाहेबांना त्यांनी निक्षून सांगितले की, "आम्ही इंग्रज सरकारास भीत नाही. आम्हास तोफा मिळाल्या की, आम्ही पुण्यावर स्वारी करू !" त्यांच्या गर्विष्ठ उद्‌गाराचे अप्पासाहेबांना आश्चर्य वाटले ! दुर्दैवी जिवाच्या हताश मुद्रेने ते त्यांच्याकडे पहातच राहिले. दौलतरावांनी मग आपल्या सर्व लोकांना तेथून निघून जाण्याची आज्ञा करताच सर्व बंडखोर आपल्या नेत्यासह तेथून शिस्तीने निघून गेले ! ते पळस्पे गावाच्या बाहेर आले, तेव्हा पहाटेचे तीन वाजले होते. अंधारात दोन कोशार्धावर वासुदेव बळवंतांचे शिरढोण हे गाव त्यांनी मागे टाकले आणि कल्हई खिंडीतून डोंगराळ प्रदेश ओलांडून घाटावर जाण्यासाठी त्यांनी कोकण प्रांत सोडला.

* * *

## प्रकरण १३ वे

# अग्निप्रलय !

रविवारी पळस्पे येथे पडलेल्या वासुदेव बळवंतांच्या छाप्याची वृत्ते मुंबईस येऊन थडकली. तेव्हा वासुदेव बळवंतांची पुढील भरारी कोठपर्यंत जाईल याची लोकांना शाश्वती राहिली नाही. त्यामुळे प्रत्यक्ष मुंबईलाही मंगळवारी १२ मे १८७९ ला घबराटीचे वातावरण पसरले. ते सांगताना 'नेटिव्ह ओपिनियन' पत्राने आपल्या एका अग्रलेखात म्हटले :

"We are sorry that the Governor should be away from the Presidency at a time of panic and Bombay was almost panic-stricken when it heard on Tuesday last of the dacoity at Palaspe which is only a few miles from this place".[1]

(" या घबराटीच्या वेळी राज्यपाल इलाख्यापासून दूर असावे याचा आम्हाला खेद होतो. आणि गेल्या मंगळवारी या ठिकाणापासून फक्त काही कोसांवर असलेल्या पळस्पे येथील दरोड्याचे वृत्त मुंबईने ऐकले तेव्हा तिची घबराटीने गाळण उडाली होती. ")

मुंबईचीच फक्त ही गत होती असे नव्हे, तर पुण्याचीही. मागदरी आणि चांदखेड येथील छाप्यानंतरच 'ज्ञानप्रकाश'ने "Deccan Dacoities" ("दख्खन-मधील दरोडे") या मथळ्याखाली आपल्या अग्रलेखात म्हटले :

It requires no extra-ordinary powers of appreciation to imagine the state of feelings of the people when such daring acts of dacoity are committed in the vicinity of Poona, where there is a large military cantonment and also a large number of Government Officials of the Government of India.

(" जेथे एक प्रचंड सैनिकी तळ आहे आणि हिंदुस्थान सरकारच्या अधिकाऱ्यांची बरीच मोठी संख्या आहे त्या पुण्याच्याच परिसरात दरोड्यांच्या अशा

---

१ "नेटिव्ह ओपिनियन," दि. १८ मे १८७९

दरोड्यांच्या घटना घडल्या असतांना लोकांच्या मनाच्या अवस्थेची कल्पना करण्यास काही मोठ्या मानसिक अभ्यासाच्या बळाची आवश्यकता नाही.") हे साधे सरे दरोडे नसून राजकीय उठावण्यास आहेत, असे म्हणणाऱ्या जिल्हाधिकाऱ्यांना या पत्राने विचारले :

"Is it really believed by these officers that these Ramoshis are the instruments of some political conspirators who are endeavouring to subvert the British Empire in India and get the whole of political power in their hands?"[2]

(" या अधिकाऱ्यांची खरोखरच अशी भावना आहे काय की, हिंदुस्थानातील ब्रिटिश साम्राज्य उलथून टाकून सगळी राजकीय सत्ता आपल्या हाती घेण्याचा प्रयत्न करीत असणाऱ्या काही राजकीय कटवाल्यांचे हे रामोशी म्हणजे केवळ हत्यार आहेत? ")

वासुदेव बळवंतांच्या उठावणीमुळे आणि त्यांच्या भयाने कित्येक जिल्ह्यात सरकारी राज्यव्यवस्थेला दरारा पार नाहीसा झालेला होता, हे पुढील पुरावलोकनावरून दिसून येईल. 'बॉम्बे गॅझेट' पत्र म्हणते

"Major Daniell is up and alive do the difficulties created by the daring dacoits and is roving about in the districts, where the powers of Government either are dissipated or paralysed."[3]

(' या धीट दरोडेखोरांनी निर्माण केलेल्या बिकट परिस्थितीची मेजर डॅनिअलला जाणीव असून तो दक्षही आहे आणि ज्या जिल्ह्यामध्ये सरकारची सत्ता खिळखिळी झालेली आहे किंवा निरुपयोगी झालेली आहे अशा जिल्ह्यामधून फिरत आहे. ")

खेडेगावातील शेकडो लोकाप्रमाणेच भितीमुळे युरोपियन लोकही पुण्यामुंबईस रहावयास गेले. युरोपियनांच्या 'गावठी' नोकरांनी आपल्या साहेबांची अशी गाळण उडालेली तोपर्यंत पाहिली नव्हती. वासुदेव बळवंतांच्या नावाचे किती भय उत्पन्न झाले होते, त्याचे वर्णन करताना, 'बॉम्बे गॅझेट' पत्र म्हणाले,

"A feeling of extreme uneasiness at the exploits of the dacoits is becoming very general The people in the city and Cantonment of Poona are . . greatly alarmed. .. ... In the district, ...... the state of affairs is different. Accounts (of dacoities) continue to be received . . from all parts Not a village unprotected by troops appears to be safe .. . The people are beginning to believe that even their wildest

२ 'ज्ञानप्रकाश,' दि. १३ एप्रिल १८७९
३ 'बॉम्बे गॅझेट,' दि. १४ मे १८७९

threats are capable of fulfilment. Even the Europeans residing in stations on railway lines have been frightened into sending their wives and children away for safety."[४]

("लुटारूंच्या कृत्यांमुळे अत्यंत अस्वस्थतेचे वातावरण सर्वत्र पसरत आहे. पुण्यास नगर भागात आणि सैनिक विभागात (लष्करात) लोक बरेच घाबरलेले आहेत. जिल्ह्यातील परिस्थिती निराळी आहे. सगळ्या ठिकाणाहून (दरोड्याच्या) वातम्या येतच आहेत. सैन्य नसलेले एकही खेडेगाव सुरक्षित दिसत नाही. लुटारूंच्या अत्यंत भंपक धमक्याही खऱ्या होण्यासारख्या आहेत असे लोक मानू लागले आहेत. लोहमार्गाच्या स्थानकांवर राहाणारे युरोपियन लोकसुद्धा घाबरून आपली बायकामुले दुसरीकडे सुरक्षिततेसाठी पाठवू लागले आहेत.")

पळस्प्याच्या दरोड्यानंतर अमुक दिवशी चोरटे येणार म्हणून ठाणे गावात हूल उठली. त्यासरशी तेव्हापासून पुढे महिनाभर मुंबईच्या कापाच्या मैदानातील (आत्ताच्या आझाद मैदानातील) 'गॅरीसन' चे पथराएक सैनिक ठाण्यास बोलावण्यात आले. ते रात्रभर ठाण्याच्या क्रमांक एकच्या पोलीस चौकीजवळ मोठ्या बंगल्याच्या देवडीवर पहारा करीत असत आणि गावात रात्रीचा रोंदही फिरवत असत.[५] दरोडेखोरांच्या भीतीने ठाण्यात अशी वातमी पसरली की दंडाधिकारी खा. ब. कावसजी यांनी ठाण्यात अधिक बंदोबस्त आवश्यक आहे असे वाटून मुंबईहून पन्नास लष्करी लोक आणविले आहेत. ठाण्याचे काही उत्साही नागरिक रात्री १० वाजता त्यांना पहाण्यास ठाण्याच्या पुलावर गेले. पण दंडाधिकाऱ्यांना दुसरी बरीच ठिकाणी सुरक्षित राखावयाची होती. त्यामुळे लोकांना नेहमीच्या एका पहाऱ्यावाचून तेथे काही आढळले नाही.

युरोपियनांची कशी भंबेरी उडाली होती ते दाखविणारी पुष्कळ दृश्ये महाराष्ट्रात दिसू लागली होती. पळस्पे येथील छाप्याच्या दुसऱ्या दिवशी वासुदेव बळवंताचे लोक रात्री कल्याणला येणार आहेत अशी कल्याण येथे हूल उठली. ती ऐकताच तेथील युरोपियन लोक घाबरून गेले. परंतु कल्याण सोडून पळून जावयाला त्यांना रात्रीपर्यंत गाडी नव्हती. धडधडत्या अंतःकरणाने त्यांनी रात्रीपर्यंत वेळ काढला. रात्री दोन वाजता एक मालगाडी कल्याणहून मुंबईला जाणार होती. पण तीसुद्धा भयग्रस्त युरोपियनांना एक वरदानच वाटले. त्यांनी आपली सर्व बायकामुले ती गाडी येताच त्या गाडीत बसविली आणि मुंबईस पाठवून दिली. पुण्यातील युरोपियन लोकही त्याला अपवाद नव्हते. आपल्या संरक्षणासाठी लागणाऱ्या गोळीबाराची अडचण पडू नये म्हणून त्यांनी बंदुकीच्या आणि पिस्तुलांच्या गोळ्या

४ 'बॉम्बे गॅझेट' दि. १९ मे १८७९

५ 'ज्ञानप्रकाश', दि. २२ जून १८७९

शोकडोनी विकत घेतल्या. त्या वेळेस 'ट्रेचर अँड कंपनी' नावाची मोठी मंडळी असा दारूगोळा पुण्याला विकत असे. युरोपियनांच्या या खरेदीमुळे त्या मंडळीच्या भांडारातील सर्व काडतुसे आणि गोळ्या त्यामुळे केव्हाच विकल्या गेल्या.

दिवस आणीबाणीचे होते. तरीही उन्हाळ्याच्या सुटीसाठी पुण्यास जाणाऱ्या लोकांनी आपला पुण्यास जाण्याचा शिरस्ता मोडला नाही. रा. ब. माधवराव रानडे त्या वेळी नाशकास दुय्यम न्यायाधीश (सबजज्ज) होते. रविवारी ४ मेला प्रतिवर्षीच्या नियमाप्रमाणे उन्हाळ्याच्या सुटीसाठी ते पुण्यास आले. त्याच दिवसात पुण्याच्या पुरोगामित्वात भर घालणारा एक समारंभ पुण्यास घडून आला. मंगळवारी १३ मेला सायंकाळी पुणेकरांनी तो पार पडला. स्त्रियांच्या वक्तृत्वाचा समारंभ तोपर्यंत पुणेकरांना अपूर्व होता. त्यामुळे त्या दिवशी पुण्यास तो घडून येणार आहे असे वृत्त कळताच पुण्याच्या परंपरावादी लोकात खळबळ उडाली. त्या दिवशी संध्याकाळी होणाऱ्या त्या समारंभास धर्माभिमानी लोकांचा विरोध होणार असल्यामुळे समारंभाला जमलेल्या लोकांमध्ये तंग वातावरण दिसत होते. परंतु तसे काही विक्षेप न घडता तो समारंभ शेवटी निर्विघ्नपणे पार पडला.

समारंभानंतर घरी परतणारे लोक त्या वैचारिक वादळात रमतगमत घरी जात होते. सायंकाळी सातच्या संधीस पुण्यातील सृष्टीतील वातावरणही एकदम पालटले. एकाएकी सोसाट्याचा वारा सुटला. आकाश मळभाने कुंद झाले. आणि ढगांच्या गडगडाटाने दशदिशा दणाणून गेल्या. मेघगर्जनांच्या गडगडाटात थोड्याच वेळात विजांच्या थैमानाची आणि मुसळधार पावसाचीही भर पडली.

थोड्याच वेळात पाऊस थांबला. आणि घरी परतणारे लोक आडोसे सोडून पुढे रस्ता चालू लागले. त्यांच्यापैकी काहीजण विश्रामबाग वाड्याकडे पहात पुढे गेले. त्या वाड्यात सरकारी इंग्रजी शाळा होती. त्या वाड्याची भव्यता त्याच रात्री विकृत होणार आहे, अशी त्यांच्यापैकी कुणालाही त्या सध्याकाळी कल्पना नव्हती.

विश्रामबाग वाड्याला ऐतिहासिक महत्त्व होते. तो बांधण्यास दुसऱ्या बाजीरावाने १८०० मध्ये सुरवात केली आणि नोव्हेंबर १८०८ ला त्याचे काम पूर्ण होऊन त्याची त्याने वास्तुशांत केली. २६० फूट रुंदीच्या आणि ८१५ फूट लांबीच्या या एकमजली प्रासादात तीन चौक होते. त्यातील एका चौकात हौद असून मधल्या चौकात विहीर होती. त्याच्या तळमजल्यावर सर्व बाजूंनी उघडी असलेली सभागृहे होती. वरच्या माळ्यावरील बऱ्याच खिडक्यांच्या बंदिस्त खोल्या होत्या. दगडी चौथऱ्यावरील सुशोभित कोरीव कामाच्या सुबक लाकडी खांबांवर लाकडी महालांनी आणि तुळयांनी तो बांधलेला होता. त्या काळात त्यावर बाजीरावाने दोन लाखांवर पैसे व्यतीत केले होते.

दुसरीकडे जाणाऱ्या वाटसरूंपैकी काहीजण बुधवारवाड्यावरून गेले. हा

वाडा आपण आता शेवटचाच पहात आहोत अशी कल्पनाही त्यांना नसेल. एक मोठा आणि एक लहान चौक असलेला हा त्रितल वाडा १५० फूट लांब आणि १४० फूट रुंद होता. पुण्याच्या सध्याच्या बुधवार चौकाला लागून फरासखान्याच्या पलीकडे तो त्या वेळी उभा होता. आता तेथे महापालिकेचे उद्यान आहे. १८१३ मध्ये दुसऱ्या बाजीरावानेच तो आपल्या शासकीय कार्यालयांसाठी म्हणून बांधला. त्याची बहाले त्याच्यावर माणसाने ऐसपैस निजावे अशी रुंद होती. आणि लाकूडकाम कोरीव आणि भक्कम होते. वरील चौकांपैकी मोठ्या चौकाच्या सभोवार कोरीव काम केलेल्या खांबाच्या सुंदर पडव्या होत्या. त्या वाड्यात बाजीरावाने आपली कार्यालये थाटली. पण १८१८ मध्ये ती बंद झाली आणि इंग्रज सरकारने आपली नवी कार्यालये तेथे थाटली.

उन्हाळ्याने थकलेल्या पुणेकराना त्या दिवशी पडलेल्या पावसाने हायसे वाटले. त्या आनंदात वासुदेव बळवंताच्या बंडाची आपल्या मागे लागलेली भीतीही ते काहीशी विसरले आणि जेवणखाण आटोपून त्यांनी आनंदातच बिछान्यावर अंग टाकले.

सर्व पुणे गाव शांत झाले होते. बंड दडपण्यासाठी सरकारने नेमलेले गावातील अधिकारी मात्र आपल्या कार्यालयात जागे होते. रस्त्यावरील पोलीस गस्त घालीत फिरत होते. पुणेकर झोपी जाऊन एखादा तास झाला असेल नसेल तोच रात्री ११ वाजण्याच्या संधीस पुण्याच्या मध्यभागातून कर्णकर्कश आरोळ्या उठल्या "आग लागली आहे! आग! धावा!" झोपी गेलेल्या पुणेकरांनी या आरोळ्या प्रथम अर्धवट गुंगीत ऐकल्या. परंतु त्या सतत कानावर येऊ लागल्यावर त्यांची गुंगी उतरली. कोणती बातमी केव्हा येईल त्याची प्रस्तुतच्या अस्वस्थतेच्या पार्श्वभूमीवर त्याना निश्चिती नव्हती. त्यामुळे 'आग लागली' या आरोळीचा अर्थ वाटेल तो होऊ शकत होता. आणि 'आग लागली! आग!' या तीन शब्दात कोणता अर्थ भरलेला आहे त्याची त्याना कल्पना करवेना!

त्यामुळे घरोघरचे लोक आपले बिछाने सोडून घरांच्या सज्जात, गच्च्यांवर, दिंडीदरवाजांत आले आणि रस्त्यावर पाहू लागले. शेकडो लोकांची धावपळ चाललेली त्यांनी पाहिली. घरातल्या लोकांपैकी अधिक धीट लोक रस्त्यात येऊन आगीच्या जागेकडे पळणाऱ्या लोकांजवळ चौकशी करू लागले पण त्यांना कशीबशीच उत्तरे देऊन रस्त्यावरचे लोक पुढे निसटत होते. तोच सबंध पुण्याचे रस्ते आगीच्या भयसूचक घंटानादाने दुमदुमून गेले. थोड्याच वेळाने गोऱ्या सोजिरांची पथके बुटांचा धाड धाड आवाज करीत पुण्यातील रस्त्यावरून फिरू लागली आणि त्यांच्या सैनिकी ब्यूगलांचे आवाज उत्तुंगपणे उमटू लागून त्यांच्या मोठमोठ्या सुरांनी तोपर्यंत झोपेतच असलेल्या उरल्यासुरल्या पुणेकरांनाही जागे केले. इतक्या मोठ्या संख्येने गोरे सोजिर पुण्यात प्रथमच उतरले होते!

नुसत्या 'आग लागली', 'आग लागली', या शब्दानी सगळी वस्तुस्थिती सरकार आणि जनता या दोघांनाही कळली नव्हती. पुण्यात त्या आधी लोकांची ठाम समजूत होती की, वासुदेव बळवंत आता पुण्यावरच स्वारी करणार. 'बॉम्बे गॅझेट' पत्राने स्पष्ट म्हटले,

"The inhabitants are expressing uneasiness and fear that the dacoit gentleman (Wasudeo Balwant) may pay the town itself a visit."[१]

("येथील नागरिक अशी घबराट आणि भीती व्यक्त करीत आहेत की, हा दरोडेखोर सद्गृहस्थ (वासुदेव बळवत) आता प्रत्यक्ष या गावालाच (पुण्यालाच) भेट देणार आहे") त्यामुळे त्यांच्यात आता निरनिराळ्या बातम्या पसरत होत्या. कोणी म्हणे: "वासुदेव बळवंताचे लोक पुण्यात शिरले आहेत. इमारतींना आगी लागल्या आहेत. आणि लढाईस तोंड लागले आहे." कोणी म्हणे: "वासुदेव बळवंत पुण्याच्या वेशीपर्यंत आले आहेत. त्यांचे काही हस्तकच काय ते पुण्यात शिरले आहेत. सरकारी सैनिकांच्या आणि त्यांच्या चकमकी झडत आहेत."

विश्रामबाग वाड्याशी पुणेकरांच्या स्वराज्यातील स्मृती निगडीत झाल्या होत्या. त्यामुळे त्याला आग लागली आहे अशी बातमी समजताच पुण्यातील पुढारी तिकडे धावले. त्यात स्वत: केरो लक्ष्मण छत्रे हे होते आणि पूना हायस्कूलचे बरेच विद्यार्थी होते. त्याना फक्त नगरपालिकेची अग्निशामक यंत्रे आणि दल तेथे आलेले दिसले. तेव्हा त्यानीच ती यंत्रे चालविण्यास पालिकेच्या नोकरांना लागलीच सहाय्य देऊन आग दुसऱ्या वास्तूंवर पसरण्याचा धोका नाहीसा केला. त्यांच्यापैकी काही विश्रामबाग वाड्याच्या छपरावर चढले आणि दुसऱ्या काहींनी आत शिरून शाळेची बाके आणि टेबले इ. लाकडी सामान बाहेर काढण्यास सहाय्य केले. लागलेली आग साधी नाही, हे लोक आणि सरकार समजून होते. त्यामुळे विश्रामबाग वाडा पेटला आहे, अशी बातमी कळताच सरकारी वाड्यास आग लागली हे हेरून सरकारने अग्निशामक दलाला तिकडे पाठवून द्यायची व्यवस्था झाली आहे की नाही, हे पहाण्यापेक्षा सोजिरांची पथकेच धाडून दिली. आणि तीही नुसत्या त्या आगीच्या ठिकाणीच नव्हे तर सबंध पुण्याभर!

आगीचे वृत्त समजताच हंगामी नगर दंडाधिकारी रिचर्डसन आणि दुसरे एक दंडाधिकारी प्लकेट यांनी लागलीच चौथ्या बंदूकवाल्या सैन्याच्या (कर्नल कमांडींग एच. एम. एस् फोर्थ रायफलसच्या) अधिकाऱ्यास एका सबंध तुकडीस आगीच्या जागी पाठविण्यास चिठ्ठी लिहिली. आणि मेजर ट्रुमन्स या सेनाधिकाऱ्यालाही तिकडे युरोपियन सोजिरांचे सैन्य धाडण्यास सुचविले आणि मग ते स्वत:ही विश्रामबाग

१ 'बॉम्बे गॅझेट', दि. ६ मे १८७९.

वाड्याकडे गेले. दंडाधिकारी रिचर्डसन येताच वाड्याच्या मधल्या चौकाचे दक्षिणेकडचे छप्पर पुढील बाजूच्या छपरापासून अलग करून टाकण्यासाठी वरील पुढाऱ्यांनी त्यांना सांगितले. त्यामुळे अर्धा वाडा सुरक्षित राहिला.

आठच क्षणात लेफ्टनंट ख्रिस्तोफर यांच्या हाताखाली पंचाहत्तराव्या 'हायलँडर्स' (एच. एम्स. सेव्हंटी-फिफ्थ हायलँडर्स) च्या अग्निशामक पथकातील (फायर कंपनी) अग्निशामक यंत्रे विद्युत् वेगाने पुण्याच्या रस्त्यावरून धावू लागली. त्यांचा घंटानाद विश्रामबाग वाड्याकडे वाजत गेला. त्यांच्या मागोमाग सैनिक विभागाचे (कँटोनमेंटचे) स्टाफ सार्जंट मरे आणि टोबिन हेही आगीच्या ठिकाणी पोचले. सैनिक तळापासून विश्रामबाग वाड्यापर्यंतचे तीन क्रोशार्धावरचे अंतर त्या धावत्या वाहनातील हायलँडर्संनी मोठ्या वेगाने तोडले होते.

लोकांच्या झुंडीही सोजिरांच्या हटकण्याची क्षिती न बाळगता विश्रामबाग वाड्याकडे लोटल्या. त्या तळपत्या वाड्यापासून लोकांना लांबवर आवरून ठेवण्यात पोलीस आणि सोजिरांना फार प्रयास पडले. धुराचे आणि ज्वाळांचे स्तंभच त्या पेटलेल्या वाड्यातून वर जात होते. अग्निशामक दलाच्या लोकांनी पाण्याच्या मोठ्यात मोठ्या फवाऱ्यांचा आगीवर मारा केला. परंतु आगीची आच इतकी मोठी की, ते फवारेही पुष्कळ वेळपर्यंत वरच्या वर वाफेमध्ये रूपांतर पावत. थोड्या वेळात आणखी अग्निशामक यंत्रे तेथे येऊन थडकली आणि त्यातून पाण्याचा मारा वाढल्यावर ती आग आटोक्यात आली

या कामगिरीवर असलेल्या पोलिसावर पोलीस प्रमुख सॅम्युअल ट्रेम स्वतः देखरेख करीत होते. लोकांची गर्दी मागे हटवण्यात त्यांच्या नाकी नऊ आले. कार्यकारी अभियंते डेव्हिडसन यांच्या नेतृत्वाखाली संरक्षक पाडापाड करणारे लोहमार्गाचे अभियांत्रिकही आता जोगने काम करू लागले आणि त्यांनी वाड्याच्या आग न लागलेल्या भागापासून त्याचे जळते भाग विलग करण्यासाठी पाडून टाकले. त्यामुळे आग अधिक पसरण्याचे टळले. ती आग विझवण्यास एकूण पंचवीस अग्नियंत्रे खपत होती. रात्री अडीच वाजण्याच्या सुमारास एक मधला चौक सोडून सगळा विश्रामबाग वाडा आगीत भस्मसात झाला. त्या वेळेला मात्र आग आटोक्यात आली आणि आजूबाजूची घरे आगीतून वाचली.

परंतु मध्यंतरात आगीवर आपण जय मिळवला म्हणून ते पोलीस, सैनिकी अधिकारी आणि अग्निशामक दलाचे अधिकारी निःश्वास टाकणार, तोच दुसरी आरोळी त्यांच्या कानावर आली— "बुधवार वाडा पेटला, धावा! धावा! बुधवार वाड्यासही आग लागली आहे." हे वृत्त समजताच लोकांचे लोंढेही बुधवार वाड्याकडे पळत सुटले. त्याच वाड्यात नागरी आणि सैनिकी सरकारी न्यायालये, मामलेदाराची कचेरी, सरकारी खजिना, पुण्याची टपाल आणि पोलीस कार्यालये आणि नेटिव्ह

जनरल लायब्ररी होती. दोन्ही सरकारी वाडेच अग्निमुखात पडत होते, ही घटना अधिकारी आणि लोक या दोघांनाही सूचक वाटली. विश्रामबाग वाड्याची आग विझवण्यास गेलेल्या काही नागरिकांनीही सहाय्य देण्यासाठी बुधवार वाड्याकडे धूम ठोकली.

विश्रामबाग वाड्याच्या अर्धरात अग्निस्थानी काही यंत्रे नि सैनिक ठेवून नगर रक्षक आणि सैनिक अधिकारी, दडाधिकारी आणि सार्जंटस् इतर अग्नि-शामक यंत्रे घेऊन बुधवार वाड्याकडे गेले. त्या वेळी विश्रामबाग वाड्याजवळ राहिलेले एक अग्निशामक यंत्र तेथे असलेल्या पुणेकर पुढाऱ्यांनीच रात्रभर चालविले.

बुधवारवाड्याचा पुढील भाग धगधगत्या ज्वालांमध्ये गुरफटून गेला होता. त्याचे पेटते निखारे विस्ताराने वरवर उडत होते. आणि त्यामुळे वाड्या-जवळ जाणेही सगळ्यांना अशक्य झाले होते. तरीही विश्रामबाग वाड्याकडून तेथे धावलेल्या पुणेकरांनी तळ मजल्यावरील नगर वाचनालयातील बरीच पुस्तके, बाहेर काढून वाचविली. हायलँडर्स लोक अग्निशामक यंत्रे घेऊन वाड्यांच्या मागील बाजूस गेले आणि त्यांचे शिडीवाले लोक आपल्या शिड्या सरसावून त्यांच्यावरून जाऊन वाड्याच्या वरच्या माळ्यावर उतरले. त्यांनी वाड्यातील बहुतेक न्याया-लयीन कागदपत्रे, खजिन्यातील पैसा आणि टपाल कार्यालयाचे सामान वरून खाली जाणाऱ्या टोपल्यातून खाली टाकले. दुसऱ्या वस्तू बाहेर काढण्यास त्यांना वेळ मिळाला नाही. ते सर्व सामान त्या आगीतच त्या रात्री जळून गेले.

आगीचा जोर इतका होता की, पाण्याच्या कापडी नळात कोळशाची माती अडकून ते चोंदले गेले. आणि काही अग्निशामक यंत्रेही मोडून पडली. या ज्वालांनी तासाभरातच आगीच्या विध्वंसाचा अक्षरशः कळस गाठला. मागे इंग्लंडचा राजपुत्र पुण्यास आला, तेव्हा त्याच्या आगमनाची स्मृती म्हणून सरदार विंचूरकर यांनी त्या वाड्यात एक स्वतंत्र तीन मजली चौकोनी मनोऱ्याची इमारत बांधून त्याच्यावर एक सुंदर घड्याळ आपल्या पाच सहस्त्र रुपये देणगीतून बसवून दिले होते. ते घड्याळ पुण्याची शोभा होते. त्यात तीनचा ठोका पडला. आगीच्या ज्वाळांनी तो मनोरा आणि घड्याळ वेढून टाकले आणि ते घड्याळ मनोऱ्यासह समोरच्या ढमढेऱ्यांच्या वाड्यावर पडले. ढमढेऱ्याचा वाडाही त्यामुळे पेटला. या आणि दुसऱ्या लगतच्या वाड्यांतील मालमत्ता तेथे गेलेल्या पुण्याच्या कार्यकर्त्यांनीच बाहेर काढून वाचविली. तो मनोरा पडताना काड् काड् आवाज झाला. मनोऱ्यासह ते घड्याळ कोसळले, तेव्हा खाली रस्त्यावर कामावर असलेली एक बैलगाडी उभी होती. तिचा गाडीवान गाडीत बसला होता. घड्याळाच्या मनोऱ्याचा जळता भाग धाडकन् त्याच्या अंगावर पडला आणि त्या जळत्या फटकाऱ्याने गाडीवान आणि त्याचा एक बैल ठार झाला.

भोवतालच्या घरांचे भाग पेटू नयेत म्हणून दोनशेंहून अधिक युरोपियन सैनिक मेजर मॅकेंझी यांच्या हाताखाली आणविले गेले. आणि त्यांनी आगीचा आवाका मर्यादित करण्यासाठी त्या घरांचे भाग पाडून टाकले. हे बरे झाले. कारण आगीचे निखारे चारी दिशाना उडून रस्त्यांच्या दोन्ही बाजूंच्या घरांवर आग उडी घेऊ लागली होती. कागदाच्या जळलेल्या तुकड्यांनी आकाश भरून गेले. मग मोडलेल्या अग्निशामक यंत्रांच्या जागी सैनिकी विभागातून (लष्करातून) दुसरी मागविण्यात आली आणि पहिली माणसे दमून गेली, तेंव्हा त्यांना सोडविण्यासाठी दुसरी नवी त्या ठिकाणी आली. पण आता पाण्याचा तुटवडा पडू लागला. तेव्हा अधिकाऱ्यांनी खडकवासल्याचे नळ सोडून पाण्याची सोय केली. पुण्याच्या सार्वजनिक कार्यकर्त्यांनी त्या वेळीही अधिक सहाय्य देऊ केले. पण तेथील युरोपियन सोजिरांनी ते घेतले नाही. पहाटे पहाटे ही आग आटोक्यात आली. आणि मग एका तासात अधिकाऱ्यांनी अग्नीवर खरोखरच विजय मिळविला.

या सर्व वेळ पुण्यात काय परिस्थिती होती ? पुणे सुरक्षित म्हणून बाहेरचे बरेचसे युरोपियन पुण्यास आले होते. त्यांच्या भीतीला पारावार राहिला नाही. त्यांना वाटले की प्रतिशोध म्हणून वासुदेव बळवंतांनी दोन्ही सरकारी वाड्यास आगी लावल्या आहेत. त्याना सुरतेची शिवाजीची लूट आठवली. आणि वासुदेव बळवंत अशीच आपली लूट करणार असे वाटू लागले. वासुदेव बळवंत पुण्यात आता काय करणार या भीतीनेच त्यांनी रात्रीचे सारे क्षण घालविले. पण वासुदेव बळवंत त्या रात्री काही पुण्यास आले नाहीत.

"बांबे गेझेट" पत्र म्हणाले:

"(The city) was one scene of turmoil and uproar. Traffic was at a standstill The population at large was in such a state of fear and alarm that it readily believed any report ...... No one knew what will happen next". [७]

("पुण्यांत एकच गोंधळ आणि आरडा ओरडा दिसत होता. वाहतूक पूर्णपणे बंद पडली होती. लोक अशा सर्वसाधारण भयात वावरत होते की, त्यांचा कोणत्याही बातमीवर लागलीच विश्वास बसत होता. पुढे काय होणार याची कोणालाच कल्पना करता येत नव्हती.") 'अनामिक' म्हणतात: "पुण्यात आगी लागल्या ती रात्र मला आठवते. पुणे सरकारच्या हातून बंडखोरांकडे जाणार अशीच त्या रात्री सर्वांची समजूत होती. जवळ जवळ पांच महिने वासुदेव बळवंताची त्या काळात सरकारला तशीच दहशत बसली होती यात शंका नाही."[८]

आगीने जवळ जवळ पन्नास घरे जळून खाक झाली, यांत ढमढेऱ्यांचाही वाडा

७ 'बॉम्बे गॅझट', दि. १६ मे १८७९

८ 'अनामिक' यांच्या आठवणी.

## प्रकरण १४ वे

# बंड गाजू लागले !

"पश्चिम हिंदुस्थानात गेले कित्येक महिने ज्या हुली उठत आहेत, त्यांच्या पुष्ट्यर्थ आता भरपूर आधार मिळालेला आहे. त्या हुलीप्रमाणे, भूतकाळात ज्या डावपेचांनी सरतेशेवटी त्या वेळच्या बलाढ्य मोगल साम्राज्याची सत्ता नष्ट करण्यात शिवाजी यशस्वी झाला, तेच डावपेच पश्चिम हिंदुस्थानात पुन्हा खेळण्याची ब्राह्मण जातीच्या काही व्यक्तींची हास्यास्पद महत्त्वाकांक्षा आहे असे म्हणतात... पुण्यात जर थोडे सैनिक शासन (मार्शल लॉ) पुकारले, तर पुण्याच्या ते हिताचेच ठरेल! ...१८५७ च्या बडाने, त्याच्या सुरवातीच्या प्रयत्नांकडे दुर्लक्ष झाल्यामुळेच, भीपण स्वरूप धारण केले. तशा प्रकारची कोणतीही चूक पुण्यात आता होता कामा नये !"

—'बॉबे गॅझेट', (मुंबई)

१३ मे १८७९ ला घडलेल्या अग्निप्रलयानंतर पुण्याला एका मोठ्या कारागृहाचीच अवस्था प्राप्त झाली. अँग्लवृत्तपत्रे सरकारी अधिकाऱ्यांच्या संशयग्रस्त मताला प्रोत्साहन देणारे अग्रलेख लागलीच लिहू लागली. तसाच एक अग्रलेख त्या पत्राचे अग्रणी समजल्या जाणाऱ्या "बॉम्बे गॅझेट" या इंग्रजी दैनिकाने पुढे दोनच दिवसात लिहिला. त्यात त्याने म्हटले,

"The rumours that have been flying about Western India for the past few months.........have.........received ample confirmation. The rumours ascribe to certain members of the Brahmin community of Poona a ridiculous ambition on their part to renew in Western India those tactics by which Shivajee in days gone by succeeded eventually in sapping the power of the then mighty Mogul Empire."

अर्धपोटी असणाऱ्या दरोडेखोरांच्या भटक्या टोळ्यांची ही कृत्ये आहेत. त्याहूनही पुण्याला लागलेल्या आगी अधिक काही सूचित करतात असे प्रतिपादून त्या पत्राने पुढे म्हटले,

"Even in Shivajee's times predatory bands at first small and insignificant in numbers began to rove about the districts; but soon so increased in boldness and in power that they brought anarchy upon ever-extending tracts of the country, and succeeded atlast in establishing the famous and dreaded Maratha system of wholesale plundering by means of mighty armies"

("[शिवाजीच्या काळातही] पहिल्यांदा अशाच लहान आणि बिनमहत्त्वाच्या संख्येच्या टोळ्या जिल्ह्यातून भटकू लागल्या. परंतु लवकरच त्या धीटपणात आणि सामर्थ्यात अशा बलवान झाल्या की, त्यांनी देशाच्या वाढत्या भागात अराजक माजविले आणि बलिष्ठ सैन्याच्या सहाय्याने चौफेर लुटालुटीच्या विख्यात आणि कर्दनकाळ मराठा युद्धपद्धतीची तेथे प्रतिष्ठापना केली.") या अग्रलेखात पुढे म्हटले होते :

"A little martial law would do Poona.........a great deal of good. The Mutiny attained its dangerous proportions mainly because we ignored the efforts that were then at the beginning made......The mysterious fires that in those days lighted up the country received but little attention until it was too late There must be no mistake of that sort in Poona now."[1]

(" पुण्यास थोडा काळ सैनिकी निर्बंध पुकारला तर पुण्याच्या दृष्टीने ते फार चांगले होईल. १८५७ च्या बंडाच्या सुरवातीस घडणाऱ्या उलाढालींकडे आपण दुर्लक्ष केल्यामुळेच त्याने भीषण स्वरूप धारण केले. त्या दिवसात देशात लागणाऱ्या गूढ आगींकडे फार विलंब होईपर्यंत अगदीच थोडे लक्ष दिले गेले. त्या प्रकारची चूक आता पुण्यात होता कामा नये.")

पुढच्या अंकात टीका करताना ते पत्र म्हणाले की, पुण्याचे काही क्षुद्र वृत्तीचे ब्राह्मण आगीच्या प्रसंगी सहाय्य न करता हसत खिदळत मजा पहात उभे होते. पुण्याच्या सार्वजनिक सभेच्या बैठकीतून गेले काही दिवस सरकारविरुद्ध पद्धतशीर प्रखर टीका करण्यात येत असे. पुण्यात चाललेल्या या राजद्रोही आंदोलनाच्या मुळाशी पुण्याचे काही ब्राह्मण आहेत, असाही कांगावा या पत्राने सुरू केला. "पुण्या-

1 'बॉम्बे गॅझेट', दि. १५ मे १८७९

चा ब्राह्मण" ("पूना ब्राह्मिन") हे शब्द पुढे विशेषतः टिळकांच्या काळात ब्रिटिश-विरोधी वृत्तीचा मनुष्य या अर्थाने रूढ झाले. त्यांचा जन्म हा असा होता.

गोऱ्या लोकांच्या वरील कांगाव्यास उत्तर देणारे झणझणीत पत्र सार्वजनिक काकांनी "बांबे गॅझेट" कडे पाठविले. आणि इतर पत्रांनाही मग ते धाडले. त्यात सैन्य किंवा पोलीस येण्याच्या आतच विश्रामबाग वाड्याच्या आगीपाशी जाऊन आपण केलेल्या सहाय्याचा आणि इतर कार्याचा वृत्तांत देऊन काकांनी म्हटले की, "विश्राम-बागवाड्याचा जो बराच भाग वाचला आहे तो ज्या स्थानिक पुढाऱ्यांनी स्वयस्फूर्तीने त्या प्रसंगी सहाय्य दिले, त्यांच्या श्रमांमुळेच काय तो वाचला आहे ...... बुधवार वाड्याच्या कामावर असलेल्या सोजिरांनी आमच्या सहाय्याचा स्वीकार केला असता, तर आम्ही तेथेही शक्य ते सर्व सहाय्य दिले असते. ढमढेऱ्यांच्या वाड्याचा पूर्व भागही केवळ आमच्या प्रयत्नामुळेच वाचला." या पत्रावर नीळकंठराव छत्रे, दुय्यम न्यायाधीश घारपुरे इ. बऱ्याच नागरिकांच्या स्वाक्षऱ्या होत्या.[२] आगीच्या कारणा-विषयी पुण्यात निरनिराळे तर्क सुरू झाले होते. आगीच्या रात्री हरी नाईक नावाचा एक प्रसिद्ध दरोडेखोर अटकेनंतर फरासखान्यात कुलूपबंद कोठडीत होता. त्याला सोडविण्यासाठी बुधवारवाड्याला त्याच्या हस्तकांनी आग लावली, अशी काही लोकांची समजूत होती. दुसरे काही म्हणत की, सरकारी कागदपत्रे जाळून टाकून सरकारी न्यायालयांना हैराण करण्यासाठी ही आग लावण्यात आली. इतरांना वाटे की, बुधवारवाडा आणि विश्रामबाग वाडा दोन्ही सरकारी वाडेच होते. म्हणून ते जाळून टाकण्याचे वासुदेव बळवंतांनी ठरविले.

दुसऱ्या दिवशी बुधवारी पुण्यात ठिकठिकाणी मोक्याच्या जागेवर गोऱ्या सोजिरांचे आणि काळ्या सैनिकांचे पहारे बसविण्यात आले. सरकारी वास्तूवर विशेष पहारे उभे ठाकले. त्यांतील लोक बंदुका सरसावून सशस्त्र उभे होते. आणि युरोपियन घोडे-स्वारांची पथके पुण्याच्या रस्त्यावरून दिवसभर हिंडू लागली. पुणे आता जवळजवळ सैनिकी शासनाखालीच होते.

सशस्त्र रक्षकांनाही न जुमानता वासुदेव बळवंत गुप्तपणे पुण्यात येत असतात आणि कोणालाही न सापडता पुण्याबाहेर जातात अशी तेथे दाट वदता होती. या बडखोर-पुढाऱ्याच्या या हालचालींना पायबंद घालण्यासाठी १४ मेला सैन्याला असा सक्त आदेश देण्यात आला की, रात्री ८ च्या पुढे आणि पहाटे ४ च्या आधी पुण्यात बाहेरून कोणाला येऊ द्यावयाचे नाही आणि पुण्यातून बाहेरही कोणाला जाऊ द्याव-याचे नाही. रात्रीपासून सकाळपर्यंतची ही संचारबंदी पुण्यात दवंडी पिटून लोकांना ज्ञात करून देण्यात आली. राजकीय अस्वस्थतेमुळे ब्रिटिश सरकार पुढे कित्येकदा येथे संचारबंदी (कर्फ्यू) पुकारीत असे. तिची सुरुवात अशा रीतीने वासुदेव बळ-

२ 'बॉम्बे गॅझेट', दि. १९ मे १८७९

वंतांच्या काळात पुणेकर प्रथमच अनुभवीत होते.

'बॉंबे गॅझेट' सारखी पत्रे पुण्याच्या लोकांविरुद्ध गरळ ओकीत होती. पण 'टाइम्स ऑफ इंडिया' पत्राने त्याच्या विषारी विधानांवरच हल्ला चढविला. आगी-च्या मुळाशी मोठा कट आहे हे 'बॉंबे गॅझेट'चे विधान खोडून काढताना 'टाइम्स ऑफ इंडिया'ने अनैबंधिक कृत्ये कणखरपणे बंद पाडली पाहिजेत, या सूचनेला पाठिंबा देतानाही म्हटले :

"The fires resemble the attempts made a few years ago in London by a few American Irishmen who thought they could upset the British Empire by blowing down the wall of a prison in Clerkenwell."[१]

(" काही वर्षापूर्वी लंडनमध्ये क्लार्कनवेलमधील तुरुंगाची भिंत उडवून देऊन आपण ब्रिटिश साम्राज्य उलथून पाडू शकू अशा समजुतीने काही अमेरिकन आयरिश लोकांनी केलेल्या प्रयत्नासारख्याच (पुण्याच्या) या आगी आहेत.")

'बॉंबे गॅझेट'च्या विधानांचा प्रतिवाद करताना "नेटिव्ह ओपिनियन" आणि "इंदुप्रकाश" या देशी पत्रांनीही वासुदेव बळवंतांच्या मनोरथाची कुचेष्टा करणारे लेख लिहिले. त्या वेळी देशभक्तीच्या भावना उघड व्यक्त करणे असे धोक्याचे होते की, राजनिष्ठेचा टेंभा मिरविण्यासाठी बऱ्याच जणांनी वासुदेव बळवंतांनाच शिव्यांची लाखोली वाहिली.

पुण्यात प्रत्यक्षात आलेल्या नव्या उपाययोजनांमुळे तेथील नागरिकांचे अति-शय हाल होऊ लागले. रात्री कामाला बाहेर पडणाऱ्या नागरिकांना आठ वाजले की कित्येकदा रस्त्यातून पुढे जाऊ दिले जात नसे. आणि म्हणून बाहेरच रात्र काढावी लागू लागली. ही बंदी इतकी सक्त होती की पळसप्याच्या लुटीनंतर पुण्यास येऊन राहिलेले बिचारे तात्यासाहेब ओझेही त्या सत्रात सापडले आणि ते आपण कोण हे सांगत असताही त्यांना अप्पा बळवंत गेटावर पोलिसांनी डाबून ठेवले. त्याचा फार बभ्रा होऊन त्या पोलिसांना अधिकाऱ्यांनी दंड केला. पण त्या पोलिसांनीही त्यावर आपण फक्त आपले कर्तव्य केले असा प्रतिवाद केला. तेव्हा तो दंड त्यांना परत करण्यात आला. वासुदेव बळवंतांना साहाय्य पोहोचविणाऱ्या त्यांच्या पुण्यातील सहकाऱ्यांच्या हालचालींना पायबंद घालण्यासाठी ही योजना चाललेली होती. पुण्यात कित्येक जणांची नावे त्यांचे सहाय्यक म्हणून घेतली जात असत. कृष्णाजी आबाजी गुरुजी या पुढील काळातील टिळकांच्या सहकार्यांचे नाव माहीतगार लोक त्या संबंधात घेत

---

१ 'टाइम्स ऑफ इंडिया', दि. १६ मे १८७९

असत. प्रख्यात समाजसुधारक महात्मा ज्योतिबा फुले यांनीही हस्तेपरहस्ते वासुदेव बळवंतांच्या टोळ्यांना भाकरी पोहोचविण्याचे सहाय्य केल्याचे लोक बोलत.[४]

पुण्याच्या आगीमुळे वासुदेव बळवंतांच्या बंडाचा प्रकाश संबंध हिंदुस्थानभरच काय, पण सातासमुद्रापलीकडे लंडनमध्येही झळकू लागला. आगीच्या तिसऱ्याच दिवशी लंडनच्या 'टाइम्स' पत्राने त्या आगीचे वृत्त छापले आणि पाठोपाठ १९ मे १८७९ च्या अंकात आपल्या कलकत्ता येथील वार्ताहराकडून आलेले पळस्प्याच्या लुटीचे आणि आगीचे सविस्तर वृत्तही प्रसिद्ध केले. त्याचा प्रारंभ पुढील परिच्छेदाने झाला होता :

"Dacoity or robbery by armed gangs is assuming alarming proportions in the Deccan, especially in the Poona District. For sometime past, bands of dacoits have been scouring and committing a series of daring attacks on houses and villages They seem to form a part of a regular organisation under the command of one Wassadeo Balwand, lately a clerk in the Financial Department."

("दख्खनमध्ये विशेषतः पुणे जिल्ह्यात लुटारूनी टोळ्या-टोळ्यांनी घातलेले छापे मोठे भयानक स्वरूप धारण करीत आहेत. खेड्यावर आणि घरावर धिटाईचे हल्ले करीत या लुटारूंच्या टोळ्या हिंडत आहेत. परवापरवांपर्यंत "फायनान्शिअल डिपार्टमेंट" मध्ये असलेल्या वासुदेव बळवत नावाच्या एका लेखनिकाच्या हाताखाली एका नियमित संघटनेचेच ते एक घटक आहेत असे दिसते.")

वासुदेव बळवतांचे बंड या एकाच मनोरम विषयाची लंडनच्या राजकीय वर्तुळात आता चर्चा होऊ लागली. त्याच्या वृत्ताची शीर्षके लंडनच्या वृत्तपत्रातून झळकू लागली. 'रॉयटर्स'च्या वृत्तसस्थेने पुण्याच्या आगीच्या बातमीचे सगळ्या जगभर वितरण केले. आणि नतरच्या बातम्याची प्रतिवृत्तं जगातील वृत्तसस्थाकडे धाडून दिली. लंडनमधील वृत्तपत्रांनी या उठावणीवर अग्रलेख लिहिले. वासुदेव बळवतांच्या नावाचा डंका लंडनमध्ये वाजू लागला.

या विषयावरील आपल्या पहिल्या अग्रलेखाचा शेवट " दि टाइम्स " पत्राने पुढील शब्दांनी केला होता.

"The Manifesto addressed to the Governor of Bombay resembles the insolence of Irish Ribandism in its andacious menaces, speaks of organising 'another Mutiny' and invents

४ 'अनामिक' यांच्या आठवणी

as its patron a mysterious potentate, on whom it bestows the name of Sivaji, the great, founder of the Mahratta Empire......"[५]

("मुंबईच्या राज्यपालांकडे पाठविलेल्या राजघोषणेत आयर्लंडमधल्या रेड रिबंड या गुप्त संस्थेच्या उद्धटपणाच्या धमक्यांचा धीटपणा आहे, सत्ताधप्रसारखे "दुसरे एक बंड" करण्याची भाषा वापरलेली आहे आणि आपला प्रणेता म्हणून एका गूढ अस्तित्वाच्या राजाची निवड करण्यात आलेली असून तो मराठा साम्राज्याचा संस्थापक असलेला शिवाजीच आहे असे म्हटलेले आहे.") रिबंड ही आयर्लंडमधील शेतकऱ्यांच्या क्रांतिकारक कृत्यांत हात असलेली गुप्त संस्था होती.

लंडनमध्ये या उठावणीची चर्चा सुरू झाली. त्याच्या आधीच तिच्यावर हिंदुस्थानातील प्रमुख वर्तमानपत्रांनीही मतप्रदर्शन केले. वासुदेव बळवंताच्या उत्थानाचे हिंदुस्थानभर उमटलेले पडसाद म्हणून काही थोड्या प्रतिष्ठित पत्रांच्या अग्रलेखातील महत्त्वाचे भाग मूळ इंग्रजीत पुढे दिले आहेत.

पुण्याच्या 'डेक्कन हेरल्ड" पत्राने या विषयावर लिहिले :

"The Deccan dacoits do not plead poverty as an excuse for what they are doing. They say they are stealing for the purpose of raising a rebellion in the country because their fellow countrymen are starving. It is out of friendship for the poor that they are stealing all."[६]

("आपल्या कृत्यांच्या समर्थनार्थ आपली गरिबी हे कारण दक्खनचे दरोडेखोर देत नाहीत. ते म्हणतात की आपण देशात बंड करून उठण्यासाठी दरोडे घालीत आहोत. कारण आपले देशबांधव उपासमारीने मरत आहेत. गरिबांविषयी वाटणाऱ्या आपुलकीमुळे ते सगळ्यांना लुबाडीत आहेत.")

पुण्याचे 'ज्ञानप्रकाश' हे पत्र त्या वेळी इंग्लिश आणि मराठी अशा जोडभाषेत निघत असे. त्याने तर वासुदेव बळवंताचे छापे महाराष्ट्रात सुरू होताच हे केवळ राजकीय विद्रोहाने घडत आहेत या समजुतीचा प्रतिवाद केला होता. ते पत्र म्हणाले :

"It is our firm belief that if the Government of Sir Richard Temple had not violently suspended all public works in December last to enable the Indian Government

---

५ 'दि टाइम्स', (लंडन), दि. १९ मे १८७९

६ 'डेक्कन हेरल्ड', दि. २० मे १८७९

to defray the expenses of the Afghan War from the revenues of India, the disturbances would in all probability would never have occurred." [७]

(" गेल्या डिसेंबरात जर सर रिचर्ड टेंपल यांच्या सरकाराने हिंदुस्थानच्या पैशाने अफगाण युद्धाचा व्यय करण्यासाठी आततायीपणाने दुष्काळी कामे थांबविली नसती तर हे छापे... बहुधा कधीच पडले नसते. ") सावकारांच्या छळामुळे किंवा रशियाच्या कारस्थानामुळे निर्माण झालेल्या राजकीय विद्रोहाने ते घडत आहे हे म्हणणे 'ज्ञानप्रकाश'ने खोडून काढले. त्याने 'रिबेलियन ऑफ द बेली' ("भुकेचे बंड".) या मथळ्याच्या आपल्या अग्रलेखात म्हटले :

"It is almost self-evident that the negligance and indifference of the Government of Sir Richard Temple...... is mainly responsible for the impleasant and critical state of things in which we find ourselves."

(" सर रिचर्ड टेंपल यांचा निष्काळजीपणा आणि बेपर्वाई याच गोष्टी सध्याच्या आपल्यावर ओढवलेल्या अप्रिय आणीबाणीच्या परिस्थितीला मुख्यत्वे कारणीभूत आहेत हे जवळ जवळ स्वयंसिद्धच आहे. ") दुष्काळी कामे बंद करण्यात आल्यामुळे आणि अरण्यनिर्बंधामुळेच ही उठावणी होत होती असे म्हणून 'ज्ञानप्रकाश' ने पुढे या अग्रलेखात म्हटले :

"There were two ways open to them They were to die or to take to brigandage. It is no wonder that they chose the latter. It is simply accidental circumstance that they have got a Brahmin for their leader....... Even if such a leader was not forthcoming they would have committed the disturbances much the same" [८]

(" त्यांना दोन मार्ग उपलब्ध होते. आपण स्वत: मरणे किंवा लुटालुटीचा मार्ग चोखाळणे. त्यांनी त्यातील दुसरा मार्ग निवडला, यात काही आश्चर्य नाही. त्यांचा पुढारी म्हणून एक ब्राह्मण आहे ही एक केवळ योगायोगाची गोष्ट आहे. ... असा पुढारी जरी पुढे आला नसता तरीसुद्धा त्यांनी कोणत्याही परिस्थितीत हे दंगे केलेच असते. ")

कलकत्त्याच्या 'इंडियन डेली न्यूज' पत्राने एक लांबलचक अग्रलेख लिहिला. त्यातील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणे आहे :

७ 'ज्ञानप्रकाश', दि. २० मार्च १८७९

८ 'ज्ञानप्रकाश', दि. २२ मे १८७९

"The people of Poona and Satara have a history of dacoities ripening into successful rebellions, a living history repeated in their folksongs and folklore. It is an almost nightly amusement to listen to tales of great robbers becoming great warriors and those great warriors becoming great princes There is a certain amount of admiration felt for that For they represent the wrongs of the ryots If then Wasudeo Balvant can claim to have struck the saucars and landlords, he will claim the confidence of the peasantry, that is, of a body of men, hardy brave and daring and familiar with the warfare in the hills and robbery in the plains.

"It is the history of the peasantry amongst whom this man is working which must be looked to, for a correct appreciation of the way in which the prevalence of dacoity has suddenly assumed so threatening a political magnitude.

"His (Wasudeo Balwant's) true character has not been comprehended. If he be capable of half-burning the Capital of Maharashtra and of filling all the country with terror and the expectation of his name (the reward offered for his arrest) is far too little The excitement in the Bombay Presidency will speedily spread."

(" सातारा आणि पुणे जिल्ह्यांना लुटीचे पर्यवसान यशस्वी बंडात झाल्याचा इतिहास आहे आणि त्यांच्या लोकगीतात आणि लोकांच्या गाण्यांत हा जिवंत इतिहास पुनःपुन्हा गायिलेला आहे. मोठे योद्धे झालेल्या मोठ्या लुटारूंच्या आणि ते मोठे राजपुरुष होणाऱ्या अशा मोठ्या योद्ध्यांच्या कथा ऐकणे ही तेथे रात्रीची करमणूक असते. त्याविषयी तिकडे काहीशी वाहवा वाटत असते. कारण ते रयतेच्या दुःखां-बाबत कड घेत असतात. तेव्हा वासुदेव बळवंत जर आपण सावकारांवर आणि जमीनदारांवर हल्ला चढविलेला आहे असा दावा करू शकत असतील तर डोंगराळ प्रदेशातील युद्धकलेशी आणि सपाट प्रदेशात लुटी मारण्याचा परिचय असलेल्या एका काटक, शूर आणि धैर्यसंपन्न लोकांच्या गटाच्या शेतकरी वर्गाचा विश्वास ते सहज संपादन करू शकतील !

" सध्या पडणाऱ्या दरोड्यांना ज्या पद्धतीमुळे एकाएकी इतके भयानक स्वरूप आले आहे, त्याचा खरा अर्थ समजून घ्यावयाचा असेल तर ज्या शेतकरी वर्गात हा मनुष्य आंदोलन करीत आहे त्या शेतकरी वर्गाचा इतिहासच आपण पाहिला पाहिजे.

"वासुदेव बळवंतांचे खरे सामर्थ्य अजून अजमावले गेलेले नाही असे दिसते. जर महाराष्ट्राची अर्धी राजधानी जाळून टाकण्याचे सामर्थ्य त्यांच्यात असेल आणि आपल्या नावाच्या दराऱ्याने आणि आशेने सबंध देश भारून टाकण्याचे सामर्थ्य त्यांच्यात असेल, तर (त्यांच्या अटकेसाठी लावलेले पारितोषिक) फारच अल्प आहे... मुंबई इलाख्यातील खळवळ वेगाने वाढतच राहील.")

ते पत्र पुढे म्हणाले,

"The peasantry of Poona and Satara are a class with whom the elements of an outbreak may be said to have always smouldered, ready to break when the circumstances *of their daily life should be so hard to bear.* *But that a* clerk in a Government office should detect that and should at once turn it to his account proves that he is no common man." [१]

("पुण्याचा आणि साताऱ्याचा शेतकरी वर्ग असा आहे की, ज्यात आपल्या नित्य जीवनातील परिस्थिती कठिण कठीण होऊन बमली की लागलीच सुरू होणाऱ्या उठावणीची वृत्ती नेहमीच धुमसत असते असे म्हणता येईल. परंतु एका सरकारी कार्यालयातील एका लेखनिकाने ते हेरावे आणि आपल्या कार्यासाठी त्याने त्याचा लागलीच उपयोग करावा हे मात्र तो काही सर्वसामान्य माणूस नाही हेच सिद्ध करते.")

कलकत्याचे सुप्रसिद्ध "स्टेटस्मन" पत्र म्हणाले:

"It is not strange that the news of recent incendiarism at Poona should have excited the keenest interest and anxiety throughout the country. There is, something. ominous in the mere word 'incendiarism' in this country, where conflagrations have come to be recognised as symptom of sedition if not precursors of serious rebellion."

("पुण्यास नुकत्याच घडलेल्या आग लावण्याच्या प्रकारांमुळे सबंध देशात अतिशय मोठे कुतूहल आणि चिंता उत्पन्न झाली असणे हे काही अस्वभाविक नाही. या देशांत जेथे मोठ्या आगी या बंडाची गभीर पूर्व चिन्हे नसली तरी राजद्रोहाची लक्षणे समजण्यात येतात, तेथे 'आगी लागणे' या नुसत्या शब्दातच काही तरी अशुभसूचक अर्थ भरलेला असतो.")

मुंबईच्या वृत्तपत्रात दप्तरमधील छापे आणि आगी यांच्या अस्वस्थतेच्या कारणांसंबंधी असलेल्या मतभेदाचा उल्लेख करून "स्टेटस्मन" पत्र म्हणाले

१ 'इंडियन डेली न्यूज' मधील हा अग्रलेख १९ मे १८७९ च्या अंकात लिहिला गेला.

की, "कडक उपाय आणि शेतीसुधारणा हे दोन उपाय जर या अस्वस्थतेविरुद्ध योजिण्यात आले नाहीत, तर ती सबंध हिंदुस्थानभर पसरल्यावाचून राहाणार नाही." [१०]

लाहोरच्या "सिव्हिल अँड मिलिटरी गॅझेट" या प्रख्यात पत्राने पुढील शब्दांचा अग्रलेख लिहिला :

"The dacoits' manifesto gives expression very fairly to a spirit of discontent and even sedition which is only too common in several of the Deccan districts."

("दख्खनच्या जिल्ह्यांत नेहमीच सर्वसामान्यपणे अस्तित्वात असणाऱ्या असंतोषाच्या, इतकेच नव्हे तर राजद्रोहाच्या प्रवृत्तीला दरोडेखोरांची राजघोषणा अगदी यथातथ्यपणे वाचा फोडीत आहे.") या पत्राने पुढे सरकारलाच चेतावणी दिली की :

"The seditious persons would naturally seize the opportunity of a time of distress for the purpose of bringing the Government into general discredit."

(" राजद्रोही लोक स्वाभाविकच सरकारला एकंदरीत दुष्कीर्त करण्यासाठी विपत्कालाची संधी साधणारच.") आणि म्हटले.

"Government must institute a most searching enquiry and inflict the utmost penalty the law allows upon the ringleaders in these disgraceful scenes" [११]

(" अतिशय कसून चौकशी करून या लज्जास्पद प्रकारांच्या म्होरक्यांना निर्बंधाने देता येणारी अधिकात अधिक शिक्षा सरकारने ठोठावली पाहिजे.")

पण अशा वेळीही "बॉम्बे गॅझेट" सारख्या हिंदीद्वेष्ट्या पत्रास उत्तम इंग्रजीतच आपल्या संपादकीय लेखातून खडसाविण्यास "नेटिव्ह ओपिनियन" सारख्या पत्रांनी कमी केले नाही. पुण्याच्या आगीसंबंधी खरी वस्तुस्थिती बाहेर येताच हे पत्र म्हणाले–

"Undue importance was given (to the dacoities and fires) by those very persons who put on an air of knowing more about the country than others do, but who in reality are the dullest lot of Anglo-Indians we have ever known." [१२]

---

१० 'स्टेट्स्मन', २१ मे १८७९

११ 'सिव्हिल अँड मिलिटरी गॅझेट,' दि. २० मे १८७९

१२ 'नेटिव्ह ओपिनियन', दि. २५ मे १८७९

("या दरोडयांना आणि आगींना अवास्तव महत्व देणाऱ्या लोकांनी दुसऱ्यांना या देशासंबंधी जी माहिती आहे त्यापेक्षा आपणास अधिक आहे असा आव आणला होता. पण वस्तुस्थितीत मात्र ते आम्हाला आतापर्यंत माहीत असणाऱ्या अर्धांग्ल लोकांतील सर्वांत बध्थड डोक्याचे लोक आहेत.")

हिंदुस्थानमधील आणि इंग्लंडमधील वृत्तपत्रात बंडाचे पडसाद अशा रीतीने उमटत असताना १७ मे १८७९ ला रात्री एक वृत्त पुण्यात येऊन थडकले. पळस्प्याच्या हल्ल्यानंतर वासुदेव बळवंतांचे सहकारी कोकण सोडून पुन्हा कसारा घाटात शिरले. त्यांना अन्न लागले ते आजूबाजूच्या गावकऱ्यांनीच पुरविले. परंतु किवळे येथील पोलीस पाटलाला आपले जेवण सिद्ध करण्यास ते सांगत होते, तोच पोलिसांची चाहूल त्यांना लागली. कारण त्यांच्या या हालचाली होत असतानाच पुण्यास मेजर डॅनिअलला समजले की, मावळ खोऱ्यातील तळेगावजवळच्या महिपाल टेकडीवर सरदार दौलतराव नाईकांच्या नेतृत्वाखाली बंडखोर परत आलेले आहेत.

सरकारपक्षीय लोक म्हणाले की, मेजर डॅनिअल आणि कॅप्टन वेस्टमकॉट यांनी आपल्या सैन्याच्या कोकणच्या रोखाने केलेल्या वेगवान धावेमुळे बंडखोरांना ठाणे जिल्हा सोडून पुन्हा पुणे जिल्ह्याच्या रोखाने येण्यास भाग पाडले. आणि ठाणे जिल्ह्यातून पळवून लावले.

वरील वृत्त समजताच मेजर डॅनिअलने आपल्यासमवेत हवे ते अधिक सैनिकीबळ घेतले. त्यात "पायदळाचे लोक आणि रिसाल्याचे स्वार" होते. आणि त्यांच्यासह तो बंडखोरांवर चाल करून गेला. इतक्या वेळपर्यंत बंडखोरांनी महिपाल टेकडी सोडून अधिक उचावरच्या ठिसुवाई टेकडीचा आश्रय घेतला होता. मेजर डॅनिअलचे सैन्य कारिंदा आणि काकतूस या टेकड्यांवर पोहोचले. परंतु त्यांना महिपाल टेकडीवर बंडखोर आढळले नाहीत. तेव्हा पूर्वेच्या बाजूला जाण्यासाठी त्याने त्या टेकड्यांवरून आपले सैनिक पाठवले आणि दौलतरावांच्या डोंगरी तळाला सर्व बाजूनी वेढा घातला.

या वेळच्या लढाईचे वर्णन करताना राज्यपाल सर रिचर्ड टेंपल म्हणतात :

"This time, however, the robbers were immediately and hotly pursued by parties of Military and Police under European officers. The country being hilly and wooded, near the foot of the mountains the robbers clean out-marched, outran, or otherwise eluded our men for fifty miles and then ascended a mountain pass leaving their pursuers 'dead beat'.........and got up to top of a high

peak with their booty."[11]

("या वेळेला मात्र युरोपियन अधिकाऱ्यांच्या हाताखालील सैनिकी आणि पोलिस पथकांनी बंडखोरांचा लागलीच आणि नेटाने पाठलाग केला. तो प्रदेश डोंगराळ आणि अरण्याचा असल्यामुळे त्या पर्वतांच्या पायथ्याजवळ पूर्ण पन्नास मैलांपर्यंत लुटारूंनी आमच्या लोकांना मजल मारण्यात मागे टाकले, धाव घेण्यात त्यांच्यावर कडी केली किंवा इतर प्रकारे त्यांना चकविले आणि नंतर आमचा पाठलाग करणाऱ्यांना पूर्णपणे त्राणरहित करून टाकले...... आणि आपली लूट घेऊन उंच शिखरावर ते गेले.")

तो शनिवारचा दिवस होता. त्या वेळी सायंकाळचे चार वाजले होते. आणि मावळत्या सूर्यप्रकाशात वासुदेव बळवंतांच्या सहकाऱ्यात आणि सरकारी हस्तकात तुळशीच्या खोऱ्यात उघड लढाईला तोंड लागले. ते लागणार असे दिसताच ठिसुबाई टेकडीवरील मोठमोठ्या झुडपांतून आपले सैन्य दौलतरावांनी विखरून ठेविले. मेजर डॅनिअलचे सैनिक त्यांना शोधण्यासाठी बंदुकीनी ती झुडपे शोधत वर येऊ लागले. ते आणखी वर येऊन आपल्या बंदुकीच्या टप्प्यात येताच दौलतरावांनी आपल्या लोकांना त्यांच्यावर गोळीबार करण्याचा आदेश दिला. टेकडीच्या माथ्यावरून खालच्या लोकांवर त्यांच्या बंदुका आता गोळ्या झाडू लागल्या. पहिल्या झटक्यात एक स्वार आणि एक पोलीस त्यांच्या गोळ्यांना बळी पडले !

डॅनिअलला बंडखोरांच्या अशा चढाईची कल्पना नव्हती. बंडखोरांच्या गोळ्यांच्या माऱ्यात त्याचे सैनिक पुढे जाईनात. पण तो थंड डोक्याचा आणि धैर्याचा माणूस होता. त्याने ती वाट सोडली आणि महिपाल टेकडीच्या दुसऱ्या बाजूला आपल्या लोकांना तो घेऊन गेला.

त्यांच्या या हालचाली बंडखोर वरून पाहातच होते. त्यामुळे त्यांनी आपल्या बंदुकीची तोंडेही पूर्व दिशेला वळविली. आणि त्यांच्या गोळ्या त्या दिशेला उडू लागल्या. डोंगराचा तो परिसर बंदुकीच्या उलटसुलट झाडलेल्या गोळ्यांच्या आवाजाने दुमदुमून गेला. परंतु मेजर डॅनिअलने स्वतःची बंदूक भरली. जवळच्या इतरांनाही बंदुका दिल्या आणि मग त्यांना हांकारीत तो स्वतःच ठिसुबाई टेकडीवर चढू लागला.

त्या डोंगरावर अंधार पसरू लागला, तेव्हा मेजर डॅनिअलच्या सैन्याने झाडलेल्या गोळ्यांच्या वर्षावात दौलतरावांचे लोक आता पटापट व्याहत होऊ लागले. तेव्हा सारासार विचार करून त्यांच्या लोकांपैकी एकजण त्या हल्लकल्लोळातच दौलतरावांना म्हणाला: "नाईक, आता आपण किती वेळ असा निभाव धरू शकू? पुढे व्हा आणि साहेबाला भेटा. आपल्या सर्वांच्या नाशाला कारण होऊ नका." त्याचे हे

११ सर रिचर्ड टेंपल यांचे राजप्रतिनिधी लॉर्ड लिटन यांना पत्र, दि. ३ जुलै १८७९

भ्याड शब्द दौलतरावांना शल्यासारखे झोंबले. युद्धाचे वारे पिऊन ते बेहोष झाले होते. त्यामुळे असा उपदेश ऐकण्याच्या मनःस्थितीत ते नव्हते. गोऱ्या साहेबांचे आपले लक्ष्य फक्त त्यांना दिसत होते. शत्रूला ठार करू किंवा त्याला मारता मारता मरून जाऊ. असा त्यांचा निर्धार होता. त्यामुळे भुईवर टेकलेल्या आपल्या बंदुकीवर विसावत ते आपल्या सहकाऱ्यास म्हणाले. "छे छे! ते शक्य नाही. वेळ आली तर मी साहेबाच्या गोळीला बळी पडून मरून जाईन. पण मी त्याला भेटण्यास कधीच जाणार नाही. आणि त्याच्या हातात जिवंत कधीच सापडणार नाही."[१४] अशा शूर उत्तराने ठिसुबाई पर्वताची शिखरे लाल करणाऱ्या रणांगणात त्यांनी पुढे धाव घेतली. सर्वांनी त्यांचा पाठपुरावा करीत पुन्हा बंदुका सरसावल्या. पराकाष्ठेच्या शौर्याने सर्वजण लढले. हा संग्राम एखाद तास झाला असेल. मेजर डॅनिअल आता त्यांच्या बराच जवळ आला होता. ते पाहून दौलतरावांनी आपला पवित्रा बदलला. त्यांनी बंदूक दूर लोटली आणि तरवार उपसली. दुसऱ्या हातात त्यांनी भरलेले पिस्तुल घेतले. आणि ते पुढे धावले. एका झाडाच्या पलीकडे मेजर डॅनिअल त्यांच्या पिस्तुलाच्या टप्प्यात आला होता. हातघाईच्या लढाईस आता तोंड लागले होते. दौलतरावांनी त्यांच्यावर आपल्या पिस्तुलाचा नेम धरला आणि निश्चितपणे त्याचा चाप ओढला. त्यांच्या पिस्तुलातून सुटलेली गोळी मेजर डॅनिअलच्या हनुवटीला चाटून गेली. त्याला लहानशी दुखापत झाली. आणि त्याला धक्का बसला. पण तो लवकरच भानावर आला. आपला नेम चुकल्याचे दौलतरावांच्या लक्षात येते न येते, तोच मेजर डॅनिअलनेही केवळ चार हातावरून आपले रिव्हॉल्वर सरळ दौलतरावाच्या-वर झाडले.[१५] त्यांच्या गोळ्यांनी आपले काम केले आणि 'हाय ! हाय !' करीत आपल्या धन्यासाठी आणि देशाच्या कार्यात लढता लढता ते रणांगणात धरणीवर कोसळले. पडता पडताही ते आपल्या सहकाऱ्यांना उत्तेजन देणारे शब्द ओरडतच होते आणि देशाचा जयजयकार करीत होते आणि नंतर भुईवर लोळत त्यांनी शेवटचा श्वास सोडला.

दौलतराव पडलेले पहाताच त्यांच्या लोकांची दाणादाण उडाली. त्यांनी आपल्या बंदुका आणि पळस्प्याची मोठी लूट तेथेच टाकून आपला जीव घेऊन

१४ पळस्पे लुटीच्या अभियोगातील मुख्य आरोपी उम्या तुकाराम याचे पहिला वर्ग नगर दंडाधिकारी कॅंपबेल याच्यापुढील निवेदन; दि. २२ मे १८७९

१५ "They fired upon our men killing two and charged upon them downhill . . . Their leader fired upon their European officer and was shot down in return."

("आमच्या लोकांवर त्यांनी गोळ्या झाडल्या आणि आमचे दोन जण ठार केले. आणि त्यांच्या-वर डोंगरावरून खाली हल्ला केला. त्यांच्या म्होरक्याने आमच्या युरोपिअन अधिकाऱ्या-वर गोळ्या झाडल्या. पण त्यालाच उलट गोळ्या घालून ठार करण्यात आले.") सर रिचर्ड टेंपल यांचे राजप्रतिनिधी लॉर्ड लिटन यांना पत्र (गोपनीय), दि. ३ जुलै १८७९

तेथून पळ काढला. ती लूट सव्वा लक्ष रुपयापेक्षा अधिक मूल्याची होती आणि तीत नोटा, रत्ने, हिरे, मोती, सोने, रुपे आणि माणके कित्येक मौल्यवान दागि-यां-मधून चमकत होते. हात कमरेवर ठेवून मेजर डॅनिअल विस्मयाने त्या लुटीकडे पहात राहिला. बंडखोर काळोखात पसार झाले ते त्याच्या प्रथम लक्षातच आले नाही. पण मागाहून ते लक्षात येताच त्यांचा पाठलाग करण्यासाठी त्याने आपले लोक पिटाळले. त्या पाठलागात चार घायाळ बंडखोर त्याच्या लोकाच्या हातात लागले आणि सात बंडखोरांचे मृतदेहही सापडले. दौलतरावांचा धिप्पाड देह लुटीच्या बाजूला पडला होता. डॅनिअलने शून्य दृष्टीने त्याच्याकडे पाहिले आणि मग ती सर्व लूट आपल्या समवेत बांधून घेऊन त्याने अंधारातच ठिसुवाई टेकडी सोडली."

वासुदेव बळवंताचे पराक्रम ऐकण्याची देशातील आणि महाराष्ट्रातील लोकांना सवय झाली होती आणि ते सापडले नाहीत हे हताशपणे ऐकण्याची इतराना ! मार्च महिनाभर वासुदेव बळवंतानी छापे घातले. त्यात पुष्कळ आरोपी सापडले. पण वासुदेव बळवंत सापडले नाहीत! त्यानतर पळस्पाच्या लुटीचा छापा पडला. त्यातील काही रामोशी सरकारला सापडले. पण वासुदेव बळवंत त्यातूनही निसटले असे सर्वांना समजले ! ! पुण्याच्या आगीच्या ज्वाळा उफाळल्या आणि विझल्या. त्या रात्रीही त्याना पकडण्यासाठी सरकारने जगजंग पछाडले. दुसरे दिवशी काही आरोपीही त्याच्या हाती लागले. पण वासुदेव बळवंत मात्र अजून मोकळेच होते. शेवटी मावळ खोऱ्यातील वरील चकमकीत तरी ते मिळाले असतील अशी पुष्कळांची अटकळ होती ! बऱ्याच जणांना मेजर डॅनिअलने पकडले, असेही लोकाना समजले. पण वासुदेव बळवंत? छे! या चकमकीतूनही ते निसटून गेले होते असे सर्वांना कळले ! !

वासुदेव बळवंतानी आपल्या हालचालींनी आणि पराक्रमाने पोलीसांवरही जो धाक आणि भय उत्पन्न केले होते, त्यामुळेही हे बऱ्याचदा होत होते. त्यांना पकडण्याचे धैर्य दाखवून मृत्यू पत्करण्यास पोलीस सिद्ध होत नसत. अशाच एका वेळी ते असेच कसे निसटून गेले ते सांगताना राज्यपाल सर रिचर्ड टेंपल म्हणतात,

"One night a gang afforded to a party of Police and Cavalry, an excellent chance of effecting a capture. But this party, owing certainly to want of promptitude and

१६ "The booty (valued since at . . . £7500) carried off from Panwell was (I understand) wholly recovered to the last jewel and the last rupee."

("पनवेलहून पळवलेली ७५०० पौंड मूल्याची लूट लुटीतील एकूण एक रत्न आणि रुपया धरून सर्वच्या सर्व परत मिळविण्यात आली.") सर रिचर्ड टेंपल याचे राजप्रतिनिधी लॉर्ड लिटन याना पत्र (गोपनीय), दि. ३ जुलै १८७९

enterprise, partly also (we hear) to want of spirit, failed to catch the robbers who decamped, and who, warned by the narrowness of their escape on that occasion, have never given the chance of capturing them again."[१७]

("एका रात्री (लुटारूंच्या) टोळीने पोलीस आणि घोडदळाच्या पथकाला त्यांना पकडण्याची अप्रतिम संधी प्राप्त करून दिली होती. परंतु त्वरा करण्याच्या आणि तत्परतेच्या अभावामुळे तर निश्चितच आणि (आम्हाला असे समजले की) काही अंशी धडाडी अंगी नसल्यामुळेही लुटारूंना पकडण्यात ते पथक अपयशी झाले. लुटारू पळून गेले आणि आपण याप्रसंगी अगदी पकडले जाता कसे निसटून गेलो,त्यापासून धडा घेऊन आपणास पुन्हा पकडण्याची संधी पुन्हा कधीही त्यांनी दिली नाही.")

अशा निसटून जाण्यामुळेच वासुदेव बळवंतांच्या नेतृत्वाच्या पद्धतीविषयी येथील वृत्तपत्रांनी जनतेला महत्त्वाची माहिती दिली ती वाचनीय आहे. "डेक्कन हेरल्ड" पत्र म्हणाले,

"As a rule, it is said, that Balwant acts like the Commander-in-Chief of the dacoits and he seldom or never joins in an affray or fight or plundering or looting, but issues orders which are rigidly carried out."[१८]

("असे म्हणतात की नियम म्हणूनच 'बळवंत' हे दरोडेखोरांच्या सरसेनापती प्रमाणे वागतात आणि ते चकमकीमध्ये किंवा लढाईत किंवा लुटालुटीत स्वतः प्रत्यक्ष क्वचितच भाग घेतात किंवा कधीही तो घेत नाहीत. तर फक्त आज्ञा सोडतात आणि त्या मात्र अगदी काटेकोरपणे पाळल्या जातात.")

परंतु असे तर्कच काही सर्वस्वी खरे नव्हते. पुष्कळदा वासुदेव बळवंताना माहितगार लोक आणि त्यांनी आपल्या व्यक्तिमत्वाने भारून टाकलेले पोलीस अधिकारीही निसटून जाण्यात सहाय्य करीत. वासुदेव बळवंत गुप्तपणे पुण्याला येत. असाच एका प्रसंगी त्यांचा सुगावा लागून फौजदार वैद्य यांना त्यांना पकडण्याच्या कामगिरीवर धाडण्यात आले. ते फौजदार वैद्य वासुदेव बळवंतांच्या संघटनेचे सदस्य असलेले अप्पाराव वैद्य यांचे बंधू होत. त्यांनाही वासुदेव बळवंतांनी आपल्या देशभक्तीने भारून टाकलेले होते. त्यामुळे त्यांना वासुदेव बळवंतांविरुद्ध काहीही करण्याची ओढ नव्हती. यापुढचा वृत्तांत पुढीलप्रमाणे आहे. पुण्यात पोलिसांना चकविण्याकरता वासुदेव बळवंतांनी ओंकारेश्वरासमोर नदीच्या दुसऱ्या टोकाला असलेल्या पूर्वेश्वराच्या मंदिराचा आश्रय घेतला. या मंदिरावर (त्यांना शोधणाऱ्या) रक्षकांचा छापा आला. त्या छाप्याचे नेतृत्व फौजदार वैद्य यांच्याकडेच होते. तेव्हा त्या

१७ सर रिचर्ड टेंपल यांचे राजप्रतिनिधी लॉर्ड लिटन यांना पत्र (गोपनीय), दि. १ जुलै १८७९.
१८ 'डेक्कन हेरल्ड', दि. २० मे १८७९

कामात हेतुतः तेच प्रथम त्या मंदिरात शिरले आणि वासुदेव बळवंत दिसताच तेथील निर्माल्याच्या कुंडात त्यांनी त्यांना स्वतःच लपवून टाकले. त्यांच्या पाठोपाठ येणाऱ्या पोलीसांनी मग वृद्धेश्वराचे सर्व मंदिर यथेच्छ धुंडाळले. परंतु वासुदेव बळवंताचा मागमूसही त्यांना लागला नाही आणि ते वचावून मग निसटून गेले."[19]

पुण्यात आणि इतरत्र वासुदेव बळवंतांना असे सहाय्य मिळत होते. त्याच्याच सुगाव्याने आपली कल्पनाशक्ती स्वैर सोडून मुंबईच्या 'बॉम्बे गॅझेट' पत्राने, पुण्याच्या आगीनंतर पुन्हा वासुदेव बळवंतांच्या आंदोलनावर एक अग्रलेख लिहून म्हटले :

"The Brahmin leader was..... known to his men...... as 'Maharaj' and the whole progress and career of that individual leads us to believe that he was only acting as the agent of some Central Committee sitting probably in Poona."[20]

("वासुदेव बळवंत हा ब्राह्मण पुढारी हा आपल्या लोकांना 'महाराज' या नावाने परिचित होता. आणि त्या व्यक्तीची सर्व प्रगती आणि जीवनक्रम पहाता आम्हाला असे वाटू लागले आहे की, बहुधा पुण्यामध्येच असणाऱ्या एका मध्यवर्ती समितीचा केवळ हस्तक म्हणूनच तो कार्य करीत असावा.")

गोऱ्या लोकांपैकी दुष्ट लोकांचा असा सरसहा सर्व पुणेकरांवर आरोप करणारा प्रचार पाहिल्यावर त्याचा प्रतिवाद करण्यासाठी २२ मेला सायकाळी सार्वजनिक सभेच्या शिष्टमंडळाने पुण्याचे जिल्हाधिकारी मूर याची भेट घेतली. त्या शिष्टमंडळात रा. ब. श्रीनिवास गोवंडे आणि रा. ब देशमुख ('लोकहितवादी') आणि राजमाचीकर, नातू, रास्ते, कोल्हटकर, मराठे, चिपळूणकर, साठे इ. लोक होते. या शिष्टमंडळाने पुण्याच्या आगीविषयी चिंता व्यक्त केली आणि आपल्या संस्थेचे सहाय्य सरकारला देऊ केले. ते घेण्याचे मान्य करून जिल्हाधिकारी मूर यांनी मुंबईच्या वरील वृत्तपत्रातील या लेखाविषयी नापसंती दाखविली आणि तोडदेखल्या का होईना पण ती जळिते पुण्याच्या लोकांच्या शत्रूचेच काम आहे असे म्हटले. बुधवार वाड्याची आग तर एक अपघाती आग आहे असेही ते म्हणाले. शिष्टमंडळाने त्यांचे आभार मानले आणि त्यांचा निरोप घेतला.

सबंध पुण्याच्या लोकांना आणि विशेषतः ब्राह्मण जातीला देशद्रोही ठरविणाऱ्या या लेखास घडलेल्या घटनांचा थोडासा उलगडा होताच 'टाइम्स ऑफ इंडिया' नेच झणझणीत उत्तर दिले. ते पत्र म्हणाले :

"There was no cause for loud shrieks of panic and alarm by those who look upon every native as a traitor

१९ अ. ज. करंदीकर : "क्रांतिकारक व्हिळक नि त्याचा काळ", पृ. १०३
२० 'बॉम्बे गॅझेट', दि. २२ मे १८७९

and every educated native as a Guy Fawkes in disguise."

(" प्रत्येक एतद्देशीय मनुष्य हा देशद्रोही आहे किंवा प्रत्येक सुशिक्षित मनुष्य हा निराळ्या वेषात वावरणारा गाय फॉक्स आहे असे समजणाऱ्यांना भीतीच्या अशा कर्णकर्कश आरोळ्या मारण्यास काहीच कारण नव्हते.") गाय फॉक्स हा ब्रिटिश पार्लमेंटच्या भुयारात भरलेल्या दारूगोळ्याने ते पार्लमेंट उडवून देण्याच्या फंदात त्या भुयारातच पकडला गेलेला एक माथेफिरू होता.

हे आरोप करणाऱ्या पत्राला आदल्या दिवशी आपण केलेले आरोप दुसऱ्या दिवशी खोटे म्हणून प्रसिद्ध करावे लागत आहे, असे सांगून 'टाइम्स ऑफ इंडिया' पुढे म्हणाले :

"Three-fourths of the population of Poona are Brahmins and the incendiaries would naturally belong to the most numerous caste . A fire in Dublin would probably be caused by an Irishman. Still this would not justify calling all the inhabitants of Dublin traitors and all Irishmen Fenians."

(" पुण्याची तीन चतुर्थांश लोकसंख्या ब्राह्मणांची आहे आणि आगलावे सहाजिकच बहुसंख्यांक जमातीचे असणार. डब्लिनमध्ये लागलेल्या आगींना बहुधा एखादा आयरीश माणूसच कारण असणार! पण म्हणून डब्लिनच्या सर्वच रहिवाशांना देशद्रोही आणि सर्व आयरीश लोकांना फेनियन म्हणणे समर्थनीय ठरणार नाही. ")

आगलाव्यांना हुडकण्यासाठी पुण्यात सक्त शोध सुरू झाला. संशयावरून कोणालाही बोलावून पोलिसांनी पोलीस ठाण्यावर न्यावे असे घडू लागले. पुण्यात गुप्त हेरांचा सुळसुळाट झाला. स्वाभाविकच पुण्यातील प्रसिद्ध पुढाऱ्यांना या सरकारी अवकृपेचा त्रास होऊ लागला. त्यात या वेळेपर्यंत सर्व सार्वजनिक कार्यात प्रमुख भाग घेणारे म्हणून सार्वजनिक काकांवर सरकारी हस्तकांचा पहिला रोख होता. परतु काका पक्के बेडर. सार्वजनिक सभेवरही सरकारी हस्तकांचा रोष होता. तेव्हा तिच्याच वतीने पुण्याच्या जिल्हाधिकाऱ्याकडे शिष्टमंडळ नेऊन त्यांनी आपली भूमिका स्पष्ट करून टाकली.

सार्वजनिक सभेची सूत्रे माधवराव रानडे हालवीत असत. वासुदेव बळवंतांचा सार्वजनिक सभेशी संबंध होता. त्यामुळे रानड्यांचा समादेश ऐकण्यासाठी ते रात्री त्यांच्याकडे जात असतात अशी दाट वदंता पुण्यास उठली. रानड्यांची विचारसरणी, विवेक आणि त्यांच्या धैर्याची मर्यादाही सरकारला नीट माहीत नसल्यामुळे त्या अफवेने सरकार सर्वस्वी अविचलित राहिले नाही. माधवराव नामजोशी हे त्यावेळी रामेश्वराजवळच्या माधवराव रानड्यांच्याच वाड्यात राहात असत. वासुदेव बळवंत

स्वाभाविकच त्यांना भेटण्यास त्या वाड्यात जात असत. माधवराव रानड्यांची आणि त्यांचीही अशा प्रसंगी गाठ पडत असे. त्यामुळेच ते माधवराव रानड्यांचा समादेश ऐकण्यास त्यांच्याकडे जातात हा प्रवाद सहज उठला असावा.

वासुदेव बळवंतांना माधवराव रानडे बंडाला प्रोत्साहक असा पाठिंबा देणेच शक्य नव्हते. कदाचित त्यांचे वैयर्थ्यच त्याना पटवून देण्याचा त्यांनी प्रयत्न केला असेल. कारण, इंग्रजांना या देशातून हाकून देण्याच्या गोष्टी बोलणे हा शुद्ध फाजील-पणा आहे, असे संतप्त उद्‌गार त्यांनी याच संधीस काढले होते. आदल्या वर्षीच आपल्यावर तसा आरोप येताच त्यांनी त्याचा गलितधैर्य होऊन आवेशाने इनकार केला होता. बडोद्याचे महाराज मल्हारराव गायकवाड यांच्या पदच्युतीच्या वेळी सार्वजनिक सभेने राजप्रतिनिधीना केलेले आवेदन रानड्यांच्या संमतीने धाडण्यात आलेले होते. मल्हाररावांवर इंग्रजांचा एक संशय असा होता की ते दक्षिणेत म्हणजे पुण्यात आपले हस्तक पाठवून राजद्रोहाचा प्रसार करीत असतात. तेव्हा रानडेही त्यात संबधित होते असे सरकारी हस्तक म्हणाले. त्या प्रसंगी मुंबईचे एक प्रख्यात पुढारी मामा परमानंद यांना रानड्यांनी दोन पत्रे लिहिली, त्यात त्यांचा वरील इन्कार दिसतो. ते म्हणतात, "मुंबईहून इकडे शहरात आलेल्या वाईट वदंतांच्या ढगां-मुळे मी इतका वाकविला गेलो आहे की, कोणाही मित्राला विशेष काही लिहिण्या-च्या मनःस्थितीत नाही...... (माझ्याविषयीच्या) दूषित दृष्टिकोणाच्या लाटेची धाव इतक्या मर्यादेला जाईल अशी काही कल्पना नव्हती. या गोष्टीसंबंधातील सत्य काय ते उघड करून सांगण्याचे काम पत्करण्यासाठी कोणी सहृदय स्नेही मिळणार नाही काय?...... तुम्ही आणि दुसऱ्या मित्रांनी... .. हे केले तर माझ्यावर फार कृपा होईल."[२१] चारच दिवसांनी त्यांनी परमानंदांना कळविले की, "मला अधिकृत किंवा अर्धाधिकृत रीतीने या वदतांसंबंधात काहीही विचारणा करण्यात आलेली नाही." मामाचे आणि शंकर पांडुरंग दीक्षिताचे नावही आपल्याशी निगडीत केले गेले म्हणून खेद व्यक्त करून रानडे म्हणाले— "पाठविलेली निवेदने जरी आम्ही लिहिलेली नसली तरी ती नीट लिहिलेली असावीत म्हणून मी पाहिलेली होती, इतके मान्य करण्यास मी सिद्ध होतो. पण संस्थानिकांशी (तसला) पत्रव्यवहार करण्याच्या किंवा (हिराबागेतील) क्लबमध्ये राजद्रोही भाषण करण्याच्या आरोपा-संबंधी बोलायचे तर अशी दुष्ट निर्भर्त्सना फक्त मुंबईची घुबडेच खोटी असताही खरी आहेत असे प्रतिपादू शकतात...... या वदतांचा जन्मच कसा झाला ते कृपा करून शोधून काढा ना!"[२२] तेव्हा रानडे वासुदेव बळवंतांशी असा संबंध ठेवणे शक्य नव्हते. परंतु सरकारी हस्तकांनी तसा आरोप त्यांच्यावर करताच बंडाच्या प्रति-ध्वनीला निराळेच पाणी चढले.

---

२१ माधवराव रानड्यांचे मामा परमानंदांना पत्र (इंग्रजी), दि. १ मे १८७८

२२ माधवराव रानड्यांचे मामा परमानंदांना पत्र (इंग्रजी) दि. ५ मे १८७८

आगी लावण्याचा खरा प्रकार विलक्षण होता. वासुदेव बळवंत रहात त्याच आळीत कारकोळपुऱ्यात कृष्णाजी नारायण रानडे म्हणून दुसरे एक रानडे रहात असत. ते त्यावेळी ५५ वर्षांचे होते. त्यांचा मुलगा केशव हा १८ वर्षांचा होता. तो वासुदेव बळवंतांच्या तरुण सहकाऱ्यात असे आणि त्यांना नरसोबाच्या देवळातील त्यांच्या बिऱ्हाडात किंवा खुन्या मुरलीधराच्या देवळात सायंकाळच्या बैठकीत नेहमी भेटत असे. कृष्णाजी रानडे हे पुण्यास बुधवार वाड्यात सरकारी बुकडेपोची शाखा होती, त्या ग्रंथभंडारात भांडारक (डेपोकीपर) म्हणून १८६२ पासून नोकरीला होते आणि केशवही त्यांच्या हाताखालीच सहाय्यकाचे काम करी. कृष्णाजी रानड्यांचा बुधवार वाड्यास आणि विश्रामबाग वाड्यास आगी लावण्याचा फेब्रुवारी १८७९ पासून, म्हणजे वासुदेव बळवंत बंडासाठी बाहेर पडले तेव्हापासूनच विचार ठरला होता. त्याची काय कारणमीमांसा द्यावयाची तेही त्यांनी त्याच वेळी ठरवून टाकले होते. त्या योजनेस लागणारे चांदीचे कडे, चांदीची सरी आणि सोन्याचे वेढे ते कुणबी लोक वापरतात तसे दागिने त्यांनी त्याच वेळेला एका सोनाराकडून करवून घेतले. या कामी त्याच भांडारात लेखनिकाचे काम करणारे शामराव म्हाळोपंत कस्तुरे या २५ वर्षे वयाच्या तरुणाचेही सहाय्य घ्यावयाचे त्यांनी ठरविले. रविवारी ४ मे १८७९ ला त्यांनी वीतभर रुंदीची सुताची वात्ती विकत आणून ठेवली आणि सोमवारी आगी लावण्याचे ठरवून रॉकेलचा एक डबा शंकरदादा नावाच्या भांडारवाल्याकडून विकत आणण्याच्या कामगिरीवर ते निघाले. परंतु त्या दिवशी तो डबा आणणाऱ्या हमालाकडे लग्न निघाल्यामुळे तो ते काम करू शकला नाही.

मग सोमवारी १२ मे १८७९ ला आगी लावण्याचे ठरवून रात्री ८ वाजून ३० मिनिटांनी आगीचे साहित्य घेऊन ग्रंथभांडाराच्या दाराने ते बुधवार वाड्यात शिरले. त्याच्या किल्ल्या त्यांच्याजवळच असल्यामुळे तसा प्रवेश करणे त्यांना कठीण गेले नाही. आपण नेलेल्या पुस्तकांची नीट रास करून त्यांनी त्यावर रॉकेल ओतले पण त्या तेलाची इतकी घाण येऊ लागली की ते काम पूर्ण न करताच ते घरी परतले. मंगळवारी १३ मेला सबंध दिवस ग्रंथभांडार बंद करून ठेवण्याची दक्षता मात्र त्यांनी घेतली.

मंगळवारी १३ मेला त्यांनी योजना प्रत्यक्षात आणली. रात्री ८॥ च्या संधीला वरील तिघेजण बुधवार वाड्यात गेले आणि त्या ठिकाणी त्यांनी आग लावून दिली. त्यारात्री तेथे पहाऱ्यावर असलेल्या ग्यानू नावाच्या शिपायास काय झाले होते त्याची बातमीच नव्हती.

याच आगीच्या जोडीला विश्रामबागवाड्यासही आग लावून देण्याचे त्यांनी प्रथमपासूनच ठरविले होते. त्याप्रमाणे लागलीच कृष्णाजी आणि केशव रानडे विश्रामबाग वाड्यात गेले. म्हाळोपंत मात्र तिकडे गेला नाही. शाळा बंद झालेली

असल्यामुळे त्या वाड्यात दुसरे कोणीच नव्हते. तेव्हा तेथेही शांतपणे आग लावून दोघेही रानडे घरी परतले.

आग याच क्रमाने कधी बाहेर उफाळते याची वाट पहात ते घरी बसले. परंतु झाले असे की रात्री ११ च्या संधीस विश्रामबागवाड्याची आगच प्रथम जोराने पेटली आणि बुधवारवाड्याची नंतर! तरी पण दोन्हीही वाडे पेटले तर खरे, या समाधानात रानडे बापलेक आपल्या घरी आणि म्हाळोपंत कस्तुरे त्यांच्या घरी आनंदित झाले.

आपल्यावर उठलेल्या गदारोळामुळे माधवराव रानड्यांनी आगींच्या अपराध्यांना हुडकण्यासाठी कटाक्षाने कंबर कसली. आगीच्या दुसऱ्याच दिवशी १४ मे ला त्यांनी बुधवारवाड्यात ज्यांचे न्यायालय होते, त्या चिंतामण सखाराम चिटणीस या दुय्यम न्यायाधिशाच्या शिपायांना बोलवून त्यांची कसून विचारपूस केली. त्यांच्यासंबंधी असे या चौकशीत काहीच निष्पन्न झाले नाही पण त्यांनी आदल्या रात्री ग्यानू नावाचा शिपाई तेथे पहाऱ्यावर होता हे सांगितले. तेव्हा ग्यानूस त्यांनी दुपारी आपल्या घरी बोलावले. ग्यानूने कृष्णाजी रानड्यावर संशय घेऊन सुटका करून घेतली. दोघा रानड्यांना नि कस्तुरेना माधवरावांनी बोलावून घेतले. पण रानडे आलेच नाहीत. कस्तुरे मात्र आला. माधवरावांसारख्या चाणाक्ष पृच्छकापुढे तो किती वेळ खऱ्या गोष्टी लपवणार ? त्याने चमत्कारिक उत्तरे देताच त्याच्यावरचा रानड्यांचा संशय बळावला. माधवरावांनी त्याला लागलीच बुधवारवाड्यातील नेटिव्ह जनरल लायब्ररी आणि लवाद कोर्टाच्या जागेत नेले आणि मग कृष्णाजी आणि केशव रानड्यांना पुन्हा कटाक्षाने बोलावणे पाठविले. रा. ब. चिंतामण चिटणिसांनाही बोलावले. या जंजाळात कोणी अडकावे म्हणून ते येण्यास प्रथम सिद्धच नव्हते. पण रानड्यांच्याच आग्रहामुळे मग आले. रानडे बापलेकांची आणि कस्तुरे ग्यानूची तेथे समोरासमोर गाठ पडून प्रश्नोत्तरात तपासणी होत असताना, नगर दंडाधिकारी प्लंकेट आणि जिल्हाधिकारी रिचर्डसन यांना आणलेले बरे, असे म्हणून चिटणिसांनी त्यांना बोलावून घेतले. या सर्वांसमोर कृष्णाजी आणि केशव रानडे आणि कस्तुरे यांनी आग आपण लावल्याचे मान्य केले. तेव्हा अपराधाचा पुरावा गोळा होऊन त्या ठिकाणी तिघाही संशयितांना पोलिसांनी अटक करून टाकली.

पुढे जिल्हा दंडाधिकारी मूर याचे समोर तिघाही संशयितांनी २० मेला स्वीकारोक्त्या दिल्या. त्या स्वीकारोक्त्यात त्यांनी पोलिसांना तर चकवलेच. पण त्या कृत्यात वासुदेव बळवंतांचेही नाव खुबीने गोवून दिले. त्यावेळी तरी त्यांच्या म्हणण्यातील तो भाग खरा असेल असेच वाटले. त्यांनी सांगितले की, आगीच्या आधी काही दिवस रविवारी ४ मेला आम्ही पर्वतीकडे फिरण्यास गेलो असता विठ्ठलवाडी जवळील गणपतीच्या देवळापाशी आम्हाला तीन माणसे बसलेली दिसली त्यापैकी

एक ब्राह्मण असून दोन कुणबी होते. त्यांना आम्ही ओळखत नाही. आमची चौकशी केल्यावर मी डेपोकीपरचा मुलगा आहे असे समजताच त्याची किल्ली माझ्याजवळ असते की नाही, हे विचारून बुधवारवाड्यात शिरण्यास आपणास सहाय्य करण्यास त्यांनी आम्हास सांगितले. तुम्ही तसे केले नाहीत तर वाईट परिणाम होतील, असा आम्हाला त्यांनी खूप दम दिला आणि आम्ही त्यांना सहाय्य केल्यास खूप पैसा आम्हाला देण्याचे वचन देऊन आम्हाला दुसऱ्या दिवशी तेथेच बोलाविले. दुसऱ्या दिवशी आम्ही तेथे जाताच त्यांनी आम्हाला पंधरा रुपये दिले आणि केरोसीनच्या दोन पेटया घेऊन रविवारी तेथे बोलावले. त्या घेऊन रविवारी गेल्यावर ते म्हणाले, "बुधवारवाडा आणि विश्रामबागवाडा हे सरकारी वाडे आहेत. ते जाळण्याचा आमचा निश्चय आहे. त्यात तुम्ही आम्हास मदत केली पाहिजे. त्यासाठीच तुम्हाला पैसे दिले आहेत." त्यांनी मग काही दागिनेही आम्हास दिले. ठरल्याप्रमाणे संध्याकाळी सहा वाजता आम्ही विश्रामबागवाड्याशी गेलो. ते लोक तेथे आले. त्यांनी किल्ल्यांनी निरीक्षकाच्या (इन्स्पेक्टरच्या) वाड्याचा दरवाजा उघडला आणि ते आत गेले. सात वाजता बाहेर येताच त्यांच्यापैकी ब्राह्मण म्हणाला, "कागदपत्रावर आणि पुस्तकांवर तेल ओतून आम्ही वाड्याला आग लावली आहे." नंतर पावणेनवाला आम्ही बुधवार वाड्याशी गेलो. त्याचे कुलूप काढून दरवाजा उघडला. आत पुस्तके रचून त्यांच्यावर तेल ओतून त्या ब्राह्मणानेच तेथेही आग लावली आणि पूर्वीच्या ठिकाणीच दुसऱ्या दिवशी जमावे असे ठरवून आम्ही घरी गेलो. या बतावणीचा पुरावा म्हणून मागे निर्देशिलेले कुणबाळ आणि इतर दागिने बंडवाल्यांनी आपणास दिलेले दागिने म्हणून संशयितांनी पुढे केले. याप्रमाणे ही घटनाही इतर गोष्टींप्रमाणेच वासुदेव बळवंतांपर्यंत जाऊन पोहोचली आणि महाराष्ट्र प्रांत पुन्हा वासुदेव बळवंत, वासुदेव बळवंत, या नावाने दुमदुमू लागला. आपणास बंडवाले जेथे भेटले असे आगवाले म्हणाले त्या ठिकाणासाठी त्यांनी विठ्ठलवाडीची निवड केली. त्याचे कारण उघड होते. त्या ठिकाणचे गणपती मंदिर हे वासुदेव बळवंतांचे नेहमी जाण्याचे ठिकाण होते.

पुण्यात आणखी दोन व्यक्ती त्याच भयग्रस्त वातावरणात वावरत होत्या. महर्षी अण्णासाहेब पटवर्धनांचा वासुदेव बळवंतांशी घनिष्ट संबंध होता. त्यांच्या वाड्यात वासुदेव बळवंतांच्या कितीतरी फेऱ्या झाल्या असतील. त्यांचा वासुदेव बळवंतांच्या बंडात हात होता, या संशयाने अण्णासाहेबांना सुद्धा सरकारी अनुचरांनी भेटी दिल्या.

या दडपशाहीच्या काळात तारुण्याच्या प्रवेशद्वारावर असलेले बाळ गंगाधर टिळकही पुण्यातच होते. वासुदेव बळवंतांचे ते एका वेळचे शिष्य होते. माधवराव नामजोश्यांशी त्यांची घनिष्ट मैत्री होती. नामजोशी ज्याचे संपादक होते त्या

'डेक्कन स्टार' पत्राच्या संपादकशाखेत टिळकही होते.[२३] आणि हे पत्र वासुदेव बळवंतांच्या देशभक्तीच्या भावनेचे त्या काळातही गोडवे गाण्यास कमी करत नव्हते. या संबंधामुळे सरकारी दडपशाहीला पुणेकरांनी ज्या धैर्याने आता तोंड दिले, त्याची टिळकांनी वाखाणणीच केली. पुढे एका प्रसंगी या काळाला उद्देशून टिळक म्हणाले : " सर रिचर्ड टेंपलसारख्या मी मी म्हणणाऱ्या गव्हर्नरास 'बॉम्बे गॅझेट' सारख्या हिंदुद्वेष्ट्या पत्रकारास मूरसाहेबासारख्या आकुंचित बुद्धीच्या कलेक्टरास, अॅशबरनरसारख्या औदार्यनष्ट कौन्सिलरास ज्या पुण्याच्या लोकांनी जेरीस आणले, त्याच पुण्याच्या लोकांनी हॅरिससाहेबांसारख्यांचे सगळ्या दक्षिणेतील लोकांच्या अकला गेल्या असे शब्द निमूटपणे ऐकून घ्यावे हे खरोखरीच सुचिन्ह नव्हे." [२४]

'डेक्कन स्टार' पत्राने याच वेळेला वासुदेव बळवंतांचा गौरवपर अग्रलेख लिहून त्यांना मिळणाऱ्या विदेशियाच्या शिव्याशापांची तर भरपाई केलीच. पण पटवर्धन –टिळकांच्या गौरवपर विचारांची पडछायाही त्या लेखात दिसते. 'डेक्कन स्टार' पत्र म्हणते :

"The influence that English education has upon our minds is that we have begun to understand what we have, what we ought to have and what we have not. Our hearty thanks, therefore, are due to such noble souls.........that have shown the self-sacrificing spirit for their country's cause. Let it clearly be understood that we do not sympathise *with the cause (of dacoity) Mr. V. B Phadke is* alleged to have undertaken ........But we certainly sympathise with his spirit of self-sacrifice. He was a clerk in the Military Finance Office drawing a handsome salary of Rs. 60 per mensem. He has left a young wife behind, to be taken care of, either by her parents or his shadowy friends! If the pluck and self-sacrificing spirit that this Vasudeorao is heard to possess had been directed to some other good cause, such as that of founding a colony...... shall he not have been praised certainly extolled?" [२५]

(" इंग्रजी शिक्षणामुळे आमच्या मनावर झालेला परिणाम म्हणजे आपल्याजवळ काय आहे, आपल्याजवळ काय असावयाला पाहिजे, आणि आपल्याजवळ काय नाही, ते आम्हाला समजू लागले आहे हा होय. स्वदेश कार्यासाठी ज्यांनी स्वार्थ-

२३ "लो. टिळक यांच्या आठवणी व आख्यायिका", (सग्रा. म. वि. बापट), न्या. नारायण गणेश चंदावरकर यांची आठवण खंड १ ला, भाग २ रा पृ. ८

२४ 'केसरी', दि. १६ ऑक्टोबर, १८९४; अग्रलेख "असे झाले पाहिजे; पण कराल का ?"

२५ 'दि डेक्कन स्टार', दि. १८ मे १८७९

त्यागी वृत्ती दाखविली त्या उदात्त अंतःकरणांना म्हणूनच आमचे हार्दिक धन्यवाद आहेत ... ... वासुदेव बळवंत फडके यांनी अंगिकारला आहे असे म्हटले जाते त्या (लुटीच्या) कार्याशी आम्ही सहानुभूतिक नाही हे स्पष्टपणे लक्षात घेतले जावे. परंतु त्यांच्या स्वार्थत्यागी वृत्तीविषयी आम्हाला निश्चितपणे सहानुभूती आहे. ते महिना रु. ६० इतक्या चांगल्या वेतनावर 'मिलिटरी फायनान्स ऑफिसा'त लेखनिक होते. त्यांनी आपल्या तरुण पत्नीस तिच्या मातापितरांच्या किंवा आपल्या संभाव्य मित्रांच्या सहाय्यावर विसंबून आपल्यामागे सोडून दिले आहे. या वासुदेवरावांच्या अंगी आहे असे म्हणतात ती चिकाटी आणि स्वार्थत्यागाची भावना, एखादी नवीन वसाहत स्थापण्यासारख्या दुसऱ्या एखाद्या चांगल्या कार्यासाठी व्यतीत झाली असती, तर त्यांची प्रशंसाच झाली नसती काय ? त्यांचा निश्चित उदो उदो झाला नसता काय ? ")

याच संधीस इंग्लंडमध्ये 'जस्टिस' या नावाखाली एका पत्रलेखकाने लंडनच्या 'टाइम्स' ला एक पत्र लिहून कळविले की, हिंदुस्थानची जनता शांतताप्रेमी आहे ही काही कल्पित समजूत नाही आणि या लोकांना अत्याचाऱ्यांना आणि विरोधी कृत्यांना प्रवृत्त करणाऱ्या कारणाचा येथील (इंग्लंडमधील) जनतेनें गंभीरपणे विचार केला पाहिजे. येथील 'डेली टेलेग्राफ' आणि 'मॉर्निंग पोस्ट' इ. कित्येक पत्रांनी या घटनेवर अग्रलेख लिहिले.त्यात निर्बंधानीच शेतकऱ्यांना लागलीच शक्य त्या सर्व सवलती दिल्या पाहिजेत आणि भूमिपुत्रांच्या हालांमुळेच हे दंगे होत आहेत असे म्हटले. सरकारहितैषी· लोकानी ब्रिटिश पार्लमेंटमध्ये प्रश्न विचारून आपल्या मतांना तोंड फोडले.

इंग्लंडमधील वृत्तपत्रात बंडाच्या आलेल्या बातम्यांचा उल्लेख करून 'हाऊस ऑफ लॉर्डस्' मध्ये अर्ल ऑफ कारनारव्हान यांनी भारतमंत्री व्हायकाउंट क्रानब्रुक यांना विचारले, "जर हे वृत्तांत खरे असतील तर ती हिंदुस्थानच्या अर्वाचीन इतिहासात अभूतपूर्व अशी अत्यंत गंभीर परिस्थिती आहे. तेव्हा या प्रश्नावर व्हायकाउंट महाराज काही प्रकाश पाडतील काय?"

भारतमंत्री व्हायकाउंट क्रानब्रुक यांनी त्यावर उत्तर दिले– "दख्खनमध्ये गेले काही आठवडे मोठी दु.स्थिती नांदत आहे. आणि कित्येक वैयक्तिक पत्रातून मला त्याचे वृत्तांत मिळालेले आहेत. त्या प्रांतात लुटारूंनी लूटी आणि इतर अत्या· चार केलेले आहेत, हेही काहीसे खरे आहे. परंतु गेल्या काही दिवसात ज्या विवक्षित घटना घडल्या त्याची मला माहिती नाही. मी आज सकाळीच मुंबईच्या राज्यपालांना तार धाडून माहिती विचारली आहे. परंतु मला अजून काही उत्तर मिळालेले नाही. पण ताज्या पत्रांतील ताज्या वृत्तांतावरून असे दिसते की, परिस्थिती निवळत चाललेली आहे."[१९]

---

१९ 'हाऊस ऑफ लॉर्डस' चे कामकाज, दि. २० मे १८७९

मुंबईच्या राज्यपालांकडे भारतमंत्र्यांनी तारी संदेशाने जी विचारणा केली होती, तिला मुंबईचे राज्यपाल सर रिचर्ड टेंपल यांनी २१ मे १८७९ ला पुढील उत्तर धाडले–

"Your Lordship's telegram regarding Deccan trouble. Recent dacoities occurred either side above and below mountains, western border, Poona and Satara Districts...... Dacoits are hillmen, hardy daring characters, led by educated persons. Number not exceeding three hundred. Steep hills and thick jungles favour their operations. Detachment of troops despatched and special pursuing parties under European officers. Leader not caught but systematically pursued. The incendiaries probably intended to annoy the Government. No sign of agrarian trouble."

("दख्खनमधील अस्वस्थतेविषयी आपली तार पोहोचली. नुकतेच पडलेले दरोडे सातारा आणि पुणे जिल्ह्यांत घाटावर आणि खाली कोकणात असे दोन्ही बाजूला पडले. लुटारू काटक आणि धीट असे डोंगरात राहाणारे लोक असून सुशिक्षित लोक त्यांचे नेतृत्व करीत आहेत. त्यांची संख्या तीनशेपेक्षा अधिक नाही. उंचच उंच डोंगर आणि दाट अरण्ये त्यांच्या हालचालींना अनुकूल ठरतात. सैन्याच्या तुकड्या आणि युरोपियन अधिकाऱ्यांच्या हाताखाली पाठलाग करणारी विशेष पथके (त्यांच्यावर) धाडली आहेत. (लुटारूंचा) पुढारी पकडला गेलेला नाही. पण त्याचा पद्धतशीरपणे पाठलाग करण्यात येत आहे. (पुण्यातील) आगलाव्यांचा हेतू बहुधा सरकारास त्रास देण्याचा असावा. शेतकऱ्यांच्या उठावाची चिन्हे नाहीत.")

तीनच दिवसांनी हॅनबरी या सभासदाने 'हाऊस ऑफ कॉमन्स' मध्येही दुय्यम भारतमंत्र्याना विचारले– "मुंबई इलाख्यात जनतेच्या उठावणीच्या अनुषंगाने लागणाऱ्या आगीसह पुन्हा प्रादुर्भाव झाला आहे, हे खरे आहे काय? त्याची कारणे कोणती नि दख्खनमधील शेतकरी जनतेच्या सहाय्यार्थ योजावयाच्या उपायासंबंधी तीन वर्षापूर्वी दिलेले आश्वासन पूर्ण करण्यासाठी सरकारने काय पावले टाकली आहेत ?"

दुय्यम भारतमंत्री स्टनहोप यांनी त्यावर उत्तर दिले: "या विषयासंबंधी ताजी माहिती मिळविण्याच्या उद्देशाने भारतमंत्र्यांनी तार धाडली होती आणि सभागृहाच्या अनुज्ञेने मुंबईच्या राज्यपालांनी धाडलेले उत्तर मी वाचून दाखवतो.

सर रिचर्ड टेंपल यांचे वरील उत्तर वाचून दाखवून स्टनहोप पुढे म्हणाले:

"नामदार मंत्र्यांच्या प्रश्नाच्या शेवटच्या भागासंबंधी मला सांगावयाचं आहे की, त्या विषयाचा अतिशय आस्थापूर्वक विचार करण्यात आलेला आहे आणि मुंबई सरकारने भारतमंत्र्यांनी आपल्या कार्यकारी मंडळाच्या विचाराने केलेल्या सूचनांवर मुख्यत: आधारलेले एक विधेयक सिद्ध केले आहे. ते आता हिंदुस्थान सरकारच्या विचाराधीन आहे." (हियर हियर चे आवाज.) [२७]

वरील तारेत बंडखोरांवर युरोपियन सैन्य पाठविल्याचा उल्लेख आहे, ते गुप्ततेने पाठविले गेले होते. ते सांगताना सर रिचर्ड टेंपलच लॉर्ड लिटन यांना कळवितात,

"We therefore sent detachments of troops to Sholapore ........ (and) Pandharpore ........to guard the rich towns, which are close to the hills.........These precautions were taken as unostentatiously as possible and they attracted very little notice from the Newspapers." [२८]

("म्हणून आम्ही सोलापूर आणि पंढरपूरला डोंगराजवळ असणाऱ्या त्या संपन्न नगरांचे संरक्षण करण्यासाठी सैन्याची पथके पाठविली...ही दक्षता शक्य तेवढी गाजावाजा न करता घेण्यात आली आणि त्यांच्याकडे वृत्तपत्रांचे अगदी कमी लक्ष गेले.")

परंतु इंग्लंडमध्येही काही उदार मतवादी लोक होते. 'हाऊस ऑफ कॉमन्स' मध्येच हिंदुस्थानवरील एका चर्चेच्या वेळी इंग्लंडचे विगत मुख्यप्रधान ग्लॅडस्टन म्हणाले : "हिंदुस्थानातील राज्याच्या एका भागात शस्त्राचारी अस्वस्थतेची अशी चिन्हे आहेत की जी त्वरेने इतरत्र पसरतील. राणी व्हिक्टोरियाने सम्राज्ञीचा किताब धारण केला तेव्हा आता आपल्याला अधिक अधिकार मिळतील आणि आपला उत्कर्ष होईल असे हिंदुस्थानला वाटले. परंतु झाले काय ? आर्थिक अडचणी, करवाढ शस्त्रनिर्बंध आणि सगळ्यावर ताण म्हणजे देशी वृत्तपत्र नियंत्रणाचा निर्बंध! यामुळे तेथील सर्व देशी वृत्तपत्र सरकारच्या कृपेवर फेकली गेली आहेत. मला याचा फार विषाद वाटतो. आपल्याशी हिंदुस्थानातील लोकांचे वैमनस्य वाढेल असे धोरण आपण ठेवता कामा नये (चिअर्स)"

आपल्या उठावणीचे हे लंडनमधील प्रतिध्वनी ऐकत असतानाच वासुदेव बळवंत आपल्या पुढील योजना आखीत होते. त्या योजना जेव्हा राजकीय निरीक्षकांना कळून आल्या, तेव्हा ते उद्गारले, "झाले त्यापेक्षा होणारे अधिक भयंकर होते!"

* * *

२७ 'हाऊस ऑफ कॉमन्स' चे कामकाज, दि. २३ मे १८७९
२८ सर रिचर्ड टेंपल यांचे लॉर्ड लिटन यांना पत्र (गोपनीय), दि. २ जून १८७९

## प्रकरण १५ वे

# अज्ञातवासातील हालचाली

राजकारण बहुत करावे । परंतु कळोच नेदावे ॥
मुख्य सूत्र हाती घ्यावे । करणें ते लोकाकरवी करवावें॥
कित्येक खलक उगवावे । राजकारणामध्यें ॥

—श्रीसमर्थ रामदास

पुण्याच्या आगलाव्यांनी केलेल्या स्वीकारोक्तीमुळे मुंबई सरकार भांबावून गेले. आग लावणारे आरोपी रानडे होते.एखादा राजद्रोही वाटला की एकच आडनाव असणारे सर्व लोक राजद्रोही हा इंग्रज सरकारचा अडाणी खाक्या. न्यायमूर्ती रानड्यांवरील संशयाला हा चांगला आधार समजून बंडात त्यांचा हात असला पाहिजे असा आपला ग्रह त्याने पक्का करून टाकला. या प्रकरणात राज्यपाल सर रिचर्ड टेंपल यांच्यावर टीका करण्यात आली आहे, परंतु व्यक्ती म्हणून ते तेवढे वाईट नव्हते. ब्रिटिशसत्तेच्या प्रारंभीच्या बऱ्याचशा इंग्रज अधिकाऱ्यांप्रमाणे त्यांच्या व्यक्तिमत्वाची बरीच अंगे भूषणास्पद होती. त्यांचा जन्म १८२६ मध्ये वूर्सेस्टर जवळील एका खेड्यात झाला. डॉ. अर्नाल्डच्या रग्बी शाळेतील शिक्षण संपताच वयाच्या १८ व्या वर्षी ते ईस्ट इंडिया कंपनीच्या हार्टफोर्डशायरमधील हेलबरी येथील महाविद्यालयात गेले. तेथे ते संस्कृत, पार्शियन, हिंदुस्थानी आणि उर्दू इतक्या भाषा शिकले. १८४६ मध्ये ते नागरी नोकर (सिव्हिल सर्व्हंट) म्हणून हिंदुस्थानात आले. हिंदू लोकांच्या उच्च संस्कृतीविषयी त्यांना आदर होता. बनारसला जाताना, " माय हॉर्ट बीट अॅज आय ड्र्यू निअर टू द सेंटर ऑफ द हिंदू वर्ल्ड!" (" हिंदू जगताच्या केंद्रस्थानाजवळ मी जाऊ लागलो तसे माझ्या हृदयाचे स्पंदन वाढू लागले.") अशी उदात्त भावना त्यांच्या मनात उद्भवली. ' हिंदू रेस अॅंड हिंदू नेशन " ("हिंदू जाती आणि हिंदू राष्ट्र") हे शब्द त्यांनी आपल्यासंबंधी १८८० मध्ये वापरले आहेत. आणि त्याहीपुढे जाऊन महराट्टा नॅशनालिटी ("मराठा राष्ट्रीयत्व") हे शब्दही वापरले आहेत. कित्येक प्रांतात

उच्च पदांवर त्यांनी काम केले. १८५१ मध्ये 'सेटलमेंट ऑफिसर' म्हणून केलेल्या त्यांच्या कामावर राजप्रतिनिधी सर जॉन लॉरेन्स आणि १८५६ मधील सीमेवरील इंग्रजांच्या राजकीय नि सैनिकी कारवाईसंबंधीच्या त्यांच्या प्रतिवृत्तावर लॉर्ड डलहौसीही खूप होऊन गेले. तत्वज्ञानी स्टुअर्ट मिल आणि इतिहासकार जॉन के यांच्याशी त्यांचा घनिष्ट परिचय होता. मराठ्यांविषयी त्याना आदर वाटे. ते म्हणतात :

"The Mahratta was not imposing at first sight with his short and broad-shouldered stature, high cheek bones, short nose and scanty beard.........I had to learn that a volcano of sentiment may be latent beneath that humble exterior."[1]

(" लहान आणि रुंद खांद्याच्या बांध्याच्या, गालाची उंच हाडे आणि आखूड नाक असलेला आणि तुरळक दाढीचा मराठा माणूस पाहिल्यावर प्रथमतः त्याची आपल्यावर छाप पडत नाही ...(पण) त्याच्या साध्यासुध्या बाह्य आकृतीखाली भावनांचा सुप्त ज्वालामुखी दडलेला असतो, हे मला कळून यावयाचे होते.") मध्य प्रांताचे मुख्य आयुक्त म्हणून नागपूरपर्यंतचा लोहमार्ग पुरा करून १८६५ मध्ये ते इंग्लंडला गेले, तेव्हा पंतप्रधान पामर्स्टन आणि अर्थमंत्री ग्लॅडस्टन यानी त्याचे स्वागत केले. १८६८ ते १८७३ पर्यंत कीर्तिशिखरावर पोचून ते हिंदुस्थानचे अर्थमंत्री झाले.

१८७१ मध्ये प्रथम पत्नीच्या निधनानंतर त्यांनी दुसरा विवाह केला, तेव्हा त्यांनी आपला मधुचंद्र महाबळेश्वरला साजरा केला. त्या ठिकाणचे वर्णन करताना ते म्हणतात :

"It was the birth-place of the Empire founded by the Mahrattas. I ascended Pratapgurh and saw the very spot where, Shivaji, their national hero, assassinated the Moslem envoy, an event which two centuries and a half ago, gave a fresh turn to the political life of India."

(*"मराठ्यांनी प्रस्थापित केलेल्या साम्राज्याचे ते जन्मस्थान होते. मी प्रताप*गडावर गेलो आणि त्यांच्या राष्ट्रीय वीरपुरुषाने- शिवाजीने ज्या जागेवर मुसलमान सरदाराला (अफझुलखानाला) ठार मारले, ती जागा पाहिली. या घटनेने अडीचशे वर्षांपूर्वी हिंदुस्थानच्या राजकीय इतिहासाला नवी कलाटणी दिली.")

१८७४-७६ मध्ये बंगाल-बिहार-ओरिसाचे राज्यपाल झाल्यावर वॉरन हेस्टिंग्ज बसे त्याच खुर्चीवर बसण्याचे आपले बालपणापासूनचे स्वप्न साकार झाल्याचा आनंद त्यांना झाला. १८७७-८० मध्ये ते मुंबईचे राज्यपाल झाले. कलांची त्यांना आवड असे. स्वतः ते उत्तम चित्रकार आणि लेखक होते. मुंबई विद्यापीठाचे ते कुलगुरू असता विज्ञान विषयाची पदवी परीक्षा त्यांनीच सुरू केली. मुंबई महा-

१ सर रिचर्ड टेंपल : " दि स्टोरी ऑफ माय लाईफ," पृ. १३२

पालिकेत निवडणुकीच्या द्वारा बारा प्रतिनिधी पाठविण्याची त्यांनीच व्यवस्था केली. वधकरी युरोपियन असला तरी त्यालाही दोषी ठरल्यावर फाशीची शिक्षा झाली पाहिजे असे त्यांचे स्पष्ट मत होते.

अशा राज्यपालाकडूनही त्या काळात उतावीळपणाच्या गोष्टी झाल्या तर त्याचे कारण येथील ब्रिटिश राज्यास धोका निर्माण होताच त्याविरुद्ध इंग्रज राज्यकर्ते निष्ठुर होत असत हेच होते. पुण्याच्या आगीसंबंधात रानड्यांवर संशय येताच सर रिचर्ड टेंपलनी "धुळ्यास जाऊन फर्स्ट क्लास सब जज्जाच्या जागेचा चार्ज घ्यावा," अशी आज्ञा रानड्यांना दिली. त्यावेळी वरिष्ठ न्यायालयास सुटी असल्यामुळे नियमाप्रमाणे अशा बदलीस आवश्यक असलेली त्यांची संमतीही न घेण्याच्या थिल्लरपणाचा आरोप सर रिचर्ड यांच्यावर रानड्यांच्या चरित्रकारानी केला आहे.

सर रिचर्ड टेंपल यांच्या माणशी प्रत्यही एक पौंड शिधा पुरे, या मतामुळे लोकांनी त्यांना 'आदशेराचा रतीबवाला' हे विशेषण दिले. त्यांनी येथे धान्य पुरेसे असल्यामुळे मृत्यू दुष्काळाने घडत नाहीत, असे म्हणून सारासूट नाकारली, अरण्य निर्बंध समर्थनीय ठरवले, दुष्काळी कामे बंद करून अफगाण युद्धाला पैसा उभा केला. तेव्हा या दुष्कृत्यामुळेच त्या राजवटीविरुद्ध वासुदेव बळवंतांच्या ध्वजाखाली लुटारू बंडास सिद्ध झाले, असेही त्यांच्या टीकाकारांनी म्हटले.

रानड्यांच्या मित्रांनी या पार्श्वभूमीवर त्यांना म्हटले की, "सरकारचा हेतू सरळ नाही. वाटल्यास धुळ्याची हवा उष्ण म्हणून मला मानवणार नाही, तरी माझी तेथे बदली करू नये," असे त्यांनी सरकारला लिहावे. पण रानडे त्यांना म्हणाले, "जोपर्यंत मला त्यांची नोकरी करावयाची आहे, तोपर्यंत सबब सांगणे मला आवडत नाही. सबब सांगण्याची वेळ आली तर राजीनामा देऊन मी मोकळा होईन." [२] ते पुढे म्हणाले, "नुसत्या संशयाने सरकारकडून माझे काही एक नुकसान होणार नाही... त्याची त्यास आपली चूक यथावकाश कळून येईल." [३]

रानड्यांची बदली राजकीय कारणावरून झाली असे वरील उद्‌गारावरून दाखविले जाते. पण "ज्युडिशियल खात्यातील विशेष जरुरीच्या कारणास्तव रा. ब. यांची बदली धुळे येथे झाली, ही गोष्ट फारच स्पष्ट असून वर लिहिलेल्या चमत्कारीक कल्पनेस काही ठिकाणी कसा अवसर मिळाला?" या शब्दात रानड्यांचेच मुखपत्र असलेल्या 'ज्ञानप्रकाश'ने हा समजच नाहीसा करून टाकलेला आहे. [४] हा संशय नाहीसा व्हावा म्हणून रानड्यांचीच या इन्कारामागे प्रेरणा असेल काय?

---

२ रमाबाई रानडे : "आमच्या आयुष्यातील काही आठवणी" पृ. ७०

३ बा. बा रानडे : "रानडे यांचे चरित्र," पृ. २३

४ 'ज्ञानप्रकाश,' दि. २ जून १८७९

ते काही असले तरी धुळ्यास गेल्यावरही रानड्यांना त्यांचे टपाल वेळेवर मिळत नाहीसे झाले. त्यांची पत्रे फोडून पुन्हा चिकटविलेली आहेत अशी दिसत. न फोडलेल्या पत्राखाली वासुदेव बळवंतांची स्वाक्षरी असे आणि बंडाच्या योजनाचा त्यात वृत्तांत असे. पण रानडे अशा पत्रांना कशी उत्तरे पाठविणार? ते ती पत्रे जशीच्या तशी फौजदाराकडे पाठवून देत. वासुदेव बळवंतांना अटक झाल्यावर धुळ्याचे सहाय्यक जिल्हाधिकारी पोलन यांनी ती करामत आपण केल्याचे सांगून "काही दिवस मला आपल्याशी अविश्वासाने वागावे लागले याविषयी मला वाईट वाटते," असे रानड्यांना सांगितले.[५]

या वेळी सरकारचे आपल्याविषयी चांगले मत व्हावे म्हणून वासुदेव बळवंतांवर रानड्यांनी हीन टीका केली नाही. मतभिन्नतेमुळे विपक्षीय देशभक्ताला पाण्यात पाहाण्याचा संप्रदाय येथे अवतरला, तो पुढे काही वर्षानंतर. चापेकरांमुळे टिळकावर तसाच प्रसंग आला, तेव्हा त्यानीही तीच धीरवृत्ती दाखविली. महाराष्ट्रीय देशभक्तीचा हा बाणा इतर प्रांतातून इथे आलेल्या क्षुद्र वृत्तीच्या पार्श्वभूमीवर किती मोहक दिसतो. कृष्णाजी नारायण आणि केशव कृष्णाजी रानड्यांच्या दंडाधिकाऱ्यापुढील स्वीकारोक्तीमुळे प्राथमिक चौकशीत आगीविषयी आणि बंडाविषयी बऱ्याच गंमती बाहेर येतील म्हणून लोक उत्सुक होते. पण नाटकात एकदम देखावा बदलावा त्याप्रमाणे ८ जूनला पहिला वर्ग दंडाधिकारी कॅपबेल याच्यापुढे केशव म्हणाला की, "आपणास बडवाले भेटले आणि त्यांनी आपणास आगी लावण्यास सांगितल्या असे आपण सांगितले, ते खोटे आहे. मी माझे वडील, आणि कारकून हेच मी विठ्ठलवाडीजवळ भेटले असे म्हटले, ते तिघेजण होत." त्याच्या वडिलांनी सांगितले की, ग्रंथभांडारातील पुस्तकासारखीच पुस्तके निराळी छापून घेऊन आपण तीन वर्षे विकत होतो. ग्रंथभांडारात चार सहस्त्र रुपयांच्या पुस्तकाची तूट होती. त्यावरून आपल्यावर संकट येणार अशी माहिती आपणास मिळाली होती. नवीन पुस्तके आणून ती तूट भरून काढण्याची खटपट आपणास साधली नाही. तेव्हा भांडारासच आग लावली की, आयव्ययाचे कागदपत्र आणि तुटीचा पुरावा नष्ट होईल या विचाराने आम्ही बुधवारवाडा जाळला. नुसत्या बुधवारवाड्यासच आग लावली तर असा काही संशय अधिकाऱ्यांना येईल म्हणून आम्ही विश्रामबागवाडाही जाळला. यानंतर तिघाही आरोपींना सत्र न्यायालयाकडे अभियोगासाठी पाठविण्यात आले.

या चौकशीचे काम प्रकट रीत्या चालले. त्याविरुद्ध इंग्रजी न्यायपद्धतीच्या प्रकटपणाची स्तुती करून हिंदी वृत्तपत्रांनी टीका केली. तेव्हा सोमवारी १० जूनला सत्र न्यायाधीश याच्यापुढे तो अभियोग उघडपणे चालला. तेथे आरोपींनी अपराध सरळ मान्य केला. त्यावर पंचांनी त्यांना दोषी धरले. आणि त्या निर्णयाशी सहमत होऊन

५ रमाबाई रानडे : "आमच्या आयुष्यातील काही आठवणी," पृ. ७०

न्यूनहॅम यानी आरोपीना दहा दहा वर्षांची काळ्या पाण्याची शिक्षा ठोठावली.

आगीत राजद्रोह पहाणाऱ्याना फटकारण्यासाठी 'ज्ञानप्रकाश'ने विचारले की, भांडाराचे हिशेब लेखानिरीक्षकानी तपासले होते की नाही? मग त्यातील तूट आरोपीना इतके दिवस कशी लपविता आली? त्या पत्राने पुढे म्हटले :

"When one reads the confessions, one meets with several irrelevant questions put to the first two convicts, such as, for instance, regarding the now notorious but otherwise obscure Wasudeo Balwant Phadke." [६]

(" त्या चार स्वीकारोक्त्या कोणीही वाचल्या म्हणजे त्यात पहिल्या दोन दंडितांना बरेच असबद्ध प्रश्न विचारण्यात आलेले आढळतात. उदाहरणार्थ, आता कुप्रसिद्ध झालेल्या, पण नाही तर अगदी अल्पज्ञात असलेल्या वासुदेव बळवंत फडके यांच्या विषयीचे प्रश्न होत. ") यावरून दंडाधिकारी त्या आगी हे सरकारला त्रास द्यावयाच्या प्रवृत्तीच्या असंतुष्ट आणि राजद्रोही लोकांचे कृत्य होते अशा मताचेच होते असे दिसते. राज्यपाल तरी आता या दृष्टिकोणाची पूर्ण चौकशी करतील किंवा आरोपीनी जर पुनर्न्यायाची मागणी (अपील) केली तर अधिकाऱ्यांना तशी संधी मिळेल अशी आगाही त्या अग्रलेखात पुढे व्यक्त करण्यात आली होती.

न्यायालयात आगीचा हेतू राजद्रोही कारस्थानाचा होता असे सिद्ध झाले नाही, तेव्हा आरोपींच्या स्वीकारोक्त्यांचा खरा अर्थ लावताना कस्तुरेच्या स्वीकारोक्तीवर 'ॲन ॲलिजनल कन्फेशन' ("दृष्टांतरूपी स्वीकारोक्ती") या नावाचा लेख लिहून आरोपीना भेटलेल्या बड्खोरांचे म्हणून आरोपीनी केलेले वर्णन खऱ्या आरोपीचेच कसे होते तेही 'ज्ञानप्रकाश'ने दाखविले.[७]

वासुदेव बळवंतांना आगीचे वृत्त समजले, तेव्हा ते गाणगापुरास होते. त्यांचा आगीत हात नव्हता. ते वृत्त समजताच ते उद्गारले, "हे वाडे जाळून काही निष्पन्न होणार नाही आणि तसं पाहिलं तर ते उगीचच जाळले. पण सरकारचं इतकं मोठं नुकसान झालं, ते बरंच झालं." तरी पण आगी लागल्या त्या मात्र त्यांच्या बंडामुळेच लागल्या.

त्यांच्या बंडामुळे वातावरण तंग होते. त्यामुळे या आगी लावल्या तर त्या त्यांच्या नावावर सहज विकल्या जातील असा विचार आगलाव्यांना सुचू शकला. केशव रानडे हा त्यांच्या आळीत रहाणारा आणि त्यांच्या सायंकाळच्या बैठकीतला तरुण होता. आपल्या हातून झालेली पुस्तक भांडारातील चार सहस्र रुपयांची अफरातफर लपविण्यासाठी आम्ही हे वाडे जाळले, हे त्याच्या वडिलांनी दिलेले

६ 'ज्ञानप्रकाश,' दि. १९ जून १८७९
७ 'ज्ञानप्रकाश,' दि. १६ जून १८७९

कारण शाळानिरीक्षकाच्या (इन्स्पेक्टरच्या) प्रतिवृत्तावरून खोटे ठरते. कारण जानेवारी १८७९ मध्ये "आम्ही भाडाराचे हिशेब पाहिले, तेव्हा त्यात काही चूक आढळली नाही," असे मत त्या अधिकाऱ्याने दिल्याचे पुढे प्रसिद्ध झाले. यावरून असे दिसते की, वासुदेव बळवंतांच्या उठावणीशी सहानुभूतिक असलेला सहकारी म्हणून केशव रानडे याने इतरांच्या सहाय्याने त्या आगी लावल्या. पुढे त्या कृत्याचा फार बभ्रा होऊन ते बालंट इतरांवरही येणार असे दिसताच, काही झाले तरी आपणास तर आता शिक्षा होणारच, तेव्हा इतरांची नावे घेऊन त्यांनाही या प्रकरणात अडकवून लाभ काय? या विचाराने त्याने इतर कटवाल्यांची नावे सांगितली नसावी.

केशव रानडेस आणि वासुदेव बळवंतांच्या बैठकीतील इतर सहकाऱ्यांना त्यांच्याविषयी मनापासून प्रेम होते आणि त्यांच्यावर ओढवणाऱ्या दु:खाविषयी वाईट वाटत होते. त्यांना पुण्याच्या लोकांनी पाठिंबा दिला नाही याचे त्यांना वैषम्य वाटत असे. ते सांगताना केशव रानडेनेच, या सहकाऱ्यांनी वासुदेव बळवंतांचे नाव कधी काढले होते काय या प्रश्नाला उत्तर देताना प्राथमिक चौकशीत दंडाधिकाऱ्याना म्हटले: "होय; काढले होते. ते म्हणत की, पुण्याच्या लोकांनी वासुदेवाप्रमाणे बंड केले नाही व त्याला एकटेच सोडले हे वाईट केले आहे." [८]

आगीच्या मुळाशी वासुदेव बळवंताचे आणखी सहकारी कटवाले आहेत असा सरकारी अधिकाऱ्याचा समज होता. 'बॉम्बे गॅझेट' पत्राच्या लंडनच्या वार्ताहराच्या ४ जुलैच्या वातमीपत्रात याचा प्रत्यय येतो. तो म्हणतो,

"The confessions of the men convicted at Poona were only intended to put the authorities off the scent."

(पुण्याला दंडित झालेल्या लोकांच्या स्वीकारोक्त्या सरकारी अधिकाऱ्यांना खऱ्या सुगाव्यापासून दूर ठेवण्याच्या हेतूनेच केलेल्या होत्या.)

इग्रज सरकारचा हा समज सर रिचर्ड टेंपल यांच्या पुढील शब्दातही व्यक्त होतो.

"The deed was perpetuated for the sake of doing mischief to the Government and must have instigators undetected, who were far more important than the wretched man who was caught and punished. This event was certainly frought with political significance." [९]

("सरकारला त्रास देण्यासाठीच हे कृत्य केले गेले होते आणि पकडल्या गेलेल्या आणि शिक्षा झालेल्या नीच अपराधी मनुष्यापेक्षाही अधिक महत्त्वाचे परंतु न साप-

८ केशव रानडे यांचे पहिला वर्ग दंडाधिकारी कॅपबेल यांच्यापुढील निवेदन; दि. ८ जून १८७९

९ सर रिचर्ड टेंपल : "मेन अँड इव्हेंटस ऑफ माय टाइम इन इंडिया," पृ. ४७०

डलेले फूसलावे त्या कृत्यामागे असले पाहिजेत. या घटनेला निश्चितच राजकीय गर्भितार्थ होता.")

असे दुसरे कटवाले होते, हा वरील लोकांचा तर्क होता. पण खरे म्हणजे पुढे दीड महिन्यातच मुंबई पोलीस अधिकारी खान बहादुर अकबर अल्ली यांना तपास चौकशीसाठी पुण्यात पाठविण्यात आले आणि शेवटी १७ जुलैला विष्णु बळवंत खरे आणि मोरो बळवंत खरे या बंधूना आणि कृष्णाजी रानड्यांचे भाचे बाबाजी नारायण फडके यांना वरील आगीमध्ये हात असल्याच्या आरोपावरून त्यानी अटक केली. दुसऱ्या दिवशी नगर दंडाधिकारी प्लंकेट यांच्यासमोर त्यांना उभे करण्यात आले. ते सारे वासुदेव बळवंतांच्या गुप्त मंडळाचे सदस्य होते. फरासखान्यात कच्च्या बंदिवासात त्यांचा फार छळ करण्यात आला. पण त्याला ते तिघेही पुरून उरले. पुढे शुक्रवारी २५ जुलैला त्यांची प्राथमिक चौकशी सुरु झाली, या चौकशीत ६ ऑगस्ट १८७९ ला पहिल्या दोघांविरुद्ध पुरावा नाही म्हणून दंडाधिकाऱ्यांनी त्यांना सोडून दिले. आणि बाबाजी फडक्यांचा अभियोग सत्र न्यायालयात वर्ग केला. परंतु तेथे त्यांचीही पुराव्याच्या अभावी निर्दोष म्हणून सुटका झाली.

पळस्प्याच्या हल्ल्यात आणि मावळ खोऱ्यातील चकमकीत वासुदेव बळवंत होते अशी प्रचलित समजूत होती. पण ती रास्त नव्हती. चांदखेड लुटल्यानंतर पुढील योजनांसाठी नवलाख उंब्रे येथे आपण पुन्हा भेटू असे दौलतरावांना सांगून ते पुण्यास परतले. पण संकल्पित वेळेला नवलाख उंब्रे येथे त्यांना जाता आले नाही. तेव्हा थोडे दिवस त्यांची वाट पाहून दौलतरावांनी पुढे जाण्याचे ठरविले आणि त्यांच्या नेतृत्वाखाली त्यांचे सहकारी कोकणात उतरले. कोकणची लूट घेऊन दौलतराव आपणास येऊन भेटतील असा विचार करून वासुदेव बळवंतांनी दौलतरावांची वाट पाहिली. पण त्याऐवजी मावळ खोऱ्यातल्या चकमकीचे वृत्तच त्यांना अज्ञातवासात समजले. त्यावेळी ते गाणगापुरास होते त्या चकमकीत मेजर डॅनिअलने गोळी घालून दौलतरावाना ठार केले होते, हे ऐकून वासुदेव बळवंतांना मोठा धक्का बसला. त्यांच्या संगतीत डोंगरपठारावर घालवलेल्या वडखोर जीवनातील अनेक प्रसंग आठवून त्या काळात दौलतरावांनी दाखविलेल्या निष्ठेच्या आणि प्रेमाच्या स्मृतींनी त्यांच्या डोळ्यात अश्रू उभे राहिले.

दौलतरावांच्या निधनाने अश्रू ढाळीत ते उद्गारले, "दौलतराव हे माझे पहिल्या प्रतीचे सरदार आणि माझे उजवे हात होते. ते शूर पुरुष होते. त्यांच्या संगतीत डोंगरपठारावर राहताना मी किती मजेचा काळ घालविला होता !" त्यांच्याविषयी अशा भावना व्यक्त केल्यावर त्यांना मारणाऱ्या मेजर डॅनिअलवर त्यांनी संतापाच्या भरात शिव्याशापाची फैर झाडली, आणि "अशा शूर पुरुषास अशा तऱ्हेने मारून त्याला काय मिळाले ?" असा प्रश्नही दुःखाच्या भरात त्यांनी

केला. एका आडगावच्या अशिक्षित परंतु निष्ठावंत आणि शूर अनुयायाविषयींही असे अश्रू ढाळावयाला लावण्याइतके त्यांचे आपल्या सहकाऱ्यांवर गाढ प्रेम होते. असा पुढारी असल्यावर अनुयायांनी त्याच्यासाठी प्राण ओवाळून टाकावे यात काय नवल ?

चांदखेड लुटल्यानंतर वासुदेव बळवंतांच्या असे लक्षात आले की, मिळालेली सर्वच्या सर्व लूट आपल्या हाती लागत नाही. रामोशी लोक स्वतःच लुटीत आपले हात धुवून घेतात आणि वर पुन्हा वेतनही मागतात. फक्त सक्त झडत्याच अशी लबाडी थांबवू शकणार होत्या. तेव्हा असे चालले तर आपल्या पुढच्या योजना प्रत्यक्षात येणार कशा, या चिंतेत ते पडले. दौलतरावांचा मृत्यू त्यांच्यावर मोठा आघात करून गेला.

गेल्या तीन महिन्याच्या छाप्यांनी इंग्रज सरकारविरुद्ध आपल्या नावाचा दरारा त्यांनी निर्माण केला होता. परंतु दरवडे घालण्यातच राजकीय कामगिरी संपली असे त्यांना वाटत नव्हते. लुटी मारण्यात आपल्या कार्यासाठी पैसा मिळवावा आणि त्याने लढाऊ लोकांच्या लहान लहान टोळ्या संघटित कराव्या, असा त्यांचा विचार होता.

लुटीचा पैसा हातात आल्यावर देशाच्या निरनिराळ्या भागात आपली माणसे कित्येक महिने आधी पाठवून लोकांची मने बंडासाठी सिद्ध करण्याचे त्यांनी ठरविले होते. एकाच वेळी सगळीकडे अशी बंडे होती, तर सरकारच्या मनात मोठी भीती उत्पन्न झाली असती. त्या उत्थानात मग देशातील डाका बंद झाल्या असत्या, आगगाड्यांचे दळणवळण बंद पडले असते, तारायंत्रे उखडली गेली असती, इकडची बातमी तिकडे गेली नसती, सरकारी खजिने लुटता आले असते, तुरुंग फोडून तुरुंगातील कैदी मोकळे करता आले असते आणि हे सर्व गट एक झाले असते. असे झाले असते म्हणजे इंग्रजांना हिंदुस्थानातून बाहेर हाकून लावण्याचे काम सोपे झाले असते, अशी त्यांची योजना होती.

त्यांचा पहिला पैसा मिळविण्याचा हेतू तडीस गेला होता. लढाऊ पथकेही सिद्ध झाली होती. पण त्यापुढे पाऊल टाकताना रामोशी लोकांचा त्यांना भरवसा वाटेना. पैसे मिळवण्यापुरतेच ते आपल्याजवळ रहाणार असे भय त्यांना वाटले. तेव्हा त्यांचा नाद सोडून देण्याचे त्यांनी ठरविले. दौलतरावांच्या मृत्यूची बातमी समजल्यावर निराशेने त्यांना पुरे घेरले.

त्या निराशेत डोंगराळ जीवनात त्यांना जे पराकाष्ठेचे हाल सोसावे लागले होते, त्याची पुसटशी कल्पना त्यांच्या एका दिवसाच्या पुढील दिनक्रमावरूनही येईल. ते त्या दिवशीच्या दैनंदिनीत म्हणतात : " सकाळपासून गोपाळरावांचे पाय दुखत होते. वाटेत मीही एका ठिकाणी पडलो... मला वाटले लोक मला पकडण्यास

येत आहेत ...म्हणून मी धावू लागलो. परंतु रस्त्यात पडलो आणि मला बरेच लागले. वाटेत आम्ही एका झाडाखाली झोपलो. सकाळी लवकर उठलो... माझ्या अंगात ताप होता आणि पायातील वेदना सहन होत नव्हत्या. तरी मी चाललो. (दौलतरावांनी सांगितलेल्या वृत्तांतावरून) अशा लोकांकडून कार्य कसे सिद्धीस जाणार असे मला वाटू लागले. लोक निघून गेले आणि आम्ही एका उंबराच्या झाडाखाली झोपी गेलो."[१०]

प्रासंगिक विफलतेच्या भरात आपल्या कार्यास दैवी आशीर्वाद हवा अशी ओढ त्यांना लागली. क्रांतिकारकांचे भावनाप्रधान मन बऱ्याच वेळा असे सहाय्य मिळविण्याची खटपट करते आणि आपल्या कार्यात यश आले नाही तर विरक्त जीवन जगायचे ठरवते. त्यामुळे कुर्नुल जिल्ह्यातील प्रख्यात श्रीशैलमल्लिकार्जुन नावाच्या पवित्र क्षेत्राला जाऊन परमेश्वरी कृपाप्रसादासाठी अनुष्ठान करण्याचा त्यांनी निश्चय केला. तसा कृपाप्रसाद मिळविण्यात जर आपल्याला यश आले नाही तर आपले स्वतःचे मस्तक कापून तेच त्या देवतेस अर्पण करण्याचाही त्यांनी निश्चय केला. हा निश्चय पुण्यासच १ एप्रिल १८७९ ला त्यांनी केला आपल्याजवळचे दागिने वितळवून त्यांनी त्याचे सोने करून घेतले आणि ३ एप्रिलला सकाळीच ते पुण्याहून निघाले. गोपाळ मोरेश्वरही त्यांचे समवेत होते. लोणीकंद येथे ते पोहोचले. तेथून पायी चालत रात्री ते उरळी कांचनला पोचले. तेथून केपूरला जाऊन मोहोनीबावा या साधुपुरुषांचे त्यांनी दर्शन घेतले आणि मग लोहमार्गाने सोलापूर आणि तेथून ते दुधणीला गेले.

येथून पुढचा प्रवास त्यांनी पायी सुरू केला. वाटेत कुर्नुल येथे गरीब जनतेचे अनन्वित हाल पाहून ते उद्गारले : "देवा, या लोकांना असले हाल पहायला लावण्यापेक्षा, मला तू मृत्यू का देत नाहीस ? माझ्या देशबांधवांचे हे हाल माझ्याच्याने पहावत नाहीत. त्यापेक्षा मृत्यू बरा !"

पुढे ५ एप्रिलला ब्रिटिश सीमेपासून ४० मैल आत निजामच्या राज्यांतील गाणगापूर किंवा गन्नूर येथे ते गेले. तेथे ते रंगोपंत मोरेश्वर महाजन यांच्याकडे उतरले. महाजनचे मूळ आडनाव भट तो कोकणात अजर्ल्याचा राहाणारा. त्या गावच्या काही अधिकारपदामुळे तेथील भटांचे महाजन झाले. रंगोपंतांचे नाव रघुनाथ भट असेही उल्लेखलेले आढळते. तो टिळकांच्याच वयाचा. म्हणजे १८५६ मध्ये जन्मलेला. टिळकांचे त्याचे आते मामे भावाचे नाते होते. टिळकांचा एक नातेवाईक या बंडात होता असे मागे म्हटले आहे तो हाच. त्याचे वडील औरंगाबादला एका कनिष्ट अधिकारावर नोकरीत होते. त्यामुळे अंजर्ल्याचा महाजन निजामच्या राज्यात गेला आणि गाणगापूरला टोलनाक्यावर लेखनिक म्हणून नोकरीस होता. त्याचे वडील

१० वासुदेव बळवंताची दैनंदिनी; १ एप्रिल १८७९

आता विद्यमान नव्हते. पूर्वी तो अंजर्ल्यास आपले चुलते पांडुरंग अप्पाजी यांच्याजवळ रहात असे. त्याचे दुसरे चुलते रत्नागिरीस आणि तिसरे हरी गोविंद महाजन पुण्यास शनिवार पेठेत राहात. ते सरकारी नोकरीत होते. महाजनने ठाणे येथे मराठी शिक्षण घेतले. पुण्यासही तेथील चुलत्यांजवळ काही दिवस मराठी शाळेत तो होता. त्याचे इंग्रजी शिक्षण काही झाले नव्हते. त्याचे मोडी अक्षर मात्र उत्तम असे. ही त्यावेळी नोकरीस चांगली अर्हता समजली जाई.

महाजनच्या माहितीसाठी अंजर्ल्याच्या बऱ्याच गावकऱ्यांकडे मी चौकशी केली. शेवटी त्याच्या एका नातेवाईकाकडून ती मिळाली. महाजन अंगयष्टीने सडपातळ होता आणि वर्णाने काळा होता. त्याचे नाक तरतरीत डोळे तांबडसर रागीट वाटत. उंचीने तो ५ फूट १० इंच होता.[११] वासुदेव बळवंतांचा तो लांबचा नातेवाईक होता. कोकणात जाताना तो पुण्यास काकांकडे उतरे. आणि १८७६ पासून तेथे वासुदेव बळवंतांशी त्याची अधिक घसट वाढली. त्यांच्या व्यक्तिमत्वाचा त्याच्यावरही इतरांप्रमाणे प्रभाव पडला. त्यांच्याविषयी त्याला पराकाष्ठेचा आदर नि प्रेम वाटू लागले. त्यांच्या घरीही तो पुढे काही दिवस राहिला. तेथे भिंतीवर लटकलेल्या बंदुका, तलवारी, पट्टे इत्यादी शस्त्रे त्याने पाहिली. त्यांच्या बंडाच्या मतप्रणालीने तो भारला गेला. त्यांनी त्याला शस्त्र शिक्षणही दिले. तो राष्ट्रीयवृत्तीचा बनला. 'ज्ञानचक्षू' हे त्या पंथाचे पत्र त्याने आपल्या नावे सुरू केले. तो पोहण्यात तरबेज झाला. त्याने तरवार फिरविण्यात प्रावीण्य मिळविले. अंजर्ल्याच्या खाडीवर होडी नसताना एकदा तीत उडी टाकून त्याने ती पार केली होती. उघड्याने पाठीवर पोहत तोंडात तरवार आडवी धरून ती पार करण्याचाही चमत्कार तो करी.

गाणगापूरास आपली आई दुर्गाबाई हिच्यासह तो राहात असे. टोलनाक्यावर त्याचे सहकारी असलेले कृष्णाजीपंत गोगटे हे त्याचे घनिष्ट मित्र होते. आता वासुदेव बळवंत त्याच्याकडे आले, ते दाढी मिशा वाढवून बंडखोराच्या वेषात. त्यांच्या समवेत गोपाळ मोरेश्वर होता. त्यांच्या अंगावर शाल आणि कमरेला आवडती तलवार होती. त्यांना पाहून महाजनला आश्चर्य वाटले. पण त्यांनी सर्व वृत्तांत त्याला सांगितला. दोघेही पाहुणे महाजनकडे उतरले.

गाणगापूर भीमा नदीच्या काठावर वसलेले दत्ताचे रम्य आणि पवित्र स्थळ होते. दत्त हे तर वासुदेव बळवंतांचे आराध्य दैवत. त्याचे दर्शन घेतल्यावर त्यांना आपल्या मनावरील ताण कमी झाल्यासारखे वाटले. गाणगापूरहून एक कोसावर भीमा आणि अमरजा यांचा संगम होतो. त्यामुळे त्या ठिकाणाला संगम म्हणतात. संगमावरही श्री दत्ताचे देवालय आहे. थरथरत्या शरीराने आणि कळवळत्या अंतःकरणाने ते त्या दत्त मंदिरात शिरले. त्यांनी श्री दत्ताला नमस्कार केला आणि

---

११ महाजन यांचे नातू मनोहर यशवंत महाजन यांनी दिलेली माहिती.

जवळचे काही सोने-रूपे मनोभावाने त्या मूर्तीला अर्पण केले.

देवळात येणाऱ्या या पुरुषाचा निराळा वेष आणि तेजस्वी स्वरूप पाहून संगमावरचा देवळाचा पुजारी रावजी दाजी फडके चमकला. त्याचेच दुसरे नाव रावजी सेवेकरी असे होते. त्यांचे सहृदय बोलणे चालणे पाहून सलगी वाढताच रावजी त्यांना म्हणाला, "महाराज, आता तुम्ही परत जाल तेव्हा तुमची आठवण म्हणून मला तुमच्या अंगावरची शाल द्या! विपन्नावस्थेतही वासुदेव बळवंतांचे औदार्य कमी झाले नव्हते. त्यामुळे त्या अवस्थेतही ते त्याला म्हणाले, "आता माझ्याजवळ ही एकच शाल आहे. पण तू पुण्याला ये. म्हणजे एकच काय वाटेल तेवढ्या शाली मी तुला देईन."

दुसऱ्या दिवशी ६ एप्रिलला कुरुंदवाडकर संस्थानच्या राणीसाहेबांनी गाणगापुरास भेट दिली. त्यांनी सर्व लोकांना तेथे जेवण घातले. मजा म्हणून वासुदेव बळवंतही त्याला गेले. ते बहुधा कधी दुसऱ्यांकडे जेवणास जात नसत. त्यामुळे एखाद्या सर्वसाधारण याचकांच्या पंक्तीत बसून ते अन्न घेताना त्यांना गोडी वाटली नाही.

७ एप्रिलला ते पहाटेच उठले आणि महाजनचा निरोप घेऊन त्यांनी गाणगापूर सोडले. या पुढील प्रवासात आपण जी गावे पाहिली. त्यांची त्यांनी आपल्या दैनंदिनीत नोंद केलेली आहे. गाणगापुरहून ते सायंकाळी पाच कोसांवर शहाबादला गेले. तेथील घरांच्या बांधकामात त्यांना विशेष लाकूडकाम आढळले नाही. तेथे त्यांनी एक रात्र काढली. आणि पुढचा प्रवास आगगाडीने करावयाचा असे ठरवून कृष्णा नदीकडे जाण्यासाठी तिकीट काढले. परंतु पाच–सहा दिवसांनी पुन्हा पायी प्रवास सुरू केला. बऱ्याच गावांना भेटी दिल्या. कोणतेही शस्त्र दिसले की, त्याचे त्यांना आकर्षण वाटे. एका गावी दिसलेल्या वैशिष्ट्यांची नोंद करताना ते म्हणतात: "येथील लोक रानटी आणि अडाणी आहेत. लोकसंख्या फारशी नाही. येथील राजवाडा मात्र प्रेक्षणीय आहे. येथील तोफा चांगल्या आहेत. एक तर २० हात लांब आहे."

नंतर श्रीशैल मल्लिकार्जुनच्या रोखाने ते निघाले. वाटेत त्यांनी आपल्या जवळचे पैसे निजामच्या राज्याच्या सरसीमेवरच्या गरीबांना वाटून टाकले. ते वाटेवरील मठात, देवळात किंवा धर्मशाळेत उतरत. लातूर जिल्ह्यात त्यांनी काही दिवस काढले. राजसत्तेचे घरणे सुटलेले, शरीरस्वास्थ्य बिघडलेले, आणि जीवित कार्यात यश येण्याची शाश्वती नाही. अशा परिस्थितीत अनोळख्या स्थितीत प्रवास करीत ते राज्यसत्तेला गुंगारा देत जात होते. अशा मनःस्थितीतच चैत्र वद्य १२ ला म्हणजे १८ एप्रिल १८७९ला एका शुक्रवारी ते श्रीशैल मल्लिकार्जुनला जाऊन पोचले. आपल्या जीवनमरणाच्या पेचप्रसंगी वासुदेव बळवंतांनी या लांबच्या

श्रीशैल मल्लिकार्जुनाचीच निवड का केली? त्यालाही त्यांची श्री दत्तनिष्ठाच कारण दिसते. कारण, श्री दत्तात्रयाचे तिसरे अवतार श्री नृसिंह सरस्वती हे गाणगापुराजवळच्या भीमा अमरजा संगमात जे आसनस्थ झाले ते चिरंतन समाधीसाठी श्रीशैल मल्लिकार्जुनी गेले, असे गुरूचरित्रात म्हटले आहे. आणि गुरूचरित्राची पारायणे करणाऱ्या वासुदेव वळवंतांना अंतिम प्रार्थनेसाठी त्यामुळे त्याचीच आठवण व्हावी हे साहजिकच ठरते.

श्रीशैल मल्लिकार्जुन हे महाक्षेत्र आहे आणि दक्षिण हिंदुस्थानात अतिशय प्राचीन आणि पवित्र महाक्षेत्र आहे. ते बारा ज्योतिर्लिंगापैकी एकच आहे. संस्कृत आणि दाक्षिणात्य भाषांत त्याच्यावर काव्ये रचली गेली. काळाच्या ओघात देशातील आणि बाहेरील कित्येक शास्त्रज्ञांनी आणि तत्वज्ञांनी त्याला भेटी दिल्या. त्याच्या मागे पार्वती देवीचे जागृत देवालय असून प्रख्यात पराक्रमी पुरुषांची गोपुरे आहेत. त्यात शिवाजीचेही एक आहे.

"कृष्णा नदी समुद्राकडे पूर्वेला वाहात जाते, तेव्हा कुर्नुलच्या दक्षिणेला सत्तर एक क्रोशाग्रांवर उत्तराभिमुख होऊन एक सहस्र पाऊले खोल असलेल्या विस्तृत आणि तुटलेल्या कड्यांच्या दरीतून वाहताना एक वळण घेते. येथे नलमल्ला अरण्याच्या निर्जन प्रदेशात, ओबडधोबड पाषाणाच्या डोंगरदऱ्यांनी आणि तापसराई आणणाऱ्या वैराण प्रदेशाच्या पट्ट्यांनी वेष्टिलेले १५६३ फूट उंचीचे एक पठार उंचावत गेलेले आहे. तेथून खाली नदीकडे पाहात हे प्रसिद्ध श्रीशैलाचे शिवमंदिर उभे आहे."

हे स्थानच मोठे रम्य होते. या पठाराला कैलासद्वार नावाच्या मार्गाने जावे लागते. "प्रत्यक्ष देवळाचा परिसर लांबट आकाराचा ६६० फूट लांब आणि ५१० फूट रुंद असून त्याच्याभोवती २० ते २६ फूट उंचीची भिंत आहे. ती फोडून काढून आणलेल्या करड्या चौकोनी दगडांनी नीट बांधलेली असून त्यात हत्ती, घोडे, वाघ, शिकारी योद्धे आणि योगी यांच्या आकृत्या आणि हिंदूंच्या महाकाव्यांतील आणि धर्मग्रंथातील कित्येक दृश्ये ठाकठोकपणे खोदलेली आहेत. या चौकाच्या मध्यभागी श्रीशैल हे चौकोनी मुख्य देऊळ आहे. त्याच्या भिंती आणि छप्पर विजयनगरचा विजयी राजा कृष्णदेव यांनी देवालयाला अर्पण केलेल्या तांब्याच्या पत्र्यांनी मढवून सुशोभित केलेली आहेत. येथे एक त्याहून लहान असे शिवपत्नी पार्वतीचेही (अष्टांबाईचे) देऊळ आहे. पठाराखाली असलेल्या कृष्णेच्या पाताळगंगा नावाच्या पात्रात आणि जरा आणखी खाली नीलगंगा नावाच्या प्रपाताला जाण्यासाठी विजयनगरच्या राणीने बांधलेल्या दगडी पायऱ्या आहेत. ही दोन्ही ठिकाणे स्नान करण्याची पवित्र स्थाने आहेत."[१२]

१२ जदुनाथ सरकार : "शिवाजी अँड हिज टाइम्स," पृ. २९६

अशी या पवित्र आणि रम्य स्थानाची वासुदेव बळवंतानी आपल्या कार्याच्या यशासाठी शेवटचे प्रार्थनास्थान म्हणून निवड केली. तेथेच चैत्र वद्य १३ ला शनिवारी १९ एप्रिलपासून त्यांनी आपले अनुष्ठान सुरू केले. अन्नपाणी संपूर्णपणे वर्ज्य करून देवीपुढे ध्यान लावून ते बसले. सात दिवस ते अनुष्ठान करावयाचे आणि त्या काळात जर आपणास दैवी शक्ती प्रसन्न झाली नाही तर तेथेच प्राणार्पण करून टाकावयाचे असा त्यांनी निश्चय केला.

या जगाचा अशा रीतीने निरोप घेण्यासाठी सिद्धता करून १९ एप्रिललाच त्यांनी मराठीत आपले आत्मचरित्र लिहावयाला प्रारंभ केला. आणि त्याचा पहिला भाग दोन दिवसात पुरा केला. हेच त्यांचे अप्रकाशित आत्मचरित्र होय. त्याचा श्रीगणेशा त्यांनी श्रीदत्तात्रयनमः अशा शब्दात आपल्या आराध्य दैवताच्या नामस्मरणानेच केला. त्यात लहानपणापासूनचा त्या वेळेपर्यंतचा त्यांचा जीवनवृत्तात आलेला आहे. त्यात शके आणि कधी तिथीचा संदर्भ देऊन त्यांनी सर्व घटना सांगितलेल्या आहेत. त्या तिथीचे इंग्रजी दिनांक शंभर वर्षांची जुनी पंचांगे धुंडाळून शोधून काढून मी येथे दिलेले आहेत. इंग्रज सरकारविरुद्ध बंड करण्याची आपल्या काही खटपटींची माहिती त्यांनी या आत्मचरित्रात अगदी उघड उघड दिलेली आहे. याचा अर्थच असा की, या बंडाच्या भीषण परिणामांना तोंड देण्यास ते सिद्ध होते. दुसरे म्हणजे या बंडात आपण यशस्वी होण्यात काही संशयातीत असंभाव्यता आहे असे त्यांना वाटत नव्हते. ध्येयासाठी प्राण पणाला लावणाऱ्या महापुरुषांची गोष्ट अशीच असते. त्यांच्या या आत्मचरित्रामुळे आणि वर उल्लेखिलेल्या दैनंदिनीमुळेच त्यांच्या विरुद्ध न्यायालयात राजद्रोह आणि युद्धाच्या कटाचा पुरावा सरकारला सहज उपलब्ध झाला. इंग्रज सरकारविरुद्ध उठावणी करणाऱ्या पुरुषाचे असे मराठी भाषेतील हे पहिलेच संपूर्ण आत्मचरित्र होय. "[१३] म्हणूनही त्याला महत्त्व आहे.

आत्मचरित्राच्या सुरुवातीलाच वासुदेव बळवंतांनी आपल्या देशबांधवाना पुढील साद घातली आहे. "अहो माझे देशबांधव आणि हिंदुस्थानवासी लोकहो, तुमच्या चरणी माझे शेवटचे वंदन असो. तुमच्या कल्याणाकरिता मी माझे देह खर्ची घालीत आहे. आणि तुमचा वकील म्हणून ईश्वराच्या न्यायसभेत हजर होतो आहे! यात मी काहीसुद्धा पुरुषार्थ केलेला नाही. दधिची ऋषींनी आपल्या अस्थिही नाही का देवांच्या कल्याणासाठी आपल्या हातांनी काढून दिल्या. तसेच ईश्वराने माझे प्राण घ्यावे. पण तुम्हा सर्वांना सुखी करावे अशी मी त्यास उभय कर जोडून प्रार्थना करतो आणि तुम्हा सर्वांना शेवटचे वंदन करतो!"

या आत्मचरित्राचा दुसरा भाग त्यांनी वैशाख शु. ५ ला शनिवारी २६ एप्रिलला पुरा केला. आपल्या वादळी जीवनाच्या वृत्तांताचा शेवट सांगताना,

१३ अ. का. प्रियोळकर "रावबहादुर दादोबा पांडुरंग," पृ. ५०

आपले देशस्वतंत्रतेचे ध्येय आपण गाठू न शकताच आपल्या आयुष्याचा अंत जवळ आला म्हणून त्यांना परमावधीचे दुःख झाले. त्या दिवशी त्यांना सडकून ताप भरला होता. त्या भावनांच्या उद्रेकांत त्यांनी दगडांनाही गुरासारखा दुःखाचा टाहो फोडावयाला लावणारे पुढील उद्‌गार काढले. "अहो हिंदुस्थानीवासी लोक हो आणि माझ्या बंधूनो, माझ्यापासून तुम्हाला काहीही लाभ झाला नाही. मी माझे ध्येय साध्य करू शकलो नाही. याविषयी सर्वजण मला क्षमा करा ! परंतु मी देश-भक्तीवाचून दुसरी कोणतीही भावना बाळगली नाही. याला ईश्वरच साक्ष आहे. तुमच्या हिताकरिताच मी सर्व काही केले."

देशभक्तीच्या भावनेचा असा उदात्त अविष्कार फारच थोड्या ठिकाणी राष्ट्रभक्तीच्या साहित्यात आलेला आढळतो. त्यातील निःस्वार्थी आणि देशबांधवांच्या कल्याणासाठी स्वतःच्या सर्वस्वाची होळी आनंदाने पेटविणाऱ्या मातृभूमीवरील भक्तीचा उसळता उद्रेक वाचताच आपल्या अंगावर रोमांच उभे राहतात.

या अनुष्ठानात वासुदेव बळवंतांची प्रकृती अधिकाधिक अशक्त होत गेली. ताप वाढत गेला. वैशाख शुद्ध ५ ला म्हणजे शनिवारी २६ एप्रिल १८७९ ला अपेक्षा केल्याप्रमाणे दैवी शक्ती प्रसन्न झाली नाही असे दिसल्यामुळे त्यांनी आपली तलवार काढली आणि प्रतिज्ञा केल्याप्रमाणे पुढ्यातील देवाला अर्पण करण्यासाठी आपले मस्तक धडापासून वेगळे करण्यासाठी म्हणून आपली मान कापण्याचा प्रयत्न केला! परंतु तेवढ्यात जवळच असलेल्या एका तेलंगी ब्राह्मणाने ते पाहिले. त्याने तीरासारखी पुढे धाव ठोकली. आणि वासुदेव बळवंतांना त्या कृत्यात अडवून तसे करू दिले नाही. त्यामुळे ती शोकांतिका टळली.

त्याचे नाव मलाप्पा. तो त्याच देवळात माईसाहेबांचा पार्वती मंदिराचा-पुजारी होता. आणि तेथेच राही, त्याला वासुदेव बळवंतांचा हा कठीण निश्चय कसा माहीत झाला समजत नाही पण कळलेला होता. आणि आपल्या देवळात आलेल्या या प्रत्यात देशभक्ताच्या हालचालीवर त्याने सूक्ष्म लक्ष ठेवले होते. वासुदेव बळवंतांची छाप त्याच्यावर पडली होती. ती शोकांतिका तेथे होऊ द्यावयाची नाही, असे त्यानी ठरविले होते. अशा रीतीने या पुरुषाने येथे जीव दिला तर काय परिणाम होतील, ही भीतीही त्याला वाटली असेल. तो वासुदेव बळवंताना तेलगू भाषेत म्हणाला: "महाराज हे कलियुग आहे. या कलियुगात असा हट्ट धरू नका. ईश्वर सेवा–अनुष्ठान चालू ठेवा. पण ईश्वर प्रसन्न झाला नाही तर प्राणा-र्पण करण्याचे वेड मात्र धरू नका. ते पाप होईल. येथे तुम्हाला मी काही एक कमी पडू देणार नाही. मी आपली सेवा करण्यास सिद्ध आहे." वासुदेव बळवंताना कामा-पुरते चालचलाऊ तेलगू येत होते. वरीलप्रमाणे मलाप्पाने त्यांचे मन वळविण्याचा खूप प्रयत्न केला आणि तो त्यांच्याजवळच बसून राहिला. त्यांचे मेतन जेवून खाऊन

चार रुपयेच होते. त्यातही त्याने ते करण्याचे मान्य केले हे पाहून वासुदेव बळवंतांना त्याच्याविषयी आपुलकी वाटली ते म्हणाले : "याची खरोखरच धन्य आहे. असा मनुष्य हजार दहा हजारात आणि तेलगणांत तर लाख मनुष्यामध्ये अधिक आहे."

थोड्याच वेळात मल्लाप्याची बाजू आणखी बळकट झाली. कारण, वीराम्मा नावाची एक भाविक बाई त्या देवळात नेहमी येत असे. तिलाही वासुदेव बळवंतांविषयी आदर वाटू लागला होता. तिनेही त्याला पाठिंबा तर दिलाच. पण त्या दोघांनी मग गावपाटलासही तेथे बोलावून आणले. त्यांनी त्यांना म्हटले की, आम्ही तुम्हास अशा ठिकाणी ठेवतो की, तुम्ही कोणालाच दिसणार नाही. वासुदेव बळवंतांनीही आपल्या प्रतिज्ञेचा मग पुन्हा विचार केला. एकदा गेलेला असा निर्वाणीचा क्षण पुन्हा क्वचितच येतो. त्यांचे म्हणणे वासुदेव बळवंतानी ऐकले. आणि ते मग पाटलांनीदाख विलेल्या गुप्त ठिकाणी राहावयास गेले.त्यांच्या प्राणार्पणाचा प्रसंग अशा रीतीनें टळला.

ही घटना म्हणजे इतिहासाची अतिशय थक्क करणारी पुनरावृत्ती होती. वासुदेव बळवंतापेक्षाही सहस्र पटीने मोठ्या पण तशाच भावनाप्रधान बंडखोरानेंही त्याच महिन्यात तशीच प्रतिज्ञा करून दोनशे वर्षांहून अधिक वर्षे आधी त्याच ठिकाणी आत्मार्पणाचा तसाच प्रयत्न केला होता! छत्रपति शिवाजी महाराज १६७७ मध्ये त्या क्षेत्रात आले होते. आणि तेच दिव्य परंतु अगदी निराळ्या मनःस्थितीत असताना त्यांनी केले होते. आपल्या ध्येयाच्या सिद्धीच्या आनंदात किंवा ते गाठण्यात आलेल्या अपयशामुळे वाटणाऱ्या तीव्र उद्विग्नतेतच मानवी मन आत्मघात करण्यास सिद्ध होत असते. वासुदेव बळवंतांनी आत्मार्पणाचा प्रयत्न केला तो अशा उद्विग्नतेत! शिवाजी महाराजांनी तसा प्रयत्न केला तो मातृभूमीला स्वतंत्र करण्याचे ध्येय यशस्वी झाल्यावर आणि आपले स्वतंत्र हिंदवी स्वराज्य स्थापन झाल्यावर वाटणाऱ्या अत्यानंदात! या घटनांवरून श्रीशैल मल्लिकार्जुनाच्या परिसरातील, या जगापलीकडच्या जगाविषयीच्या विचारांनी मानवी मनावर प्रभाव पडावा अशा वातावरणाचा, प्रत्यय येतो. शिवाजी महाराजांच्या त्या प्रयत्नाचा वृत्तांत एका प्रख्यात इतिहासकाराने पुढील प्रमाणे दिला आहे:

"Shivaji ascended this difficult plateau bathed in the Krishna, and spent some ten days at Shri Shail doing religious rites. The quiet and secluded beauty of the scenery and the spiritual atmosphere of the place penetrated his soul, and he believed that he would find no better place to die in So he attempted to cut off his own head before the goddess, but his ministers restrained his religious frenzy and recalled him to a sense of duty to his subjects and to the Hindu world at large." [१४]

१४ जदुनाथ सरकार : "शिवाजी अँड हिज टाइम्स," पृ. २९७

("शिवाजी ते अवघड पठार चढून गेला. त्यानें कृष्णा नदीत स्नान केले आणि श्रीशैल क्षेत्रात धार्मिक विधी उरकण्यात त्याने दहा दिवस घालविले. तेथील शांत आणि रम्य वनश्रीचे एकांतातील सौंदर्य आणि अध्यात्मिक वातावरण त्यांच्या अंतः-करणाला जाऊन भिडले. आणि त्यापेक्षा देह ठेवण्यासाठी अधिक चांगले स्थळ आपणास आढळणार नाही, असे त्याला वाटले. तेव्हा त्या देवतेसमोरच आपले शिर-कमल उतरून ठेवण्याचा त्याने प्रयत्न केला. पण त्याच्या मंत्रिमंडळाने त्याच्या या धार्मिक लहरीला आवर घातला आणि आपल्या प्रजेसंबंधीच्या आणि सगळचा हिंदु-जगतासंबंधींच्या आपल्या कर्तव्याची जाणीव त्याला करून दिली.") आत्मर्पणाचा विचार अशा रीतीने समाप्त झाल्यावर मग शिवाजीने त्या ठिकाणी एक घाट, मठ आणि धर्मशाळा बांधण्याचा आदेश देऊन ते स्थान सोडले.

गावपाटलाने आणि मल्लाप्पा प्रभृतीनी व्यवस्था केलेल्या जागी राहू लाग-ल्यावर वासुदेव बळवंतांचा ताप कमी होऊ लागला. शरीरस्वास्थ्य सुरू झाल्यावर त्यांचा आत्मार्पणाचा विचार लोप पावला. परत गाणगापुरास जाऊन प्रकृती सुधारेपर्यंत तेथे राहावयाचे त्यांनी ठरविले. त्यांच्या मार्गावर सरकारी हस्तकांचे जाळे पसरले होते. त्यामुळे आपली खरी ओळख प्रकट होऊ नये म्हणून त्यांनी आपले रूप आणि नाव बदलले. त्यांनी गळयात रुद्राक्षाची माळ घातली. कर्ण-कुंडले धारण केली आणि काशीकरबावा म्हणूनच ते गाणगापुराच्या वाटेवर २० मे च्या संधीस कुर्नुल येथे येऊन पोचले.

उठावणीच्या नवीन योजना आखण्याच्या विचारात असताना कुर्नुल येथे भास्कर ज्योतिषी या धूर्त आणि मोठी धडक असी असलेल्या सहकाऱ्याला भेटताना त्यांना फार आनंद झाला. भास्करचे खरे नाव भास्कर जोशी असे होते. पण तो ज्योतिषी असल्यामुळे भास्कर ज्योतिषी आणि काशीला राहात असे म्हणून भास्कर काशीवाले असेही त्यास म्हणत. वासुदेव बळवंतांनी देशकार्यात जी स्वार्थ-त्यागाची वृत्ती दाखविली, तिच्यामुळे भास्करच्या मनात त्यांच्याविषयी आत्यंतिक आदराची भावना होती. याच भेटीत भास्करने एक महत्त्वाचे पत्र वासुदेव बळवं-तांना दिले. तेच पुढे वासुदेव बळवंतांच्या दुसऱ्या एका सहकाऱ्यापाशी पोलिसांना मिळाले आणि सरकारी प्रवक्त्यांनी त्याचे वर्णन, वासुदेवाला ते जितके समजण्यात यावे असे वाटते, तितके काही ते साधेसुधे नाही असे केले. हे पत्र तांबडया शाईने लिहिलेले होते. त्या पत्रात भास्करने वासुदेव बळवंतांची हैदराबादच्या मौलवी महंमदसाहेब यांच्याशी ओळख करून दिलेली होती. मौलवी महंमदसाहेब हे निजा-मच्या राज्यातील मोठे वजनदार आणि बऱ्याच मोठया अनुयायित्वाचे गृहस्थ होते.

या पत्रात भास्करने वासुदेव बळवंतांविषयी मौलवी महंमदसाहेब यास

लिहिले होते. "सध्या मी कुर्नुल जिल्ह्यात आहे. आणि लवकरच बनारसला जाण्याचा माझा विचार आहे. मी पुण्याला होतो, त्यावेळेला ते मला दहाबीस वेळा भेटले. या भेटीत मला त्यांच्या परिस्थितीची आणि परिवाराची पुष्कळ प्रकारे कल्पना आली. आपल्या या हिंदुस्थान देशाला चांगले दिवस यावे म्हणून इतकी चिंता वाहणारा एकही मनुष्य लाखो माणसामध्येही मला भेटलेला नाही. हजार किंवा पाच हजार माणसातही ते शूर, कर्तबगार, आपला देह झिजविणारा असून आमच्या हिंदुधर्माचे पालन करणारे त्यांच्या योग्यतेचे फारच थोडे लोक असतील. सरकारी राज्य-कारभाराची मराठी आणि इंग्रजीत त्याना चांगली माहिती आहे. आपण हैदराबादे-तील मोठे प्रतिष्ठित गृहस्थ असून गुणांचे चाहते आहात. त्यामुळे त्याना आपणास भेटण्याची उत्कट इच्छा आहे, लोकांच्या इहलोकातील कार्यासाठी त्यांनी आतापर्यंत स्वतःचे हजारो रुपये खर्च केलेले आहेत. आपल्याला काहीतरी हिताचा मार्ग निश्चित सापडेल या हेतूने ते आपल्याकडे आलेले आहेत."

बंडासाठी कराव्या लागणाऱ्या अखंड खटपटीच्या श्रमामुळे वासुदेव बळवंताना आता कंटाळून थकल्यासारखे वाटले आणि भावी योजनांचा विचार करताना ते उद्गारले, "काय करावे! आयुष्यात काही शांतता नाही माझ्या चित्ताला " [१५]

गाणगापुरला वासुदेव बळवंत १७ जून १८७९ ला पोचले. आणि एखाद दिवस तेथे गावात राहिल्यानंतर ते लागलीच गाणगापुरहून दोन कोसांवर अस-लेल्या संगमावरच्या देवळात राहावयास गेले. त्यांची प्रकृती अजून ठीक नव्हती. त्यामुळे रंगोपंत महाजन आणि कृष्णाजीपंत गोगटे या दोघांच्या घरच्या मंडळींची वासुदेव बळवंतांची व्यवस्था ठेवण्यात धावपळ सुरू झाली. त्यांचे जेवण महाजन किंवा गोगटे यांच्या घरून येई आणि त्यामुळे संगमावरच्या मंदिरातून बाहेर पड-ण्याची वासुदेव बळवंतांवर पाळी आली नाही. काशीकरबाबा म्हणून आपली भूमिका त्यांनी इतक्या उत्तम रीतीने पार पाडली की, काही दिवस महाजनची आई दुर्गा-बाई हिला आणि गोगटयांची मंडळी यांना त्यांची खरी ओळखही प्रथम कळली नाही. अशा व्यवस्थेत वासुदेव बळवंतांची प्रकृती सुधारू लागली. ती चांगली झाल्या-वर महाजनने त्यांना आपल्या घरीच हालविले.

प्रख्यात संशोधक अ. ज. करंदीकर यांनी उल्लेख केला आहे, ती वासुदेव बळवंतांची पुण्याची भेट याच काळातील असावी. अप्पाराव वैद्यांच्या चिरंजीवांनी त्यांना तो वृत्तान्त सांगितला आहे. वासुदेव बळवंत वेषांतर करून भली मोठी झोळी घेऊन अकस्मात त्यांच्या (वैद्यांच्या) घरी आले. वैद्यांच्या आईने त्याना ओळखले नाही. पण त्यांचा वेष पाहून, "माधुकरी हवी आहे का ?" असे त्यांना विचारले. त्यांनी सांगितले, "माधुकरी नको. पण एक पाट घेऊन या." ते ऐकून वैद्यांच्या

१५ वासुदेव बळवंतांची दैनंदिनी : १७ मे १८७९

आईला नवल वाटले. पण ती लगेच पाट घेऊन आली. त्या पाटावर आपल्या झोळीतून आणलेली शंकराची अवजड पिंडी आणि गणपतीची एक मूर्ती त्यांनी ठेवली. आणि "पोलीस आपल्या पाठीवर आहेत. त्यांच्या हातून तुम्ही मला वाचवू शकत नाही. पण या देवांना वाचवा." वैद्यांच्या आईला असे सांगून ते नाहीसे झाले. त्या देवांची अप्पाराव वैद्यांनी चांगली जपणूक केली. [१६]

वासुदेव बळवंत गाणगापूरला परत आले त्यावेळेला पावसाळा सुरू झाला. गाणगापुराजवळच्या भीमा नदीला आता महापूर पाणी आले. वासुदेव बळवंतांची आशाही आता नव्याने फुलू लागली. या काळात महाजन समवर्तेच्या गप्पांमध्ये वासुदेव बळवंतांनी गतायुष्यातील बऱ्याच रोमांचकारी घटना त्याला सांगितल्या. थोड्याच दिवसात त्यांच्या चळवळ्या स्वभावाने पुन्हा उसळी मारली. गाणगापूरच्या काही तरुणांना त्यांनी महाजनच्या मध्यस्थीने बोलावून घेतले. आणि निजामाच्या राज्यातील शस्त्रनिर्बंधाच्या शिथिलपणाचा लाभ घेऊन त्यांच्यासाठी, बंदूक आणि इतर शस्त्रे हाताळण्याचे शिक्षण देणारा एक वर्ग काढला. त्यासाठी महाजनला त्यांनी शस्त्रे गोळा करण्यास सांगितले. त्याने तेलूरच्या सत्या बिन कुंतय्या जंगम या कोळ्याकडून स्वतःसाठी एक बंदूक आणली. देवळाचा पुजारी श्रीपादभट म्हणून होता. त्याच्याकडून गोपाळ मोरेश्वरसाठी दुसरी बंदूक आणली. महाजन आणि इतरांना वासुदेव बळवंतांनी निशाण मारण्यास शिकविले.

थोड्याच दिवसात श्री शैल मल्लिकार्जुनला जाताना, कार्याचे सूत्र जेथे सोडले तेथूनच त्यांनी ते पुन्हा हाती घेतले. आणि जे करणे ते दुसऱ्यांच्या मध्यस्थीने ते करवू लागले. महाजनच्या मध्यस्थीने पागा येथे रोहिला वस्तीत राहणाऱ्या लढाऊ रोहिल्यांशी त्यांनी संपर्क साधला. पागा ही सहराजपाल (को–रीजंट) शमसूल उमरा याची स्वतंत्र जहागीर होती. आणि निजामच्या आणि इंग्रजांच्या राज्यांतील लोकांना आश्रय घेण्यास सुरक्षित जागा होती. ब्रिटनमध्ये फसवणूक करणाऱ्यांना जसा स्पेन तसा ब्रिटिश हिंदुस्थानातील अपराध्यांना हा जिल्हा उपयोगी पडे. कारण तेथे वरील दोघांही सत्ताधाऱ्यांचा अधिकार चालत नव्हता. महाजनचा या रोहिले लोकांशी घनिष्ट परिचय होता. त्यामुळे वासुदेव बळवंतांच्या त्यांच्या समवेतच्या वाटाघाटींना तो सुयोग्य मध्यस्थ होता. त्याने वासुदेव बळवंतांच्या विचाराने त्याच वेळी काही लिंगायत आणि कोळी साहसवाद्यांशीही त्याच उद्देशाने बोलणी सुरू केली. त्यात मैलगिरी बिन शरणाप्पा वाणी हा लिंगायत आणि तेलूरचा सातय्या बिन कुंतय्या जंगम आणि संन्यासी बिन बोमण्णा हे कोळी होते.

त्याच वेळी देशातील निरनिराळ्या भागातील आपल्या साहाय्यकांना वासुदेव

---

१६ अ. ज. करंदीकर : "क्रांतिकारक टिळक नि त्यांचा काळ," पृ. १०३

बळवंतांनी या नव्या योजनेत सहभागी होण्यासाठी पाचारण केले. भास्कर ज्योतिपीला त्यांनी बनारसला गुप्त कामगिरीवर धाडले. मौलवी महंमदसाहेब हे निजामाच्या राज्यांत शीख, रोहिले आणि अरब टोळीवाल्यांचे पुढारी होते. भास्करने त्यांना म्हणून दिलेल्या आपल्या ओळखपत्राने त्यांच्याकडूनही आणखी लोक मिळविण्याची वासुदेव बळवंतांनी खटपट सुरू केली. सर रिचर्ड मीड त्या वेळी हैद्राबादला राजनिवासी (रेसिडेंट) होते. मुंबई सरकारला त्यांनी पुढे त्या मौलवी महंमदसाहेबांविषयी जी माहिती दिली, तिच्याप्रमाणे पाहाता, त्यांचे तेथें बरेच वजन होते. पुष्कळ अनुयायी होते आणि त्यांच्या विषयी उगीच काहीही बोलण्यास लोकांना मोठी भीती वाटत असे. दक्षिण हिंदुस्थानात गोदावरी जिल्ह्यातील रपा बंडखोराशी वासुदेव बळवंतांनी त्यांचे साहाय्य मिळविण्यासाठी पत्रव्यवहार सुरू केला. आणि आवश्यक तर तिकडे जाण्याचीही सिद्धता केली. दख्खनमधील आणि बाहेरच्या संस्थानिकांकडे सहाय्याची मागणी धाडली आणि पुण्यास ब्रिटिशांच्या सैन्यात त्यांचे मित्र होते, त्यांच्याशीही विचार विनिमय सुरू केला.

अज्ञातवासांत वासुदेव बळवंतांना येणारी पत्रं महाजनच्या नावाने येत. आपल्या जाणाऱ्या पत्राचा पत्ता ते तोंडी सांगत आणि तो ते महाजनकडून लिहून घेत. आपले हस्ताक्षर सरकारी अनुचरानी ओळखू नये म्हणून ते हे पत्ते स्वत: लिहीत नसत. मौलवी महमदसाहेब यांच्याशी झालेल्या यांच्या वाटाघाटींचे खरे स्वरूप काय होते ते शोधून काढण्यासाठी ब्रिटिश राजनिवासाने पुढे फार प्रयत्न केला. पण वासुदेव बळवंतांच्या अशा दक्षतेमुळे त्यासंबंधीची काहीही माहिती मिळविणे त्यांना शक्य झाले नाही. मग त्या संबंधीच्या पुराव्याची तर गोष्टच सोडा.

खुषीत आले म्हणजे महाजन आणि इतर जवळच्या सहकाऱ्यांसमवेत पत्त्यांचा किंवा गंजिफांचा डाव ते मांडीत. या वेळी परिचित रोहिल्यांची सेना उभारण्याची ते चर्चा करीत. आपल्या या नव्या सेनेची विभागणी कशी करायची तेही त्यांनी ठरविले. पाचशे रोहिल्यांना चाकरीस ठेवावयाचे त्यापैकी दोनशे लोक घोडेस्वार राहतील आणि तीनशे पायदळांत भरती होतील असे त्यांनी ठरविले. या घोडेस्वारांसाठी घोडेही खरेदी करण्याचे त्यांनी ठरविले. या नव्या सैनिकांचा नवा पट करावयाचा आणि तो ठेवण्यासाठी गाणगापूरच्याच रामचंद्रपंत हनुमंत कुळकर्णी यांची लेखापाल आणि पटवारी म्हणून महिना शंभर रुपये वेतनावर नेमणूक करण्यास त्यांनी महाजन यास सांगितले.

रंगोपंत महाजनने रोहिले प्रभृती लोकांशी जी बोलणी सुरू केली होती, ती थोड्याच दिवसात यशस्वी होऊ लागली. महाजन गाणगापूरापासून ५ कोसांवर असलेल्या अंबूर येथेच ईसमाईलखान रोहिला यास भेटला आणि त्याला त्याने सांगितले की, आपणास माणसे नोकरीस ठेवावयाची आहेत. माणसे कोणत्या जातीची

आहेत त्याच्याशी आपणास कर्तव्य नाही. आपणास शंभर माणसे हवीत आणि ती तरुण हवीत. इस्माईलखान हा पेशावरकडील राहणारा. त्याच्या गावी जाण्यास पेशावरपासून दोन दिवसांचा प्रवास करावा लागत असे. इस्माईलखानाने विचारले "माणसे कोणास हवी आहेत?" महाजनने सांगितले की, ती आपल्या भावास हवी आहेत. तेव्हा इस्माईलखानाने त्याला सांगितले की, "माझी आणि तुमच्या भावाची भेट झाली, म्हणजे पुढे बोलू. त्यांना तुम्ही घेऊन या."

त्यासाठी अन्नूर येथे जाण्यास वासुदेव बळवंत दुसऱ्या दिवशी पहाटेच निघाले. ते सात वाजता तेथे पोचले. आणि गावाबाहेर चावडीवर राहिले. रोहिल्यांनी त्यांच्या जेवणाखाण्याची चावडीवरच व्यवस्था केली. ते त्यांना 'महाराज' म्हणून ओळखू लागले. वाटाघाटी दोनतीन दिवस चालल्या होत्या. इस्माईलखानासमवेत शेख शहाबुद्दीन, शेख इमाम, हसनखान शेरेखान, शेख सोंडू, शेख अहंमद, सय्यद हुसेनखान आणि शेख हुसेनखान हे रोहिल्यांच्यावतीने आणि जानोजीराव यशवंतराव हे दक्षिणी लोकांच्यावतीने वाटाघाटीत भाग घेत होते. हे लोक तेथे निरनिराळ्या सरदारांच्या हाताखाली नोकरीस होते. वाटाघाटींच्या वेळी आपला तोंडावळा त्यांना दिसू नये म्हणून वासुदेव बळवंतांनी तो उपरण्याने नाकापर्यंत झाकला होता. त्यांच्या मुद्रेचा वरचा भागही जवळजवळ पूर्णपणे वस्त्राने झाकला होता. रोहिल्यांना त्यांनी सांगितले की, आपणास सर्दी झाली असल्यामुळे ही दक्षता घ्यावी लागत आहे.

वाटाघाटीत रोहिल्यांना प्रत्येकी महिना दहा रुपये वेतन आणि फुकट अन्न मी देईन, असे वासुदेव बळवंतांनी सांगितले. त्यावर इस्माईलखान म्हणाला, "इतके वेतन दिल्यावर तुम्हाला वाटेल तेवढी माणसे मिळतील."

वाटाघाटी निर्णायक अवस्थेला आल्या, तेव्हा चावडी सोडून वासुदेव बळवंत अन्नूर गावात गेले. तेथे त्यांच्या सांगण्याप्रमाणे महाजनने एक ठरावपत्रक लिहून काढले. आणि त्यावर रोहिल्यांच्यावतीने इस्माईलखानाने स्वाक्षरी केली. या ठरावाप्रमाणे रोहिलेप्रमुखांनी वासुदेव बळवंतांना पाचशे रोहिले पुरवावयाचे असे ठरले. त्यापैकी दोनशे घोडेस्वार असावयाचे होते आणि त्यांनीच आपले घोडे आणावयाचे होते. फौज उभी रहाताच इस्माईलखानास वासुदेव बळवंतांनी जमादार करावयाचे आणि त्याचे मासिक वेतन पंचवीस रुपये द्यावयाचे असे ठरले. ठरावपत्रकावर स्वाक्षऱ्या होताच वासुदेव बळवंतांनी जानोजीरावांना सांगितले, "यानंतरही आपल्या दक्षिणी लोकांपैकी कोणाला सैन्यात यावयाचे असेल तर त्याला आणा; त्याला हरकत नाही." वासुदेव बळवंतांनी या लोकांची कामगिरी म्हणून त्यांना अरण्यात आणि डोंगराळ प्रदेशात आपल्या अधिपत्याखाली रहावे लागेल आणि लढावे लागेल असे सांगितले.

लिंगायत आणि कोळी नाईकांशी महाजनने ज्या वाटाघाटी केल्या, त्यात मैलगिरी बिन नरणप्पाने माणसे कशासाठी हवी आहेत, त्याची चौकशी करून

वरील वेतनावरच दोनशे माणसे शस्त्रांसह देण्याचे मान्य केले. तेलूरच्या सातय्या बिन कुंतय्याने शंभर सशस्त्र माणसे आणि चतुरा किंवा सन्यासी बिन बोमण्णा कोळी याने त्याच अटींवर शंभर माणसे देण्याचे मान्य केले.

वाटाघाटी यशस्वीपणे संपवून वासुदेव बळवंत गाणगापुरला परत आले. इतक्यात पावसाळा सुरू झाला. तेंव्हा या नऊशे लोकांचे आपले सैन्य पावसाळा संपल्यावरच उभारावयाचे असे वासुदेव बळवंतांनी ठरविले. या सैन्यासाठी एकंदर पाच सहस्त्र रुपये लागणार होते परंतु थोड्याच दिवसात त्यांना रोहिल्यांच्या-वतीने इस्माईलखानाचा निरोप आला की, आपण ठरल्याप्रमाणे लोक देऊ, परंतु त्यासाठी घोडे विकत घेण्यासाठी दोन सहस्त्र रुपये अंगावर आधी दिल्यावाचून ते मिळू शकणार नाहीत. वासुदेव बळवंतांजवळ गाणगापुरला तेवढा पैसा नव्हता. त्यामुळे त्यांनी फक्त दोन हजार रुपयेच अरबाना आणि रोहिल्यांना दिले आणि उरलेले तीन हजार रुपये पुण्याहून आणण्यासाठी गोपाळ मोरेश्वरना पाठविले. लुटीच्या पैशापैकी दौलतरावांच्या सासऱ्यांकडे ठेवी होत्या. त्यातून पुण्याचे आपले शेजारी विनायकराव दामले किंवा गोखले यांना भेटल्यास ते पैसे आणून देण्याची व्यवस्था करतील, असे वासुदेव बळवंतांनी गोपाळ मोरेश्वरना सांगितले. पण गोपाळ मोरेश्वरांना ते पैसे मिळाले नाहीत. महाजनने दुसऱ्या एका ठिकाणाहून ते आणण्याचे सुचविले. पण वासुदेव बळवंतांना ती सूचना पसंत पडली नाही. आणि त्या पैशाची व्यवस्था करण्यासाठी पंढरपुरला जाण्याचे ठरवून गोपाळ मोरेश्वरसह ते स्वतःच तिकडे जाण्यास निघाले.[१७]

या कामास पंधरा दिवसांपेक्षा अधिक दिवस लागले नसते. त्याच पंधरवड्यात जर दुर्दैवाने त्यांना दगा दिला नसता, तर वासुदेव बळवंतांची ही पाचशे स्वारांची नवी सेना बंडासाठी सिद्ध झाली असती आणि पावसाळा संपताच इंग्रज सरकार विरुद्ध लढू लागली असती. तिच्या सुरुवातीच्या यशाने दिपून जाऊन शेकडो अडाणी शेतकरी आणि टोळीवाले त्या सेनेला जाऊन मिळाले असते आणि इंग्रज सरकार विरुद्ध बंडाचा प्रचंड उठाव हिंदुस्थानात झाला असता. क्रांतीचे प्रारंभ लहान असतात. पण पुढे तिचा लोंढा वाढत जातो, हे ज्याना माहीत आहे त्याना वासुदेव बळवंतांनी काय इतिहास घडवला असता, ते सांगावयास नको ! पण नेहमीप्रमाणे फितुरीने आपले पंख या धाडसी आणि शूर क्रांतिकारकांच्या हालचालीवर याच वेळी पसरले आणि त्याचे हे रोमहर्षक बंड अयशस्वी होऊन बसले.

* * *

१७ "Wassudeo ..... had advanced Rs. 2000 to the Arabs and Rohillas for the purchase of horses and ... was on his way to Pandharpur to bring the further advance of Rs. 3000."

("वासुदेव बळवंतानी अरब आणि रोहिल्याना २००० रुपये घोडे विकत घेण्यासाठी विसार म्हणून दिले होते आणि उरलेल्या तीन सहस्त्र रुपयाची व्यवस्था करण्यासाठीच ते पंढरपुरला चालले होते.") -'बॉंबे गॅझेट,' दि. २८ जुलै १८७९

## प्रकरण १६ वे

# अटकेचा रोमांचकारी वृत्तांत

गाणगापूर येथील अज्ञातवासात वासुदेव बळवंताच्या योजनांविषयीच्या हालचाली चालल्या होत्या, त्यावेळी त्यांच्यासंबंधी उलट सुलट बातम्या देशाच्या निरनिराळ्या भागातून येत होत्या. वासुदेव बळवंतांचा या छाप्याशी संबंध नव्हता. पण त्यावेळी सरकारास हें माहीत नव्हते. त्यामुळे सर्वच छापे वासुदेव बळवंतांनीच संघटीत केलेल्यापैकी आहेत असे ते धरून चालले. याविषयी 'टाइम्स ऑफ इंडिया' पत्राने म्हटले :

"Wasudeo Bulwant has endeavoured to extend the area of disturbances to Nasik and to the difficult country of Satpura hills. Dacoits have been seen in Ahmednagar and Akola Districts and that would indicate that part of his longer scheme of disturbances is in the course of realisation. The raid on Palaspe near Panwell also shows that he is capable of going far afield for plunder and mischief......He is evidently a man capable of giving much trouble." [1]

("वासुदेव बळवंतांनी उठावेचे क्षेत्र नाशिकपर्यंत आणि सातपुडा पर्वताच्या अवघड प्रदेशापर्यंत वाढविण्याचा प्रयत्न चालविलेला आहे. अहमदनगर आणि अकोला जिल्ह्यातही दरोडेखोर दिसलेले आहेत. अस्वस्थतेच्या प्रकारांच्या त्यांच्या अधिक विशाल योजनेचा काही भाग प्रत्यक्षात येण्याच्या मार्गावर आहे, असे ही गोष्ट दाखविते. पनवेलजवळ पळस्प्याला पडलेला दरोडा वासुदेव बळवंत लूट मारण्यासाठी आणि अत्याचारासाठी वाटेल त्या मर्यादेपर्यंत जाऊ शकणारा आहे, असेही दाखवितो... फारच त्रास देण्याचे सामर्थ्य असलेला तो माणूस आहे, हे उघड आहे.")

---

१ 'टाइम्स ऑफ इंडिया,' दि. २४ मे १८७९

लुटारूंनी सरकारकडे आपली बातमी देणाऱ्यांना धाकात ठेवले होते. खंडाळा येथून एका वाचकाने एका इंग्रजी पत्राला कळविले की, आमच्याविरुद्ध जो कोणी सरकारला माहिती देईल तो दुसऱ्या दिवशी सकाळी मरून पडलेला आढळेल, असे दरोडेखोरांनी घोषित केले आहे.

लोकांना वासुदेव बळवंतांच्या स्वारीची ठिकठिकाणी भीती वाटत होती. ८ जूनला लोणावळ्यास अशी कंडी उठली की रात्री ९ वाजता लुटारूंनी खंडाळ्यास छापा घातला आहे आणि ते लवकरच लोणावळ्यास येणार आहेत. तेव्हा लागलीच पोलिसांच्या बिगुलांचे आवाज मोठ्याने येऊ लागले. पंधरा मिनिटातच जी. आय. पी. रेल्वेचे स्वयंसेवक कवायतीच्या पटांगणात जमले. त्या सर्वांना प्रत्येकी २० गोळ्यांची काडतुसे देण्यात आली. त्यांचा प्रमुख रिडेक हाही लागलीच तेथे धावला. गावभर लोकांनी घराघरातील दिवे मालवून टाकले आणि दरवाजे धडाधड लावून घेतले. युरोपियन अधिकाऱ्यांच्या नोकरांनी त्यांच्या बायकामुलांना एकटेच सोडले आणि ते आपापल्या घरी पळाले. रात्री ११ वाजता मग दरोडेखोर आल्याची अफवा खोटी होती असे सर्वांना कळून आले.

लंडनमध्ये ३ जून १८७९ ला लंडनच्या 'टाइम्स' पत्राने वासुदेव बळवंतांच्या बंडाबरचा आपला सर्वात मोठा अग्रलेख लिहिला. त्यात दख्खनमधल्या सावकार-विरोधी दंग्याचा उल्लेख करून आपली सारापद्धती सुधारण्याचा विचार सरकारने करावा म्हणजे प्रस्तुतचे मुख्यतः शेतकऱ्यांचे असलेले बंड थंडावेल असे सांगून त्या पत्राने म्हटले :

"No precedent can be found for the active disaffection of the peasantry accompanied by deeds of violence, to which the peninsula of Hindustan has been a stranger since the dark days of 1857." [२]

("१८५७ च्या काळ्याकुट्ट दिवसांपासून हिंदुस्थानच्या द्वीपकल्पास माहीत नव्हत्या अशा अत्याचारांच्या घटना ज्यात अनुपमाने घडल्या, अशा आताच्या शेतकऱ्यांच्या सक्रिय विद्रोहाला मागील काळात काही उदाहरण मिळू शकत नाही.") ९ जूनला त्या पत्राने म्हटले :

"Wassudeo Balwant Phadke, the organising spirit of the movement is still at large."

("या आंदोलनाचे संघटक प्रणेते वासुदेव बळवंत फडके हे अजून मोकळेच आहेत.")

सरकारच्या धावपळीची टिंगल करणारी पत्रे वासुदेव बळवंतांच्या पुण्यातील आणि बाहेरील अनुयायांकडून सर्व अधिकाऱ्यांना धाडली जाण्यास याचवेळी सुरवात झाली. त्या पत्रात लिहिले होते, "सध्या जरी या दुसऱ्या शिवाजीचे (वासुदेव

२ 'दि. टाइम्स,' लंडन, दि. ३ जून १८७९

बळवंतांचे) अनुयायी निद्रिस्त असले, तरी ते काही मेलेले नाहीत. पावसाळा संपताच देशात बंड करण्याचा आपला उद्योग ते अधिक जोराने सुरू केल्यावाचून रहाणार नाहीत."

लोक वासुदेव बळवंतांची शिवाजीशी तुलना करीत होते. त्यात थोडेसे तथ्य होते. महाराष्ट्रात बंड करण्याची स्फूर्ती वासुदेव बळवंतांनी निःसंशय शिवचरित्रापासून घेतली होती. स्वधर्मावर त्यांची जाज्वल्य निष्ठा होती आणि कालमानाप्रमाणे शिवाजीच्या हिंदू राज्याच्या ठिकाणी हिंदी प्रजासत्ताक (इंडियन रिपब्लिक) स्थापन करण्याचे ध्येय त्यांनी स्वीकारले होते, तरी त्यांची बंडाची सर्व पद्धत त्यांनी शिवाजीच्याच पद्धतीवर ठेवली होती. लोक प्रथम शिवाजीला बंडखोर आणि लुटारूच म्हणत असत. शिवाजीच्या महाराष्ट्राचेच ते वंशज होते. हे त्यांची बंडांची अयशस्वी झालेली ही योजना आणि युद्धपद्धती पहाता लक्षात येते.

वासुदेव बळवंतांनी आपल्या उत्थानासाठी निवडलेली वेळही त्यांना अधिक उठाव देणारी होती. त्या वेळी इंग्लंडची स्थिती सगळीकडे विचित्र झाली होती.

इस्त्रदुल्लाचा प्रतिशोध घेणे इंग्लंडला अशक्य झाले होते. आणि त्या दुर्घटनेची आठवण लोकांच्या मनात जागी होती. तुर्कस्थानात बर्लीनच्या तहामुळे युरोपातील युद्ध टळणे शक्य होणार नाही असे वाटत होते. ईजिप्तमध्येही भयानक संकटे उभी राहिली होती. पूर्वेकडे ब्रह्मदेशाचा राजा ब्रिटिश सरकारवर मात करण्याच्या खटपटी करीत होता. प्रत्यक्ष हिंदुस्थानात राजमहेंद्री येथे रंपा लोकांच्या उठावणीत सरकारी आगनावाच त्या लोकांनी पकडल्या होत्या आणि सरकारविरुद्धची त्यांची उठावणी जोरात सुरू होती. मुंबईच्या राज्यपालांनी तसेच मत व्यक्त करताना म्हटले आहे :

"The causes (of the revolt) were hard to fathom. But one of them, may have been the protracted excitement in reference first to the Russo-Turkish War, and then to the military operations in Afghanistan."[1]

("या उठावणीची कारणे शोधून काढणे कठीण होते. पण त्यापैकी एक कारण रूसो-तुर्की युद्धामुळे आणि नंतर अफगाणिस्थानातील सैनिकी चढायांमुळे उडालेली प्रदीर्घ खळबळ हे असावे.")

अशा स्थितीत वासुदेव बळवंतांना त्वरेने पकडले पाहिजे, असा सरकारचा निश्चय झाला. त्याचा पहिला परिणाम म्हणजे वासुदेव बळवंतांच्या शोधासाठी त्यांच्या नातलगांच्या मागे सरकारचा ससेमिरा सुरू झाला. वासुदेव बळवंतांचे वृद्ध वडील शिरढोण येथे होते. त्यांच्या घराच्या वारंवार झडत्या झाल्या. झडत्यानंतर

[1] सर रिचर्ड टेंपल : "दि स्टोरी ऑफ माय लाइफ," पृ. २९

दीर्घकालीन प्रश्नोत्तरांच्या त्यांच्या वडिलांना फार त्रास झाला. त्यातून निष्पन्न काहीच झाले नाही हे निराळे. कारण वासुदेव बळवंतांनी आपला घराशी कुटुंबाशी संबंध केव्हाच तोडून टाकला होता. आपल्या पत्नीला भेटण्यासाठी तरी वासुदेव बळवंत जात असले पाहिजेत, असा तर्क सरकारी अधिकाऱ्यांनी केला. बाई जुन्नरला दामले आडनावाच्या आपल्या मामांकडे होत्या. त्यांच्यावर बरेच दिवस गुप्त पाळत ठेवून त्यांच्याकडे गुप्त अनुचरांच्या फेऱ्या सुरू झाल्या. त्यांना भेटण्यासाठी वासुदेव बळवंत गेले असले तर फारच चलाखीने गेले असणार. त्यामुळे तेथेही त्यांचा ठाव-ठिकाणा सरकारास लागला नाही. बाईंवर गुप्त अनुचरांची पाळत होती ही माहिती त्यांच्या आठवणीवरून आणि वृत्तपत्रातील तर्कावरून या पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तीत मी प्रथम लिहिली होती. पण आता या माहितीला अधिकृत आधार मिळालेला आहे. स्वतः राज्यपाल सर रिचर्ड टेंपल हे मागे उल्लेखलेल्या एका पत्रात म्हणतात :

"One pledge, however, he (Wassudew Bulwant) has given to the Argus of the law. He has left a young wife in the Deccan! She is, of course, unmolested but secretly watched." [४]

("पण तरीही सहस्त्राक्ष निर्बंधसत्तेजवळ (वासुदेव बळवंतांनी) एक तारण ठेवलेले आहे. त्याने दख्खनमध्ये आपली बायको मागे ठेवलेली आहे. अर्थातच तिला काही त्रास देण्यात आला नाही. परंतु गुप्तपणे तिच्यावर पाळत ठेवण्यात आलेली आहे.") काही दिवसानंतर आणखी दक्षता म्हणून बाईंना कोणत्याही बाहेरच्या माणसासमवेत बोलू न देण्याचीही दक्षता सरकारने घेतली. शेवटी सशस्त्र पहाऱ्यात बाईंची जुन्नरयेथून उचलबांगडी करून पोलिसांनी त्यांना कर्जतमार्गे थेट शिरढोणला आणून ठेविले. ब्रिटिश संगिनीच्या क्रूर वेढ्यात एका राजक्रांतिकारकाची पत्नी म्हणून परकीय सत्ता आपल्याकडे पाहात असताना, कधी घराबाहेरही सहसा न पड-णाऱ्या उच्च कुळातील सरलहृदयी बाईंनी त्या प्रसंगास ज्या धैर्याने तोंड दिले, ते केवळ असामान्य होते. मुंबईस वासुदेव बळवंतांचे दोन भाऊ राहात होते. त्यांनाही पोलिसांनी भेटी दिल्या आणि पोलीस ठाण्यावर हेलपाटे घालावे लागले.

छापे, झडत्या आणि अटकांचे सत्र पुण्यातही सुरू झाले. हरि गणेश किंवा अण्णासाहेब पटवर्धन हे सांगली संस्थानचे दिवाण निवृत्तीनंतर पुण्यात राहात होते. तपकीर गल्लीत त्यांचा वाडा होता. त्यांच्या पुण्यातील जीवनक्रमाविषयी जाणते लोक म्हणतात : "तो अत्यंत वाईट चालीचा होता. अनेकांना त्यांनी कुमार्गाला लावले. स्त्रियाही त्यात असत." [५] त्यांच्या इंग्रजनिष्ठेचा वृत्तांतही 'डेक्कन स्टार'ने प्रसिद्ध केला. सत्तावनच्या स्वातंत्र्ययुद्धानंतर नानासाहेब पेशवे यांना ग्वाल्हेरचे शिंदे

४ सर रिचर्ड टेंपल यांचे राजप्रतिनिधी लॉर्ड लिटन यांना पत्र (गोपनीय), दि. ३ जुलै १८७९
५ त्र्य. र देवगिरीकर - "वासुकाका जोशी व त्यांचा काळ," पृ ७४

सरकारने पकडून तुरुंगात टाकल्याची बातमी आली, त्यावेळेला आनंद प्रदर्शित करण्यासाठी थेट नेक नामदार गव्हर्नरसाहेबासच या गृहस्थानी मेवामिठाई पाठवून दिली.

अशा या अण्णासाहेब पटवर्धनांचा वासुदेव बळवंतांशी पत्रव्यवहार असून त्यांच्याकडे वासुदेव बळवंतांची लूट ठेवलेली आहे आणि अनुज्ञा नसलेली शस्त्रेही आहेत अशी माहिती मेजर डॅनिअलला मिळाली. तेव्हा मुंबईहून नुकतेच पुण्यास बदलून आलेले मुख्य ठाण्याचे फोजदार रा. ब. हरिनारायण आणि कित्येक पोलीस शिपाई अशा तीस एक लोकांना घेऊन मेमध्ये शेवटच्या शनिवारी ३१ मेला त्याने त्यांच्या वाड्याला वेढा दिला. पटवर्धनांना त्याने खाली वाड्याबाहेर बोलाविले. आपणास मिळालेली माहिती त्यांना सांगून आम्हाला वाड्याची झडती घ्यावयाची आहे, असे त्यांना त्याने सांगितले. त्याला नकार देणे पटवर्धनांना शक्यच नव्हते. डॅनिअलने मग सबंध वाड्याची बराच वेळ कसून झडती घेतली. परंतु तेथे सापडलेली शस्त्रे दंडाधिकाऱ्याची अनुज्ञा असलेली होती असे आढळले. तथापि सांकेतिक भाषेत लिहिलेली आहेत असे वाटावे, अशी काही पत्रे पोलिसांना तेथे मिळाली. ती आणि इतर काही पत्रव्यवहार पटवर्धनांकडून 'फेरिस्त' लिहून घेऊन तो डॅनिअलने आपल्या समवेत नेला. या झडतीमुळे पुण्यात फारच खळबळ उडाली. परंतु वरील पत्रव्यवहाराची पोलिसांनी सूक्ष्म तपासणी केली, तेव्हा त्यांना सांगली संस्थानासंबंधी त्यात काही वृत्तांत आढळला. पोलिसांनी तो पत्रव्यवहार नंतर पटवर्धनांकडे परत केला.

परंतु या झडतीच्या निष्फळतेनंतरही सरकारचा पाठपुरावा करणाऱ्या पत्रांनी उलट लोकांना असा उपदेश केला की, पोलिसांना मिळणारी माहिती विश्वसनीय वाटली म्हणूनच त्यांनी हा छापा घातला. निरपराध लोकांनी अशी झडती देऊन, आपण अपराधी नाही हे सिद्ध करण्यास आनंदाने पुढे यावे. पुण्यात सैनिकी निर्बंध येण्याचे टाळण्याचा मार्ग हाच आहे की, देशद्रोह्यांना शोधून काढण्यास त्यांनी सहाय्य घ्यावे. खोटी माहिती देऊन सरकारला दुसऱ्याच मार्गावर लोटणाऱ्यांना योग्य ती शिक्षा होईलच होईल.

यानंतरही दुसऱ्या प्रतिष्ठित गृहस्थांवर पोलिसांची दृष्टी वळलीच. भिकारदास मारुतीच्या बागेच्या रस्त्यावर रामभाऊ नातू हे रहात असत. वासुदेव बळवंतांच्या निवासस्थानाजवळच्या भागात त्यांचा वाडा होता. त्यांचा वाडा भव्य होता. आणि त्या वाड्याचे आवार विस्तीर्ण होते. वाड्यापासून लांब टोकावर त्यांचे एक मोडकळीस आलेले पडघर होते. ते जवळजवळ ओसाड होते. त्यांच्या मुलाचा वासुदेव बळवंतांशी पत्रव्यवहार असावा अशी माहिती मिळताच बुधवार २५ मे १८७९ ला नातूंच्या घराचीच मेजर डॅनिअलने कसून झडती घेतली. पण या

झडतीतही पोलिसांना वाड्यात काही आक्षेपार्ह मिळाले नाही. पुढे त्यांनी घराचे आवार आणि पडघर धुंडाळले, तेव्हा मात्र त्या पडघरात त्यांना एक न उघडलेले पत्राचे बंद पाकीट मिळाले. त्यावर रामभाऊ भातूंच्या मुलाचा पत्ता होता. ते पत्रच मोठे घबाड मिळाले. म्हणून पोलीस घेऊन गेले.

या झडतीमुळे पुण्यात मोठी खळबळ उडाली. पण पुढे एक आठवडा झाला, तेव्हा ही झडतीही निष्फळ होती, असे समजून झडतीवर 'ज्ञानप्रकाश' ने सडकून टीका केली. ते पत्र म्हणाले:

"Neither the son nor his father has been taken into custody. It is no doubt true that the house which the respectable gentleman owns is situated in the same quarter of the town in which the miscreant Wasudeo Balwant Phadke had rented lodgings......But if the house of every respectable gentleman residing in that vicinity is to be searched, no one can deem himself safe and secure from these unwelcome police visits." [1]

("मुलाला किंवा त्याच्या वडिलांना कोणालाच या प्रकरणी अटक करण्यात आलेली नाही. हे निःसंशय खरे आहे की, या आदरणीय सद्गृहस्थाचे घर त्या दुष्ट वासुदेव बळवंतांनी भाड्याने घेतलेले होते, त्या भागातच आहे. परंतु जर त्या परिसरातील प्रत्येक सद्गृहस्थाच्या घराची झडती घेण्याचे ठरले तर पोलिसांच्या या अप्रिय भेटीपासून आपल्याला धोका नाही आणि आपण सुरक्षित आहोत, असे कोणीही मानू शकणार नाही.") अधिकाऱ्यांनी सारासार विचार करून मगच अशा झडतींचे अधिपत्र (वॉरंट) मिळविण्यासाठी आवेदन करावे, असे म्हणून 'ज्ञानप्रकाश'ने आशा व्यक्त केली की, अधिकाऱ्यांनी केवळ निनावी पत्रानेच दिलेल्या माहितीवर विसंबून ही कृती केलेली नाही आणि म्हटले की त्यांनी अशी खोटी माहिती देणाऱ्यांना धडा शिकविला पाहिजे. जिल्हाधिकारी मूर यांनीही अशा अरेरावी कृत्यांना पायबंद घालावा.

पुण्यामध्ये शोधाचा हा धुमाकूळ चालला असताना वासुदेव बळवंतांचा खरा ठावठिकाणा कोणालाच माहीत नव्हता. पण ते अमक्या ठिकाणी आहेत, तमक्या ठिकाणी जाणार आहेत, अशा बातम्यांच्या वावड्या मात्र वातावरणात उडत होत्या. हिंदुस्थानातील राजकीय निर्वासितांची आश्रयाची ठिकाणे ब्रिटिश सत्ता नसलेल्या राज्यात असावयाची. अशा राज्यात हिंदुस्थानाच्या सीमेवरील नेपाळच्या स्वतंत्र राज्याचा समावेश नेहमी होत आलेला आहे. नानासाहेब पेशव्यांपासून बेचाळीसच्या आंदोलनातील जयप्रकाश नारायण प्रभृती क्रांतिकारकांपर्यंतच्या क्रांतिकारकांचे

१ 'ज्ञानप्रकाश,' दि. २६ जून १८७९

अज्ञातवासातील निवासस्थान म्हणून नेपाळचा उल्लेख आणि उपयोग होत आलेला आहे. नेपाळप्रमाणेच काशी हे धार्मिक यात्रेकरूंचे क्षेत्र. त्यामुळे आज्ञातवासी लोकांना काशी हेही तसेच आश्रयाचे ठिकाण होत आले आहे. पुढे दिल्ली आणि लाहोर कटांतील क्रांतिकारकांनी काशीमध्ये असे दिवस काढलेही. या पार्श्वभूमीवर लोक वासुदेव बळवंतांविषयी म्हणाले: "वासुदेव बळवंत यांनी आता गोसाव्याचे रूप घेतले आहे. ते आता बंडखोरी सोडून यात्रा करण्याकरिता काशीकडे गेले असून तेथून ते पुढे नेपाळकडे जाणार आहेत." सरकारलाही ही गोष्ट शक्य वाटत होती. राज्यपाल सर रिचर्ड टेंपल यांच्या पुढील उद्गारावरून ते दिसते. ते म्हणतात :

".........But if he disguises himself and reaches some distant part of India, there is no knowing."[7]

("पण त्यांनी जर वेषांतर केले आणि हिंदुस्थानच्या एखाद्या लांबच्या ठिकाणी तो पोहचला तर सांगता येत नाही.")

त्यामुळेच वासुदेव बळवंतांच्या अटकेसाठी काढलेल्या राजघोषणा सगळ्या महाराष्ट्रभर खेड्यात आणि नगरात अधिक सातत्याने झळकू लागल्या. जिल्हाधिकारी मूर यांच्या स्वाक्षरीने ती राजघोषणा पुण्यास सैनिक विभागात (लष्करात) आणि गावात बऱ्याच ठिकाणी लागली होती. हे सांगताना 'टाइम्स ऑफ इंडिया'ने म्हटले :

"We have placards all over the Camp and City offering a reward of Rs. 3000 for the apprehension of Wassudeo Bulwant Phadke, but no one has come forward as yet to claim the money."

("पुण्यात सैनिक विभागात आणि गावात सगळीकडे वासुदेव बळवंत फडके यांच्या अटकेसाठी रु. ३००० चे पारितोषिक घोषित करणारी पत्रके लागलेली आहेत. पण अजूनपर्यंत तरी ते पैसे घेण्यास कोणीही पुढे आलेले नाही.") यानंतर वासुदेव बळवंतांची टर उडवून चेष्टेच्या स्वरात हे पत्र म्हणते :

"Shivaji, the Second, must feel rather uncomfortable for the feeling......that he may be betrayed at any moment by one of his intimate friends."[8]

("आपल्या अगदी निकटच्या मित्रांपैकीच एखादा कोणत्याही क्षणी आपला विश्वासघात करील या भीतीमुळे या दुसऱ्या शिवाजीला जरासे कसेसेच वाटत असेल")

७ सर रिचर्ड टेंपल यांचे राजप्रतिनिधी लॉर्ड लिटन यांना पत्र (गोपनीय), दि ३ जुलै १८७९

८ 'टाइम्स ऑफ इंडिया,' दि १ जुलै १८७९

अशा वावड्या उठण्याला वासुदेव बळवंत दूरदूरच्या गावांना भेटी देत होते, हा समज हेही कारण होते. जुलैच्या पहिल्या आठवड्यातच जवलपूर येथे वेशीवरच एक पत्र चिकटविलेले आढळले. त्यात तेथील मोठे सावकार शेट गोकुळदास यांच्याकडे एक सहस्र रुपयांची मागणी करण्यात आली होती. आणि त्यावर वासुदेव बळवंतांची स्वाक्षरी होती. त्यानंतर शेट गोकुळदास यांना स्वतःलाच वासुदेव बळवंतांच्या स्वाक्षरीचे एक पत्र आले. त्यात म्हटले होते की, तुम्ही पाच सहस्र रुपये आणून येथील दुर्गावती किल्ल्यावर ठेवावे. या किल्ल्याला माधव महाल असेही म्हणत असत. त्यात पुढे म्हटले होते की, तुम्ही असे जर केले नाही, तर तुमचे घरच लुटले जाईल. या पत्रामुळे वासुदेव बळवंत सध्या मध्य प्रांतात असून जबलपूरपर्यंत पोचले अशी दाट वदंता तेथे उठली. या पत्रामुळे जबलपूरचे पोलीस निरीक्षक आणि पोलीस उपआयुक्त यांनी वासुदेव बळवंतांना पकडण्यासाठी एका माणसास पाच सहस्र रुपये देऊन वरील ठिकाणी पाठवून दिले. त्या ठिकाणावर टेहळणी ठेवली. पण वासुदेव बळवंत त्याप्रमाणे ते पैसे घेण्यास तिकडे आलेच नाहीत. पुढे 'इंडियन मिरर' या पत्राने बऱ्याच दिवसांनी हा पुढचा वृत्तांत प्रसिद्ध केला. मुंबईमध्ये प्रचलित असलेल्या बातमीप्रमाणे त्याच्या आधी मुंबईच्या एका पूज्य महाराजांचे आशीर्वाद घेण्यासाठी वासुदेव बळवंतांची स्वारी मुंबईत येऊन गेली होती.

बंडाच्या उपशमासाठी गोरे आणि एतद्देशीय असे अठराशे सैनिक सर्व भागात खपत होते. त्यांचे प्रयत्न इतके पराकाष्ठेने चालले होते की, त्यातच काही धंदेवाईक पायाळू लोकही सरकारने नेमले होते. हे लोक केवळ पावलांच्या ठशांवरून अरण्यातही विवक्षित माणसांचा माग काढू शकत असत. पण वासुदेव बळवंतांना पकडण्याच्या सरकारच्या या प्रयत्नात संपूर्ण यश येत नव्हते. या वेळी सरकार त्या संबंधात किती हताश झाले होते, हे सर रिचर्ड टेंपल यांच्या पुढील शब्दांवरून दिसते:

"After many 'swoops' and 'casts' to catch the Brahmin leader we fail to catch him ........But if he lurks in this Presidency, our vigilance will outlast him probably.......... and some fine day a hand may be laid on his shoulders."[१]

("बऱ्याच 'झडपां'नंतर आणि 'सापळ्यां'नंतर या ब्राह्मण पुढाऱ्याला पकडण्यात आम्ही अपेशी ठरलो आहोत. पण जर तो या इलाख्यातच रेंगाळत असेल, तर आमची दक्षतापूर्ण खटपट त्याला पुरून उरेल. आणि एका सुदिनी त्याच्या खांद्यावर आमच्या पकडीचा हात पडेल.") बंडाचे पुढारी वासुदेव बळवंत पकडले गेले म्हणजे बंड दडपणे सोपे जाईल, असे सरकारला वाटत होते. झाडाच्या मुळा-

१ सर रिचर्ड टेंपल यांचे राजप्रतिनिधी लॉर्ड लिटन यांना पत्र, (गोपनीय), दि. ३ जुलै १८७९

वरच घाव घातला म्हणजे फांद्या आपोआपच कोसळून पडतील, असा सरकारचा विचार होता. सुदैवाने वासुदेव बळवंतांचा थोडासा विश्वासनीय सुगावा याच वेळी सरकारास लागला. आणि त्यांना पकडण्यासाठी मेजर डॅनिअल जुलैच्या मध्यास फौज घेऊन दक्षिणेकडे निघाला.

त्याला हा सुगावा कसा लागला यासंबंधी निरनिराळी वृत्ते आहेत. वासुदेव बळवंतांनी आपल्या एका स्नेह्याला लिहिलेले पत्र सरकारी हस्तकांनी मध्येच अडविले आणि ते मेजर डॅनिअलकडे धाडण्यात आले; त्यावरून त्यांचा ताजा पत्ता त्याला मिळाला असे म्हटले जात होते तर वासुदेव बळवंत हैदराबाद येथेच आहेत अशा समजुतीने तो हैदराबाद येथे गेला. परंतु त्यापूर्वीच वासुदेव बळवंत हैदराबाद सोडून विजापूरकडे निघून गेले, असेही काही जण म्हणत होते.

खरे असे घडले होते की, पुण्यामध्येच बुधवारपेठेतील एका देवळात पुष्कळ बायका पुराण ऐकण्यास जात असत. त्यांच्यातील एक बाई नुकतीच गाणगापुरास गेली असता वासुदेव बळवंत तिकडे आहेत असे तिला कळले होते. तेव्हा तिने पुराणास आलेल्या दुसऱ्या एका बाईला म्हटले, "सरकार मारे वासुदेव बळवंताचा इकडे तपास करीत आहे. पण वासुदेव बळवंत आहे तिकडे गाणगापुरास. दोनच दिवसापूर्वी मी तिकडे जाऊन आले, तेव्हा त्याला पाहिले." त्या बायकातच पुण्याच्या एका पोलीस जमादाराची बायको होती. वासुदेव बळवंतांना पकडून देणाऱ्यास सरकारने मोठे बक्षीस लावले आहे हे तिने आपल्या नवऱ्याकडून ऐकले होते. ती घाईघाईने घरी परतली आणि आपल्या नवऱ्यास तिने ते वृत्त सांगितले. ते ऐकताच गरीब देशाभिमानी आणि श्रीमंत फितुरी यातील फरक न कळणारे स्वार्थी जीव दुसरे काय करणार? त्याने ते वृत्त पुण्याचे पोलीस निरीक्षक हरि नारायण यांना सांगितले आणि त्यांनी ते मेजर डॅनिअल यास कळविले.

वासुदेव बळवंतांना पकडण्यासाठी सरकारी यंत्रणा विजेच्या गतीने मग सुरू झाली. मेजर डॅनिअल लागलीच पुण्याचे सैनिकी लेखानियंत्रक (कंट्रोलर ऑफ मिलिटिरी अकाऊंटस) कर्नल यंग यांना भेटला आणि वासुदेव बळवंतांना ओळखणाऱ्या एका सैनिकाला आणि एका शिपायाला त्याने आपल्याकडे बोलावून घेतले. त्यांची नावे शेख सुलेमान आणि भिवा अशी होती. शेख सुलेमान हा लेफ्टनंट राज्यपालांचा शरीरसंरक्षक (ए. डी. सी.) शेख कासम याचा भाऊ होता. त्यांना वासुदेव बळवंतांना ओळखण्यासाठी म्हणून आपल्या समवेत नेण्यासाठी त्याने कर्नल यंग यांची अनुज्ञा मिळविली. आणि त्यांच्या आदेशाप्रमाणे ११ जुलै १८७९ ला रात्री गुदूर स्थानकावर जाण्यासाठी ते निघाले आणि तेथे पोहचल्यावर दुसऱ्या दिवशी तेथून निघून सकाळीच गाणगापुरला पोचले.

गाणगापुरला वासुदेव बळवंतांचा कोणालाही न कळता सुगावा कसा काढावा

हा त्यांच्यापुढे प्रश्नच होता. कारण सरकारी अनुचाऱ्यांच्या टेहळणीचा थोडा जरी सुगावा लागला, तरी वासुदेव बळवंत निसटून जात. शेवटी त्यांनी एक युक्ती योजली. गाणगापुरच्या नदीच्या तीरावर सायंकाळी ब्राह्मण लोक संध्या करण्यासाठी येत असत. वासुदेव बळवंत धार्मिक वृत्तीचे असल्यामुळे तसेच संध्याकाळी तेथे येतील अशा निश्चितीने ते दोघे सायंकाळी नदीकाठावर लक्ष ठेवून बसले.

थोड्याच वेळात वासुदेव बळवंत आपल्या सहकाऱ्यांजवळ बोलत संथ पावले टाकीत तिकडे येताना त्यांना दिसले. त्यांचे पुण्याचे रूप बदललेले होते. त्यांनी आता दाढी जटा वाढविल्या होत्या. त्या दोघानी मग ते ठिकाण सोडले आणि ते गुदूरला गेले.

तेथून रातोरात त्यांनी मेजर डॅनिअलला तारेनेच ते वृत्त कळविले आणि १३ जुलैला ते परत गाणगापुरला आले.

वासुदेव बळवंत त्यांना तेथे दिसले नाहीत. त्यांनी तेथे आणखी शोध घेतला आणि मेजर डॅनिअलला तारेने आपला निष्कर्ष कळविला की रंगोपंत मोरेश्वर महाजन नावाच्या तेथील तरुणाला तातडीच अटक केली तर सर्व काम होईल.

गाणगापुरच्या दत्तमंदिराभोवती अपरिचित लोक दिसताच देवळाचे पुजारी रामभाऊ सेवेकरी याना काहीतरी चमत्कारिक वाटले. ते वासुदेव बळवंतांचे हितचिंतक बनले होते. तेव्हा त्यांनी महाजन भेटताच त्याला सांगितले की, देवळाभोवती पोलिसांची टेहेळणी दिसते. त्याने हे सांगताच खरी वस्तुस्थिती काय आहे ते पहाण्यासाठी महाजन गाणगापुरच्या धावडीवर गेला. तेथे शेख सुलेमान त्याला भेटला. तो दिसताच शेख सुलेमानला त्याने विचारले, " वासुदेव बळवंताच्या नावाचे जाहीरनामे लागले आहेत. तो धरला गेला काय!" तेव्हा सुलेमानने उत्तर दिले, "आम्ही शिकारीसाठी आलो आहो." शेख सुलेमानने धूर्तपणे त्याच्याकडून काही माहिती मिळविली. पण महाजन काही कमी धूर्त नव्हता. त्यानेही त्याच्याकडून त्याच्या येण्याच्या प्रयोजनाची माहिती कौशल्याने काढून घेतली. अनूरहून वासुदेव बळवंत गाणगापुरात परत येताच सुलेमान त्यांच्याच पाळतीवर असून त्यांना अटक करण्यासाठी सरकार पावले टाकत असावे ही बातमी सांगून महाजनने त्यांना सावध केले. आणि प्रथम त्यांना संगम येथे हालविले.

मेजर डॅनिअलने फार हुशारीने पावले टाकली. अनोळखी मनुष्य भोवती दिसला, तर वासुदेव बळवंतांसारखा जन्मजात क्रांतिकारक तो सरकारी अनुचर भासावा हे ओळखून पुन्हा एकदा आपल्या हातातून निसटेल हे ओळखून एका बाईलाच त्याने त्यांच्या मार्गावर धाडून दिले. आपण तेथे जाईपर्यंत तिने त्यांच्या मार्गावर रहावे, असे सांगून तिला त्याने पुढे पाठविले. वासुदेव बळवंतांनी आता-

पर्यंत केले त्याप्रमाणे आपणास सहज गुंगारा देणे त्यांना साधू नये असा त्याचा त्यात हेतू होता.

नंतर तो मुंबईचे राज्यपाल सर रिचर्ड टेंपल यांना भेटला आणि झटपट पावले टाकली तर आपली शिकार हस्तगत होईल अशी त्याने त्यांची निश्चिती पटविली. टेंपलसाहेब वासुदेव बळवंतांच्या उठाठेवीने अक्षरशः टेकीला आले होते. त्यामुळे त्यांनी सर रिचर्ड मीड यांना सांकेतिक शब्दात तातडीची तार पाठवून कळविले की, मेजर डॅनिअल हे हैदराबादला वासुदेव बळवंतांना पकडण्याच्या कामगिरीवर येत आहेत. तेव्हा त्यांना शक्य ते सहाय्य तत्परतेने द्या. त्यांनी हा निरोप सांकेतिक भाषेत पाठविला. कारण नाहीतर तो मध्येच फुटून वासुदेव बळवंतांनाचा कळण्याचा संभव होता. वासुदेव बळवंताविषयी त्यावेळी सार्वत्रिक सहानुभूती असल्यामुळे त्यांना अशी माहिती मिळत असे. ते त्यामुळे त्यांनी टाळले.

मेजर डॅनिअल बुधवारी १६ जुलै १८७९ ला निघून गुरुवारी १७ जुलैला हैदराबादला पोहोचला. तेथे पोचताच तो तडक तेथील ब्रिटिश राजनिवासाच्या बंगल्यावर (रेसिडेन्सीमध्ये) गेला. आणि सर रिचर्ड मीडशी त्यांचे बोलणे झाले. त्यांनी लागलीच त्याच्या येण्याचे उद्दिष्ट निजामाला जाऊन सांगितले. हैदराबादचा निजाम हा ब्रिटिश सरकारचा "सर्वात विश्वासू मित्र" होता. त्याने मेजर डॅनिअलला सहाय्य करण्याची कामगिरी आपला मुख्य प्रधान सर सालर जंग यांच्यावर त्वरेने सोपविली. सर सालर जंग यांनी शुक्रवारी सकाळीच हैदराबादचा पोलीस आयुक्त सय्यद अबदुल हक यास जातीने मेजर डॅनिअलसमवेत जाण्याची आज्ञा सोडली. स्वतः निजाम आणि त्याचे अधिकारी यांनी वासुदेव बळवंतांना पकडण्याच्या कामात तनमनधनाने भाग घेतला. अबदुल हकने चारी कोपऱ्यातून सर्व सहाय्य देण्याची व्यवस्था केली. वऱ्हाडचा युरोपियन पोलीस निरीक्षक स्टीफनसन याने त्याला त्या कामात अतिशय मोलाचे सहाय्य केले. हैदराबादचा पोलीस निरीक्षक सय्यद अबदुल नूर याने काही पोलीस हवालदार आपल्या समवेत घेतले आणि हे सर्वजण १९ जुलैला आगगाडीने गुलबर्ग्याकडे निघाले. अटकेचे पाश वासुदेव बळवंतांभोवती आवळले जाऊ लागले.

मेजर डॅनिअल आपल्या पाठलागावर आहे असे समजल्यावर नेहमीप्रमाणे वासुदेव बळवंतांनी गाणगापूर सोडले. आपला मार्ग बदलला आणि पंढरपूरच्या बाजूला ते वेगाने वळले. निवडक महाराष्ट्रीय तरुण आपल्यासमवेत घेऊन त्यांच्या सशस्त्र परिवारास ते पुढे चालू लागले. निजाम राज्यातील गावोगावच्या उच्च पदावरील अधिकाऱ्यांना आपल्या मुख्य प्रधानाच्या सहाय्यासाठी सिद्ध व्हावेच लागले. हे सर्व अधिकारी शनिवारी १९ जुलैला गुलबर्ग्याला पोहोचल्यावर मेजर डॅनिअलने त्यांच्यापैकी दोन पोलीस निरीक्षक आणि चार बंदुकधारी शिपाई

निवडून वासुदेव बळवंतांच्या दोन्ही संभाव्य वाटा रोखण्यासाठी एक आपल्या स्वत:च्या हाताखाली आणि दुसरी अबदुल हक याच्या नेतृत्वाखाली अशा या लोकांच्या दोन तुकड्या केल्या. आपण स्वत: या हस्तकांसह गाणगापुरास जावयाचे असे ठरवून तो गुद्दूर स्थानकाकडे निघाला. गुद्दूरहून तो गाणगापुरास जाणार होता. गुद्दूर हे गाणगापुरपासून २० क्रोशार्धांवर होते. इतरांना अबदुल हकच्या हाताखाली पायीच चालत जाऊन दुसऱ्या वाटेने गाणगापुराला जावयास त्याने सांगितले. हे अंतर चाळीस क्रोशार्धांचे होते. दोन्हीही तुकड्यांनी रविवारी २० जुलैला सकाळी एकमेकांना गाणगापुरास भेटावयाचे होते.

हैदराबादचे राजस्व आयुक्त (रेव्हेन्यू कमिशनर) पोलीस महानिरीक्षक (आय्. जी. पी.) पोलीस अधीक्षक (पो. सुपरिंटेंडेंट) आणि इतर क्षेत्रीय अधिकारी (डिव्हिजनल ऑफिसर्स) यांनी, पो. आयुक्त अबदुल हक हा गुलबर्ग्यास उतरला, तेव्हा त्याला आणि त्याच्या तुकडीला मानवंदना दिली. त्याच्या तुकडीत दोनशे घोडेस्वार आणि दोनशे शिपाई होते. आठ जमादार, आठ दफेदार आणि एक अधीक्षक यांच्याकडे त्यांचे नेतृत्व होते. वरील मानवंदना घेऊन ते सर्व गुलबर्ग्याहून गाणगापुरला जाण्यासाठी निघाले.

निजाम राज्याच्या आणि विजापूर जिल्ह्याच्या सरसीमेवरील वासुदेव बळवंतांच्या रोमहर्षक पाठलागाला आता प्रारंभ झाला होता. वासुदेव बळवंत सापडले म्हणावे आणि ते निसटावे, असे बऱ्याच वेळा झाले होते. त्याची पुनरावृत्ती होऊ नये म्हणून आपल्या स्वास्थ्याकडेही लक्ष न देता, डॅनिअल वेळ वाया जाऊ न देता, क्षणाक्षणाला धावत होता. त्याने शनिवारी १९ जुलैला सायंकाळीच गुलबर्गा सोडले. तिकडचा सारा प्रांत वासुदेव बळवंतांच्या पायाखाली रळलेला. तिकडील जनतेच्या मनात त्यांच्याविषयी सहानुभूती होती. आणि आपल्या विषयी असहिष्णुता होती हे त्याला माहीत होते. त्याने जेवण करण्यातही वेळ घालविला नाही. पावसाच्या सरीवर सरी कोसळत होत्या आणि तो रस्ता चिखलाने आणि पाणी साचून, चालण्यास कठीण झाला होता. त्यामुळे त्याने चालण्यास सुटसुटीत पडेल एवढेच सामान आपल्या समवेत घेतले. चार दिवसांपर्यंत पुरतील इतकेच कपडे आणि खाण्याचे पदार्थ त्याने घेतले. त्यात बिस्किटांचे एकदोन पुडे, थोडा चीज आणि भरपूर मद्य (व्हिस्की) ही होती. अन्न शिजविण्यासाठी, चहाकॉफी घेण्यासाठी, विश्रांतीसाठी किंवा झोप काढण्यासाठी, कशाकशासाठीही वाटेत थांबावयाचे नाही असे ठरवून तो वाऱ्यासारखा पुढे निघाला. अशा तऱ्हेने शनिवारी रात्रभर आडवाटेने प्रवास करून रविवारी २० जुलैला सकाळी तो गाणगापुरास पोचला.

त्याच्या या द्रुतगतीचे वर्णन लंडनच्या 'डेली टेलिग्राफ' पत्राने पुढीलप्रमाणे केले आहे:

"Swift as the storm, terrible as fate, relentless as death, the representative of the British authority held to the track."

("वादळाप्रमाणे गतिमान, दैवाप्रमाणे भीषण, आणि मृत्यूप्रमाणे अविरत असा हा ब्रिटिश सत्तेचा प्रतिनिधी आपला मार्ग आक्रमित राहिला!")

मेजर डॅनिअलच्या आधीच अबदुल हक आपल्या सैन्यासह गाणगापुरला येऊन पोचला. त्याच्या घोडयाच्या सैन्याच्या टापा ऐकून आणि आवेशयुक्त चेहरे पाहून गाणगापुरच्या लोकांची घाबरगुंडीच उडाली. अबदुल हकने वासुदेव बळवंतासाठी सगळे गाणगापूर धुंडाळले. शेवटी तेथील देवळाला वेढा दिला आणि आतील सर्व लोकांना अटक केली. या लोकात रंगोपंत मोरेश्वर महाजन हाही होता. सैन्याच्या भयप्रद गराडयात अबदुल हकच्या हुकेलहुण्णी शब्दांचा कडकडाट ऐकताच आणि त्याची करडी दृष्टी पहाताच महाजन आपल्या धैर्यात टिकाव धरू शकला नाही. आणि त्याच्याकडून आपल्याला हवी असलेली माहिती मिळविण्यास अबदुल हकला विशेष प्रयास पडले नाहीत. महाजनला आणि इतरांना निवडक लोकांच्या हातात देऊन तो मग अमूरला रोहिल्यांच्या वस्तीत गेला. इस्माईलखान आणि इतरांना त्याने अकस्मात पकडले, निःशस्त्र करून अटक केली आणि त्या सर्वांनाही गाणगा-पुरास आणले.

रोहिल्यांच्या म्होरक्यांच्या या अटकेचे वृत्त वणव्याप्रमाणे भोवतालच्या खेडयातून पसरले. आणि त्याने चिडून जाऊन मिळतील ती सर्व शस्त्रे घेऊन तेथील संतप्त रोहिल्यांनी अबदुल हक आणि त्यांच्या सैन्यावर हल्ला करून आपल्या पुढाऱ्यांना सोडवून नेण्यासाठी गाणगापुरात एकच गर्दी केली. त्यांच्या या निश्चयी हल्ल्यात अबदुल हक आणि त्याच्या सैन्याची चटणी उडाली असती. पण तेवढयात तेथील–शमसुल उमराच्या सह-राजपालाचा (को-रीजंट) सहाय्यक अधिकारी तेथे आला आणि त्याने आपल्या कळकळीच्या आणि समजुतीच्या बोलण्याने त्या संताप-लेल्या जमावास कसे तरी शांत केले.

वासुदेव दोन वर्षापूर्वी गाणगापुरास होता. पण दोनच दिवसापूर्वी गाणगापुर-हून एनामल्लीमार्गे पंढरपुरास गेला आणि संगम येथे शोध घेतला तर त्याचा पुढील पत्ता लागेल, असेही अबदुल हकला महाजनकडून समजले. तेव्हा पकडलेल्या बंद्यांना आपल्या अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करून तो संगमला जाण्यास निघाला.

१८७९ मध्ये जूनच्या दुसऱ्या आठवडयात पावसाला सुरवात झाली. आणि पुढे दहाबारा दिवस त्याने खूप झोड उठविली. पावसाच्या सतत पडणाऱ्या सरींमुळे गाणगापूर ते पंढरपुरपर्यंतचा रस्ताही पाण्याच्या डबक्यांनी भरून गेला होता. त्या-मुळे नेहमी आरामशीर वहानातून प्रवास करणाऱ्या युरोपियन प्रवाशांची तेथे पायी

प्रवास करताना होणारी स्थिती काय वर्णावी! त्याच अवस्थेत बुटाला चिखलाचे लगदे लागलेले आहेत, चेहऱ्यावर घाम डवरलेला आहे, आणि आपला लठ्ठ देहही घामाघूम झाला आहे, उकाडयाने जीव जातो आहे, अशा स्थितीत मेजर डॅनिअल तिकडे प्रवास करीत होता. परंतु एखाद्या खेळकर युरोपियनांप्रमाणे तो तरीही न वैतागता तोंडाने शीळ वाजवीत चालतच राहिला. गाणगापुरला पोहचताच तेथे न थांबता तो लागलीच पुढे संगमावर गेला.

अबदुल हकने त्याला गाणगापुरहून दोन कोशाधांवरच गाठले. तो भेटताच अबदुल हकने त्याला आपला घोडा दिला आणि स्वतःसाठी आपल्या एका घोडेस्वाराचा घोडा घेऊन त्यावर तो स्वार झाला.मग ते सारे सैन्य गाणगापुरास परत आले. तेथे पकडलेल्या लोकांना डॅनिअलने बरेच प्रश्न विचारले. आपणास हवी ती आणखी माहिती त्याने मिळविली आणि ते सर्वजण वासुदेव बळवंतांच्या पाठलागावर निघाले.

वासुदेव बळवंतांच्या अंगात तेव्हा ताप चढला होता आणि आयुष्यातील सर्वात भीषण प्रसंगाला तोंड देण्याची त्यावेळी त्यांच्यावर पाळी आली होती. गाणगापुरहून संगमापर्यंतची धाव संपवून ते भीमेच्या तीरावर आले. त्यावेळी भीमा नदीला पूर आला होता आणि ती घोंघावत रामपूरकडे कृष्णेशी होणाऱ्या संगमाला मिळण्यासाठी खळाळत वहात होती.

गाणगापुरहून ते संगमावर पोहोचले. तेव्हा बाजूस वहाणारी भीमा पाहून त्यांच्या मनात आले की, आपल्या पाठलागावर असणाऱ्या लोकांना चांगली तुकांडी देण्यास आपला सरळ मार्ग आपण सोडून दिला पाहिजे. भीमा ओलांडून जर आपण पलीकडे गेलो तर पाठलाग करणाऱ्यांना आपणास चांगले चकविता येईल! परंतु भीमा नदीला त्या वेळेला पूर आलेला असल्यामुळे ती ओलांडून जाणे सोपे काम नव्हते. तथापि प्रचंड योजना आखणाऱ्यांचा आत्मविश्वासही प्रचंड असतो. याच आत्मविश्वासाच्या बळावर भीमा नदी ओलांडून जाण्याचे त्यांनी ठरविले.

आपल्याला सुटसुटीतपणे दौड मारता यावी म्हणून नदीच्या अलीकडेच त्यांनी आपल्या सर्व सहकाऱ्यांचा निरोप घेतला. आणि महत्वाचे कागदपत्र आणि स्वसंरक्षास पुरेशी शस्त्रे एका बळकटीत घेऊन फक्त गोपाळ मोरेश्वर साठे या जिवश्च कंठश्च साथीदारासह ते भीमेच्या तीराकडे वळले.

नदीला पलीकडे जावयाला कुठेच उतार नव्हता तेव्हा शून्य मनाने भीमेच्या तीरावर तिच्या प्रवाहाकडे पहात ते उभे राहिले. त्यांनी त्या तीरावर पाहिले. पण नदी पार करण्यासाठी त्यांना एकही नाव दिसली नाही आणि असली तरी त्यांना नदीपलीकडे नेण्यास त्या पुरात कोण सिद्ध झाला असता? काय तो निर्णय त्यांना क्षणा दोन क्षणात घ्यावयाचा होता. ते स्वतः पट्टीचे पोहणारे होते त्यामुळे शेवटी

भीमेत उडी मारून नदी पलीकडे जाण्याचा त्यांनी निश्चय केला. नाही तर सगळाच कारभार आटोपला असता.

पावसात भिजत ते असा निश्चय करीत होते तोच संगमचा वाकलेल्या शरीराचा, पांढऱ्या दाढीचा, लहान बांध्याचा नावाडी मीरासाहेब पावसात भिजत तिकडे येत असलेला त्यांना दिसला. त्याच्या मागोमाग त्याचा सहाय्यक रावजी हाही होता. वासुदेव बळवंतांचा आनंद गगनात मावेना. त्याची एकच का होईना पण एक तरी नाव आता तेथे होती. आपणा दोघास पलीकडे नेण्यास वासुदेव बळवंतांनी त्यांना सांगितले. तेव्हा दुथडी वाहणाऱ्या भीमेकडे पहात तो हसला आणि उत्तरला, " या महापुरात पलीकडे जावयाचं तरी कसं, महाराज !"- वासुदेव बळवंतांनी त्याचे मन वळविण्याचा बराच प्रयत्न केला. पण तरीही तो सिद्ध होईना. तेव्हा मग ते त्याला निश्चयी स्वरात म्हणाले, " तू जर आम्हाला पलीकडे नेणार नसशील तर नदीत उडी टाकून आम्ही पलीकडे जाऊ. मग काय व्हावयाचे ते होवो!"

त्यांचा हा निश्चय नुसती धमकी नव्हती. पराक्रमी पुरुषाच्या अशा स्वरातही जो प्रभाव असतो त्याची छाप मीरासाहेबावरही पडली. " छे छे! महाराज! ते कसं होईल? त्यात धोका आहे. मी तुम्हाला पलीकडे नेतो." असे म्हणून मीरा साहेबाने अलीकडच्या नदीकाठावरच्या आपल्या नावेची दोरी सोडली आणि प्रलयकाळाप्रमाणे वाटणाऱ्या वायुमानात वासुदेव बळवंत आणि गोपाळ मोरेश्वर हे दोन क्रांतिकारक त्या नावेत बसले. सपाटयाच्या पर्जन्यवृष्टीत त्यांची एकाकी नाव भीमा ओलांडू लागली. भीमेच्या विशाल पात्रातून जाताना भावनाप्रधान अंतःकरणाने वासुदेव बळवंत भीमेला उद्देशून उद्गारले असतील : " भीमे! तुझ्या या लेकरांना सुरक्षित पलीकडे ने! ती संकटात आहेत. " पलीकडील तीरावर पोचताच वासुदेव बळवंतांनी मीरासाहेबाच्या हातात चांगले पारितोषिक ठेवले आणि त्याच्या कानात काही सांगितले. मेजर डॅनिअल येण्यापूर्वीच त्याने त्याप्रमाणे केले.

वासुदेव बळवंतांनी गुरुवारी १७ जुलैला भीमा नदी ओलांडली. मेजर डॅनिअल संगम येथे रविवारी २० जुलैला आपल्या सेनेसह पोचले. त्याने मीरासाहेब आणि रावजी नावाच्या त्याच्या सहाय्यकाला लागलीच अटक केली आणि त्यांच्याकडून वासुदेव बळवंतासंबंधीचे वरील वृत्त मिळविले. मीरासाहेब त्याला म्हणाला, " इकडील तीरावरची एकच एक नाव घेऊन महाराज (वासुदेव बळवंत) पलीकडे गेले. " ते ऐकताच नदी ओलांडून जाण्याचे आपले एकच एक साधन वासुदेव बळवंतांनी नाहीसे केले, याचा डॅनिअलला विषाद वाटला. कारण त्यामुळे त्याला नदी पार करण्यास विलंब झाला.[१०]

---

१० "We Should have done so (crossed the Bhima) earlier; but were delayed on the bank of the river in crossing."

(मराठी भाषांतरासाठी पान क्र. २१५ पहा.)

परंतु त्याने धीर सोडला नाही. गावांतील कोळी लोकांना त्याने हाकारून आणले आणि कोळी लोक आपले तराफे पाण्यावर तरंगते ठेवण्यासाठी उपयोगात आणतात अशी बरीच पोकळ सुगडी जमा केली. आपण स्वतः अबदुल, हक, स्टीफनसन आणि काही स्वार ६. आठ जणांच्या सांघाला त्याने ती बांधली. त्याप्रमाणे आठ दमदार घोड्यांना तशीच बांधून पोहण्यास सिद्ध केले. ते आठही जण मग त्या आठ घोड्यांवर स्वार झाले आणि या देशी बनावटीच्या पोहण्यांच्या साधनांसह त्याने आपले घोडे त्या उसळत्या महापुरात घातले. ते सगळे जण चिमुकल्या नावांप्रमाणे त्या पुरात हेलकावे खाऊ लागले. क्षणाक्षणाला पाण्याखाली बुडत, पुराचा मारा खात, क्षणात पाण्यावर येत, काही तासांनंतर दुपारी तीन वाजता ते सर्वजण भीमेच्या पलीकडच्या तीराला लागले. तेथे त्यांनी आपले घोडे विश्रांतीसाठी सोडून दिले, आपले ओले कपडे काढून वाळविले, शस्त्रे साफ केली. घोड्यांना मालीश केले आणि मग विश्रांती न घेताच सायंकाळी ते आपल्या शोधात पुढे निघाले.

तोपर्यंत वासुदेव बळवंत आणि गोपाळ मोरेश्वर यांनी बरेच अंतर तोडले होते. त्याने शुक्रवार १८ जुलैचा सबंध दिवस भीमा नदीजवळच्या शिंदगी गावाच्या ओसाड गावातील एका पडीक घरांतील आतल्या खोलीत घालविला. आणि नंतर ते कलगीला गेले. परंतु तेथे जेवणाची व्यवस्था नीट होणार नाही असे दिसताच तसेच पुढे हुलूरला गेले. त्यापुढचा त्यांचा निवास बंगलूरला झाला. थोडा प्रवास करीत, थोडी विश्रांती घेत ते चालले होते. बंगलूर येथे ते आल्याचे समजताच तेथील गावचा कुलकर्णी त्यांच्या भेटीस आला आणि त्याने त्यांच्या भोजनाची व्यवस्था केली. तेथील देवळात विश्रांती घेऊन वासुदेव बळवंत पुढे निघाले.

नंतरचे त्यांचे गाव नारायणपूर होते. दुसऱ्या दिवशीचे दुपारचे जेवण तेथेच करून वासुदेव बळवंत १९ जुलैला दुपारी शिरसगी येथे आले आणि रात्री तेथेच झोपले. तेथून दुसऱ्या दिवशी शिरसगीच्या पाटील कुळकर्ण्यांशी गप्पा मारून आणि त्यांची विचारपूस करून ते पुढे निघाले आणि सायंकाळी घिघिपुर्दे येथे पोचले. परंतु येथे फार न थांबता ते त्वरेने देवरनावडगीकडे निघाले आणि २० जुलैला सूर्यास्ताला देवरनावडगीला पोचले.

भीमेपार झाल्यावर मेजर डॅनिअलने आपले घोडे दुप्पट वेगाने हाकारले. शिंदगीमधील वरील घराजवळ तो पोचला. मीरसाहेबाने त्याला सांगितले होते की, वासुदेव बळवंतांनी शुक्रवारचा सबंध दिवस त्या घरात काढला होता. त्यामुळे मोठ्या आशेने त्याने त्या पडीक घरात डोकावून पाहिले. पण वासुदेव बळवंत

त्याला तेथे सापडले नाहीत. तेव्हा रविवारी रातोरात त्यांच्या पुढील निवासांचा शोध घेत तो रात्री नारायणपूर येथे आला आणि नंतर शिरसगीला तेथे शेतात दोन मुले खेळत होती. घोडेस्वार पहाताच ती कुतूहलाने त्यांच्याजवळ आली. अशा अशा वर्णनाचे दोघेजण या गावातून पुढे गेले काय? अशी चौकशी त्यांच्याजवळ त्याने करताच त्यांनी 'होय' म्हणून सांगितले. तेव्हा आपण वासुदेव बळवंतांच्या मार्गावरच आहोत अशी निश्चिती होऊन तो पुढे गेला. वाटेत अशाप्रकारे फक्त चौकशी करण्यासाठी त्याने घोडयांचे लगाम खेचले असतील तेवढेच. बाकी तो पुढे जातच राहिला. २० जुलैच्या मध्यरात्री त्याने निजामाचे राज्य सोडले आणि त्याची सीमा ओलांडून त्याने ब्रिटिश हिंदुस्थानात प्रवेश केला.

देवरनावडगी हे गाव विजापूर जिल्ह्यात निजामच्या राज्यापासून सहा मैल आत आहे. तेच स्वतंत्रतेतील वासुदेव बळवंतांचे शेवटचे निवासस्थान ठरले. वासुदेव बळवंतांनी २० जुलै १८७९ च्या निर्णायक रात्री देवरनावडगीत प्रवेश केला, तेव्हा पूर्ण अंधार पडला होता. गेले चार दिवस त्यांनी सतत तीस मैलाचा लांब रस्ता एकसारखा तुडवला होता. त्यामुळे ते आता अतिशय दमले होते. त्यांच्या अंगात आता ताप अधिकच चढला होता. त्याने एक गाव सोडावे आणि मेजर डॅनिअलने त्या गावात शिरावे असे आता कित्येक तास चालले होते! अतिशय दमल्यामुळे देवरनावडगीसच रात्री विश्रांती घेण्याचे त्यांनी ठरविले.

त्या गावात त्यांना झोपण्यासाठी सोयिस्कर अशी दोनच स्थाने होती. एक गावाच्या बाहेर जवळच्याच डोंगरात दगडात खोदलेला बुद्धाचा भव्य विहार होता. त्याचे खांब दगडी आणि भरभक्कम होते आणि त्याचे छतही दगडीच होते. त्या दिवशी द्वितीया होती. पण पावसाळ्या रात्रीमुळे आकाशात बिजेची चंद्रकोर चमकत नव्हती. अंधःकारात वाट चाचपडत विहाराच्या दगडी खांबाकडे पाहात वासुदेव बळवंतांनी त्या विहारात प्रवेश केला. तेव्हा रात्री १० ची वेळ होती. आणि क्षणदृष्ट विजेच्या प्रकाशातच त्या विहारातील आपली वाट त्यांना शोधावी लागली.

वासुदेव बळवंतांनी दिवसभर काही खाल्ले नव्हते. तापाने आणि पित्ताने त्यांचे मस्तक चढून गेले होते.[11] गोपाळ मोरेश्वर हा एकच विश्वासाचा सहकारी त्यांच्याजवळ होता. काही महत्त्वाचे कागदपत्र आणि थोडे पैसे बांधून घेतलेली एक वळकटी त्यांच्याजवळ होती. बंडाच्या काळात त्यांनी नेहमी जवळ बाळगलेली आपली आवडती तलवार त्यांच्याजवळ होती. तशीच एक तलवार गोपाळ मोरेश्वर यांच्याजवळ होती. या दोघांजवळ होत्या त्या तलवारी अत्यंत चांगल्या प्रतीच्या होत्या.[12] वासुदेव बळवंतांच्या कमरेला एक पिस्तुल होते. आपल्या मार्गावर असलेल्या

११ "He was slightly feverish on the night of his arrest."
(वासुदेव बळवंतांच्या अभियोगातील पुण्याच्या सत्र न्यायालयातील मेजर डॅनिअलची साक्ष; दि. ३ नोव्हेंबर १८७९ )

१२ "The Swords that both of them possessed were of the very best kind"
'पूना ऑब्झर्वर', दि. २४ जुलै १८७९

सरकारी अधिकाऱ्यांशी दोन हात करण्याचा प्रसंग केव्हा येईल ते सांगता येणार नाही, या विचाराने समोरासमोर होणाऱ्या द्वंद्वयुद्धात प्रतिपक्षाला मारावे लागेल, तेव्हा उपयोगी पडावे म्हणून त्यांनी एक सुटसुटीत, लहान पण तीक्ष्ण दुधारी पात्याचे शस्त्र जवळ बाळगले होते. काळविटाच्या शिंगाची मूठ असलेले, दोन्ही बाजूने चालवता येणारे, हातात सहज मावणारे, 'मारा' नावाचे हेच ते शस्त्र होय. अशा सशस्त्र स्थितीत गोपाळ मोरेश्वर साठे यांच्यासह विहाराच्या मुख्य दालनात आपल्या कागदपत्रांच्या बळकटीची उशी करून निद्राधीन होण्यासाठी वासुदेव बळवंतांनी भुईवर अंग टाकले.

निद्राधीन होण्यापूर्वी कोणासही आपली ओळख सहज पटू नये म्हणून त्यांनी दक्षता घेतली होती. त्यांनी सुरवार घातली होती, डोक्यास पांढरा फेटा बांधला होता आणि त्याचे सोगे कानावरून घेऊन त्यांनी आपले कान झाकून टाकले होते. फेट्याचाच लपेटा त्यांनी आपल्या विपुल दाढीवरून लपेटून घेतला होता. त्या वेषात पहाणाऱ्याला त्यांची थोडीशीच मुद्रा दिसू शकत होती. त्यामुळे इतर निद्रिस्त प्रवाशात गोपाळ मोरेश्वरसह ते झोपले, तेव्हा ते एखाद्या उत्तर हिंदुस्थानी मुसलमान प्रवाशासारखे दिसत होते. त्यामुळे तेच वासुदेव बळवंत हे अनोळखीच काय, पण ओळखीच्या माणसालाही चटकन सांगता येणारे नव्हते.

घिंघिसुर्दे येथे मेजर डॅनिअल पोचला, तेव्हा त्या रात्री वासुदेव बळवंत देवरनावडगीसच निश्चित तळ ठोकतील असा आडाखा त्याने बांधला. नारायणपूर सोडल्यापासून चार तासात तो देवरनावडगीस आला. त्यानेही सतत बेचाळीस तास प्रवास केला होता. त्या गावाच्या चावडीवर त्याने शोध घेतला, तेव्हा कोणी तरी दोन प्रवासी विहाराच्या बाजूला झोपण्यास गेले होते, अशी माहिती त्याला मिळाली.

आपल्या घोड्यांच्या टापांचा आवाज होऊन आपले भावी बंदिवान सावध होऊ नयेत म्हणून डॅनिअल आणि त्याचे लोक चावडीजवळ येताच खाली उतरले. आपल्यापैकी एकदोन जणांच्या हातात आपले घोडे देऊन डॅनिअल स्वतः स्टीफनसन् आणि अबदुल हक यांच्यासह इतरांना घेऊन सशस्त्र स्थितीत पायीच गावातील विहाराकडे गेला.

तो देवरनावडगीच्या चावडीवर आला, तेव्हा मुसळधार पाऊस कोसळत होता. त्यामुळे त्या काळरात्रीची भयानकता वाढली होती. तो विहाराशी पोचला, तेव्हाही पावसाच्या घोंघाटावाचून काही ऐकू येत नव्हते. लांब अंतरावर अशुभ कोल्हेकुई उमटत होती, ती सोडली तर दुसरे काही ऐकू येत नव्हते. अशा वेळी हिंदी क्रांतिकारांचा पुरस्सर अध्वर्यू ब्रिटिश सरकारच्या हस्तकांच्या हातात पडणार होता.

विहाराच्या प्रवेशद्वाराच्या पोकळीवाचून त्या अंधारात काहीच दिसत नव्हते. एक सोडून बाकीच्यांना गप्पपणे दबा धरून बसण्यास सांगून आपल्याजवळ कप-

डबात गुंडाळून आणलेला चोरफाणस डॅनिअलने बाहेर काढला आणि त्याचा अंधुक प्रकाश त्याने विहारात फेकला. त्याने डोळे विस्फारून आत पाहिले. दाटीदाटीने कितीतरी प्रवासी तेथे झोपले होते.

परंतु एका कमानीखाली गळ्यापर्यंत जवळजवळ पूर्णपणे कापडलेल्या दोन आकृत्यांनी त्यांचे लक्ष लागलीच वेधून घेतले. त्यापैकी एक आकृती उंच मनुष्याची आणि दुसरी त्यापेक्षा ठेंगण्या मनुष्याची होती. वासुदेव बळवंतांची उंची डॅनिअलला माहिती होती. त्यामुळे तिचे त्या उंच मनुष्याच्या उंचीशी साधर्म्य पाहताच, ती वासुदेव बळवंतांचीच आकृती होती, या विषयी त्याला संशय राहिला नाही.

आपली शिकार हाती आल्याचा त्याला आनंद झाला. पण त्याने घाई केली नाही. इतके दिवस सरकारची पाचावर धारण बसविणाऱ्या या लढवय्या, धैर्यशाली, आपल्या स्वतःच्या भवितव्याचा मुळीच विचार न करणाऱ्या मराठा बंडखोराने आपल्या संरक्षणाची काय व्यवस्था केली असेल याची त्याला कल्पना करता येईना. ठिसुबाई टेकडीवरची लढाई त्याला आठवत होती. त्यामुळे सावधगिरी म्हणून त्याने आपले पिस्तुल सरसावले, अबदुल हक आणि स्टीफनसनलाही तसेच करण्यास सांगितले आणि इतरांनाही सावध केले.

डॅनिअलने आपल्या चोरफाणसाचा प्रकाश वासुदेव बळवंतांच्या तोंडावर फेकला, तेव्हा त्यांना गाढ झोप लागली होती. त्यांची निश्चित ओळख पटल्यावर काहीही विरोध होत नसताना त्यांच्या दोन्ही बाजूस पाय टाकीत त्याने उजव्या हाताने आपले रिव्हॉल्वर सरसावले. डाव्या पायातील बुटाचा पाय त्यांच्या तलवारीवर दाबला आणि दुसऱ्या हाताने झडप घालून त्यांचा गळा दाबीत पराक्रमाची शिकस्त करीत, शूर मेजर डॅनिअल वासुदेव बळवंतांच्या रुंद छातीवर जाऊन बसला! असहाय्य झालेल्या वासुदेव बळवंतांचा गळा डाव्या हाताने पकडीत मग तो त्यांना म्हणाला, "वासुदेव बळवंतजी, मी म्हटलं नव्हतं की, मी तुम्हाला पकडीनच पकडीन म्हणून! त्याप्रमाणे तुम्हाला आता पकडले आहे! तेव्हा मला शरण या!"

त्याच वेळी अबदुल हकने गोपाळ मोरेश्वर यांच्या अंगावर उडी मारून त्यांनाही गळ्यापाशी पकडण्याचा प्रयत्न केला. ते अधिक सावध होते. ती पकड बसताच त्यांनी आपल्या तोंडापाशी आलेल्या अबदुल हकच्या बोटांचाच कडकडून चावा घेतला आणि सुटघा हाताने आपली तलवार उपसली. पण अर्ध्यावर उठत ते आता अबदुल हकवर वार करणार तोच ज्वरग्रस्त वासुदेव बळवंतांच्या अंगावरून झेप घेत डॅनिअलने गोपाळ मोरेश्वर यांच्या तोंडावर ठोसा लगावला आणि अर्धवट उठण्याच्या प्रयत्नात असलेले गोपाळ मोरेश्वर खाली पडले. अबदुल हकने

त्यांच्यावर घट्ट पकड बसवून त्यांची तलवार काढून घेतली. आणि त्यांना अटक केली.

आपल्या छातीवर मोठे दडपण आले आहे असे भासून वासुदेव बळवंत जागे झाले. जागे होताच त्यांना जे दृश्य दिसले ते त्यांना प्रथम खरे वाटेना ! त्यांनी डोळे पूर्णपणे उघडले. संपूर्ण अंधारात त्यांना सभोवार थोडासा प्रकाश दिसला. आपण पहातो ते एखादे स्वप्न तर नाही ना ? असा विचार त्यांच्या मनाला चाटून गेला. परंतु थोड्याच क्षणात त्यांच्या सर्व लक्षात आले. आपल्या छातीवर बसलेल्या डॅनिअलकडे पहात त्यांनी आपले पिस्तुल चाचपले. पण ते त्यांच्या हाताला लागेना. डॅनिअलने ते काढून घेऊन केव्हाच दूर फेकून दिले होते. त्यांनी आपली आवडती तरवार चाचपली. पण तीही डॅनिअलच्या बुटाच्या लाथेखाली दाबून टाकल्याचे त्यांना समजले. असहाय्यतेमुळे ते सर्वस्वी हताश झाले.

पण तरीही वासुदेव बळवंतांनी शरणागतीची भाषा काढली नाही. डॅनिअल-च्या 'शरण ये' या शब्दावर तितक्याच तेजस्वीपणे त्यांनी उत्तर दिले, " शूर असून असा गुप्तपणाने एकाएकी येऊन निजल्या ठिकाणी तू मला धरलेस, ही काही शौर्याची गोष्ट नाही. मी सावधपणे उभा असताना तुझे माझे दोन हात होऊन मग तू मला धरलं असतंस तर तुझी शूरात गणना झाली असती! अजूनही तुझी छाती असेल तर मला मोकळा सोड, आपण द्वंद्वयुद्ध खेळू आणि त्यात जो दुसऱ्याचा पराभव करील, तो विजयी होईल. तू विजयी झालास तर मला पकडून ने. "

अस्खलित इंग्रजीत खणखणीत आवाजात वासुदेव बळवंतांनी दिलेले हे आव्हान ऐकून मेजर डॅनिअल चपापला. वासुदेव बळवंतांविषयी मोठा राग असूनही त्याला शेवटी या पराक्रमी बंडखोराच्या शौर्याविषयी प्रतिपक्षियांची प्रशंसा वाटली. त्यामुळे वासुदेव बळवंताचे आव्हान ऐकून तो हसला. पण त्याने ते स्वीकारले नाही किंवा त्यांना काही उत्तर दिले नाही.

त्यांच्याशी दोन हात करण्याची आशा नष्ट झाल्यावर वासुदेव बळवंतांचा संताप अनावर झाला. त्यांनी त्याची खूप निर्भत्सना केली आणि त्यांचे रक्त सळसळू लागून त्या स्थितीतही त्याच्या हातून सुटण्याची त्यांनी खूप धडपड केली. तेव्हा त्या दोघांची चांगली झटापट झाली. त्या झटापटीत आपले सारे पेच आणि सामर्थ्य वासुदेव बळवंतांनी उपयोगात आणले[१३] आणि डॅनिअलला जवळ जवळ दूर फेकून दिले. डॅनिअलनेही त्यांना आडदांडपणेच तोंड दिले. या झटापटीत त्याचा त्यांनी

१३ Both of them showed great resistence."
"त्या दोघानी ( वासुदेव बळवत व गोपाळ मोरेश्वर यानी ) मोठा प्रतिकार केला." 'पूना 'ऑब्झर्वर', दि. २४ जुलै १८७९: 'अनामिक' यांची आठवण; गणपुले यानी त्यांना ही माहिती सांगितली होती.

दमच काढला. त्याला त्या रात्री खरी हिंदुस्थानी द्वंद्वयुद्धाची चुणूक दाखविली.

डॅनिअल त्यांच्यावरील आपली पकड घट्ट करीत असताना त्यांची जी झुंज झाली तीत वासुदेव बळवंतांना दंडाला आणि छातीला रक्तबंबाळ करणाऱ्या दुखापती झाल्या[१४] आणि त्यांच्या छातीवर तरवारीचा एक मोठा वार लागला.[१५] अशा निकराच्या झुंजीनंतरच डॅनिअल त्यांना पकडू शकला, ते काही सहजासहजी त्याच्या स्वाधीन झाले नाहीत.

वासुदेव बळवंतांनी ही झुंज केली, त्यासरशी त्यांचे कदाचित लपलेले आणखी साथीदार शस्त्रे उपसून पुढे येतील आणि आपल्याशी मारामारी सुरू करतील अशी भीती वाटून डॅनिअलने ठरलेली खूण आपल्या इतर लोकांना केली. तेव्हा त्याचे लोक भराभर त्या विहारात घुसले आणि तो विहार दंगलीने दुमदुमून गेला. अनेकांपुढे ते फक्त दोन क्रांतिकारक काय करणार होते? ते पूर्णपणे पकडले गेले. त्यांना अटक करण्यात येऊन हातकड्या घालण्यात आल्या आणि साखळदंडांनी बांधण्यात आले, आणि मग रोखलेल्या संगिनींच्या आणि बंदुकींच्या वेढ्यात देवरनावडगीच्या चावडीवर नेण्यात आले.

चावडीवर त्यांची झडती घेण्यात आली. त्या झडतीत वासुदेव बळवंतांजवळ एक पिस्तुल, एक तलवार आणि 'मारा' नावाचे दोन्ही बाजूस तीक्ष्ण धारेचे पाते असलेले हातात सहज लपवता येणारे शस्त्र सापडले. त्यांनी उशास घेतलेल्या बळकटीत त्यांना ठिकठिकाणाहून आलेली पत्रे सापडली. त्याचप्रमाणे त्यांची दैनंदिनी, आत्मचरित्र, दोन लोटे, नेहमी त्यांच्या गळ्यात असणारी रुद्राक्षाची माळ, श्री दत्ताचे चित्र, काही रोख पैसे आणि युद्धकलेवर त्यांनी लिहिलेल्या प्रबंधाचे हस्तलिखीत सापडले. त्यात पावसाळ्यानंतर आपण सरकारविरुद्ध बंड करण्यासाठी सैन्य कसे उभारावयाचे, त्यांच्या संघटनेच्या रूपरेषेचे एक हस्तलिखित, त्याला शस्त्र साधने कोणती हवीत आणि ती कशी मिळवावयाची, त्याला कवायती आणि युद्ध शास्त्राचे धडे देऊन शिस्तीत सिद्ध कसे करावयाचे, त्याला सामुग्री कोणती आणि कशी पुरवावयाची आणि त्याचे रणांगणात नेतृत्व कसे करावयाचे, यासंबंधी सविस्तर सूचना होत्या. झडतीत रणांगणात असताना स्वतःच्या वर्तणुकीत आपण पाळावयाच्या नियमांचे एक हस्तलिखित, आणि "राज्यक्रांतीनंतर गादीवर

---

१४ "They resisted violently and Vasudeo received a slight wound"
("त्यांनी निकराने प्रतिकार केला आणि वासुदेवाला लहानशी दुखापत झाली") "बॉबे गॅझेटियर," खंड २३. पृ. ६४६

१५ वासुदेव बळवंतांना पकडून पुण्यात आणण्यात येत असता, वाटेत सोलापूर स्थानकावर त्या ठिकाणच्या 'कस्पतरू' पत्राच्या प्रतिनिधीने पूर्वी उल्लेख केलेल्या भिवा शिपायाकडून या घटनेची खरी माहिती काढून घेऊन ती आपल्या पत्रात नतर प्रसिद्ध केली, त्या प्रतिवृत्तात ही वस्तुस्थिती दिलेली होती,

येणाऱ्या सत्ताधाऱ्याने पाळावयाचे नीतिनियम," ही बाळबोध लिपीतील हस्तलिखित पुस्तिका, " आपल्याविषयी बातम्या असलेल्या वृत्तपत्रांचे दोन अंक, आपल्या अटकेसाठी एक सहस्र रुपयांचे पारितोषिक उद्‌घोषिणारी मुंबई सरकारची राजघोषणा, दुसरे तसेच तीन सहस्र रुपये पारितोषिक उद्‌घोषिणारी मध्यप्रभागाचे आयुक्त रॉबर्टसन यांची राजघोषणा आणि त्यांना प्रत्युत्तर म्हणून वासुदेव बळवंतांनी काढलेल्या राज्यपालांच्या मस्तकासाठी पाच सहस्र रुपयांचे आणि पुण्याचे जिल्हाधिकारी आणि सत्र न्यायाधीश यांच्या मस्तकासाठी तीन सहस्र रुपयांचे इ. पारितोषिके देऊ करणारी प्रतिघोषणा यांच्या प्रती, मुंबईच्या राज्यपालांना ते लिहीत होते ते वैयक्तिक पत्र, इ. वस्तू आणि साहित्य सापडले. यापैकी वासुदेव बळवंतांची दैनंदिनी निळ्या वेष्टनात असल्यामुळे ती निळ्या वेष्टनाचे पुस्तक म्हणून पुढे अभियोगात संदर्भिली गेली. यापैकी बरेच लिखाण वासुदेव बळवंत जे पुस्तक छापून प्रसिद्ध करण्यासाठी लिहीत होते त्यासाठीच केलेले होते आणि ते त्यांच्या सांगण्याप्रमाणे दुसऱ्याने लिहून घेतलेले होते वरील सर्व विधी होईपर्यंत पहाट झाली. नंतर दोकडो सहस्र सैनिकांच्या वेढ्यात वासुदेव बळवंतांची गोपाळ मोरेश्वरसह अफझुलपूरमार्गे दुधणी स्थानकावर पाठवणी करण्यात आली. त्यांच्यावरील पहाऱ्यावर देखरेख करण्यासाठी स्टीफनसन त्यांच्यासमवेत स्वतः चालला होता. वासुदेव बळवंतांना या वाटेने नेण्याचा निर्णय डॅनिअलने बऱ्याच विचारांनी घेतला होता. कारण त्यांना तेथून हालविण्याची दुसरी वाट होती ती डोंगराळ आणि रानावनाच्या प्रदेशातून जात होती. त्यांच्यासाठी जीव टाकणारे सहकारी त्या वाटेवर सरकारी लोकांवर हल्ला करून त्यांना सोडविण्याचा प्रयत्न करतील, अशी भीती डॅनिअलला वाटत होती. दुसरे म्हणजे त्या वाटेने जाताना नदी ओलांडावी लागत होती. एका नदीमुळे आपल्याला किती परिश्रम पडले होते, त्याचा डॅनिअलला अनुभव होता. नदीत उडी मारूनही वासुदेव बळवंतांसारखा धाडसी पुरुष पुन्हा निसटण्याचा प्रयत्न करावरून करणार नाही, असा धोका त्याला वाटला. म्हणून त्याने दुधणी मार्गेच त्यांची पाठवणी केली आणि तो स्वतः अब्दुल हसन गाणगापुरास परत गेला. तेथून राजनिवासी सर रिचर्ड मीड, निजामचा मुख्य प्रधान सर सालर जंग आणि मुंबईचे राज्यपाल सर रिचर्ड टेंपल यांना तारेने ते वृत्त त्याने कळविले. गेले बेचाळीस तास गाणगापुरास सैनिकांचा गराडा पडला होता. तेथील कोणालाही गावाबाहेर जाऊ देण्यात आले नव्हते. धराच्या झडत्या घेऊन आल्या

१६ "It contained detailed instructions for raising equipping, disciplining, provisioning and commanding a force intended to operate against the Government a short paper in Balbodh, containing..... rules for conduct"etc.--Case No. 153 of 1879"Imperative V/s Wasudeo Balwant phadake and 14 others," वासुदेव बळवंतांच्या अभियोगातील कागदपत्र.

होरयां वासुदेव बळवंताशी असलेला पत्रव्यवहार काही घरी सापडला होता आणि कित्येकाना अटक करण्यात आली होती त्याची सख्या चाळीसावर होती डॅनिअलने पकडलेल्या लोकाची चौकशी केली आणि नऊ जण सोडून इतराना सोडून दिले नतर त्याने आपला निकडीचा पत्रव्यवहार पाहिला आणि पकडलेल्या लोकांना गुलबर्ग्यास नेऊन तेथील तुरुगात ठेवण्याचा आदेश देऊन आणि त्याच्या पुढील चौकशीचे काम अवदुल हकवर सोपवून २२ जुलैला सकाळी ९ वाजता त्याने पुण्यास प्रयाण केले

तिकडे दुधणीच्या वाटेवर स्टीफनसनने वासुदेव बळवताना साखळदडात बाधून घालवले असताना स्वस्थपणे पहाणे जनतेला अशक्य प्राय झाले त्याच्या या सतापाचे प्रत्यतर स्टीफनसनला वाटभर आले गावकऱ्यानी त्याची आणि त्याच्या गोतावळ्याची हुर्यावडी उडविली आणि निर्भत्सना केली वाटभर त्या गोतावळ्यास खाद्यपदार्थ पुरविण्यास कोणी पुढे आले नाही आणि लोकाच्या या असहिष्णू वृत्तीमुळे आपले बदी सभाळता सभाळता स्टीफनसनला पुरेवाट झाली दुधणीस पोचेपर्यंत त्याला आणि त्याच्या लोकाना कडकडीत उपास पडला दुपारी ११ वाजता दुधणीस पोचल्यावरच ते तो सोडू शकले आणि त्यानी सुटकेचा नि श्वास टाकला

दुधणी स्थानकावरून वासुदेव बळवत आणि त्याच्या सहकाऱ्याला कडक पोलीस सरक्षक वेढ्यात आगगाडीच्या तिसऱ्या वर्गाच्या एका राखीव डब्यात स्टीफनसनच्या अधिपत्याखाली चढविण्यात आले तो डबा बद करण्यात आला गाडी चालू झाली त्याच्या आगमनाची बातमी सोलापुरात आधीच पोचली होती आणि त्याना पाहाण्यासाठी सोलापूर स्थानकावर आणि बाहेर लोकाची प्रचड गर्दी उसळली होती " पुण्याकडे जाणारी वरील गाडी सोलापूर स्थानकावर येताच त्या सर्व गडबडीत सोलापुरच्या 'कल्पतरू' पत्राच्या प्रतिनिधीने तरीही थेट त्याच्या पर्यंत एकदा धाव मारण्यास यश मिळविलेच त्याच भेटीत वासुदेव बळवताच्या डॅनिअलशी झालेल्या द्वदयुद्धाची चिन्हे वासुदेव बळवताना पाहाताच त्या वार्ताहराने टिपली थोड्याच वेळात गाडी पुढे चालू झाली वासुदेव बळवत आणि गोपाळ मोरेश्वर आपल्या पुण्याच्या वाटेवर बदिवान म्हणून प्रवास करू लागले[१७]

१७ 'पुणे वैभव', दि २४ जुलै १८७९

# प्रकरण १७ वे

## सरकारविरुद्ध कटाचा आरोप!

रविवारी २० जुलै १८७९ च्या उत्तररात्री वासुदेव बळवंतांना अटक झाली. सोमवारी हे वृत्त सायंकाळी पुण्याच्या सरकारी गोटात येऊन धडकले आणि मंगळवारी २२ जुलैला सकाळी पुणेकर घराबाहेर पडले तेव्हा मुली 'वासुदेव बळवंत फडके यांना अटक' ही वर्तमानपत्रातील शीर्षके ओरडणाऱ्या वृत्तपत्र विकणाऱ्या मुलांच्या आरोळ्या ऐकत. 'डेक्कन हेरल्ड' आणि 'पूना ऑब्झर्वर' या पुण्याच्या दोन्ही इंग्रजी पत्रांनी त्या सकाळी आपल्या पत्राचे विशेष अंक काढून ती बातमी पुणेकरांना कळविली आणि ते अंक जसजसे पुण्याच्या रस्त्यावरून विकले जाऊ लागले, तसतशी पुण्यातील सळबळ वाढत गेली. 'पूना ऑब्झर्वर' ने म्हटले की, "गेल्या फेब्रुवारीपासून दख्खनमधील आणि कोकणातील शांतता नाहीशी करणाऱ्या या उलाढाल्यास कडक पहाऱ्यात पुण्यास पाठवून देण्यात येत आहे. त्यामुळे पुण्याच्या कोपऱ्याकोपऱ्यावर जमून या वृत्ताची आणि त्यात इतर ऐकलेल्या बातमीची भर घालून पुणेकर त्याची चर्चा करू लागले. वासुदेव बळवंत अशा रीतीने जिवंतपणी सरकारच्या हातात सापडणेच शक्य नाही. त्यापेक्षा त्यांनी मरणच पत्करले असते; असा बहुसंख्यांक हिंदी लोकांचा विश्वास होता. ते म्हणाले की, ही एक हूल आहे. 'पूना ऑब्झर्वर' ने प्रसिद्ध केलेले वृत्त खरे मानण्याकडे त्यांचा प्रथम कल नव्हता.

युरोपियनांना आणि सरकारी अधिकाऱ्यांना ती बातमी कधी येईल अशी उत्कंठा होती. वासुदेव बळवंतांच्या भीतीने पुण्यात येऊन राहिलेल्या युरोपियन लोकांचे हिंदी नोकर जेव्हा बाजारात गेले, तेव्हा त्यांना हे वृत्त समजले आणि घरी परत येताच त्यांनी ते आपल्या यजमानांना सांगितले. पण ते सुटकेचा सुटे निःश्वास टाकतात तोच ते नोकर त्यांना सांगू लागले की, लोकांचा मात्र या वृत्तावर अजून विश्वास बसत नाही. त्यामुळे त्यांच्या धन्यांना पुन्हा निराशा वाटली.

परंतु ते वृत्त खरे होते. आणि जसजसा दिवस वर येऊ लागला, तसतसे मनाविरुद्धही ते वृत्त खरे मानणे लोकांना भाग पडले. मग मंगळवारी रात्री साडे अकरा-

च्या संधीस मुंबईच्या वृत्तपत्राच्या पुण्यास असलेल्या विशेष वार्ताहरांनी आपल्या पत्रांना तशा निकडीच्या तारा केल्या. वासुदेव बळवंतांविषयीच्या बातम्या ज्या प्रमुख ठिकाणी प्रसिद्ध होत असत, त्या ठिकाणीच दुसऱ्या दिवशी मुंबईच्या इंग्रजी वृत्तपत्रात त्या झळकल्या. त्या अशा होत्या :

**Arrest of Wassudew Bulwunt Phadke**

Poona, July 22, 11-35 p.m.

Our Poona Correspondent telegraphs that the notorious' Wassudew Bulwunt Phadke was arrested by Major Daniell in the Kalladgi District between Belgaum and Kolhapore.

Wassudew was in the course of flight and, was traced from village to village, and finally caught with one companion in a temple.........Wassudew had enlisted five hundred Arabs and Rohillas and advanced their Jamadar Rs. 2,000 promising Rs. 3000 more to purchase horses. Papers found with him contain a proposed plan of operation and rules for his conduct and deportment while fighting. The news of his capture has created great excitement in Poona."

**वासुदेव बळवंत फडके यांना अटक**

पुणे–जुलै २२, रात्री ११-३५ वाजता

"आमचा पुण्याचा वार्ताहर तारेने कळवितो की, कुप्रसिद्ध वासुदेव बळवंत फडके याला मेजर डॅनिअल यांनी कलादगी जिल्ह्यात बेळगाव आणि कोल्हापूर यांच्यामध्ये अटक केली आहे.

वासुदेव हा त्वरेने प्रवास करीत होता आणि एका खेड्यामधून दुसऱ्या खेड्यात त्याचा माग काढण्यात येऊन शेवटी एका साथीदारासह एका देवळात त्यास पकडण्यात आले. वासुदेवाने पाचशे अरब आणि रोहिले यांना आपल्या सैन्यात भरती केले होते आणि त्यांच्या जमादाराला घोडे विकत घेण्यासाठी त्याने २००० रुपये आधी देऊन आणखी ३००० रुपये नंतर देण्याचे आश्वासन दिले होते. त्याच्यापाशी सापडलेल्या कागदपत्रात संकल्पित लढाईचा आराखडा सापडला आणि रणांगणास असताना आपण ठेवावयाच्या वर्तनाचे आणि वागणुकीचे नियम होते. त्याच्या अटकेच्या बातमीने पुण्यात मोठी खळबळ उडाली आहे."

दुसऱ्या दिवशी त्या अटकेचे अधिक सविस्तर वृत्त या वृत्तपत्रांनी प्रसिद्ध केले : मेजर डॅनिअलच्या कामगिरीचे गोडवे गायले आणि वासुदेव बळवंतांना

'असुधारणीय बंडखोर' (इनकॉरिजिबल रिबेल) म्हटले. त्यांच्या अभियोगात पुण्याच्या बऱ्याच नामवंत पुढाऱ्यांचे कटातील अगदी उघडकीस येईल अशी आशा-ही त्या वृत्तपत्रांनी व्यक्त केली. वासुदेव बळवंतांच्या अटकेला आता देशभर महत्त्व प्राप्त झाले होते. त्यामुळे २३ जुलैला सिमल्याहून त्या वृत्ताचा पुढील विद्युत संदेश हिंदुस्थानभर सुटला.

"Simla, July 23—Wassudewpant Phadke has been captured by Major Daniell at Hyderabad, with the assistance of a special officer deputed by the Nizam's Government."

(सिमला दि. २३ जुलै वासुदेवपंत फडके याना निजामाने प्रतिनियुक्त केलेल्या एका विशेष अधिकाऱ्याच्या साहाय्याने हैदराबाद येथे पकडलेले आहे !)

ही बातमी देताना इंग्रजी पत्रांनी प्रथमच अधिकृतरीत्या वासुदेव बळवंतांचे वर्णन दिले. ते म्हणाले :

"Wassudew Bulwant himself is described as a tall well-built man of considerable mental and bodily energy."

("स्वतः वासुदेव बळवंत हे फार मानसिक आणि शारीरिक सामर्थ्यांचे उंच, दणकट शरीर बांध्याचे असे गृहस्थ आहेत. असे त्यांचे वर्णन करण्यात येते.")

रॉयटरच्या वृत्तसंस्थेने हेच वृत्त गुरुवारी २४ जुलैला मुंबईहून जगभर प्रसृत केले. लंडनच्या 'टाइम्स'ने वृत्त आपल्या शुक्रवार दि. २५ जुलैच्या अंकात प्रसिद्ध केले, ते असे होते :

(Through Reuter's Agency)

India, Bombay, July 24.

Wassudew Bulwant Phadke, formerly a clerk in the Military Finance Office at Poona, and lately notorious as the leader of the gang of dacoits, who committed acts of incendiarism and robbery in the Deccan, has been apprehended by the police who had long been in pursuit of him.

बळवंत फडके यास बराच काळ त्यांच्या मागावर असलेल्या पोलिसांनी अटक केलेली आहे "

वासुदेव बळवंताच्या अटकेनंतर पुण्यात त्यांच्याविषयी निरनिराळ्या बातम्या पसरत होत्या. आज त्याना पुण्यात आणणार, सायंकाळी ते पुण्यात येणार, अशी बातमी मंगळवारी पुण्यात पसरली आणि त्या दिवशी सायंकाळी पुणे स्थानकावर त्याना पहाण्यास सहस्रावधी लोकांची गर्दी उसळली त्या प्रचंड जनसमुदायास आटोक्यात ठेवता ठेवता पोलिसांची त्रेधा उडाली लोक स्थानकाच्या लोखंडी कुंपणांवर चढून बसले आणि तिकीट-धराधर धडक मारून फलाटावर जाण्याचाही त्यांनी प्रयत्न केला पण पोलिसांनी त्यांना मागे हटवले ते नंतर जवळच्या रेल्वे पुलावर जाऊन बसले. आणि फलाटावर पाहू लागले शेवटी लोकांनी स्थानकाबाहेरच बैठक मारली आणि वासुदेव बळवंताना घेऊन येणाऱ्या गाडीची ते अधीरतेने वाट पहात बसले परंतु वासुदेव बळवंत त्या सायंकाळी पुण्यास आलेच नाहीत. तेव्हा लोक निराशेने रात्री घरोघरी परतले

आणि त्यानंतर वासुदेव बळवंताना पाहण्याचा त्यांचा विचार फसलाच कारण बुधवारी दि. २३ जुलैला ते पुण्याला आले ते पहाटेच्या ४.१५ वाजता पुण्याला पोचणाऱ्या गाडीने. काही उपद्व्यापी लोकांनी तरीही ते वृत्त कसे तरी मिळविलेच आणि त्या भाडवेळीही अगदी तुरळक लोक पुणे स्थानकावर गेलेच आदल्या दिवशीच्या अनुभवामुळे सरकारी अधिकाऱ्यांनी दक्षता घेतली होती सुभेदार मेजर कादरखान याच्या हाताखाली पोलिसांची तुकडी उघडया संगिनी, तलवारी आणि बंदुका रोखून गाडी येण्याच्या कितीतरी वेळ आधीच गाडीची वाट पाहून पुण्याच्या फलाटावर उभी राहिली. पुण्याचे पहिले सहाय्यक जिल्हाधिकारी आणि पहिला वर्ग दंडाधिकारी केसर जातीने उपस्थित होते. वृत्तपत्राचे वार्ताहरही त्यावेळी स्थानकावर गेले होते

गाडी स्थानकात येत असताच पोलिसांनी आणि सैनिकांनी फलाटावर अर्धवर्तुळाकृती कडे केले. येणाऱ्या बंदिवानाचा डबा कोठे येणार हे त्याना माहीत असे, त्यामुळे, त्यांनी त्या डब्याशी ते कडे उभे केले गाडी स्थानकात शिरली. पोलिसांचे आणि सैनिकांचे आवाज वाढले गाडी थांबली. त्या आरडाओरड्यातच एका राखीव तिसऱ्या वर्गाच्या डब्याचे दार उघडले गेले आणि सहा महिन्याच्या वडाच्या धामधुमीनंतर दोन्ही बाजूच्या रक्षकासह हातकड्या घातलेली आणि साखळदंडाने बांधलेली वासुदेव बळवंतांची मूर्ती तशाच स्थितीतील गोपाळ मोरेश्वर याच्यासह त्या डब्यातून खाली उतरली हिंदी आणि युरोपियन सैनिकांनी त्यांच्या सभोवार वेढा दिलेला होता; आणि त्यांच्या मागोमाग मेजर डॅनिअल आणि स्टीफनसन हेही गाडीतून उतरले.

वासुदेव बळवंतांनी दाढी जटा वाढविल्या होत्या. आणि गेल्या पाच महिन्यातील श्रमाने आणि उन्हातून झालेल्या भटकंतीमुळे त्यांचा मूळचा गोरा वर्ण बदलून ते बरेच काळे पडले होते. तरीपण त्यांच्या मुद्रेवर करारी स्तब्धतेचे तेज दिसत होते. संरक्षकांच्या गराड्यात मंद मंद पाऊले टाकीत ते पुढे चालू लागले. पुण्याच्या स्थानिक अधिकाऱ्यांनी त्यांना आपल्या स्वाधीन करून घेतले. स्थानकाबाहेर घोड्याच्या एका बंद गाडीत त्याना चढविण्यात आले. आणि मेजर डॅनिअलच्या स्थानकाजवळच्या बंगल्यात नेण्यात आले. तेथे दंडाधिकारी केसर यांनी गावातील तुरुंगाच्या (सिटी जेलच्या) बंदिपालाला वासुदेव बळवंताना त्या तुरुंगात ठेवावे; म्हणून एक अधिपत्र (वॉरंट) लिहिले. गोपाळ मोरेश्वरना त्यांच्यापासून आता सैनिकी विभागातील बंदिघरात (कँटोन्मेंट लॉकअपमध्ये) ठेवण्यासाठी निराळे काढण्यात आले. आणि पुण्याचे मुख्य आरक्षी (चीफ कॉन्स्टेबल किंवा फौजदार) स्मिथ यांनाही तसेच अधिपत्र देऊन त्यांच्या स्वाधीन करण्यात आले. या दोघानाही आपापल्या तुरुंगाकडे नेताना पुण्याच्या घोडदळातील (पूना हॉर्संच्या) घोडेस्वारांचा पहारा त्यांच्यासमवेत देण्यात आला. त्यांच्या वाटभर सशस्त्र सोजिरांचाही पहारा ठेवण्यात आला होता. राजकीय क्रांतिकारकांसाठी इतकी कडक संरक्षण व्यवस्था ब्रिटिश सरकारला पुण्याला प्रथमच करावी लागत होती.

अटक झाल्यापासून पुण्यात येईपर्यंत वाटेत वासुदेव बळवंत काहीही बोलले नाहीत. सबंध प्रवासात आपल्या भवितव्याविषयी त्यांनी एक प्रकारची निश्चित वृत्ती दाखविली. मेजर डॅनिअलच्या प्रश्नांना त्यांनी काहीच उत्तर न देता वासलात लावली. त्यांची निर्भय मुद्रा पाहून तोही चाट पडला. या प्रपंचात आपण पडलो तेव्हाच आपण मरणाची सिद्धता ठेवलेली होती. अशा विचाराने आपल्याला अटकेची किंवा मृत्यूची काही भीती आहे असे त्यांनी दाखविले नाही. त्यांनी असे मौन स्वीकारले होते. परंतु वाटेवरच्या लोकाना त्यांचा विसर पडला नव्हता. वाटेतील स्थानकांवर त्याना प्रेमाने पाहण्यासाठी त्यांची गर्दी जमलीच. सोलापुरला तर ती विशेषच होती.

पुण्यास तुरुंगांत आल्यापासूनच, ज्या राज्यसत्तेविरुद्ध वासुदेव बळवंतांनी बंड केले होते, त्या राज्यसत्तेचे प्रतिशोधक चक्र वाष्पयंत्रांच्या निर्दयतेने त्यांच्यावर फिरू लागले. सरळ रीतीने त्यांच्याकडून माहिती मिळण्याचे चिन्ह दिसेना, तेव्हा मेजर डॅनिअलने छळाचे शस्त्र त्यांच्यावर उपसले. आणि त्यांच्या यातनांखाली वासुदेव बळवंतांचे शरीर पिचले जाऊ लागले. तुरुंगात चाललेला वासुदेव बळवंतांचा हा छळ चोवीस तासात कळसास पोचला. त्यातून आपला स्वाभिमान राखण्याचा आणि आपली सुटका करून घेण्याचा एकच मार्ग त्यांच्यापुढे त्यामुळे राहिला. आत्महत्या ! आणि गुरुवारी २४ जुलैला, रात्री आपल्या कोठडीच्या तुळईपासून लोंबकळणाऱ्या एका दोरीचा, गळफास लावून घेऊन आत्महत्या करण्याचा त्यांनी प्रयत्न केला ! पण पहारेकऱ्यांच्या धावपळीमुळे तो फसला.

त्याच्या सान्निध्यात येणारा प्रत्येक हिंदी मनुष्य त्याच्याशी सहानुभूतीने वागे. त्यामुळे त्याच्या आत्महत्येच्या या प्रयत्नाचे वृत्त सरकारने राखलेल्या सर्व गुप्ततेनंतरही बाहेर फुटले आणि पुण्यात दुसऱ्या दिवशी सर्वत्र पसरले. मात्र तसे ते पसरताना वासुदेव बळवंतानी आत्महत्येचा प्रयत्न केला, या खऱ्या वृत्ताऐवजी वासुदेव बळवंत आत तुरुंगात मरून पडलेले आढळले, असे त्याचे विपर्यस्त रूप झाले. आदल्या मंगळवारच्या त्याच्या अटकेच्या वृत्ताने उडालेल्या खळबळीवर या वृत्ताच्या खळबळीची दुसरी लाट आता उसळली ते कधीच जिवंतपणे सरकारच्या हातात पडणे शक्य नाही अशी निश्चिती वाटणाऱ्या लोकाचा या वृत्तावर लागलीच विश्वास बसला आणि त्याच्या तोडून पसरतच हे वृत्त मग सरकारी अधिकाऱ्याच्या कानावर परत गेले कित्येक नागरिकही ते वृत्त खरे आहे असे समजून वासुदेव बळवंताना ठेवले होते, त्या गावातील कारागाराशी (सिटी जेलशी) शोध करूनही गेले परंतु तेथे ते जिवंत आहेत, पण त्याची प्रकृती जरा अस्वस्थ आहे, अशी माहिती त्याना मिळाली

या प्रकाराची पुनरावृत्ती होऊ नये म्हणून काराधिकाऱ्यानी कडक व्यवस्था केली त्याच्याशी अधिकारावाचून कोणीही चकार शब्द बोलू नये असा आदेश त्यानी सोडला त्यानी पुन्हा आत्महत्येचा प्रयत्न करू नये आणि पळूनही जाऊ नये म्हणून त्याची कोठडीही बदलण्यात आली आणि युरोपियन बंदिवानासाठी ज्या विशेष कोठड्या होत्या, त्यातील एका कोठडीत रक्षापालाच्या आणि तुरुगाच्या शिपायाच्या कडक सरक्षणात त्याना ठेवण्यात आले त्याच्या आत्महत्येच्या प्रयत्नाची वातमी समजताच वरिष्ठ अधिकाऱ्यानी ७८ व्या हायलँडर्सचे गोरे सोजिर सायंकाळपूर्वीच त्याच्या कोठडीवर धाडले. हिंदी पहारेकरी देशप्रेमाने दगा देतील म्हणून युरोपियन पहारेकऱ्याची पाठवणी तेथे करण्यात आली दोन रक्षक त्याच्यावर चोवीस तास लक्ष ठेवू लागले जिल्हाधिकारी मूर किंवा मेजर डॅनिअल याच्या विशेष अनुज्ञेवाचून आता कोणीही त्याना भेटू शकत नाहीसा झाला. एक तळपता टागता दिवा त्याच्या कोठडीच्या बाहेरच्या एका कडीवरून कोठडीच्या आतल्या या प्रस्थात बंदीच्या सर्व हालचाली कळतील असा प्रकाश त्याच्यावर फेकू लागला. आणि अशा प्रकाशित कोठडीत वासुदेव बळवंतानी गुरुवारची २५ जुलैची रात्र काढली

शुक्रवारी २५ जुलैला अन्नामधून विष घेऊन वासुदेव बळवंतानी देहत्याग करू नये म्हणून अधिकाऱ्यानी बंदिपालाला काही सूचना दिल्या. आणि त्याप्रमाणे त्या तुरुगाचे पारशी बंदिपाल फ्रामजी मावसजी यानी वासुदेव बळवंताचे अन्न आपल्या स्वत च्या देखरेखीखाली सिद्ध करून घेऊन यातील नमुना प्रथम ते करणाऱ्या स्वयपाक्यासच खावयाला दिले त्या स्वयपाक्यावर त्याचा काही वाईट

परिणाम दिसला नाही. तेव्हाच त्यांनी अन्नाच्या नव्या दरिकेवर स्वाक्षरी केली आणि ते जेवण वासुदेव बळवंतांना देण्यात आले.

मध्यंतरात अशा रीतीच्या योजनेला इतके यश येऊ लागले होते याविषयी, 'टाइम्स ऑफ इंडिया' पत्राने आश्चर्य व्यक्त केले. तर 'बॉम्बे गॅझेट'ने त्यांच्या अटकेमुळेच केवळ पुढील आपत्ती टळली असे मत देऊन टाकले. लाहोरच्या 'सिव्हिल अँड मिलिटरी गॅझेट' पत्रासारख्या पत्राचा मस्तवालपणा याच्या पलीकडे गेला आणि वासुदेव बळवंतांना उघड्या मैदानात फाशी द्यावे किंवा फटके मारावे अशी घोर शिक्षा सुचविण्याचा अधमपणा त्या पत्राच्या पांढऱ्या पायाच्या संपादकाने केला. मद्रासच्या 'मद्रास मेल' पत्राने त्यांच्या या भावी योजनेस राक्षसी कट असे संबोधून पुण्याचे लोक त्यांना अनुकूल होते या गोष्टीकडे वाचकांचे लक्ष वेधले होते.

अटकेपासून आठवडाभर चाललेल्या छळानंतरही वासुदेव बळवंतांनी आपल्या क्रांतिकारक कार्याविषयी तोंडातून 'ब्र'ही काढला नाही. त्यांच्याकडून भराभर माहिती मिळण्याचे चिन्ह दिसेना. तेव्हा तो मार्ग सोडून देऊन मेजर डॅनियल सर रिचर्ड टेंपल यांच्या विचाराने ३० जुलैला हैदराबाद येथे पुरावा गोळा करण्यासाठी परत गेला. रोहिल्यांची सेना उभारण्याचे प्रयत्न वासुदेव बळवंतांनी तेथेच केले होते. सर सालर जंग आणि शम-सुल-उमरा यांचे सर्व बळ पाठीशी असल्यामुळे तेथील त्यांच्या साथीदारांना आपण हुडकून काढू शकू असा त्यास विश्वास वाटला.

वासुदेव बळवंतांचे रूप आता पालटले होते. तेव्हा त्यांच्या नव्या स्वरूपातील एक छायाचित्र दप्तरी असावे आणि वेळ पडल्यास चौकशीत ओळख पटविण्यासाठीही त्याचा उपयोग होईल अशा हेतूने वासुदेव बळवंतांचे एक छायाचित्र घेण्याचे सरकारने ठरविले. त्यावेळी छायाचित्राची कला नुकतीच कुठे विकास पावत होती. तरीही वासुदेव बळवंतांचे छायाचित्र घेण्याचे सरकारने ठरविले यावरून त्यांच्या अशा छायाचित्राला सरकार कसे महत्त्व देत होते ते दिसते. या कामासाठी वासुदेव बळवंतांना बाहेरच्या छबीघरात नेणे अशक्य होते. त्यामुळे छायाचित्रकारालाच तुरुंगात बोलावण्याचे सरकारने ठरविले. त्या वेळी पुण्यास सरकारी वेकरीजवळ 'कँप'मध्येच किंग नावाचा उत्तम छायाचित्रकार होता. त्याचे चित्रघर सोलापूर रस्त्यावरच्या आताच्या घरक्रमांक १४ मधील खोली क्र. ४ मध्ये त्यावेळी होते.[1] तेव्हा या किंग नावाच्या छायाचित्रकारालाच सोमवारी २८ जुलैला सायंकाळी तुरुंगात नेण्यात आले आणि त्याने तेथेच वासुदेव बळवंतांचे छायाचित्र घेतले. ओळख पटावी म्हणून ब्रि. सरकारने घेतलेले राजक्रांतिकारकाचे यसे हे पहिलेच छायाचित्र असावे.

---

१ श्री प. मराठे पुण्यास आयुक्त असताना आणि श्री ग. त्रि. काळे तेथे पो. अधीक्षक असता त्यांच्या आस्थेमुळे १९७० मध्ये मला ही माहिती मिळाली.

नतरच्या दहापधरा दिवसात पुण्यात वासुदेव बळवताविषयी बाजारगप्पाचे पीक आले त्यापैकी एक गप्प अशी होती की, तुरुगात असलेल्या या बदिवानाला पाहण्यासाठी वासुदेव बळवताच्या पत्नीला तेथे नेण्यात आले पण तोच बंदिवान आपला पती होय, अशी तिची निश्चिती पटू शकली नाही वासुदेव बळवत सरकारच्या हाती सापडणार नाहीत अशी लोकाची समजूत होती तीच या भूमिकेला कारणीभूत होती पण ही बातमी खरी नव्हती बडासाठी बाहेर पडल्यानतर वासुदेव बळवताची आपल्या पत्नीशी कधीच गाठ पडली नाही

वासुदेव बळवताना पाहाण्याची युरोपियनातही स्पर्धा लागत असे अशा वेळी ते वासुदेव बळवताशी चार शब्द बोलूनही घेत पण बऱ्याच वेळा वासुदेव बळवत अशा इग्रजाना काही उत्तर न देता तुच्छतेने वागवीत एकदा एक युरोपियन क्षेत्रीय अधिकारी (फील्ड ऑफिसर) त्याना भेटण्यास गेला पण त्याच्याशी ते चक्कार शब्द बोलले नाहीत परतु काही वेळा वासुदेव बळवताचे अशा लोकाशीही सभाषण होई अशा सभाषणात त्याच्या नावाची युरोपियन लोक वाटेल तशी फिरवाफिरव करीत बडानतर नुसत्या 'वासुदव बळवत' या आवडत्या नावाने लोक त्याना सबोधू लागले आडनावाविना अशी नावे लिहिणे ही त्यावेळी प्रथाच होती परतु युरोपियनाना वासुदेव बळवत हे सर्व त्याचे स्वत चेच नाव वाटे आणि त्यामुळे ते वासुदेव बळवताना कधी बळवत वासुदेव म्हणून सबोधित किंवा नुसते बळवतही म्हणत।

त्याना पुण्यात आणल्यावर एक बडे युरोपियन अधिकारी त्याना भेटण्यासाठी त्यांच्या कोठडीपाशी गेले हे बहुधा जिल्हाधिकारी, मूर असावेत त्याच्या नावासबधीच्या वरील अज्ञानात त्यानी त्याना हाक मारली

"Good Morning, Bulwunt! How are you?" ("नमस्ते बळवतराव! काय कस काय आहे तुमच?")

वासुदेव बळवतानी त्याच्या प्रणामाचा स्वीकार करीत म्हटले "Oh very well! How are you?" ("वा! ठीक आहे आपल कस काय आहे?")

अधिकारी "Quite well; I thank you" (छान आहे मी आपला आभारी आहे!")

वासुदेव बळवत "I wish, you give orders that I should be treated better than any other prisoner here" ("मला येथील इतर कोणत्याही बदिवानापेक्षा चागल्या रीतीन वागविल जाव असा आपण आदेश द्यावा, अशी माझी इच्छा आहे")

अधिकारी: 'Oh! yes! Hem decidedly" ("वा! वा! हो, अगदी निश्चितीने")

वासुदेव बळवताच्या वडाकडे राजप्रतिनिधी लॉर्ड लिटन याचे लक्ष होतेच

"दख्खन रयत निर्बंधी 'च्या विधेयकावर मध्यवर्ती विधिमंडळात (इंपिरियल लेजिस्लेटिव्ह कौन्सिलमध्ये) बोलताना त्यानी दक्षिणेतील बंडाचा उल्लेख केला ते म्हणाले.

'Many persons will be disposed to attribute the success of these disturbances to the still unremedied conditions of the indebted ryots There is no evidence in support of it and there is much evidence which points to a very different cause of these troubles

("या दंग्याच्या यशाचे कारण म्हणून तिकडील ऋणबद्ध रयतेच्या वाईट स्थितीकडे बोट दाखविण्याची पुष्कळ जणाची प्रवृत्ती होईल तसे म्हणण्यास काही पुरावा नाही या बंडाचे अगदी निराळे कारण दाखविणारा मात्र पुष्कळ पुरावा आहे!")

वासुदेव बळवताच्या अटकेच्या मागोमाग मुंबई प्रांतभर झडत्या, अटका आणि शोध सुरू झाले ऑगस्टच्या पहिल्याच आठवड्यात काही कटवाल्याना हैदराबाद दख्खनमध्ये पकडण्यात आले रविवारी ३ ऑगस्टला वासुदेव बळवताचे क्रमांक दोनचे धाकटे बधू पांडुरंग बळवत याना कुलाबा जिल्ह्याच्या गुप्त अनुचारानी पनवेल जवळच्या खेड्यात शिरढोणला अटक केली आणि सोमवारी सकाळीच पुण्यास पाठवून दिले मंगळवारी ५ ऑगस्टला वासुदेव बळवताचे धाकटे बंधू कृष्णाजी बळवत याना मुंबई पोलिसानी अटक केली आणि पुण्यास पाठवून दिले ते सुद्धा शरीराने आणि व्यक्तिमत्वाने वासुदेव बळवताप्रमाणेच दिसत असत ते जेव्हा गाडीतून पुणे स्थानकावर उतरले तेव्हा त्याच्या हातातील हातकड्यानी आणि त्याच्या धिप्पाड व्यक्तिमत्वाने लोकाचे चटकन लक्ष वेधून घेतले आणि ते कोण याची लोक चौकशी करू लागले ते वासुदेव बळवताचे बधू आहेत असे समजताच लोक चमकले त्याना वासुदेव बळवताना शस्त्रे आणि बदुका पुरविल्याच्या आरोपावरून अटक करण्यात आली होती फणसळकर नावाच्या वासुदेव बळवताच्या साथीदारास सोलापूर येथे पकडण्यात आले आणि लेले यास कल्याण येथे अटक करण्यात आली हे दोघे काही दिवस पुण्यास खाजगीवाल्याच्या वाड्यात राहत असत त्या वाड्याची आणि त्याच्या नव्या बिऱ्हाडाची झडती घेण्यात येऊन काही कागदपत्र राजहृत करण्यात आले आणि फणसळकराच्या लेखनिकालाही एकदोन दिवसातच धुळे येथे अटक करण्यात आली पुढे सप्टेंबरच्या शेवटच्या आठवड्यापर्यंत वासुदेव बळवताच्या बडात हात असल्याचा त्याच्याविरुद्ध काहीही पुरावा मिळेना, तेव्हा त्या दोघाचा सबंध पोलिसानी बडोद्याचे पदच्युत महाराज मल्हारराव गायकवाड याच्याशी जोडण्याचे ठरविले मल्हाररावाचे महाराज प्रकरण होऊन झाली होती तीन वर्षे, तेव्हा तसे उघड कसे म्हणणार? त्यामुळे—महाराजाच्या नावावर काही लोका

त्यांनी ठकविल्याचा त्यांच्यावर संशय होता म्हणून त्यांना पकडण्यात आले होते. अशी पुस्ती पोलिसांनी या समर्थनास जोडली.

झडत्या, धरपकडी आणि अटका यांचे सत्र महाराष्ट्रांत सुरू झाले. आणि बंडात भाग घेतलेल्या देशभक्तांच्या हालचालीही त्याच वेळी येथे सुरू झाल्या. भास्कर जोशीने भास्कर ज्योतिषी किंवा काशीकर किंवा काशीवाले अशा भिन्न भिन्न नावाने वावरत वासुदेव बळवंतांच्या उलाढालीत बराच भाग घेतला होता आणि वासुदेव बळवंतांविषयी त्याला कट्टर अभिमान आणि प्रशंसा होती. या वेळी उत्तर हिंदुस्थानातील गढवालच्या राजाच्या राजसभेत ज्योतिषी म्हणून प्रवेश करून घेऊन त्याचा विश्वास त्याने संपादन केला. आपल्या कुटुंबाच्या जन्मपत्रिका करण्याचे काम राजाने त्याला दिले. बंडात राजाचे काय साहाय्य मिळते ते पाहाण्याची तो खटपट करीत होता. वासुदेव बळवंतांना पकडल्याचे वृत्त कळताच तो भूमिगत झाला. आणि बनारस मध्येच लपून बसला. त्याच्या शोधासाठी ते पोलीस अधिकारी गेले, त्यांना तो गढवाल येथे मिळाला नाही. पण तेथील राजाने त्याच्या ज्योतिषविषयक ज्ञानासंबंधी, विद्वत्तेविषयी आणि बुद्धिमत्तेविषयी अतिशय गौरवपर उद्गार काढले. त्याची राजावर चांगलीच छाप पडली होती. त्यामुळे राजा असेही म्हणाला की, भास्कर हा पक्का स्वाभिमानी आणि तापट स्वभावाचा मनुष्य आहे. त्यानतर डॅनिअलने आणि अबदुल हकने त्याला पकडण्यासाठी आकाशपाताळ एक केले. पण व्यर्थ. तरीही पुण्याच्या पोलिसांनी त्याच्यासंबंधी दिलेल्या माहितीच्या अनुरोधाने बनारसचे पोलीस गुप्तपणे त्याच्या मागावर राहिले आणि नंतर त्याला पकडण्यात दीड एक महिन्यात त्याना यश आले. पण तो इतका हुषार की, बंडात भाग घेतल्याचा काहीही पुरावा त्याने पोलिसांना मिळू दिला नाही.

गाणगापुरलाच वासुदेव बळवंतांना माणसे देण्याचे मान्य केलेल्या लोकांना पकडले होते. त्यातील रोहिले, लिंगायत आणि कोळी लोकांची मेजर डॅनिअलने ३० जुलै आणि १ ऑगस्टला कसून चौकशी केली. त्यावेळी त्यांच्यापैकी दोघांनी सांगितले की, वासुदेव बळवंतांनी जेव्हा आपल्याजवळ सशस्त्र माणसे पुरविण्यासंबंधी गोष्ट काढली, तेव्हा आपणास तसे करता येणे शक्य नाही. असेच आपण त्याना सांगितले.

१८७९ चा ऑगस्ट महिना संपत आला, तेव्हा वासुदेव बळवंतांचा अभियोग केव्हा सुरू होणार याची विचारपूस जनतेमध्ये मोठ्या प्रमाणावर होऊ लागली. त्यांचा अभियोग सत्र न्यायालयाच्या विशेष सत्रात (स्पेशल सेशनमध्ये) घेण्यात येईल. कारण हा अभियोगच सबंध सत्रात चालण्याइतका मोठा होणार आहे असे लोकांना वाटत होते. त्यांच्या अभियोगात लांब-लांबचे साक्षीदार बोलाविण्यात येणार आहेत. त्यांची जमवाजमव करण्यास सरकारास फार वेळ लागत आहे.

त्यामुळे तो सप्टेंबरच्या आरंभी सुरू होईल. आणि त्या वेळी सरकार आपल्या-वतीने मुंबईचे नाणावलेले बॅरिस्टर मॅरियट यांना या प्रश्यात बंडखोराविरुद्ध काम चालविण्यासाठी पाचारण करणार आहे असे लोक म्हणू लागले. सरकार त्या अभियोगाला इतके महत्त्व देत आहे, अशी लोकांची रास्त समजूत होती. त्याप्रमाणेच वासुदेव बळवंतांच्या पाठीशीही लोक त्याच निर्धाराने उभे राहतील अशी सरकार पक्षीयांचीही समजूत होती. त्यामुळे त्यांच्या विचारांचा आविष्कार करणाऱ्या 'टाइम्स ऑफ इंडिया' मध्ये त्याच्या पुण्याच्या वार्ताहराने प्रसिद्ध केले की,

"I have heard that Phadke is to have all the talent of Bombay Bar to defend him and that funds for his defence will be forthcoming though, from what quarter, it would be interesting to know."

("मी असे ऐकले आहे की, आपल्या बचावासाठी फडके याला मुंबईच्या विधिविशारदांच्या सर्वच्या सर्व सामर्थ्यांचा लाभ मिळणार आहे आणि त्याला लागतील ते पैसे मिळणे शक्य आहे. अर्थात ते कुठून मिळणार आहेत हे पाहणे मात्र मनोरंजक ठरेल.") महत्त्वाच्या राजकीय अभियोगात वर्गणी जमवून जनतेने देशभक्तांचा बचाव करण्याच्या आपल्या स्वातंत्र्य लढ्यातील परंपरेची ही अशी सुरुवात होती. जिवंत राष्ट्राची परंपरा अशीच असते!

वासुदेव बळवंतांच्या अभियोगाचे कामकाज पाहण्याची अँग्लोइंडियनांनीही इच्छा होती. त्यामुळे 'पूना ऑब्झर्वर' पत्रानेही आशा प्रकट केली की, वासुदेव बळवंतांचा अभियोग सुरू होण्याचा दिवस लोकांपासून गुप्त ठेवला जाणार नाही.

पुण्याचे पहिला वर्ग दंडाधिकारी आल्केड वेगर यांनी तुरुंगात जाऊन २० आणि २२ ऑगस्टला वासुदेव बळवंतांचे पहिले निवेदन घेतले आणि २५ आणि २७ ऑगस्टला दुसरे. त्यांचा अभियोग हा येथील तशा तऱ्हेचा पहिलाच राजकीय अभियोग होता. त्यांच्या हालचाली गुप्तपणे झालेल्या आणि लोकांची त्यांना अपरंपार सहानुभूती होती. त्यामुळे त्यांच्याविरुद्ध पुरावा मिळविण्यात सरकारास प्रयास पडले. आणि बराच वेळ लागला.

वासुदेव बळवंताच्या अभियोगाच्या कामाची लवकर सुरवात होण्याचे चिन्ह दिसेना, तेव्हा लोकानी मात्र त्याचे कारण थोड्याच दिवसात शोधून काढले पकडलेले गृहस्थ खरे वासुदेव बळवत फडके नसून खरे म्हणजे रत्नागिरी जिल्ह्यातील कोणी वासुदेव बळवंत काळे आहेत आणि त्याचा भाऊ शिवराम बळवत काळे याने अटकेत असलेल्या माणसाचे छायाचित्र पाहिले, तेव्हा तोही हा आपलाच भाऊ असे म्हणतो असे लोक म्हणू लागले इतकेच काय, पण पुण्याच्या जिल्हाधिकाऱ्यापर्यंत हा गोंधळ पोचला, तेव्हा खऱ्या गोष्टीचा छडा लावण्यासाठी त्यानी काळे यास अटकेत असलेल्या मनुष्याला पाहाण्याची अनुज्ञा दिली आणि तरीही त्याने तेच मत दिले, असेही लोक म्हणू लागले

आपल्या समजुतीच्या समर्थनार्थ लोकानी सरकारी पारितोषिकाच्या राजघोषणा सगळीकडे लावण्याचाही उपक्रम सुरू केला सातारा, पुणे आणि हैद्राबादला त्या तशा लागल्या आणि मग ते लोक विचारू लागले की, खरे वासुदेव बळवत जर सरकारला सापडले आहेत, तर मग त्याच्या अटकेसाठी या राजघोषणा पुन्हा का लावल्या जात आहेत?

लोकानी अशा बातम्यानी विरगुळा मिळवावा, इतका त्रास त्याना पुण्यात होत आलाही होता, आगीच्या दुसऱ्या दिवशी पुण्यात पुकारण्यात आलेली आणि नतर सैल झालेली सचारबदी पुण्यात २३ सप्टेंबरला पुन्हा पुकारण्यात आली रात्री नऊनतर जो जेथे सापडेल तेथेच पोलीस त्याला तात्काळ सकाळपर्यंत बसवून ठेऊ लागले सत्तावनच्या क्रातिकाळातही अशी आज्ञा निघाली नव्हती तेव्हा सुद्धा रात्री ११ वाजताच काय ती तोफ उडे आणि नतर सचारबदी सुरू होई परंतु बिल्ला दाखवून नागरिक त्यानतरही फिरू शकत असत आताची ही बदी पुणेकराना त्यामुळे जाचक होऊ लागली

सप्टेंबरच्या शेवटपर्यंत कच्च्या बदीत राहिल्यानतर वासुदेव बळवतानी पुण्याच्या जिल्हाअधिकाऱ्याकडे एक आवेदन धाडले त्यात त्यानी म्हटले की, मला अटक होऊन अडीच महिने झाले तेव्हा माझी चौकशी लवकर करण्याची आता व्यवस्था करावी त्याला जिल्हाधिकाऱ्याकडून उत्तर आले की, हे प्रकरण पोलिसाच्या हातात आहे आणि त्यामुळे मला त्यात हात घालता येत नाही तेव्हा वासुदेव बळवतानी वरिष्ठ अधिकाऱ्याकडेही आवेदन धाडले की, माझा अभियोग लवकरात लवकर सुरू व्हावा त्याचवेळी शक्य तो सर्व पुरावा गोळा झालेला होता आणि विधिविषयक समादेशकाकडे (लीगल रिमेंब्रन्सर) तो मतदर्शनासाठी धाडण्यात आला होता त्यामुळे वासुदेव बळवताना हे कळविण्यात येऊन सरकारचा जो निर्णय होईल तो ही तुम्हास लवकर कळविला जाईल असे त्याना सागण्यात आले

याचवेळी ३० सप्टेंबरच्या सधीस वासुदेव बळवताचे बधू कृष्णाजी बळवत

यांची चौकशी पूर्ण झाल्यामुळे त्यांना फरासखान्यात पोलीस कोठडीत ठेवण्याची आवश्यकता नाही; म्हणून त्यांना गावातील तुरुंगात (सिटीजेलमध्ये) स्थानांतरित करण्यात आले. वासुदेव बळवंतांना शस्त्रे पुरवल्याच्या आरोपावरून त्यांच्यावर अभियोग भरण्यात येईल, अशी त्यावेळी पुण्यात बातमी होती.

वासुदेव बळवंताविरुद्ध बंड करण्याचा पुरावा मिळणे दुरापास्त होऊन बसल्या-मुळे साध्या दरोडेखोराप्रमाणे त्यांचा अभियोग चालविणे सरकारला भाग आहे. आणि ऑक्टोबरच्या मध्यास हा महत्त्वपूर्ण अभियोग लवकरच पुण्यात सुरू होईल, असेही यावेळी प्रसिद्ध झाले. हे वृत्त प्रसिद्ध करताना धैर्यवान बळवंतांना (करेजिअस बळवंतांना) आता फार दिवस तुरुंगात खितपत पडावे लागणार नाही अशी ग्वाही सरकारपक्षीय वृत्तपत्रांनी दिली.

खरे पाहता, सरकारने चौकशीचे काम रेंगाळू दिले नव्हते. सर रिचर्ड टेंपल यांनी स्वत: मेजर वेस्टमकॉट आणि इतर अधिकाऱ्यांना पंढरपूरला जाऊन तेथे वासुदेव बळवंताविरुद्धच्या पुराव्याचे धागेदोरे पहाण्यात डॅनिअलला सहाय्य कर-ण्याचा २५ जुलैलाच आदेश दिला. मेजर डॅनिअलने गोळा केलेला सर्व पुरावा, मुंबई सरकारचे हंगामी सचिव न्यूजंट यांनी विधिविषयक समादेशक जे. आर. नेलर यांच्यापुढे पुण्याला २७-ऑगस्ट १८७९ लाच ठेवला. वासुदेव बळवंतांना देहांत शिक्षा मिळावी अशी सरकारला फार उत्कंठा होती. त्यामुळे वरील कागदपत्रात न्यूजंट यांनी नेलर यांना त्यांचे मत विचारले की, "कोणत्या आरोपावरून वासुदेव बळवंतावर अभियोग भरावा, अधिराज्याविरुद्ध (स्टेटविरुद्ध) केलेल्या अपराधां-वरून त्यांच्यावर अभियोग भरण्यात आला तर, ते दोषी ठरून दंडित होण्यास पुरेसा असा पुरावा आहे काय, आणि जर त्यांना दंडित करून घेण्याची निश्चिती असेल तर त्यांना फाशीची शिक्षा ठोठावण्यात येईल ही शक्यता आहे काय?"

परंतु १ सप्टेंबरला वासुदेव बळवंतांच्या भूमिगत दिवसांतील हालचालींच्या प्रतिवृत्ताच्या वर्तमानपत्रातील प्रसिद्धीमुळे राज्यपालांच्या कार्यकारी मंडळात चांगलीच खळबळ आणि संताप उडाला. मंडळाचे एक प्रमुख सदस्य ॲशबर्नर यांनी ती बातमी त्या वृत्तपत्राला कशी मिळाली त्याची कसून चौकशी व्हावी असे सुचविले. त्याप्रमाणे लागलीच मेजर डॅनिअलचे त्यासंबंधी स्पष्टीकरण मागण्यात आले. त्याने स्पष्टीकरण देताना आपण काहीही माहिती वृत्तपत्रांना दिल्याचा इन्कार केला. पण उलट पुस्ती जोडली की, एका सद्गृहस्थाने आपणास तो अबदुल हक याच्याकडून मिळाल्याचे म्हटले आहे. पुढे त्याने म्हटले की, प्रसिद्ध झालेला, इतक्या बारीक-सारीक गोष्टी सांगणारा आणि सविस्तर स्वरूपाचा वृत्तांत अबदुल हकनेच सांगितला.

असला पाहिजे. किंवा खरे म्हणजे पाठविलाच असला पाहिजे. राज्यपालांनी या स्पष्टीकरणाचा स्वीकार केला. आणि असा आदेश दिला की, अबदुल हकला यापुढे त्या प्रकरणासंबंधी शक्य तेवढी कमीत कमी माहिती मिळावी. डॅनिअलचे हे लेखी स्पष्टीकरण मला स्वतःला पाहावयाला मिळाले आहे. हे स्पष्टीकरण डॅनिअलकडून मागण्यात आले त्यावरून ब्रिटिश राज्यव्यवस्थेत त्या जुन्या काळातही किती पद्धत आणि शिस्त होती ते दिसते.

२८ सप्टेंबर १८७९ पर्यंत विधीविषयक समादेशक नेलर हे आपले मत वर धाडू शकले नाहीत. ते देताना त्यांनी, मिळालेल्या पुराव्यावरून फेब्रुवारी ते जुलै १८७९ पर्यंतच्या वासुदेव बळवंताच्या हालचालींचा वृत्तांत लिहून काढला आणि तो सरकारकडे पाठविताना म्हटले की, "वासुदेव बळवंतांवर कोणत्या आरोपाखाली अभियोग चालवावा, ते ठरविताना सरकारला आणि तो चालविण्याचे काम ज्यांच्यावर येऊन पडेल त्या अधिकाऱ्यांना अशा दोघांनाही तो उपयोगी पडेल.[१]

नेलर पुढे म्हणाले की, वासुदेव बळवंतांविरुद्ध अगदी निश्चितीने सिद्ध करता येईल असा पहिला आरोप म्हणजे भारतीय दंड विधानाच्या परिच्छेद '४०० खाली "सराईतपणे दरोडे घालणाऱ्या लोकांच्या टोळीचा सदस्य असल्याचा." आणि त्या विधानाच्या परिच्छेद ३९५ खाली "काही ठिकाणी दरोडे घातल्याचा" हा होय. त्यातील पहिल्या आरोपाखाली आरोपीला जन्मठेप काळ्यापाण्याची शिक्षा मिळू शकेल. आणखी पुढे नेलर म्हणाले, "निरनिराळ्या दरोड्यांमध्ये वासुदेवासमवेत भाग घेणाऱ्या रामोश्यांनी आणि इतरांनी आपल्यापुढे काही उद्दिष्ट ठेवले असले तरी वासुदेवाच्या दृष्टीने तरी दरोडे हे केवळ ते उद्दिष्ट साधण्याचे साधन होते. आणि तेच केवळ त्याचे उद्दिष्ट नव्हते. तो ब्राह्मण आणि काही शिक्षण झालेला आणि समाजात काही स्थान असलेला मनुष्य आहे. ही गोष्टही तो केवळ लूट मारण्यासाठीच रामोश्यांसमवेत फिरत नव्हता, असे दाखविण्यास पुरेशी आहे...... त्याच्या सगळ्या प्रयत्नांचे खरे उद्दिष्ट, प्रथमपासून शेवटपर्यंत त्याने सतत मनात बाळगला तो हेतू त्याच्या दैनंदिनीत आणि आत्मचरित्रांत दोन्ही लिखाणात संशयातीत अचूकपणे विषद केलेला आहे. बंड करून इंग्रजांचा उच्छेद करावयाचा हाच त्याचा प्रयत्न होता."

"काहीही झाले तरी निदान वासुदेवाचा तरी राणीविरुद्ध युद्ध पुकारण्याचाच पूर्ण हेतू असला," तरी युद्ध पुकारण्याचा प्रत्यक्ष प्रयत्न केला गेला नाही. आणि भारतीय दंडविधानाच्या १२१ या परिच्छेदाखाली फाशीची शिक्षा होणारा अपराध घडलेला नाही, असे म्हणून नेलरनी सरकारची निराशा केली. नेलर पुढे म्हणाले की, तरी पण *अधिराज्याविरुद्ध दंड विधानाच्या १२१ अ १२२ आणि १२४ अ या*

१ गोपनीय पत्र क्र. (११४०) (१८७९), जॅ. डी. व्हॉल्यूम क्र. ५८-५९ (१८७९-८०) मुंबई सरकारचे कागदपत्र.

परिच्छेदांखाली अनुक्रमे "युद्ध पुकारण्याचा कट केल्याचा, युद्ध पुकारण्यासाठी माणसे, शस्त्रे आणि दारुगोळा जमवून किंवा इतर रीतीनेही सिद्धता केल्याचा आणि राजद्रोहाचा असे अपराध सिद्ध करण्याइतका भरपूर पुरावा आहे." त्यांनी मग असे मत दिले की "त्यापैकी एका तरी परिच्छेदाखाली त्याला शिक्षा होईल, यासंबंधी मला काहीही संशय नाही. आणि मला असे वाटते की, या सर्व परिच्छेदांखालीच त्याला शिक्षा झाली पाहिजे. त्यापैकी कोणत्याही शिक्षेचा परिणाम जन्मठेप काळेपाणी हाच होईल."

नेलर पुढे म्हणाले, "अशा प्रकारच्या प्रकरणात निर्णयाप्रत येताना राजकीय दृष्टींनी विचार करावाच लागतो याची मला जाणीव आहे. परंतु माझ्यापुढे असलेल्या माहितीप्रमाणे मला आजमावता येते त्याप्रमाणे पहाता, त्याला शिक्षा होणे हे ठरल्यासारखेच आहे. आपल्या सरकारविरुद्ध देश उठविण्याचा वासुदेवाचा प्रयत्न किती शोचनीयपणे अयशस्वी झालेला आहे, हे लोकांना कळू देण्यात काही हानी तर होणार नाहीच, पण उलट पुष्कळ हितच होईल!"

राज्यपालांच्या कार्यकारी मंडळाचे दुसरे एक सदस्य रावेनक्रॉफ्ट यांनी चोवीस तासात हे प्रकरण राज्यपालांपुढे निर्णयासाठी पाठविले. रावेनक्रॉफ्ट यांनी विधिविषयक समादेशकांच्या दृष्टिकोणाला दुजोरा दिला आणि म्हटले : "भारतीय दंड विधानाच्या १२१ या परिच्छेदाखाली आरोप ठेवण्यात यावा, असे मला वाटत नाही. कारण राजकीय अभियोग फसणे हे नेहमी धोकादायक असते."

राज्यपालांनी मग आपला निर्णय देताना म्हटले : "विधिविषयक समादेशकांच्या मताला मान्यता देणाऱ्या रावेनक्रॉफ्ट यांच्याशी मी सहमत आहे. आरोपांच्या दोन्ही गटाखाली त्याच्यावर अभियोग भरावा." नंतर त्याखाली त्यांनी आपली RT ही अद्याक्षरे केली !

राज्यपालांनी याप्रमाणे त्या प्रकरणात शेवटचा निर्णय दिला, तरी त्यांच्या कार्यकारी मंडळाच्या सदस्यात वासुदेव बळवंतांवर राजकीय आरोप ठेवावयाचे की नाही या संबंधात उघड उघड मतभेद होता. देशभक्तावरील अभियोग ही त्याच्या राष्ट्राच्या दृष्टीने अभिमानाची नि आदराची घटना असते. आणि आपल्या राष्ट्राच्यावतीने बोलणारा प्रतिनिधी म्हणून त्याचा थोरपणा त्याच्या योगाने जगाच्या प्रत्ययाला येतो. वरील प्रकरणात मतभेद दाखविणारे सदस्य अॅशबर्नर याना हे सत्य चांगले समजले होते. वासुदेव बळवंतांनी आपल्या बंडाने ब्रिटिश सत्ताधाऱ्यांना हैराण केले होते. आणि जगाच्या दृष्टीने त्यांच्या बंडाला कसे महत्त्व होते, तेही अॅशबर्नर याचे हे मत दाखविते. अॅशबर्नर म्हणाले : "आपले उद्दिष्ट या उलाढाली आणि त्रासदायक माणसाला जन्मठेप काळ्या पाण्यावर पाठवून घालवून देणे हे आहे. इतर वेळी शिक्षा झाल्यामुळे त्याला मिळाले नसते ते महत्त्व, आपण जर

त्याच्यावर राजकीय आरोपावरून अभियोग भरला, तर आपण त्याला देऊ त्याची एखाद्या हुतात्म्याच्या उचीवर प्रतिष्ठापना होईल आणि दरखनमधील सर्व राजद्रोही वृत्तीच्या लोकाची सहानुभूती त्याला मिळेल "

' म्हणून प्रथमत मी त्याच्यावर पुराव्यातील दरोड्याच्या आरोपावरूनच अभियोग भरीन, राजकीय आरोपावरून नव्हे त्याला जर जन्मठेप काळचापाण्याची शिक्षा झाली तर आणखी काहीही कारवाई करणे अनावश्यक ठरेल पण जर याहून सौम्य शिक्षा त्याला ठोठावण्यात आली, तर आपण याहून अधिक गभीर आरोप त्याच्यावर ठेवावे

' आपण जर त्याच्यावर राजकीय आरोपावरून अभियोग चालविला तर त्याचे आतरराष्ट्रीय महत्त्वाच्या अभियोगात रूपातर करण्याची आणि आणखी राजद्रोहाचे बीजारोपण करण्याची सधी साधण्याचा फडके प्रयत्न करील " (Phadke will take the opportunity of making an international trial of it)

वासुदेव बळवताच्या स्वातत्र्याच्या इतिहासातील स्थानाचे हे मूल्यमापन किती रास्त होते! पण राज्यपालाचे मत अर्थातच निर्णायक ठरले त्यानी आपल्या कार्यकारी मडळाच्या बैठकीत ६ ऑक्टोबर १८७९ ला शेवटी निर्बंधाने आवश्यक असे, आधी राज्याविरुद्ध करण्यात आलेल्या आरोपाखाली अभियोग भरण्यास समोदन देणारा ठराव समत केला आणि "थोडाही विलब न लावता वासुदेव बळवत फडके याच्याविरुद्धचा अभियोग सुरू करण्यात यावा," असा आदेश दिला त्या ठरावात विधिविषयक समादेशकाचेही त्याच्या मौलिक प्रतिवृत्ताविषयी आभार मानण्यात आले "[४]

मुबई सरकारचे हगामी सचिव न्यूजट यानी तो ठराव मग विधिविषयक समादेशकाकडे पाठवून, या महत्त्वाच्या प्रकरणात सरकारची बाजू योग्य प्रकारे माडली जावी म्हणून आवश्यक त्या गोष्टी कराव्या असे त्याना कळविले विधिविषयक समादेशकानी मुबईच्या उच्च न्यायालयातील सरकारी वकील नानाभाई हरिदास याना सरकारच्यावतीने अभियोग चालविण्याचा आदेश दिला त्यातील हेतू रेवनश्रॉफ्ट यांच्या पुढील अभिप्रायावरून कळत ते म्हणतात " ठीक आहे. मला असेही वाटते की, या प्रकरणात राणी सरकारच्या वतीने एखाद्या युरोपियन अधिकाऱ्यापेक्षा एखाद्या वकिलाने (म्हणजेच त्या दिवसात हिंदी माणसाने) उभे रहाणे हे अधिक चागले होय माझ्या म्हणण्याचा अर्थ असा की, त्यामुळे सरकार त्या अभियोगाविषयी अवास्तवपणे सचित होते किंवा तो एखाद्या साहेबावाचून दुसऱ्या माणसाच्याही हातात देण्यास भीत होते असे दिसणार नाही "

४ मुबई सरकारचा ठराव (जी आर) क्र ६००६ (१८७९)

राज्यसरकारविरुद्ध केलेल्या अपराधांवरून वासुदेव बळवंतांवर अभियोग भरण्यासाठी औपचारिक संमोदन देणारा सरकारी ठराव "मुंबईच्या किल्ल्या"तून १८ ऑक्टोबर १८७९ ला पुण्याला धाडण्यात आला. वासुदेव बळवंतांनी भोर संस्थानात घातलेल्या दरोड्यासंबंधात त्यांच्यावर अभियोग भरण्यासाठी त्या संस्थानाच्या सातारा येथील राजकीय प्रतिनिधीनेही (पोलिटिकल एजंटनेही) स्वतंत्र संमोदन दिले.

वासुदेव बळवंतांचा अभियोग लवकरच चालू होणार असा रंग दिसताच त्यांचा बचाव कोण करणार याकडे सर्वांचे डोळे लागले. कारण त्यांच्याविषयी आपुलकी वाटणारा एखादा वकील त्यांचे वकीलपत्र घेण्यास पुढे आलाच तर सरकारची केवढी अवकृपा त्याला आपल्यावर ओढवून घ्यावयाला लागणार होती! स्वतः वासुदेव बळवंतांनी आपल्या बचावाविषयी काही खटपट केली नव्हती. त्यांच्या प्राथमिक चौकशीच्या वेळी विलंबानेच त्यांचे वकील न्यायालयात आले आणि तोपर्यंत अभियुक्त क्र. १ यास (वासुदेव बळवंतांना) वकील नाही, अशी भाषाही न्यायालयात उच्चारली गेली, त्यावरूनच हे सिद्ध होते.

सर्वसामान्य जनता त्यामुळेच वासुदेव बळवंतांच्या अभियोगाचे काम त्यांना कोणीही वकील नसतानाच चालणार, असे धरून चालली होती. पण पुण्यात सच्चे देशभक्त अजून जिवत होते. त्यांच्यामुळे आपल्यावर आपत्ती ओढवली तरी त्यांच्या विरुद्ध चाकोरी बाहेर जाऊन यावगा शब्द न काढणारे माधवराव रानडे हे तेथेच होते. कोणत्याही आरोपीला न्यायालयात बचावाचे पूर्ण साहाय्य मिळाले पाहिजे, आणि वासुदेव बळवंतांसारख्या देशभक्ताला ते साहाय्य न मिळणे, हे तर न्याय आणि देशभक्ती या दोहोविरुद्ध पाप ठरले असते, याची एक निष्णात न्यायाधीश आणि देशभक्त म्हणून रानड्यांना जाणीव होती. संकटांत सापडलेल्या परिचित मित्रासंबंधीही त्यांचे काही कर्तव्य होते.

त्यामुळे माधवराव रानड्यांच्या गोटात ही चर्चा अगदी शेवटच्या दिवसांपर्यंत चालली होती. सार्वजनिककाकांच्या हालचाली रानड्यांना त्यांची माहिती असल्यावाचून घडत नसते. "उद्या तरी त्यांचा बचाव करण्यास कोणीतरी न्यायालयात उभे राहिले पाहिजेच ना?" या त्या गोष्टीतील निरुत्तर करणाऱ्या प्रश्नाचे आव्हान सार्वजनिककाकांनी स्वीकारले. आणि वासुदेव बळवंतांच्या न्यायालयातील बचावाचा भार आपल्या मस्तकावर घेतला. त्यांनी हा निर्णय रानड्यांच्या संमतीनेच घेतला होता. त्यांच्या निर्णयाच्या भयानक परिणामांची कल्पना त्यांच्यापुढे मांडताना: "तुमच्या धाडसाचा परिणाम तुमच्या लक्षांत आला आहे काय? असा पोक्त प्रश्न एकाने काकांना विचारलाही. पण काकांनी त्याला ताडकन उत्तर दिले, "परिणाम काय व्हावयाचा आहे? येऊन जाऊन सरकार रागावण्याची भीती, पण

सरकार अतिशय रागावले तर वासुदेव बळवंताबरोबर गणेश वासुदेवाला (त्यांचे स्वत:चे नाव) ते फासावर लटकावील यापेक्षा सरकारच्या हाती जास्त काय आहे? आणि त्यालाही माझी सिद्धता आहे."[५] या निर्णयाने काकांनी एक धैर्यशाली, उदात्त परंपरा या राष्ट्रात निर्माण केली! क्रांतिकारकांच्या अभियोगात त्यामुळेच छातीच्या वकिलानी आपली नेहमीची प्रकरणे टाकून देऊनसुद्धा क्रांतिकारक अभियुक्तांच्या बचावाचे काम न्यायालयांत कित्येकदा केले. घोटवडेकर, माधवराव नामजोशी आणि भिकाजीपंत हर्डीकर यानीही या कामी काकांकडे खटपट केली होती.

होता होता बुधवारी २२ ऑक्टोबरला वासुदेव बळवंतांच्या आणि त्यांच्या सहबंद्यांच्या प्राथमिक चौकशीची सुनावणी पुण्यात सुरू होण्याचे निश्चित झाले. बुधवारवाडा जळल्यामुळे त्यात असलेले नेहमीचे पहिला वर्ग दंडाधिकारी यांचे न्यायालय त्यांच्या चौकशीच्या सुनावणीसाठी मिळण्यासारखे नव्हते. तेव्हा ते न्यायालय जिल्हाधिकाऱ्यांच्या नव्या कार्यालयात हालविले गेले आणि तेथे पहिला वर्ग दंडाधिकारी आल्फ्रेड केसर यांच्यापुढे जिल्हाधिकाऱ्यांच्या कार्यालयाच्या पहिल्या माळ्यावर ती वरील दिवशी सुरू झाली. पकडलेल्या लोकांपैकी वासुदेव बळवंतांसह एकंदर सोळा जणांवर हे काम चालविण्यात येण्याचे ठरवून इतरांना सोडून देण्यात आले.

त्या दिवशी वासुदेव बळवंतांना पाहाण्यासाठी वरील न्यायालयाकडे शेकडो प्रेक्षकांनी सकाळपासूनच गर्दी करून सोडली. त्या वास्तूच्या सभोतालच्या पडव्या, चौक आणि पटांगणही प्रेक्षकांनी भरून गेली. न्यायालयात पोलिसांचा आणि साहाय्यक जिल्हाधिकारी कँपबेल यांच्या हाताखाली युरोपियन सोजिरांचा कडक पहारा होता. त्या दिवशी न्यायालयात अभियोगाशी प्रत्यक्ष संबंध असलेले सरकारी अधिकारी आणि वकील आणि बचावपक्षाचे वकील यांनाच फक्त प्रवेश देण्यात आला. वृत्तपत्रांच्या वार्ताहरांनाही आत सोडण्यात आले.

न्यायालयात दंडाधिकाऱ्यांच्या प्राथमिक चौकशीतील निशाण्या म्हणून प्रविष्ट होणाऱ्या वस्तूंचा प्रेक्षणीय संच दिसत होता. सरकारच्यावतीने काम चालविण्यासाठी मुंबईच्या उच्च न्यायालयातील वकील नानाभाई हरिदास हे उभे होते. आरोपींना पोलिसांच्या आणि सैनिकांच्या कडक वेढ्यात हातकड्या घालून न्यायालयात आणण्यात आले. वासुदेव बळवंतांच्या हातातही त्या ठोकलेल्या होत्या.

चौकशीच्या सुनावणीचे काम सुरू होताच दंडाधिकाऱ्यांनी प्रारंभीच विचारले:
"वासुदेव बळवंतांचा बचाव कोणी करणार आहे काय?"
नानाभाई हरिदास: "मला माहीत नाही, महाराज!"

न्यायालयांतील प्रेक्षकांना हे ऐकून धक्का बसला. तोच न्यायालयाच्या प्रवेश-

५ प्रा. न. र. फाटक : "न्या. रानडे यांचे चरित्र" पृ. ३२०

द्वारातून पुणेकरांचे आवडते सार्वजनिककाका देशभक्ती जेथे संकटात असेल तेथें धावून जाण्याच्या आपल्या स्वभावाप्रमाणे घाईतच न्यायालयात शिरले. ते वकिलां-च्या जागेकडे जाण्यास निघाले, तेव्हा प्रेक्षकांचे आधाशी डोळेही त्यांची हालचाल उत्कंठेने पाहू लागले. काका आपल्या जागेवर जाऊन उभे राहिले. आणि धीरगंभीर आवाजात दंडाधिकाऱ्यांना म्हणाले : "आरोपी क्रमांक १ वासुदेव बळवंत याचे वकीलपत्र घेण्यासाठी मी आलेलो आहे."

प्रशांत सागरात विद्युल्लतेचा गोळा पडावा, याप्रमाणे त्यांचे हे वाक्य न्याया-लयातील शांततेत कडाडले आणि त्यानंतर त्या सागरात प्रचंड लाटांचा खळबळाट उडावा त्याप्रमाणे लोकांच्या अंतःकरणात उदात्त भावनांची खळबळ उडाली. वासुदेव बळवंतांनाही असे काही होईल अशी विशेष कल्पना नव्हती. त्यांनी काकां-कडे पाहिले आणि कृतज्ञतेने त्यांचे हृदय भरून आले. पुण्याच्या नेत्यानी शेवटी आपले तेजस्वी नेतृत्व अशा रीतीने दाखविले म्हणून चमकलेल्या दंडाधिकाऱ्यानीही काकांच्या वकीलपत्राला संमती देऊन, अभियोजकांना पुढील कामास सुरुवात करण्यास सांगितले.

आज मेजर डॅनिअल आणि इतर अकरा साक्षीदारांच्या सरकारच्यावतीनें साक्षी झाल्या. डॅनिअलने वासुदेव बळवंतांच्या अटकेचा वृत्तांत सागून दंड विधानाच्या भिन्नभिन्न परिच्छेदाखाली त्यांच्यावर आणि त्यांच्या साथीदारांवर अभियोग चाल-विण्यास लागणारी समोदने देणारी कागदपत्रे त्यांनी पुढे केली. त्यात अधिराज्या-विरुद्ध केलेल्या अपराधांसंबंधीच्या आरोपांवर अभियोग चालविण्यास लागणारी संमोदने विशेष होती. त्यानंतर पाटणकर आणि धारवडकर या दोन्ही विद्यार्थ्यांनी वासुदेव बळवंतांचा मेव्हणा वल्लाळ किंवा गणेश काशीनाथ कुंटे याने आणि अर्जुना आणि गणू या दोन रामोश्यांनी वासुदेव बळवंतांच्या पुण्यातील आणि इतर ठिका-णच्या हालचाली सांगणाऱ्या साक्षी दिल्या. गणू रामोशी हा एका छाप्यात प्रत्यक्ष छापेकरी होता. त्यानतर धामारीच्या गावकऱ्यांच्या तेथील छाप्यासंबंधीच्या साक्षी होऊन आजचे कामकाज संपले. तेव्हा दंडाधिकाऱ्याने घोषित केले की, प्रत्यही आवश्यक तर उपाहाराची सुटी न घेताही, पण लवकरात लवकर ही सुनावणी आपण संपविणार आहोत.

सकाळी अनपेक्षितपणे आणि विलंबानेच आलेल्या सार्वजनिककाकांनी मग न्यायालयात वासुदेव बळवंतांची भेट घेतली आणि चौकशीच्या कामकाजासंबंधी त्यांच्याशी चर्चा केली. त्यांची वासुदेव बळवंतांशी बऱ्याच दिवसानंतर भेट होत होती. आणि ती त्यांच्या बंडानंतर त्यांच्याशी होणारी त्यांची पहिलीच भेट होती. त्यामुळे त्यांनी वासुदेव बळवंताशी इतरही गप्पागोष्टी आता केल्या.

न्यायालयाच्या आवारात उसळलेली लोकांची गर्दी पाहून दंडाधिकाऱ्यांनी

सर्व लोकांना त्या आवारातून प्रथम बाहेर काढून मगच वासुदेव बळवंताना बंदि-गृहाकडे नेण्यात यावे, असा अधिकाऱ्यांना आदेश दिला. वासुदेव बळवंतांनीही त्यामुळे आपल्याला लोकांच्या गर्दीतून बाहेर जायला सुटी वाट तरी मिळेल या विचाराने त्या आदेशाचे स्वागतच केले. आपले शृंखलाबद्ध हात उंचावून त्यांनी आपल्या साथीदारांना प्रथम पुढे चलण्यास सुचविले आणि त्यांनी तसे करताच मग ते पुढे चालू लागले. बंदिगृहात वासुदेव बळवंतांनी आणि इतर बंद्यांनी निसटून जाण्याचा कट रचू नये म्हणून यानंतर त्यांना इतर बंद्यांपासून निराळे काढण्यात आले. आणि त्यांची घोरपडी येथील सैनिकी कोठडयातील (मिलिटरी बरॅक्समधील) एकीत पाठवणी करण्यात आली. बाकीच्या बंद्यांना मात्र त्यांच्या नेहमीच्या कच्च्या बंदीच्या कोठड्यांकडे नेण्यात आले.

वासुदेव बळवंताचे बंधू कृष्णाजी बळवंत यांच्यावर त्याच प्रकरणात अभि-योग भरण्याइतका पुरावा नसल्याने आजच त्यांना प्रतिभूवर सोडण्यात आले. या दिवशी न्यायालयाजवळ उसळलेली गर्दी पाहून 'पूना ऑब्झर्वर' पत्र म्हणाले की, "जिल्हाधिकाऱ्यांच्या कार्यालयाच्या आवारात लोकांची फार मोठी दाटी उडाली होती. आणि वासुदेव बळवंताच्यावरील अभियोगाने ते फार विचलीत झालेले दिसले."

दुसऱ्या दिवशी गुरुवारी २३ ऑक्टोबरला न्यायालयाभोवती आदल्या दिवशी-पेक्षाही अधिक गर्दी उसळली. त्या दिवशी या चौकशीचे कामकाज पाहाण्यास आजू-बाजूच्या खेड्यांतीलही शेकडो लोक आले होते. वासुदेव बळवंतांच्या नावाने युरोपियनांमध्येही एक प्रकारचे कुतूहल उत्पन्न झाले होते. त्यामुळे तेही आज न्यायालयात बऱ्याच संख्येने उपस्थित होते. आज आधीच्या एका अभियोगात शिक्षा झालेल्या वासुदेव बळवंतांच्या एका साथीदाराची साक्ष झाली. परंतु साक्षीदाराच्या पिंजऱ्यात शिरल्यावर त्यांच्याविरुद्ध जाणाऱ्या गोष्टी सांगण्यास तो सिद्ध होत नव्हता. तेव्हा दंडाधिकाऱ्यांनी त्याला म्हटले की, "तू खरं सांगितलंस तर तुला आणखी काहीही शिक्षा होणार नाही. भिऊ नको ! खरं काय ते सांग." पण असे वारंवार आश्वासन देऊनही वासुदेव बळवंतांचा आपला काही संबंध नाही, आप-णास त्यांनी काहीही वेतन दिले नाही, आपली त्यांची ओळखही नाही, असेच त्याने सांगितले! दुसऱ्या एका दंडित रामोशी साक्षीदाराने तर काहीही सांगण्याचेच न्यायालयात नाकारले. त्यामुळे त्याला माघारी तुरुंगात पाठविण्यात आले. आपल्या नेत्याविषयीची या रामोश्याची ही निष्ठा पाहून न्यायालयात मोठीच खळबळ उडाली.

न्यायालयात आणि बाहेर सशस्त्र संरक्षकांचा वेढा होता. तरीही पोलिसांना आणि युरोपियन अधिकाऱ्यांना तेथे निर्धास्त वाटत नव्हते. त्यामुळे न्यायालयात

येऊन बसल्यावरसुद्धा वासुदेव बळवंतांच्या हातातील बेड्या त्यानी काढल्या नाहीत. वासुदेव बळवंतांनी पहिल्या दिवशी त्याविषयी गाऱ्हाणे केले नाही. त्यामुळे दंडाधिकाऱ्याच्याही ते लक्षात आले नाही. परंतु वरील रामोश्याची साक्ष पटल्यावर दंडाधिकाऱ्यांचे तिकडे आज लक्ष गेले, तेव्हा एकट्या वासुदेव बळवंतांच्याच हातात बेड्या आणि तेही न्यायालयात कामकाज चालू असता, ते बसले असताना, हे पाहून त्यांचेही पित्त खवळले आणि त्रासून त्यांनी पोलीस अधिकाऱ्यांना आज झाडले. नंतर ते त्यांना म्हणाले, "कधीही माझ्या आज्ञेवाचून न्यायालयात आरोपीला त्याच्या हातात बेड्या घालून बसवू नका." वासुदेव बळवंत : "कालसुद्धा सबंध दिवसभर माझ्या हातात हातकड्या होत्या." दंडाधिकारी : "हो ! हो ! खरंच ! माझ्या ते लक्षातच आलं नाही." दंडाधिकाऱ्यांनी मग वासुदेव बळवंतांच्या हातातील बेड्या काढून टाकण्याची पोलिसांना आज्ञा केली आणि त्यांनी त्या घाईघाईने काढून टाकल्या.

त्यानंतर पुण्याच्या लघुवाद न्यायालयात (स्मॉल कॉज कोर्टात) लेखनिकाचे काम करणारे महादेव गोविंद करमरकर यांची आणि छापे पडलेल्या काही गावांच्या गावकऱ्यांच्या साक्षी झाल्या. यानंतर जो साक्षीदार सरकारच्यावतीने साक्ष देण्यासाठी पुढे आला तो अभियोजकांच्या हातातील महत्त्वाचा आणि मौल्यवान साक्षीदार होता. वासुदेव बळवंतांच्या हालचाली गुप्तपणे झालेल्या होत्या. सरकारी पक्षाला त्याचा पुरावा सहज मिळणे अशक्य झाले होते. तो त्याचा पेच या साक्षीदाराने सोडविला. त्याचे नाव रंगोपंत मोरेश्वर महाजन. त्याच्याकडेच वासुदेव बळवंतांनी भूमिगत आयुष्यातील अज्ञातवासाचे बरेच दिवस काढले होते. आणि आपल्या योजना आखल्या होत्या. खरे म्हणजे तोही त्यात सहभागी झालेला होता. त्यानेच आता अन्वेषक अधिकाऱ्यांना आणि अभियोजकांना हवी होती ती माहिती वासुदेव बळवंतांविरुद्ध आपल्या साक्षीत सांगितली.

हैदराबादचे साक्षीदार सोडले तर प्राथमिक चौकशीत आणखी साक्षीदार आपण बोलाविणार नाही, असे सरकारी वकिलानी या ठिकाणी सांगितले. आणि ते अजून पुण्यास आलेले नाहीत असे म्हटले.

दंडाधिकारी : "ते साक्षीदार जर उद्या आले तर मी उद्याही चौकशीचे काम पुढे चालवीन." दंडाधिकाऱ्यांनी मग चौकशीचे काम शनिवार दि. २५ ऑक्टोबरपर्यंत स्थगित केले.

दुसऱ्या दिवशी शुक्रवारी २४ ऑक्टोबरला दसरा होता. विजयादशमीचा हा दिवस वासुदेव बळवंतांना घोरपडीच्या कोठडीतच काढावा लागला. तो दिवस उजाडताच मागील सात-आठ वर्षातील तशाच दिवसाची त्यांना आठवण झाली. त्याच दिवशी काही वर्षे सोनेलुटीच्या समारंभात आपण केलेल्या स्वराज्य स्थापनेच्या

निरनिराळ्या प्रतिज्ञाही धुळीस मिळालेल्या या दसऱ्याच्या दिवशी आपणास पाहा-व्या लागत आहेत, याचे त्यांना वाईट वाटले!

या दिवशी सकाळी पुण्यात मोठी खळबळ उडाली. कारण आज सकाळीच आदितवार पेठेतील फडके वाड्यास मोठी आग लागली. मेजर डॅनिअल आणि दंडाधिकारी केसर हे अग्निशामक यंत्रणेसह युरोपियन सैनिक घेऊनच आगीच्या स्थळी धावले. आणि बऱ्याच प्रयासानतर त्यांनी ती आटोक्यात आणली. पण वासुदेव बळवंतांविरुद्धच्या प्राथमिक चौकशीचे कामकाज चालू असतानाच ही आग लाग-ल्यामुळे पुण्यात तिच्या कारणांविषयी निराळेच तर्क प्रसृत होऊन मोठी खळबळ उडाली.

हैद्राबादचे रोहिले साक्षीदार शनिवारी २५ ऑक्टोबरला सकाळी पुण्यास आले. आणि मग शनिवारी तिसऱ्या दिवशी प्राथमिक चौकशीच्या सुनावणीचे काम पुढे चालू झाले. तेव्हाही लोकांची गर्दी तशीच होती. त्या दिवशी रंगनाथ मोरेश्वर महाजन यास साक्षीसाठी पुन्हा बोलविण्यात आले. त्याने भास्कर ज्योतिषी यांचे पत्र वाचून दाखविले. त्यातील वासुदेव बळवंत हे एक असामान्य देशभक्त आहेत आणि त्यांनी आपले सर्व जीवन देशकार्यासाठी वेचिले आहे, हे उत्तर न्यायालयात वाचले जात असता लोकांच्या मनात त्यांच्याविषयी प्रेमाच्या उर्मी उमटल्या.

नतर हैद्राबादच्या पाच रोहिल्यांचा महत्त्वाच्या साक्षी झाल्या. त्यात वासुदेव बळवंतांनी आखलेल्या नव्या सेनेच्या उभारणीच्या योजनेचा वृत्तांत आणि त्यासाठी जुलै १८७९ मध्ये झालेल्या वाटाघाटी आणि लेखी ठराव पत्रकाचा वृत्तांत साक्षी-दारांनी सांगितला. या साक्षीदारांची उलट तपासणी घेण्यात आलीच पाहिजे, कारण नाहीतर ते येथे काय सांगितले गेले ते एकमेकांना सांगतील आणि 'सेशन्स कोर्टात' माझी बाजू विघडवून टाकतील, असे वासुदेव बळवंतांनी उभे राहून म्हटले.

दडाधिकारी : "तुझ्या वतीने तुझे वकील येथे आहेत आणि त्यांनीच या संबंधात बोलावे हे बरे होईल. श्री. जोशी यांनी उलट तपासणी घेतली तर तुला ती घेऊ देता येणार नाही." दंडाधिकाऱ्यांनी मग सार्वजनिककाकांना विचारले: "तुम्ही वासुदेव बळवंतांचे वकील म्हणून उभे राहाणार काय? आणि हैद्राबादच्या साक्षीदारांची तुम्हाला इथे उलट तपासणी घ्यावयाची आहे काय?" तेव्हा वासुदेव बळवंतांशी सार्वजनिककाकांचे संभाषण झाले नि मग ते दंडाधिकाऱ्याना म्हणाले, "त्यांची उलट तपासणी मी सत्र न्यायालयापर्यंत राखून ठेवीत आहे. मी तसे वासुदेवाला सांगितले आहे."

या ठिकाणी सरकारी वकिलांनी पंत सचिवांच्या प्रदेशाच्या राजकीय प्रति-निधीने दिलेले त्या प्रांतातील छाप्यांसंबधात वासुदेव बळवंतांवर भरावयाच्या अभियोगास अनुमोदन देणारे पत्र न्यायालयात सादर केले.

वासुदेव बळवंतांचा नियमित व्यायामावर कटाक्ष होता. नि तो कधी सोडावा लागला तर त्यांना अस्वस्थ वाटे. आजचे काम संपत आल्यावर त्यामुळे ते आरोपीच्या पिंजऱ्यात उभे राहिले नि दंडाधिकाऱ्यांना म्हणाले : "मला नेहमी सक्त बंदीमध्ये ठेवण्यात येत आहे. नेहमीच्या सवयीप्रमाणे काहीही व्यायाम घेता येत नाही. आणि त्यामुळे मला फार अस्वस्थता वाटते. तेव्हा काही व्यायाम घेता येईल अशी व्यवस्था व्हावी." दंडाधिकारी त्यांना म्हणाले. "तुला प्रत्यही अवश्य तो व्यायाम करण्याची आणि उघड्यावर फिरण्याची सवलत द्यावी असे मी तुरुंगाच्या अधिकाऱ्यांना लिहून कळवीन." आणि यानंतर चौकशीचे आजचे काम संपले.

सोमवारी २७ ऑक्टोबरला प्राथमिक चौकशीच्या सुनावणीचा शेवटचा दिवस होता. त्या दिवशी आरोपीची मागे घेतलेली निवेदने वाचण्यात येऊन त्यांना दंडाधिकाऱ्यांनी प्रश्नही विचारले आणि त्यांची उत्तरे लिहून घेतली. वासुदेव बळवंतांची दोन लांबलचक निवेदने न्यायालयात वाचण्यात आली. आता वकील मिळालेला आहे, तेव्हा न्यायालयाच्या कामात त्याला सहाय्य करावे म्हणून आपला शक्य तो बचाव करणारी उत्तरे दंडाधिकाऱ्यांना दिली. आपण लिहिलेली दैनंदिनी स्मृती टीपांची आहे. आणि लुटीचे छापे घालण्यात वाईट लोकांना पोलिसांच्या स्वाधीन करण्याचा आपला हेतू होता, असे त्यांनी सांगितले. अमुक अमुक गृहस्थ कोठे आहेत ते आपणास माहीत नाही. अमक्या अमक्या वेळी शस्त्रे कोणी दिली ते आपणास सांगता येत नाही, दैनंदिनीतील काही गोष्टी वाचताना हृद्य वाटाव्या, अशा प्रकारे लिहिलेल्या आहेत, त्या सर्वच सत्या धरून चालता येणार नाही, रामोश्यांना वेतन कोण देत होते हे सांगता येत नाही, अमक्या ठिकाणी हल्ला करण्याचा आपला विचार नव्हता; सैनिकी विभागाशी संबंध असल्यामुळे पाच–पंचवीस माणसे ब्रिटिश राज्य उलथून पाडू शकतील असे मला कसे वाटेल? इंग्रज सरकारच्या सैन्यातच वरिष्ठ अधिकारी होण्याची माझी महत्त्वाकांक्षा होती, पण मी सरकारास साहाय्यकारी होत असता, ते उलट मलाच पकडण्यास सिद्ध झाले, असे वासुदेव बळवंतांनी प्रश्नोत्तरात सांगितले.

वासुदेव बळवंतांची ही निवेदने वाचण्याचे नि प्रश्नोत्तर लिहून घेण्याचे काम जवळजवळ सबंध दिवस चालले होते. ते संपताच दंडाधिकाऱ्यांनी त्यांना विचारले : "आपल्या वतीने तुला कोणी साक्षीदार बोलवावयाचे आहेत काय ?" वासुदेव बळवंत : "माझ्या साक्षीदारांची यादी लांबलचक–तेवीस साक्षीदारांची आहे." ती यादी नंतर वासुदेव बळवंतांनी सार्वजनिककाकांच्या हस्ते दंडाधिकाऱ्यांना दिली. तेव्हा त्यांनी विचारले, तरी त्यातील काही साक्षीदारांना बोलाविण्याची कारणे सांगण्यास वासुदेव बळवंतांनी नकार दिला. त्यावर त्यांचे दुय्यम वकील लाटे यांनी म्हटले : "पोलिसांच्या देखत ती कारणे सांगण्यास आरोपी सिद्ध नसावा." त्यामुळे-

दंडाधिकाऱ्यांनी मग त्यांना म्हटले : " येथें ती कारणे तुला सांगावयाची नसतील तर ती मला मागाहून लिहून कळव. म्हणजे मग मी त्या साक्षीदारांना बोलावण्या-संबंधी विचार करीन. "

त्यानंतरही वासुदेव बळवंतांनी प्रश्न उपस्थित केला की, 'अबदुल हक याने आपल्या अटकेच्या वेळी पोलीस कारवाईत भाग घेतला होता. त्याला साक्षीदार म्हणून बोलावण्यात येत नाही ?'

दंडाधिकारी : " तुला त्याचा येण्याचा खर्च द्यावा लागेल. नाही तर त्याला बोलावता येणार नाही. "

वासुदेव बळवंत : " त्याची साक्ष फार महत्त्वाची आहे. तो आला नाही तर हा खटला पुढे चालू शकणार नाही. "

परंतु यानंतर वासुदेव बळवंतांविरुद्ध आरोपपत्र भरण्यात आले. त्यातील एकेक आरोप जन्मठेप काळ्या पाण्याच्या शिक्षेचा आणि तोपर्यंत कोणाही देश-भक्ताविरुद्ध न ठेवला गेलेला असा होता. ते आरोप एकामागून एक वाचले जाऊ लागताच त्यांच्या भीषण शिक्षेची चित्रे चाणाक्ष प्रेक्षकांच्या डोळ्यापुढे येऊ लागून न्यायालयात गंभीर वातावरण पसरले. सामान्य माणसाचा तर धीरच खचून गेला.

इतर आरोपींसह वासुदेव बळवंतांविरुद्ध भारतीय दंड विधानाच्या परिच्छेद ३९५ खाली धामारी, वाल्हे, चादखेड, आणि इतर ठिकाणी दरोडे घातल्याचा आणि परिच्छेद ४०० खाली सराईतपणे दरोडे घालण्याच्या उद्दिष्टासाठी एकत्र आलेल्या लोकांच्या टोळीचा सदस्य असल्याचा असे दोन आरोप ठेवण्यात आले. नंतर त्या दंडविधानाच्या परिच्छेद १२१ अ खाली ब्रिटिश हिंदुस्थानात आणि बाहेर राणीसरकारविरुद्ध सशस्त्र युद्ध पुकारण्याचा कट केल्याचा, परिच्छेद १२२ खाली राणी सरकारविरुद्ध युद्ध पुकारण्याच्या हेतूने किंवा युद्ध पुकारण्यासाठी सिद्ध असण्याच्या हेतूने माणसे, शस्त्रे, दारुगोळा गोळा करून आणि इतर मार्गांनी युद्ध पुकारण्याची सिद्धता करण्याचा, आणि त्या दंड विधानांच्या परिच्छेद १२४ अ खाली ब्रिटिश हिंदुस्थानात निर्बंधाने प्रस्थापित झालेल्या सरकारविरुद्ध आपल्या कृत्यांनी किंवा भाषणांनी अप्रीतीच्या भावना फैलावल्याचा असे आरोपही त्यांच्या-वर ठेवण्यात आले. हे शेवटचे तीन आरोप राज्यसरकारविरुद्धचे होते. आणि हे शेवटचे तीन परिच्छेद पुढे प्रसिद्ध हिंदी देशभक्तांवर ज्यांच्याखाली आरोप ठेवून आणि अभियोग भरून इंग्रज सरकारने शिक्षा ठोठावून घेतल्या, अशा दुष्कीर्तीने कुप्रसिद्ध झाले. परंतु त्यांच्या खालील आरोपावरून अभियोग होणारे वासुदेव बळ-वंत फडके हे पहिलेच हिंदी देशभक्त होते !

या आरोपांवरून वरील आरोपींचा अभियोग दंडाधिकाऱ्यांनी सत्र न्याया-लयात वर्ग केला. आणि प्राथमिक चौकशीचे काम संपवून त्यांनी न्यायालय सोडले.

या आरोपांच्या घोषणेने प्रक्षुब्ध झालेला लोकांचा न्यायालयाबाहेरील जमाव आटो-क्यात ठेवताना पोलिसांना महाप्रयास पडले. वासुदेव बळवंत नंतर न्यायालयाबाहेर आले, तेव्हा लोकांनी त्यांच्याभोवती एकच गर्दी करण्याचा प्रयत्न केला. पण पोलि-सांनी त्यांना हटवीत गर्दीतून एक वाट करून घेतली आणि त्याच वाटेने पुढील कामाविषयी एकाग्रतेने विचार करीत आपल्याला घोरपडीच्या सैनिकी कोठड्यांकडे नेणाऱ्या घोड्याच्या धमणीत वासुदेव बळवंत चढले !

* * *

## प्रकरण १८ वे

# भीषण जन्मठेपेची निर्दय शिक्षा

"जे गरीब लोक उपासमारीने मरत होते, त्याना मी वाचवू कसा शकेन याची कित्येक वर्षे मला चिंता लागून राहिलेली होती! ज्या भूमीचे पोटी आपण जन्मलो तिच्याच पोटी ही लेकरे झाली! त्यानी अन्नावाचून उपाशी मरावे आणि आपण कुत्र्याप्रमाणे पोट भरीत रहावे, हे मला पाहवले नाही आणि म्हणून ब्रिटिश सरकारविरुद्ध मी सशस्त्र बंड पुकारले!" — वासुदेव बळवंत फडके

वासुदेव बळवंतावर ठेवण्यात आलेल्या भीषण आरोपावरून सर्व देशभक्त लोकाची निश्चिती झाली की, त्याना फाशी देण्याचा सरकारचा निश्चय झालेला आहे लोकाच्या कल्पना पुष्कळदा विचित्र असतात त्यामुळे ते देहात प्रायश्चित्तही भयंकरपणे दिले जावे म्हणून सरकार त्याना आगगाडीच्या बंबात घालून जाळणार आहे, असे लोक म्हणू लागले त्यांना तसेच जाळले अशी पुढे सर्वसाधारण समजूतच होऊन बसली अर्थात ती खरी नव्हती पण लोकाना त्याचा इंग्रजविरोधी अपराध किती भयंकर वाटत होता ते त्यावरून दिसते

पुण्यातील देशभक्त सत्र न्यायालयात त्याना उत्तमात उत्तम वकील मिळावा म्हणून खटपट करू लागले त्यासाठी निवड झालेला निबंधपंडित रानड्याच्याच बुद्धिमत्तेचा आणि त्याचा नि वासुदेव बळवंताचा समकालीन होता या श्रेष्ठ निबंध-पंडिताचे नाव महादेव चिमणाजी आपटे होते

आपट्याचा जन्म १८४४ मधील त्याचे बालपण गरिबीत गेले पण त्याची महत्त्वाकांक्षा भव्य असल्यामुळे शाळा महाविद्यालयात त्यानी प्रथम श्रेणी कधी सोडली नाही डेक्कन कॉलिजातून १८६७ मध्ये ते बी ए च्या परीक्षेत पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाले आणि तेथेच अधिछात्र (फेलो) झाले १८७१ मध्ये एल् एल् बी च्या परीक्षेत ते पहिले आले अलिबागला दुय्यम न्यायाधीश म्हणून काही दिवस काढल्यावर मुंबईच्या उच्च न्यायालयात ते स्वतंत्रपणे वकिली करू लागले आणि लवकरच त्यांची तेथे प्रथम श्रेणीच्या वकिलात गणना होऊ लागली वकिलीत

त्यांनी नऊ लाख रुपयांवर कमाई केली असेल. विद्येचे त्यांना अतोनात प्रेम म्हणून परदेशात जाऊन उच्च शिक्षण घेण्यासाठी काही विद्यार्थ्यांना त्यांनी पैसे दिले. तसेच आग्रा येथे कातडी कमाविण्याचा आणि पुण्यास चाकू-कात्र्या बनविण्याचा असे कारखाने काढले. त्यात तूट आली तरी ते डगमगले नाहीत. संस्कृत ग्रंथांच्या प्रकाशनासाठी आणि कुटुंबातील मुलांच्या शिक्षणासाठी त्यांनी 'आनंदाश्रम' स्थापन केला. आणि आपले पुतणे कादंबरीकार हरिभाऊ आपटे यांना त्याचे व्यवस्थापक नेमले. वासुदेव बळवंतांवरचा अभियोग हे देशभक्तीवरील संकट आहे, अशा भावनेने मी मी म्हणणाऱ्या वकिलांची त्यांच्या बचावासाठी उभे राहाताना घाबरगुंडी उडत असता वासुदेव बळवंतांचे वकीलपत्र बेडरपणे त्यांनी घेतले. त्यासाठी महर्षी पटवर्धनानीही खटपट केली असेल. यावेळी दक्षिणी मराठ्यांवर नि विशेषतः दक्षिणी ब्राह्मणांवर सरकार राजद्रोही हालचालीचा आरोप करीत होते. पण ते वकीलपत्र घेताना आपटे त्वेषाने म्हणाले : 'हां ! हां ! मीही पुण्याचा दक्षिणी ब्राह्मणच आहे." १८९४ मध्ये ते मृत्यू पावले, तेव्हा 'केसरी'त टिळकांनीच ही गोष्ट उघड केली नि म्हटले : "सन १८७९ साली दक्षिणी ब्राह्मणांवर जो कहर उसळला होता, त्या-प्रसंगी या अभिमानाने आपटे यांनी जे काम केले, ते काम हल्लीच्या प्रसंगीही त्यांनी आनंदाने केले असते." या निर्भयपांडित्यामुळे ते वास्तविक मुंबईच्या उच्च न्याया-लयाचे पहिले हिंदी न्यायाधीश व्हावयाचे पण त्यांच्या वरील कीर्तीमुळे त्या दिवसात त्यांना ते पद मिळाले नाही.

खिडक्यांवर आणि बाहेरच्या पडव्यांच्या अर्ध्या भिंतीवर चढू लागले. पण पोलिसांनी त्यांना मोठ्या प्रयासाने प्रतिबंध करून रोखले. तरी काही जणांनी तेथे बैठक मारलीच. अभियोजकांच्या आणि बचावाच्या वकिलांनाही न्यायालयात प्रवेश करण्यास प्रयास पडले. ते आत गेले, तेव्हा त्यांनाही बसण्यास जागा मिळाली नाही. परंतु अधिकाऱ्यांनी त्या जागांवरील आगंतुकांना त्यांच्या जागांवरून हुसकावले. आणि मग ते वकील स्थानापन्न झाले. इतक्या अफाट जनसमुदायामुळे न्यायालयातील वातावरण दाटीदाटीने बसलेल्या लोकांच्या श्वासोच्छ्वासाने गरम झाले आणि त्या थंडीच्या दिवसातही जमलेल्या लोकांना उकाड्याने नकोनकोसे झाले.[१]

न्यायालयात चालणाऱ्या अभियोगातील मुख्य व्यक्ती वासुदेव बळवंत फडके हे न्यायालयात अजून आले नव्हते. घोरपडी येथील बंदिगृहातून त्यांना संगमावरील न्यायालयात आणण्यासाठी घोड्यांची चारी बाजूंनी बंद असलेली, स्वतंत्र चारचाकी शिग्राम सोमवारी सकाळीच त्यांच्या बंदिगृहापाशी जाऊन उभी राहिली. त्यांच्या हातापायात हातकड्या आणि बेड्या ठोकण्यात आल्या. आणि काढण्या बांधूनच त्यांना आपल्या कोठडीतून बाहेर काढण्यात आले. गाडीत त्यांच्या दुबाजूस दोन गोरे सोल्जर जाऊन बसले. त्यांच्या हातात रोखलेल्या बंदुका होत्या. गाडीच्या चारी बाजूस तशाच सशस्त्र हायलँडर्सचा वेढा होता. ते बसताच त्यांची शिग्राम बंद करण्यात आली आणि बाहेर वर पेटीवर बसलेल्या गाडीहाक्याने ती चालू करताच संगमाच्या दिशेने ती चालू लागली.

गाडीवानाजवळही एक सशस्त्र नाईक बसला होता आणि गाडी चालू होताच तिच्या पुढे नि मागे सशस्त्र घोडेस्वार दौडत होते. न्यायालयाच्या चौकात ती शिग्राम पोचली. वासुदेव बळवंतांना उतरून घेण्यास पोलीस आणि सोल्जरांचा समुदाय उभा होता. त्यांच्या अधिकाऱ्यांनी गाडीचे दार उघडले. वासुदेव बळवंत खाली उतरल्यावर त्यांना त्यांनी आपल्या स्वाधीन करून घेतले आणि वाटभर त्यांना दक्षतेने आणणाऱ्या रक्षकांचा जीव भांड्यात पडला. वासुदेव बळवंतांच्या जीवाला जीव देणारे साथीदार पोलिसांच्या हातून त्यांना सोडवून नेण्यासाठी काय करतील याचा नेम नव्हता. त्यांच्या आधीच काही दिवस वासुदेव बळवंतांचा एक धाडसी साथीदार पांडू रामोशी गुप्तपणे पुण्यात आला होता. भांबुर्ड्याच्या एका पडीक घरात त्यांची नि पोलिसांची गाठ पडली होती. पोलिसांवर त्याने आपले पिस्तुल झाडले होते. आणि पोलिसांना त्याला ठार करावे लागले होते.

वासुदेव बळवंत न्यायालयाकडे चालू लागले, तेव्हा सगळ्यांचे डोळे त्यांच्याकडे लागले. त्यांनी पांढरे स्वच्छ कपडे परिधान केले होते. त्यांच्या पायात तंग सुरवार

१ " रिपोर्ट ऑफ दि ट्रायल ऑफ वासुदेव बळवंत फडके, " (प्रिंटेड अॅट दि डेली टेलिग्राफ अँड डेक्कन हेरल्ड प्रेस, पुना.)

न्यूनर्हेम स्थानापन्न झाल्यावर सर्व लोक आणि आरोपी खाली बसले.

वासुदेव बळवंत आणि इतर आरोपींविरुद्ध दंडविधानाच्या निरनिराळ्या परिच्छेदाखाली औपचारिकपणे मागे उल्लेखिलेले आरोप ठेवण्यात येऊन, ते त्यांना वाचून दाखविण्यात आले.

तीच धातूच्या एका नळकांड्यात पंचांची नावे लिहिलेले कागदाचे तुकडे टाकून ते बंद करण्यात आले आणि ते त्याच्या एका बाजूच्या कडेवर न्यायाधिशांच्या समोरच्या टेबलावर नेहमीच्या प्रथेप्रमाणे न्यायालयाच्या हवालदाराने घरंगळत फिरविले. नंतर ते उघडण्यात येऊन त्यातील चिठ्ठ्यातून पाच चिठ्ठ्या उचलून न्यायालय-अवेक्षकांकडे (शिरस्तेदारांकडे) देण्यात आल्या. त्या उघडून त्यांच्यावरची पाच पंचांची नावे त्यांनी वाचून दाखविताच ती पुकारण्यात आली. ती अशी होती. १) नारायण पांडुरंग दानवलकर (पंचप्रमुख) २) विनायक रघुनाथ नवलकर ३) नारायण सोमप्पा ४) सॅम्युअल रेमन आणि ५) विसाजी चिंतामण गोरे.

न्यायाधीश (आरोपींना) · "यापैकी कोणत्याही पंचाच्या नियुक्तीला तुम्हाला आक्षेप घ्यावयाचा आहे काय?" सर्व आरोपींनी, "नाही" म्हणून उत्तर दिले. आणि मग वरील पाच गृहस्थांची अभियोगात पंच म्हणून न्यायाधीशांनी नियुक्ती केली. पंचांच्या निवडीनंतर वासुदेव बळवंतांच्यावतीने महादेव चिमणाजी आपटे यांचे वकीलपत्र सादर करण्यात आले. पण ते स्वतः अजून आले नव्हते. त्यांना सहाय्यक म्हणून चिंतामण पांडुरंग लाटे हे पुण्याचे प्रख्यात वकील उपस्थित होते. त्यांनी वरील वकीलपत्र पुढे केले. लाटे यांची पुण्यातील पहिल्या तीन चार क्रमांकांच्या नामांकित वकिलात गणना होत असे. वासुदेव बळवंतांचा बचाव करण्यास वासुदेव बळवंतांचे वकील म्हणून ते खालच्या न्यायालयात उभे होते. आणि आताही धैर्याने उभे राहिले होते. यावरून पुण्याच्या सुशिक्षित लोकांची वासुदेव बळवंतांविषयीची सहानुभूतीची भावना व्यक्त होते. इतर आरोपींच्यावतीने दुसरे वकील उभे होते.

सरकारच्यावतीने मुंबईचे प्रसिद्ध वकील नानाभाई हरिदास हे हा अभियोग चालविण्यास उभे होते. त्यांचा शैक्षणिक आवाका फार स्पृहणीय नव्हता. १८४०-४१ मध्ये सुरतेत जेव्हा पहिली इंग्रजी शाळा स्थापन झाली, तेव्हा ते त्या शाळेत पहिल्या वर्गात गेलेल्या विद्यार्थ्यांत होते. प्रख्यात व्याकरणकार दादोबा पांडुरंग हेच तेथे पहिले सहाय्यक इंग्लीश शाळा शिक्षक (असिस्टंट इंग्लीश स्कूलमास्टर) म्हणून नेमले गेले होते. नानाभाई हा कायस्थ घराण्यातील मुलगा. ठेंगण्या बांध्याचा आणि काहीसा भांडखोर मुलगा म्हणूनच ते दादोबांच्या लक्षात राहिले. नानाभाई पुढे मुंबईस इंग्रजी वकिलीची परीक्षाही उत्तीर्ण होऊ शकले नाहीत. मग मद्रासेत जाऊन ती परीक्षा देऊन त्यांनी कशीबशी सनद मिळविली. आणि मुंबईच्या उच्च न्याया-

लयात वकिली केली. ते पुढे न्यायाधीश झाले, तेव्हा आपला विद्यार्थी म्हणून दादोबा पांडुरंग त्यांना कौतुकाने भेटण्यास गेले. पण नानाभाई काही आपले गुरू म्हणून इतर विद्यार्थ्यांप्रमाणे आस्थेने दादोबांना भेटण्यास आले नाहीत. त्यामुळे हा आप-मतलबी, बेपर्वा, कृतघ्न आणि हलक्या मनाच्या लोकांपैकीच होता, असे दादोबा पांडुरंगाचे त्याच्याविषयी मत झाले[२] नानाभाईंना पुण्याचे सरकारी अभियोक्ते वकील नारायण जगन्नाथ किंवा नाना भिडे हे सहाय्य करीत होते. नोव्हेंबर १८६५ मध्ये पुण्याच्या 'पुर्नविवाहोत्तेजक सभे'च्या वतीने महाराष्ट्रात पहिला पुनर्विवाह मुंबईला वांद्रयास झाला, तो नाना भिडयांचा, मोरोपंत पॅडसे यांच्या विधवा कन्येशी झाला.[३] त्यामुळे ते अधिकच प्रसिद्धीस आले. आपटे यांची उच्च न्यायालयाचे न्यायाधीश होण्याची पात्रता होती. पण ते तसे होऊ शकले नाहीत. तर नानाभाई हरिदास मात्र पुढे ८ नोव्हेंबर १८८० ला मुंबईच्या उच्च न्यायालयाचे पहिले हिंदी न्यायाधीश झाले.

पंचांच्या पुढयात एका टेबलावर अभियोगातील निशाण्या असलेल्या वस्तू ठेवण्यात आल्या होत्या. त्यात कित्येक बंदुका, २ पिस्तुले, २ पट्टे, ३ तरवारी, बंदुकीची दारू, काठया, सोन्याचे, चांदीचे, हिऱ्याचे, रुप्याचे, मोत्याचे कित्येक दागिने, दिवे, खंजीर, वाजविण्याची शिंगे, पायाला आणि हाताला बांधण्याची संरक्षक चिलखते, खानदेशाचा आणि इतर आलेख्य (नकाशे), पेटया आणि इतर काही वस्तू होत्या.

साडे अकरा वाजता अभियोगाला सुरुवात झाली. आरोपींविरुद्ध ठेवण्यात आलेले आरोप वाचण्यात आल्यावर न्यायाधीशांनी त्यांना विचारले : " तुम्ही या आरोपाखाली आपण दोषी आहोत असे म्हणता काय ? " त्यावर सर्व आरोपींनी 'नाही' म्हणून उत्तर दिले.

पंचांना अभियोग समजावून देताना नानाभाई हरिदासांनी आरोपीविरुद्धची सरकारची बाजू मांडली ते म्हणाले: "पंचातील सभ्य गृहस्थहो, तुमच्यासमोर असलेल्या बंदिवानांवर निरनिराळे आरोप आहेत. आरोपी क्र. १ वासुदेव बळवंत फडके याच्यावर बरेच आरोप आहेत आणि त्यातील तीन राज्यसरकारविरुद्ध केलेल्या अपराधांसंबंधीचे आहेत. तो आणि इतर आरोपी यांच्याविरुद्ध दरोडे घालण्याचा आणि सराईतपणे दरोडे घालण्याच्या उद्देशाने एकत्र आलेल्या लोकांच्या टोळक्याचे सदस्य असल्याचे असे आरोप आहेत.

"दरोडा म्हणजे काय हे तुम्हाला माहीत असल्यामुळे त्याची व्याख्या मी

---

२ " रावबहादूर दादोबा पांडुरंग, " (संपादक नि चरित्र लेखक) अ. का. प्रियोळकर, पृ. १४७, १५०

३ ग. रा. हवलदार : " रावसाहेब मंडलिक यांचे चरित्र, " पृ. ३०७

तुम्हाला सांगण्याची आवश्यकता नाही. वासुदेव बळवंत फडके याचा मुख्य उद्देश हिंदुस्थानातील ब्रिटिश राज्य उलथून पाडून ते नष्ट करण्याचा होता. तुमच्यापुढे मांडण्यात येणारा पुरावा सरकारविरुद्ध त्याने केलेल्या अपराधासंबंधीचे आरोप चांगले सिद्ध करील. ब्रिटिश राज्य नष्ट करण्याचे त्याचे ध्येय सिद्धीस जावे कसे? त्याच्या एकट्याने ते होणे शक्य नव्हते. त्यासाठी माणसांची आवश्यकता होती आणि पैशाशिवाय माणसे मिळणे शक्य नव्हते. त्याला जे युद्ध पुकारावयाचे होते त्याला लागणाऱ्या या युद्धाच्या नसा मिळविणे हे वासुदेव बळवंतांचे पहिले उद्दिष्ट होते. तसा पैसा काही श्रीमंत सावकारांकडून मिळविण्याचा त्याने प्रयत्न केला. तो त्याने कुठे केला ते उघडकीस आलेले नाही. परंतु त्या प्रयत्नांत त्याला यश आले नाही."

"या प्रयत्नांत असे अपयश आले, तरी त्याने आपले उद्दिष्ट सोडले नाही. आपले उद्दिष्ट साध्य करण्यासाठी त्याने दुसरा एक मार्ग चोखाळला. त्याचवेळी दुर्दैवाने देश एका हाहाःकार उडविणाऱ्या दुष्काळाच्या कचाट्यात सापडला होता आणि कित्येक जिल्ह्यात शेकडो लोक बेकारीच्या खाईत लोटले गेले होते. दुष्काळात मरणाऱ्या माणसांची दुस्थिती पाहून त्याला वाटले की, ब्रिटिश सरकारविरुद्ध उठावणी करण्यास ही संधी बरी आहे. या लोकांपैकी बरेचसे लोक लुटारू जातीचे होते. त्यांना आपल्या सैन्यात नोकरीला ठेवावे आणि सरकारी खजिन्यांवर हल्ले करून त्यांच्या संरक्षकांना ठार करून ते लुटावे असा त्याने बेत केला. त्यांची शस्त्रे आणि अशा खजिन्यातील पैसा हाती आल्यावर त्या पैशाने शेकडो लोक आपल्या सैन्यात भराभर समाविष्ट करून घेता येतील आणि आपल्या योजना प्रत्यक्षात आणता येतील. त्यानंतर या पैशाने आणि शस्त्रांनी तशाच प्रकारची शस्त्रे आणि माणसे गोळा करता येतील, असा त्याचा विश्वास होता.

पुण्यातच त्याने आपल्या उद्योगास प्रारंभ केला. शारीरिक सामर्थ्य वाढविणारे खेळ खेळणे, बंदूक उडविणे, नेम मारणे इ. युद्धकला तरुणांना शिकविण्यासाठी त्याने वर्ग उघडले आणि त्या काळामध्ये पुण्यातील शेकडो विद्यार्थ्यांना त्याने पारंगत केले. त्याने राजद्रोह पसरविणारी भाषणे केली. त्याने पुढे रामोश्यांशी संबंध प्रस्थापित केले. त्यांची निष्ठा संपादन केली आणि त्यांच्याशी तो नेहमी विचार विनिमय करू लागला.

"शेवटी या कटातील मुख्य ठिकाण पुण्याहून लोणी येथे हालविले गेले. तिथे त्याने एका मोठ्या मेजवानीचा बेत केला आणि सर्व रामोश्यांना एकत्र जमविले. होता होता शेकडो खेडुतांना त्याने आपल्या सैन्यात ओढले. त्यांना त्याने शस्त्रे पुरविली आणि लुटीच्या रूपाने बंड उभारले! धामारी, वाल्हे आणि सांदरोड इ. ठिकाणी दरोडे पडले. त्याने काय हाहाकार उडाला ते तुम्हाला माहीतच आहे.

कित्येक खेड्यावर छापे घातले गेले आणि ती लुटण्यात आली. लुटीत मिळालेला काही पैसा रामोश्यांना वाटण्यात आला आणि काही पैशाने आणखी शस्त्रे विकत घेण्यात आली. लुटीत शस्त्रेही मिळविण्यात आली. कित्येक लोक व्याहत झाले आणि काहींना जीवे मारण्यात आले. लुटी मारल्या गेल्या."

"परंतु थोड्याच दिवसात वासुदेवाला असे आढळून आले की, रामोशी लोक हे स्वार्थी दृष्टीने लुटीत भाग घेत आहेत. ते असे हुपार की, मिळणारी लूट हीच काय ती त्यांना महत्त्वाची वाटे. त्याच्या भावी ध्येयाविषयी त्यांना काहीही सोयर-सुतक नव्हते. त्यांच्याविषयी अशा रीतीने निराश होऊन त्यांना सोडून त्याने दक्षिणे-कडे निजामाच्या राज्यात अधिक लढाऊ वृत्तीचे रोहिले लोक राहात होते तिकडे आपले लक्ष वळविले. तेथे त्याला रंगोपंत मोरेश्वर महाजन हा चांगला सहकारी मिळाला. तो त्याचे तेथील उद्योग सागीलच. महिना १० रुपये आणि फुकट जेवण या वेतनावर माणसे नोकरीस ठेवण्याविषयी रोहिला पुढाऱ्यांशी त्याने एक करार केला. त्या रोहिल्यांच्या मुखानेच हा सर्व वृत्तांत तुम्हाला येथे सांगण्यात येईल."

"इतके होईपर्यंत सरकारी अनुभगाचे पाश आपल्याभोवती आवळले जात आहेत, असे वासुदेवाला आढळले. तो ज्याला आपला सरदार म्हणे तो दौलतराव मेजर डॅनिअलकडून मारला गेला, असेही त्याला कळले. ते ऐकल्यावर त्याने कोणत्या प्रशंसक शब्दात दौलतरावाची त्याच्या शौर्याविषयी वाखाणणी केली आणि कोणत्या शब्दात मेजर डॅनिअलला संतापाने शिव्यांची लाखोली वाहिली हा वृत्तांत सरकारच्या वतीने साक्षीदारांच्या तोंडूनच तुम्हाला ऐकावयास मिळेल. इतके सांगितले म्हणजे पुरे की, आपले पुढील उद्योग पुरे होण्याच्या आधीच वासु-देवाला जवळच्या तरवारीसह आणि शस्त्रासह तो एका देवळात झोपलेला असताना पकडण्यात आले. त्याच्या अटकेचा वृत्तांत मेजर डॅनिअलच तुम्हाला सविस्तर सांगतील. मेजर डॅनिअल यानी ज्या धडाडीने आणि त्वरेने वासुदेवाला पकडण्यात यश मिळविले आणि त्यामुळे जो हाहाःकार उडवून देणारा एक मोठा कट त्यांनी मुळातच नष्ट करून टाकला त्याविषयी त्यांची प्रशंसा करावी तेवढी थोडीच होईल. कारण तसे झाले नसते तर वासुदेवाने केवढा हाहाःकार उडविला असता त्याची कल्पना करवत नाही. त्याने आधीच उडवून दिलेली धामधूम लक्षात घेतली म्हणजे तो हाहाःकार किती भयानक ठरला असता, ते तुम्हीच ठरवा ! आणि येथे होणाऱ्या साक्षी ऐकल्यावर अभियोक्ते आरोपीविरुद्ध आरोप सिद्ध करण्यात किती यशस्वी झालेले आहेत त्याविषयी पूर्ण विचारांती तुम्ही तुमचे मत बनवा ! "

नानाभाई हरिदास यांच्या भाषणानंतर अपराध कार्यवहन संहितेच्या ४६५ परिच्छेदाखालील, भारतीय दंडविधानाच्या १२१ अ, १२२ आणि १२४ अ या परिच्छेदांखाली वासुदेव बळवंतांवर अभियोग भरण्यास मुंबई सरकारने दिलेल्या

संमोदनाचे[४] आणि पंतसचिवांच्या प्रदेशात (भोर संस्थानात) घडलेल्या अपराधांसाठी त्यांच्यावर अभियोग भरण्यास सातान्याच्या हंगामी राजकीय प्रतिनिधीने दिलेले संमोदनाचे[५] कागदपत्र वाचून दाखविण्यात येऊन न्यायालयात नोंदण्यात आले.

आणि नंतर वासुदेव बळवंतांचा बंड दडपणारा मुख्य अधिकारी आणि पुण्याचा जिल्हा पो. अधीक्षक मेजर हेन्री विल्यम डॅनिअल साक्ष देण्यासाठी साक्षीदाराच्या पिंजऱ्यात शिरला. तो आपल्या साक्षीत म्हणाला : "आरोपी क्र. १ वासुदेव बळवंत फडके याला मी ओळखतो. गेल्या जुलैमध्ये वऱ्हाडचे पो. निरीक्षक स्टीफनसन आणि निझामाच्या राज्यातील पो. आयुक्त सय्यद अब्दुल हक आणि इतर अधिकाऱ्यांसह मी त्याचा पाठलाग करण्यासाठी गेलो होतो. त्याच्या कार्यालयातील त्याचा एक सहकारी आणि सशस्त्र पोलीस आणि सैन्यही माझ्या सहाय्यास होते."

डॅनिअल म्हणाला : " आम्ही सर्वजण भीमा नदीच्या तीरावर गन्नूर किंवा गाणगापूर येथे २० जुलै १८७९ ला पोचलो. तेथे आरोपी भीमा नदी ओलांडून पलीकडे गेल्याची माहिती आम्हास मिळाली. तेव्हा आम्हीही नदी ओलांडून पलीकडे गेलो. आणि या खेड्यातून त्या खेड्यात त्याचा पाठलाग केला. शेवटी २१ जुलै १८७९ ला पहाटे तो आम्हाला कलादगी जिल्ह्यातील देवरनावडगी गावातल्या एका देवळात सापडला. आपल्या उशाला एक बळकटी घेऊन तो तेव्हा गाढ झोपलेला होता. त्याच्यासमवेत एक साथीदार होता. तो आता न्यायालयासमोर नाही. मी त्या दोघांनाही अटक केली आणि त्यांची झडती घेतली."

अटकेनंतर झडतीत वासुदेव बळवंतांजवळ मिळालेल्या वस्तूंची नामावली सांगताना डॅनिअल म्हणाला : "हे लहान निळे पुस्तक त्याच्या बळकटीत मिळाले. हे हस्तलिखितही त्यात मिळाले आणि हा युद्ध कलेवरील प्रबंध आणि हे बाळबोध लिपीतील लिखाण!" आपण त्यांना पकडल्यावर त्यांनी केलेल्या तीव्र प्रतिकाराचीही डॅनिअलने माहिती सांगितली. आपटे अजून न्यायालयात आले नसल्यामुळे लाटे यांनीच डॅनिअलची उलट तपासणी घेतली त्यांनी उलट तपासणीत डॅनिअल याच्याकडून पुढील माहिती मिळविली. डॅनिअल म्हणाला : " वासुदेवासमवेत गोपाळ मोरेश्वर नावाच्या एका मनुष्यालाही अटक करण्यात आली होती. तो आता कुठे आहे हे माहीत नाही. वेळोवेळी कच्च्या कोठडीत ठेवल्यानंतर त्याच्याविरुद्ध काही आरोप नसल्यामुळे त्याला वैयक्तिक हमी घेऊन सोडून देण्यात आले. त्याला कधी दंडाधिकाऱ्याकडे नेला होता की नाही ते मला सांगता येत नाही. अटक केलेल्या लोकात आणखी एक मनुष्य होता. वासुदेव बळवंतांना अटक होईपर्यंत तो अटकेत होता. पण पुढे त्याला सोडून देण्यात आले. त्याचे नाव रंगोपंत महाजन.

४ पत्र न. १२७ (१८७९), न्यायविभाग, मुंबई दि. १८ ऑक्टोबर १८७९

५ " ॲक्टिंग पोलिटिकल एजंट, सातारा" यांचे पत्र, दि. २२ ऑक्टोबर १८७९

त्यानेच तर आम्हाला वरील माहिती दिली. त्याला राणीसरकारचा साक्षीदार करण्यात आले आहे. तो स्वतःहून साक्षीदार म्हणून पुढे आला. त्याला कोठडीत ठेवण्यात आले नाही. अटकेत असतानाच त्याला पुण्याला आणण्यात आले होते. वासुदेव आता दिसतो तसाच अटकेच्यावेळी बहुतेक दिसला. अटकेच्या वेळी त्याच्या अंगात ताप होता. तो बहुधा मानसिक त्रासामुळे त्याला आला असेल. अटकेच्या वेळी त्याच्याजवळ काहीही मौल्यवान वस्तू मिळाली नाही. त्याला दोन-तीन वेळा मी तुरुंगात भेटलो आहे. मि. केसर यांच्यापुढे त्याला नेल, तेव्हा मी उपस्थित होतो. पण मि. केसर यांनी त्याची निवेदने घेतली तेव्हा मी उपस्थित नव्हतो."

आणखी प्रश्नांना उत्तर देताना डॅनिअल उलट तपासणीत म्हणाला : "वासुदेवाची दैनंदिनी आणि आत्मचरित्रही सापडल्यापासून माझ्याजवळ आणि मेजर वाईझ यांच्याजवळच कुलुपात होती. भाषांतर करण्यासाठी ती चारपाच दिवस मेजर वाईझ यांच्याजवळ दिली होती. माझ्या आठवणीप्रमाणे माझ्या हाताखालच्या लोकांना माझ्या अनुपस्थित ती घेता येणारी नव्हती किंवा तसा हात त्यांना कोणीही लावलेला नाही. मेजर वाईझनेच मला वाटते पुण्याचे पो. निरीक्षक शिवराम पांडुरंग यांच्या सहाय्याने त्याचे इंग्रजीत भाषांतर केले! शिवराम पांडुरंग यांचा वासुदेवाला पकडण्याच्या प्रयत्नांशी काहीही संबंध नसे. दरोड्यासंबंधीच्या प्रकरणांसाठी त्यांना विशेष कामगिरीवर म्हणून नेमण्यात आले होते."

या महत्त्वाच्या बातमीनंतर लाटे यांनी डॅनिअलकडून आणखीही महत्त्वाची उत्तरे उलट तपासणीत मिळविली. डॅनिअल म्हणाला : " या लिखाणाच्या प्रत्येक पानावर मी माझी स्वाक्षरी केलेली नव्हती. कालपर्यंत मी आणि केसर एकाच बंगल्यात रहात होतो. त्यांचा मी नातेवाईक नाही ! "

न्यायालय अवेक्षकांनी (शिरस्तेदारांनी) वरील दैनंदिनी आणि आत्मचरित्र त्याच्या प्रतीवरून त्याचप्रमाणे त्यांच्या भावी संघटनेच्या रूपरेषेचे पुस्तक इ. वासुदेव बळवंतांजवळ सापडलेले इतर कागदपत्र न्यायालयात वाचून दाखविले. पण हे वाचन चालू असताना भाषांतरात बऱ्याच चुका आहेत हे वासुदेव बळवंतांनी दाखवून दिले. हे कागदपत्र नंतर पंचांनाही दाखविण्यात आले. मूळ दैनंदिनी आणि आत्मचरित्र वासुदेव बळवंतांच्या हातात देण्यात आली आणि न्यायाधीशांनी मग " ते तूच लिहिले आहेस काय ? " म्हणून वासुदेव बळवंतांना विचारले. त्यावर वासुदेव बळवंतांनी उत्तर दिले : " होय ! परंतु डायरी वाचनीय होण्यासाठी मी तशी लिहिली आहे आणि तिच्यातील मजकूर माझा नाही. आत्मचरित्र लिहिण्याच्या वेळी काही वेळ माझ्या अंगात ताप होता. या संबंधाने आणखी गोष्टी मी पुढे सांगेन ! "

न्यायाधीश : " हे नियमाचे पुस्तक तू लिहिले आहेस काय ? "

वासुदेव बळवंत : " प्रसिद्ध करण्यासाठी मी एक पुस्तक पूर्ण करीत होतो. हे बाळबोध लिपीतील लिखाण त्या पुस्तकात होते. पण ते माझ्या सांगण्याप्रमाणे दुसऱ्याने लिहिलेले आहे. "

याच वेळी दुपारी दोन वाजण्याच्या सुमारास महादेव चिमणाजी आपटे हे मुंबईहून पुण्यास आल्यावर स्थानकावरून थेट न्यायालयात आले आणि वासुदेव बळवंतांचा बचाव मग त्यांनी आपल्या हाती घेतला.

परशुराम नारायण पाटणकर या तरुणाने आपल्या साक्षीत सांगितले : "माझं वय १९ वर्षांचे आहे. मी विद्यार्थी असून 'पूना हायस्कूल' मध्ये शिकत असतो. वासुदेवाची आणि माझी दोन वर्षांची ओळख आहे. मी त्याच्या घरी जात असे. तेथे तो मला तरवारीचे आणि दांडपट्ट्याचे हात शिकवीत असे. रामोश्यांबद्दल माझं त्याच्याशी बोलणं झालं, तेव्हा तो म्हणाला की, मी त्यांना जमवून त्यांच्या मदतीने सरकारविरुद्ध बंड करणार आहे. त्यात तुम्ही मला मदत केली पाहिजे." साक्षीदाराची उलट तपासणी आपटे यांनी घेतली. त्यावेळी तो म्हणाला : "वासुदेवाबरोबरचं हे बोलणं पोलिसांना कसं कळलं ते मी सांगू शकत नाही. वासुदेवाला पकडण्याच्या आधी काही दिवस मी पोलीस कोठडीत होतो. मला गोळी मारता येत नाही. आणि तरवार फिरवताही येत नाही. मला मदत करावयास वासुदेवानं का सांगितलं ते मला सांगता येत नाही." न्यायाधिशाच्या प्रश्नास उत्तर देताना साक्षीदार म्हणाला की, आपल्याला मदत देण्यासाठी वासुदेवाने आपल्याला फक्त एकदाच सांगितले.

वासुदेव बळवंतांचा मेहुणा बल्लाळ काशीनाथ कुंटे म्हणाला : "मी सदाशिव पेठेत रहातो. मी भावे प्रायव्हेट स्कूलचा विद्यार्थी आहे. माझे दुसरे नाव गणेश काशीनाथ कुंटे असं आहे. मी वासुदेव बळवंतांना ओळखतो. ते माझे मेव्हणे आहेत. मी त्यांच्या घरी जात असे." त्यांच्याकडे रामोशी आणि इतर लोक येत असत असे सांगून कुंटे म्हणाला : "त्यांच्याकडे बरेच ब्राह्मण तरुण येत असत. त्यांच्यात राजकीय विषयावर वाद चालत. ते वर्तमानपत्राचा कोणताही भाग वाचण्याचं सोडीत नसत. लढाईची हकीकत वाचत असत. वासुदेव बळवंतांच्या घरात एक बंदूक, एक तरवार, एक पिस्तुल, दोन दांडपट्टे आणि एक कटयार ही हत्यारं मी पाहिली होती. ती एक दिवस कडब्यात घालून लोणी येथे पाठविण्यासाठी म्हणून त्यांनी बाहेर काढली होती."

प्रत्यक्ष आपला मेहुणा आपल्याविरुद्ध साक्ष देऊ लागला, तेव्हा वासुदेव बळवंतांना धक्काच बसला. पण त्याने तसे केले नाही तर त्याच्यापुढे पोलिसांच्या छळाचे काय ताट वाढून ठेवले होते, ते लक्षात येताच त्यांना त्याची साक्ष स्वाभाविक वाटू लागली. परंतु तोंच पोलिसांच्या दमदाटीने दबलेल्या या साक्षीदाराने आपले

मन घट्ट केले. पोलिसांच्या भयामधून आपली सुटका करून घेतली आणि मृत्यूच्या छायेत वावरणाऱ्या आपल्या विख्यात मेव्हण्याविरुद्ध साक्ष देण्याचे नाकारून न्यायालयात खळबळ उडवून देणारी वाक्ये कापऱ्या आवाजात भराभर उच्चारण्यास सुरवात केली. न्यायाधिशांनी त्याची खालच्या न्यायालयातील साक्ष वाचून दाखवून तिच्यातील वरील शस्त्रे वासुदेव बळवंतांनी एक दिवस लोणीस पाठविली, या त्याच्या विधानाकडे त्याचे लक्ष वेधले. तेव्हा तो म्हणाला : "मला त्या वेळी जसं आठवलं तसं मी सांगितलं आणि आता मला जे नीट आठवतं आहे, तेच मी सांगतो आहे!"

कुंटेच्या या बदलेल्या मनःस्थितीचा पूर्ण लाभ घेऊन आपटे यांनी त्याची उलट तपासणी केली. तेव्हा त्याने म्हटले : "आपल्या घरात असलेल्या हत्यारांसाठी वासुदेव बळवंतांजवळ पास होता. आणि मी हे कोर्टात हजर असणाऱ्या फौजदारांना सांगितलं होतं. (या वेळी कुंटे याने न्यायालयात असलेल्या नाना फौजदार यांच्याकडे हात दाखविला.)[६] मला त्यांनी एकदा आपल्या घरात संध्याकाळी चार वाजल्यापासून दुसऱ्या दिवशी पहाटेपर्यंत डांबून ठेवलं होत. रात्रभर मी त्यांच्याच घरी होतो. येथे मी काय सांगायचं ते त्यांनीच मला शिकवलं. मी म्हटलं की 'ही गोष्ट खरी नाही, मी खोटं कसं सांगू?' तेव्हा ते म्हणाले, 'मी सांगतो तसंच तू कोर्टात सांगितलं पाहिजे. तू जर तसं कोर्टात सांगितलं नाहीस, तर तू उद्या ठार होशील', त्यांनी मला अशी धमकी दिली, म्हणून माराच्या धाकाने मी पहिल्यांदा जे सांगितलं ते सांगितलं पण ते खरं नाही." कुंटे याने याप्रमाणे आपली साक्ष फिरविताच, त्याचे धैर्य पाहून लोक आनंदित झाले, आपल्या मेव्हण्याचे हे धैर्य पाहून वासुदेव बळवंतांनाही समाधान वाटले.

न्यायालयातील वाढत्या खळबळीच्या वातावरणात उलट तपासणीत कुंटे पुढे म्हणाला : "लोणीस किंवा इतर कोणत्या तरी ठिकाणी हत्यारं पाठविण्यात आल्याच मी जे पूर्वी खालच्या कोर्टात सांगितलं, ते साफ खोट आहे. मी ते मारपीट होईल या भीतीनच सांगितलं आणि इथेही या खोट्या गोष्टी पहिल्यांदा भीतीमुळेच सांगितल्या. ती माझी भीती पाच मिनिटापूर्वीपर्यंत कायम होती. पण आता ती गेली आहे. मला खरं सांगण्यास सांगण्यात आलं आहे आणि म्हणून आता मी खरं सांगत आहे. घरी जाताच मला पुन्हा फौजदाराची भीती वाटेल. पण त्याची मला पर्वा नाही. वासुदेवरावाच्या घरी जाणारे लोक वर्तमानपत्र वाचत असत, हे सोडून मी सांगितलेलं बाकी सर्व खोटं होतं. ते त्यातील मजकूर वेळ जाण्याकरिता वाचत असत. लढाईचा म्हणूनच केवळ वाचत नसत. त्यांच्या घरी मी हत्यारं

६ याचे नाव नारायणराव किंवा नाना वेळकर असे होते. ते चीफ कॉन्स्टेबल ऑफ पोलीस होते. त्या दिवसात हेच फौजदाराचे पदनाम होते.

पहात असे. पण त्यांचा उपयोग करण्याबद्दल ते कधी बोलले नाहीत. राणी सरकारचं राज्य घेण्यासंबंधी ते कधीच बोलले नाहीत. सर्व बोलणी घरगुती बाबींसंबंधी असे."

सरकारच्या बाजूच्या कुंटे यांनी आपल्या साक्षीत असा विचका केल्यावर तो शक्य तो सावरण्याकरिता नानाभाई हरिदासांनी आपल्या फेर तपासणीत प्रयत्न केला. पण कुंटे त्यावेळी म्हणाला : " मि. केसर यांच्यापुढे मला दाखविण्यात आलं ते निवेदन मी केलं होतं. पण ते मी भीतीमुळे केलं होतं. मला अटक झाल्यानंतर किती दिवसांनी मी केसर साहेबांपुढे साक्ष दिली ते मला आठवत नाही. मला धमकी देण्यात आली होती आणि मला भीती वाटत होती, हे मी मॅजिस्ट्रेट साहेबांना सांगितलं नव्हतं ही गोष्ट खरी आहे. मॅजिस्ट्रेट डॉ. फ्रेझर यांनाही मी ते सांगितलं नव्हतं. या कोर्टात पहिला खटला झाला, तेव्हाही मी जज्जसाहेबांना ते सांगितलं नाही. पण त्यांच्यापुढे दिलेला जबाब आणि इथे मागे दिलेला जबाब हा खोटा आहे. तो मी भीतीमुळेच दिला, असं सांगावयाला मला कोणी पढविलेलं नाही." यातील सूचक अर्थ लक्षात घेऊन महादेव चिमणाजी आपटे म्हणाले : " मी तर स्थानकावरून थेट न्यायालयात आलेलो आहे. " फेर तपासणीत कुंटे पुढे म्हणाला : " मी पूर्वी खोटं सांगितलं हे मला कबूल आहे. पण भीतीमुळे आणि धमकीमुळेच मी हे केलं " कुंटे याने आपली विधाने पुन्हा ठासून केल्यावर त्याला वठणीवर आणण्याचा न्यायाधिशांनी स्वतः प्रयत्न केला. पण त्यांच्या प्रश्नांना उत्तरे देतानाही कुंटे म्हणाला : " फडक्यात लपवलेली हत्यारं मी वासुदेव बळवंतांच्या घरी असताना कधीच पाहिली नाहीत. ती त्यांनी लोणीस किंवा इतर कोणत्याही ठिकाणी पाठविल्याचं मी पाहिलं नाही. "

न्या. न्यूनहॅम : " साक्षीदाराने उघड उघड खोटी साक्ष दिलेली आहे ! (कुंटे यास) हा अभियोग संपेपर्यंत तू प्रत्यक्ष इथे येत जा! शाळेत जावयास लागू नकोस ! "

कुंटे अशा रीतीने फिरला खरा. पण खोटी साक्ष दिल्याच्या आरोपावरून त्याच्यावर पुढे अभियोग भरण्यात आला आणि तो चालून त्याला त्या अपराधासाठी फटक्यांची क्रूर शिक्षा देऊन सरकारने त्याच्यावर प्रतिशोध घेतला ! परंतु देशभक्तीसाठी त्याने ती शिक्षा देखील आनंदाने स्वीकारली !

या साक्षीदाराने न्यायालयात उडविलेली खळबळ नाहीशी झाली नव्हती, तोच पुढचा साक्षीदार सीताराम बाळकृष्ण धारवाडकर, वासुदेव बळवंतांच्या घरी आपण दिलेल्या भेटीत घडलेला वृत्तांत सांगून म्हणाला : " आरोपी क्र. १ हेच वासुदेव बळवंत फडके म्हणून मी सांगू शकत नाही. त्यांना मी एकदाच पाहिलं होतं. वासुदेव बळवंतांच्या घराच्या आवारात लोक तरवारींचे हात शिकत असत."

आपटे यांनी घेतलेल्या उलट तपासणीत तो म्हणाला : " मी आयुष्यात फक्त एकदाच वासुदेवाच्या घरी गेलो आहे. मला साक्ष देण्यासाठी कोणी पढविलेलं नाही. मला वाईला पकडून इथे आणण्यात आलं आहे. मला दोन दिवस पोलीस कोठडीत ठेवण्यात आलं होतं. वासुदेवाच्या बंडाशी संबंध असावा या संशयानं वाईहून मला इकडे आणण्यात आलं आहे. वासुदेवानं माणसं जमविल्याचं मी स्वत: पाहिलं नाही. "

अर्जुना हणमंता या रामोश्याने सांगितले : "मी वासुदेवाला ओळखतो. मी त्यांना मुरलीधराच्या देवळात भेटत असे. या देवळाजवळ त्यांचे घर आहे. त्या देवळात बळवंतराव * नावाचा एक म्हातारा माणूस होता. दोनशे माणसं जमण्याची मसलत तेथेच ठरली. वासुदेव मला एकदा कलेक्टर कचेरीजवळ भेटला. मी त्याला रामराम केला आणि इकडे कोणीकडे म्हणून विचारलं. तेव्हा मी मुंबई ऑफिसात काम करतो म्हणून ते म्हणाले. पहिल्या दरोड्यानंतर मला पकडून नेण्यात आलं. मी फौजदाराला ही गोष्ट सांगितली. त्यानं मला मेजर डॅनिअलकडे नेले. डॅनिअलला मी ही गोष्ट सांगितली. तेव्हा मला खजिन्याच्या विहिरीजवळच्या देवळात नेण्यात आलं आणि नंतर मुंबई ऑफिसात. मला भेटलेला माणूस तिथे आहे का म्हणून मला विचारण्यात आलं. मी नाही म्हणून सांगितलं. उलट तपासणीत साक्षीदार म्हणाला :"वासुदेवाला मी एकदा घरी आणि एकदा रस्त्यांत इतक्या वेळाच पाहिलं. माझं गाव पुण्यापासून तीन-चार मैल आहे. मुरलीधराचं देऊळ पुण्याला आहे. मी पुण्याला नेहमी येत होतो. मला मेजर वाईझ यांनी पुढे १३ महिने रेल्वेवर विशेष कामगिरीवर म्हणून नोकरीस ठेवलं होतं. परंतु रेल्वेतल्या धान्याच्या चोऱ्या बंद झाल्या म्हणून माझी नोकरी गेल्या २० तारखेस बंद झाली." साक्षीदाराच्या नोकरीची ही माहिती बाहेर येणार असे वाटल्यावरूनच काय, वासुदेव बळवंतांविरुद्धची चौकशी दंडाधिकाऱ्यांपुढे सुरू होण्याच्या आधीच, तुझी नोकरी संपली आहे, असे या साक्षीदाराला सांगण्यात आले होते. सायंकाळी पाच वाजल्यामुळे यानंतर त्या दिवशीचे अभियोगाचे काम संपले. ते संपल्यावर तुरुंगाकडे जाण्यासाठी वासुदेव बळवंतांना बाहेर आणण्यात आले, तेव्हा शेकडो लोक त्यांना पहाण्यास त्यांच्याभोवती जमले आणि त्यांनी केलेल्या त्यांच्या नावाच्या प्रचंड जयजयकारात त्यांना घेऊन जाणारी शिग्राम तुरुंगाकडे निघाली.

मंगळवारी ४ नोव्हेंबरला अभियोगाचा दुसरा दिवस होता. त्या दिवशी आपल्या ३४ व्या वाढदिवशी वासुदेव बळवंत अभियोगासाठी न्यायालयात आले, तेव्हा आदल्या दिवसापेक्षाही तेथे लोकांची अधिक गर्दी होती. १० वाजताच न्यायालय लोकांनी चिक्कार भरून गेले. जमशेटजी जीजीभाई, जमशेटजी कारशेटजी आणि

७ हे गृहस्थ म्हणजेच मोरो बळवंत खरे यांचे वडील असावेत

इतर प्रतिष्ठित लोक आज वासुदेव बळवंतांना पहाण्यास आणि अभियोग ऐकण्यास आले होते. त्यात कित्येक युरोपियनही होते. त्यांच्यामध्ये मि. स्पेन्सर (सिनिअर) हेही होते. आज झालेल्या मनस्वी गर्दीमुळे वासुदेव बळवंतांच्या मोठेपणाचे जगात प्रदर्शन होत होते, असे दिसून आल्यामुळे अभियोगाचे वृत्त देणारा 'पूना ऑब्झर्वर' पत्राचा वार्ताहर चिडून म्हणतो :

"The crowd was quite as great as on Monday and eager spectators were quite as intense in their enthusiasm to catch a glimpse of the Brahmin rebel leader as ever. It is painful to see the crowds of idlers wandering about in the precincts of the Court Yard and peeping through windows and every available crevice and would be better at home."[८]

(" आज न्यायालयात लोकांची सोमवारी होती तेवढीच मोठी गर्दी होती आणि या ब्राह्मण बंडखोर पुढाऱ्यास पहाण्याची त्यांची उत्कंठा सदा असते तशीच मोठी होती. न्यायालयाच्या आवारात भटकणाऱ्या रिकामटेकड्या आणि खिडक्यांतून आणि प्रत्येक फटीतून आत डोकावणाऱ्या लोकांची गर्दी पाहून दुःख होते. ते घरीच बसून राहिले असते तर फार बरे झाले असते. ") वासुदेव बळवंतांना आणल्यावर ते आरोपीच्या पिंजऱ्यात शिरताना त्यांना पहाण्यासाठी झालेली लोकांची अपूर्व धावपळ वर्णन करताना वरील वार्ताहर म्हणतो :

"सर्वसामान्य समजूतदार मर्त्य लोकांच्या पातळीपेक्षा अधिक वर उठून दिसण्याची आणि आपले नाव मागे ठेवण्याचा प्रयत्न करण्याची ज्याची उत्तुंग महत्त्वाकांक्षा असल्याचे उघड दिसते; त्या "वासुदेव बळवंता" सारख्या व्यक्तिमत्वाच्या मनुष्याचीही स्थितप्रज्ञता विचलित करण्याला त्यांचे दर्शन घेण्यासाठी उडालेली ही झिम्मड अगदी पुरेशी होती."[९]

इंग्रज न्यायाधीश क्रांतिकारकांचे अभियोग चालवू लागले की, त्यांना क्रांतिकारकांच्या व्याकुळ देशबांधवाकडून किंवा सहकाऱ्यांकडून, या देशभक्तांना तुम्ही शिक्षा ठोठावल्यात तर तुमच्या प्राणावर बेतेल, अशा धमकीची पत्रे जात. त्या तेजस्वी परंपरेचा उदयही वासुदेव बळवंताच्या वेळेपासूनच झाला आहे. कारण त्यांच्या सहकाऱ्यांनी न्यायाधीश न्यूनहॅम यांना अशीच धमकीची पत्रे पाठवून दिली. राज्यपाल सर रिचर्ड टेंपल म्हणतात :

"Several insolent letters were received by the judges who were trying the dacoits, probably from the friends of

८ 'पूना ऑब्झर्वर', दि. ५ नोव्हेंबर १८७९

९ कित्ता

the prisoners, who thought thus to exercise intimidation." [10]

("दरोडेखोरांचे अभियोग चालविणाऱ्या न्यायाधिशांना, बहुधा बंदिवानाच्या मित्रांकडून, पण अशा रीतीने धाक दाखवून घाबरविणाऱ्या मार्गाचा अवलंब करून कित्येक धमकीची पत्रेही आली होती.")

वाढत्या गर्दीमुळे महत्त्वाच्या लोकांच्या व्यवस्थेत काही कमी पडू नये म्हणून न्यायालयात येताच न्या. न्यूनहॅम यांनी वृत्तपत्र प्रतिनिधींना विचारले : "तुमची बसण्याची व्यवस्था ठीक झाली आहे ना?" त्यावर वृत्तप्रतिनिधींनी, "हो!" म्हटले. न्यायाधीश : "मग हरकत नाही."

आज गणू रघू रामोशी याची पहिली साक्ष झाली. तो म्हणाला, "गेल्या श्रावणात जानकू रामोशी माझ्याकडे आला होता. तो सध्या धामारीच्या दरोड्यात भाग घेतला म्हणून तुरुंगात शिक्षा भोगीत आहे. तो मला म्हणाला, " पुण्याहून एक महाराज आले आहेत. त्यांच्याबरोबर पुष्कळ रामोशी आहेत. त्यांना बंड करण्यासाठी माणसे हवी आहेत. ते महिना पंधरा रुपये पगार देण्यास तयार आहेत. (वासुदेव बळवंतांकडे हात दाखवून) महाराजांना त्यावेळी दाढी नव्हती. पण आरोपी नं. १ हेच ते महाराज होत, अशी मला खात्री आहे. मी त्यांच्याकडे नाव नोंदविले आणि त्यांच्या रामोश्यात सामील झालो. पुढे पौषात मला पहिला पगार मिळाला." यानंतर या साक्षीदाराने काही गावांच्या लुटीची माहिती सांगितली.

या खळबळ उडविणाऱ्या कटाचे नायक वासुदेव बळवंत यांच्याविषयी देशभर होणारी प्रशंसा ठिकठिकाणाहून त्यांना येणाऱ्या पत्रातून व्यक्त केली जात होती. असेच एक पत्र न्यायालयाच्या पत्त्यावर याच वेळी आले. तेव्हा वासुदेव बळवंतांचे वकील आपटे न्यायाधिशांना म्हणाले : "वासुदेवाला त्याचे हे पत्र देण्यास हरकत नसावी." न्यायाधीश : "त्यास काही हरकत नाही." नंतर ते पत्र वासुदेव बळवंतांना देण्यात आले. यावेळी अर्जुना हणमंता या आदल्या दिवशीच्या रामोशी साक्षीदाराला पुन्हा बोलावण्यात आले. आणि मेजर डॅनिअल याला त्याला ओळखण्यास सांगण्यात आले. डॅनिअलने त्याला आपल्याकडे मुख्य पो. आरक्षी (फौजदार) हरि नारायण यांनी आणल्याचे आणि त्याने सांगितलेला वृत्तांत सांगितला. न्यायाधीश : "त्यानंतर तुम्ही काय केले?" डॅनिअल : "मी त्याला फायनान्स ऑफिसात नेले. आणि तेथील सर्व ब्राह्मण लेखनिकांना एकत्र करून त्यांना त्याच्या पुढून जावयाला लावले. पण त्यापैकी कोणालाही त्याने ओळखले नाही." न्यायाधीश : "त्यामुळेच वासुदेवाच्या हालचाली तुम्हाला माहीत झाल्या काय?" डॅनिअल : "मला त्याने दरोड्यात भाग घेतल्याचा फक्त संशय येऊ लागला. आणि त्याप्रमाणे त्याच्यासंबंधी

१० सर रिचर्ड टेंपल यांचे राजप्रतिनिधी लॉर्ड लिटन यांना पत्र (गोपनीय), १ जुलै १८७९

मी चौकशी करू लागलो" न्या न्यूनहॅम - "मी हे प्रश्न या साक्षीदाराने आपल्या साक्षीत जे सांगितले, त्याला सपुष्टी मिळविण्यासाठी मेजर डॅनिअलला विचारले आहेत"

यानतर हनुमंता त्रिंबक या रामोश्याने आदल्या महाशिवरात्रीला लोणीकंद येथे झालेल्या रात्रीच्या समेलनाचा वृत्तात सांगितला तो म्हणाला : "महाराजानी (वासुदेव बळवंतानी) आपणास आणखी माणस हवी आहेत, असं म्हणताच रामोशी म्हणाले, "आम्हाला पैसा आणि हत्यार द्या, म्हणजे आम्ही आणखी माणस मिळवितो" जलवता येसू या रामोश्याने चिंचोशीच्या जगलात केलेल्या लुटारूच्या पाठलागाचा वृत्तात सांगितला हे दोघे साक्षीदार काही दिवस पोलीस कोठडीत होते, असेही त्याच्या उलट तपासणीत बाहेर आले एका मारवाड्याने धामारीवर पडलेल्या छाप्याची आणि तेथे झालेल्या लुटीची माहिती सांगितली

ठाण्याच्या लघुवाद न्यायालयात लेखनिक असणारे २४ वर्षाचे एक तरुण महादेव गोविंद करमरकर म्हणाले "वासुदेवाच्या घरी मी जात असे तेथे तरुण मुले जमत आणि तरवार–पट्टयाचे खेळ शिकत असत वासुदेवच त्याना हे खेळ शिकवत असे त्यावेळी कित्येक रामोशीही तिथे येत असत विष्णू गद्रे, गोपाळ कर्वे, हरि गुपचूप, गणू देवधर, परशुराम पाटणकर, गणपतराव साठे आणि वाईचे दोन तरुण हे त्यात असत या वाईच्या तरुणाची नावे मला माहीत नाहीत विष्णू गद्रे ट्रेनिंग कॉलेजचा विद्यार्थी होता गणपतराव साठे कलेक्टर साहेबाच्या ऑफिसात होते एक दोन वेळा वासुदेवाबरोबर मी निशाण मारण्यास गेलो होतो निशाण वासुदेव मारीत असे त्याच्याजवळ गावठी बदूक होती वरील लोक तेथे कशासाठी जमत असत त मला ठाऊक नाही मी बड करणार आहे असं वासुदेव म्हणत असे' उलट तपासणीत करमरकर म्हणाले 'बड कस करावयाच ते मला माहीत नाही मी ती थट्टाच समजलो!'

एका पोलीस शिपायाची बंडखोराच्या पाठलागाची माहिती सांगणारी साक्ष झाल्यावर धोंडी गोपाळा हा राजेवाडीचा माळी म्हणाला "लुटीच्या रात्री देवळे दवराच्या देवळात नेहमीप्रमाणे मी दिवा लावण्यास गेलो होतो तेथे लुटारू मला भेटले ते मला म्हणाले, "आम्ही दिवा लावण्याची व्यवस्था करू तू येथून निघून जा" त्याच हे बोलणं ऐकताच मी घाबरून गावात पळून गेलो!"

वाल्हे आणि पागारे या गावच्या लोकाच्या त्या गावावर पडलेल्या छाप्याचे वृत्तात सागणाऱ्या साक्षी झाल्यावर पुण्याचे वैद्य मोरो बाबाजी पाटक आपल्या साक्षीत म्हणाले "मी बुधवार पेठेत बाळेबावर येथे राहतो वासुदेवाच बिऱ्हाड माझ्या घरातच आहे त्याच्या घराचा पोलिसानी झाडा घेतला, तेव्हा पच म्हणून मी हजर होतो तो वैशाख महिना असेल माझ्या बरोबर सखाराम शेट सोनार

आणि विष्णु आत्माराम जोगळेकर हे आणखी दोन पंच होते. जोगळेकर आता हयात नाहीत. झाडा दुपारपर्यंत चालला होता. येथे जी हत्यारं आहेत, ती वासुदेवाच्या घरांत सापडली. त्यात दोन बंदुका, तलवारी, नकाशा, शिशाच्या गोळ्या, चिलखताचा तुकडा, बंदुकीची दारू, बंदुका साफ करण्याची किल्ली, कातड्याचे घोड्याच्या खोगीरावर असणारे होल्स्टर्स, पट्ट्याचे खोवले इ. वस्तू होत्या." साक्षीदाराने त्या वस्तू न्यायालयात दाखविल्या. आपटे यांनी जेव्हा या साक्षीदाराची उलट तपासणी घेतली, तेव्हा तो म्हणाला: "झाडा झाला, त्याच्या आधी पाच एक महिने वासुदेव घरात नव्हता. त्याच्या घराला त्या वेळी कुलूप होते." आणखी काही साक्षी झाल्यावर संध्याकाळचे पाच वाजले. आणि न्यायालयाचे काम दुसऱ्या दिवशी सकाळपर्यंत स्थगित करण्यात येऊन लोकांच्या उसळत्या गर्दीतून वासुदेव बळवंतांना तुरुंगाकडे नेण्यात आले.

तिसऱ्या दिवशी बुधवारी ५ नोव्हेंबर, १८७९ ला अभियोगाचे काम पुढे चालू झाले. उसळत्या गर्दीमुळे सर्व प्रेक्षकांना अभियोगाचे काम पाहाण्यास मिळणे अशक्य झाले होते. अभियोग अधिक मोठ्या जागेत चालला असता, तर लोकांना तेथे प्रवेश मिळणे शक्य झाले असते. तशी व्यवस्था करण्याविषयी अधिकाऱ्यांकडे सूचना करण्यापर्यंतही काहींची धाव गेली होती. पण न्यायाधिशानी तशी सूचना केली असतानाही ती गोष्ट झाली नाही. ही गोष्ट न्या. न्यूनहॅम यांनी आज बाहेर फोडली. न्यायलयात आल्यावर ते म्हणाले: "Pro Bono Publico" (लोकहित कर्ता) या स्वाक्षरीचे एक पत्र मला आज आलेले आहे, त्यात वासुदेव बळवंताचा अभियोग महत्त्वाचा आहे आणि त्याच्याकडे बऱ्याच जणांचे पुष्कळ लक्ष लागून राहिलेले आहे. न्यायालयातील जागा ही अभियोगाचे काम ऐकण्यास येणाऱ्या सगळ्यांना आत प्रवेश मिळेल इतकी मोठी नाही. म्हणून वासुदेव बळवंताच्या अभियोगाचं काम सत्र न्यायालयाऐवजी अधिक प्रशस्त अशा कौन्सिल हॉलमध्ये चालविण्यात यावे अशी व्यवस्था व्हावी, असे माझे स्वतःचेही काही दिवसापूर्वी मत होते. पण कौन्सिल हॉल मधील उंची गालीच्याचा फार मान राखला जात आहे, असे मला आढळले. या सूचनेचा विचार करण्याला आता फार विलंबही झाला आहे."

बुधवारी महत्त्वाची साक्ष झाली रंगोपंत मोरेश्वर महाजन याची. पुण्यात आणल्यावर मेजर डॅनिअल याने स्टीफनसनच्या बंगल्यांतच महाजन याची राहाण्याची व्यवस्था केली. वासुदेव बळवंतांच्या कोणा साथीदाराने प्रतिशोध म्हणून किंवा न्यायालयात त्याची साक्ष होऊ नये या हेतूने त्याच्या जिवास अपाय करू नये. किंवा तो बाहेर राहिला तर त्याच्या देशभक्तीला आवाहन करून कोणी त्याला फोडूही नये, हा त्यात त्याचा हेतू होता. महाजनला पकडल्यानंतर त्याने वासुदेव

बळवंतांविरुद्ध राणीसरकारचा साक्षीदार व्हावे म्हणून कटवाल्यांना साक्षीदार होण्यास त्वरेने प्रवृत्त करणारी छळाची शस्त्रे त्याच्यापुढे खळखळविण्यात आली होती. नि तो भ्याड असल्यामुळे स्वेच्छेनेच वासुदेव बळवंतांच्या क्रांतिकारक हालचालींचा वृत्तांत देण्यास तो सिद्ध झाला, असे या पुस्तकाच्या पहिल्या आवृत्तीमध्ये मी म्हटले होते. त्यातील पोलिसांच्या छळाने तो घाबरून गेला, ही एकच गोष्ट सत्य आहे. पण पोलिसांच्या पाशवी छळाला तोंड देऊन पुरून उरणारा आडदांड मनुष्य सापडणे सोपे नाही. महाजनलाही पुढे पाहिलेल्या अजलपुरच्या एका चाणाक्ष गावकऱ्याने सांगितले: "त्याना आम्ही रंगूमामा म्हणत असू. अंजलपुरचे लोक सांगत की, यांच्या अंगावर सांडसानी फुल्या देण्यापर्यंत पोलिसांनी यांचा छळ केला होता!"

तेव्हा या घटनानंतरच महाजन राणी सरकारचा साक्षीदार झाला होता हे उघड आहे. त्यांची साक्ष पुण्याला न्यायालयात सुरू झाली, तेव्हा ती वेळ वासुदेव बळवंताना प्रलयकालाचीच वाटली. महाजन आपल्या साक्षीत म्हणाला: "मी गाणगापुरास राहातो. गाणगापूरचे दुसरे नाव घानूर असं आहे. मी तेथे टोलनाक्यावर कारकून म्हणून नोकरीस आहे माझं कुटुंब गाणगापुरास राहातं. हरि गोविंद हे माझे चुलते पुण्यास शनिवार पेठेत राहातात. मी आरोपी नं. १ वासुदेव बळवंतास ओळखतो. त्याची आणि माझी पहिल्यांदा गाठ तीन वर्षापूर्वी बडदाळेस (बार्डाला येथे) पडली. ते मोगलाईत गाणगापुरापासून चार पाच कोसांवर आहे. तो गाणगापुरास जाण्यास आला होता. त्या वेळी वासुदेव माझ्याकडे एक दिवस राहिला होता. त्यानंतर सात आठ महिन्यांनी मी पुण्यास आलो. त्यावेळेस मी कोकणात जात होतो. पुण्यास मी वासुदेवाकडे उतरलो. त्याच्या घरात मी बंदुका, तरवारी आणि पट्टे ही हत्यारं पाहिली. ती हत्यारं किती होती, ते माझ्या लक्षात नाही. तो बडदाळेस आला होता, त्या वेळेस त्याच्याजवळ एक कट्यार होती. कोर्टापुढे असलेल्या हत्यारात ती नाही." महाजन पुढे म्हणाला: "त्यानंतर गेल्या चैत्रात तो पुन्हा आमच्याकडे गाणगापुरास आला तेव्हा त्याच्याबरोबर गोपाळराव होता. गोपाळरावाच्या बापाचं नाव मला ठाऊक नाही. या वेळेस वासुदेवानं दाढी वाढविलेली होती. त्याच्याजवळ तलवार होती. त्या दोघांजवळ दोन काठ्या होत्या. त्याच्याजवळ नाशिक, सातारा जिल्ह्यांची वर्णनं होती. याशिवाय नकाशेही होते. ते कोणत्या जिल्ह्याचे होते ते माहीत नाही. वासुदेवाजवळ पुष्कळ चांदी आणि सोनंही होतं. ती दोन्ही त्यानं गावातील सोनाराकडून वितळवून त्याच्या लडया पाडून घेतल्या. त्यानं चांदी थोडी खैरात केली नि थोडी बरोबर नेली. त्याच्या अंगावर एक शाल होती. मी त्याला विचारलं, 'हे सोनं तुम्याजवळ कसं आलं?' तेव्हा तो म्हणाला की, ते आपल्यापाशी एकानं गहाण ठेवलेलं आहे. चांदी त्यानं संगमावरील देवळातील दत्तात्रेयास वाहिली. सोनं मी विकत घेतलं. देवळाच्या पुजाऱ्यानं याच्याजवळ त्याची शाल मागितली. तेव्हा वासुदेव त्याला म्हणाला, 'माझ्याजवळ सध्या ही एकच शाल आहे.

पण तू पुण्याला आलास, तर एकच काय वाटेल तेवढ्या शाली मी तुला देईन.' मला वासुदेवानं काही उंची माणकं भेट म्हणून दिली."

" 'ज्ञानचक्षु' पत्राचा एक अंक त्याच्या नावावर आला. मीही त्या पत्राचा वर्गणीदार होतो. 'ज्ञानचक्षु'च्या अंकात वासुदेव दरोडे मारून पुण्याहून फरारी झाल्याची बातमी होती. मी त्यास ती दाखविली, तेव्हा आपण लूटी मारल्याचं आणि पळून गेल्याचं त्यानं कबूल केलं. वासुदेव म्हणाला की, मी रामोश्यांबरोबर डोंगरात रहात होतो.' आणि रामोश्यांच्या संगतीतील डोंगरातील जीवनक्रम त्याने सांगितला."

" वासुदेव नंतर गोपाळरावासह शैल मल्लिकार्जुनास निघून गेला. महिना सव्वा महिन्यानी गोपाळराव परत आला. तो संगमावर राहिला. त्या वेळेस मी अफझलपुरास होतो. तेथून आलो, तेव्हा गोपाळ आल्याचं ऐकलं. त्यानंतर बारसहा दिवसांनी वासुदेवही परत गाणगापुरास आला. तो काही दिवस संगमावर आणि काही दिवस गावात रहात असे. गाणगापुरास तो देवळात राहू लागला. तो त्या वेळेस आजारी होता. मी दोन चार दिवसांनी त्याला पहाण्यास जात असे. एके दिवशी 'ज्ञानचक्षु'चे तीन नंबर माझ्या नावाने आले. एकात बुधवारवाडा आणि विश्रामबागवाडा जळाल्याची बातमी होती आणि दुसऱ्यात दौलतराव मारला गेल्याची. तिसऱ्यात काय होतं, ते माझ्या ध्यानात नाही. दौलतरावाची हकीकत ऐकून वासुदेवास फार वाईट वाटलं. त्याचा चेहरा उतरला आणि त्याच्या डोळ्यातून टिपं गळू लागली. दौलतरावाच्या संगतीत घालविलेल्या दिवसांच्या आठवणी सांगून त्यानं फार शोक केला. तो म्हणाला : " दौलतराव हा माझा सरदार होता. तो माझा मित्र असून माझ्या टोळीचा मुख्य होता. तो शूर होता. आणि त्याची त्यानं एखाद्या वीराप्रमाणे स्तुती केली. अशा शूर माणसाला मेजर डॅनिअलनं मारलं म्हणून वासुदेवानं संतापानं मेजर डॅनिअलला शिव्याशाप दिले. पुण्याच्या आगींचा मजकूर ऐकल्यावर वासुदेव म्हणाला :" ते वाडे उगाचच जाळले. पण झालं ते काही वाईट झालं नाही. सरकारचं नुकसान होणं हे केव्हाही चांगलंच. वासुदेव म्हणाला की, पुन्हा दोनतीनशे माणसं मिळाली की, मी परत कामाला लागेन."

महाजनने नंतर रोहिल्यांची आपण कशी गाठ घेतली ते सांगून म्हटले : "त्यांना समक्ष भेटून करार करण्याचं ठरलं. गाणगापुरास परत आल्यावर वासुदेव 'काशीकरबावा' म्हणूनच देवळात राहात असे. काही दिवसांनी त्याचा ताप वाढत गेला. तेव्हा तो माझ्याकडे राहण्यास आला. तो आमच्याकडेच जेवत असे. बंड करून ब्रिटिश राज्य उलथून पाडण्याची योजना त्यानं येथेच आखली. तो म्हणे, आता पैसे जमवून फौज गोळा करावी. फौज जमा करून राज्य घ्यावं. रेल्वे मोडावी. तारायंत्र तोडावी. आणि इंग्रजांचं राज्य उलथून पाडावं. तो म्हणाला की, पुण्याचा

सरकारी खजिना लुटण्याची आपण योजना आखली होती. पण एका मुसलमानानं फितुरी करुन ती बातमी सरकारला दिली आणि तो कट फसला." महाजन पुढे म्हणाला : "काही पत्र माझ्या हातानं पत्ता लिहून तो धाडीत असे. त्याचं एक पत्र माझ्या पत्त्यावर आलं होतं. त्याला त्यानं जबाब पाठविला. त्यावर मी पत्ता लिहिला. तो असा— मुंबईत, फणसवाडीत जगन्नाथाचे चाळीत, गोविंद गोपाळ करमरकर यांचेकडे. पत्र पाठविणाऱ्यांत भास्कर ज्योतिषी आणि हैदराबादचा महंमद हे होते. त्यांच्या नावाचं भास्करचं पत्र हैदराबादेस जातेवेळी मी घेऊन जाईन, असं वासुदेव म्हणाला."

इस्माईलखान रोहिल्याची गाठ पडून त्याच्याशी रोहिल्यांच्या भरतीविषयी झालेल्या वाटाघाटींची माहिती सांगताना महाजन म्हणाला: "इस्माईलखान अन्नूरला आला होता, तेव्हा वासुदेव बागेत होता. गोपाळराव त्याच्याबरोबर बागेतच होता. ही बाग गाणगापुराहून एक मैलावर आहे. तेथून मी त्याना अन्नूरला घेऊन गेलो. गाणगापुराहून अन्नूर पाच मैलांवर आहे."

इस्माईलखानाशी झालेल्या लेखी करारांची माहिती देऊन आपल्या साक्षीत महाजन पुढे म्हणाला: "मेजर डॅनिअल येण्याच्या आधी गाणगापुरच्या देवळाचा सेवेकरी रामभाऊ हा मजकडे आला. त्यानं सांगितलं की, सुलेमान चावडीत असून तो वासुदेवाला धरण्याकरता आला आहे. तो वासुदेवाच्या शोधात होता. मी ते सांगून वासुदेवाला सावध केले. तेव्हा तो माझ्या घरातून निघून देवळाच्या बागेत राहू लागला रोहिल्यांना पैसे द्यावयाचे ठरले होते. पैसे आणण्यास मी पुण्यात जातो, असं म्हणालो. पण वासुदेव स्वतःच ते आणण्यासाठी गाणगापुरहून निघाला. त्याचं दप्तर वगैरे कागद माझ्या घरी होते. मेजर डॅनिअल येताच माझ्या सांगण्यावरून आईनं ते नाहीसं केलं. त्यात गव्हर्नरचं डोकं आणून देणाऱ्यास रु ५००० आणि इतरांना कमी रकमांचे वासुदेव बळवंताचे जाहीरनामे होते. याशिवाय सातारा, नाशिक जिल्ह्याची वर्णनं होती. आणि नकाशे होते. पुण्यास दोनशे माणसं हाताखाली असणारे रजपूत आपले मित्र आहेत, आणि गोदावरी प्रांतात माझे मोठमोठाले स्नेही आहेत, असं वासुदेव म्हणाला. गोदावरीकडे जाण्याचा त्याचा बेत होता, हे मला ठाऊक होतं."

महाजनची आपटे यांनी नंतर कसून उलट तपासणी घेतली. तीत उत्तर देताना महाजनची भंबेरी उडाली. तो म्हणाला : "पुण्यात माझ्या काकांचं घर असूनही मी पुण्यास स्टीफनसन साहेबांच्या बंगल्यात राहात आहे."

आपटे (न्यायाधीशास) : "याचा अर्थ साक्षीदार पोलिसांच्या ताब्यात आहे असाच मी करतो." महाजन : "पण मी पोलिसांच्या ताब्यात नाही. वासुदेवानं त्याचे जाहीरनामे माझ्यादेखत काढले नाहीत. वासुदेवाचे सर्व कागदपत्र माझ्या

आईने नष्ट केले होते. काही वर्तमानपत्राचा मी स्वतःच वर्गणीदार असल्यामुळे त्यांचे अंक माझ्याकडे येत असत. डॅनिअल साहेबास मी वरील पत्र दिलं. ते कलमदानात होतं. जाहीरनाम्यांखेरीज दुसरे कागद मी वाचले नाहीत. डायरी त्यात होती. पण मी ती वाचली नाही. मी निशाण मारण्यास गेलो. कारण निशाण मारणं ही एक विद्या आहे म्हणून ते माझ्या मनात आलं."

अमूरच्या जानोजीराव यशवंतराव या मराठा साक्षीदाराने साक्ष देताना म्हटले : " मी निसबत निजाम सरकार समशेर उमरा, तालुका गवूर, अमूर येथे शिपाई म्हणून नोकरी करतो. आरोपी नं. १ दोन-तीन महिन्यापूर्वी अमूर येथे आला होता. आम्ही त्याला 'महाराज' म्हणत होतो. दरमहा १० रुपये आणि पोटास अन्न या पगारावर माणसं ठेवण्याची त्यानी तयारी दाखविली होती. इस्माईल-खानाबरोबर त्यांचा माझ्या समक्ष करार झाला. तो रंगोपंत यानं लिहिला आणि इस्माईलखान याच्या हातात दिला. त्यावेळी शहाबुद्दीन, शेख सांडू, हुसेनसाहेब, हुसेनखान वगैरे बरेच रोहिले पुढारी हजर होते. त्या पगारावर काम काम करायचं असं विचारताच आरोपी नं. १ म्हणाला की, इंग्रज सरकारविरुद्ध बंड करायचं आहे. दिवसा जंगलात राहून रात्री ब्रिटिश मुलखात लूट मारायची आहे. गवूर येथे ५० रोहिले आहेत. ते सर्व महंमद जमादाराचे हाताखाली आहेत. ठराव पत्राचा इ. सर्व वृत्तांत सागून साक्षीदार म्हणाला : " इस्माईलखान वगैरेंनी ते करण्याचं नाकारलं. पण आम्ही दक्षिणी लोकांनी तर सुरुवातीपासूनच ते नाकबूल केलं होतं." धतुरा बोमण्णा याने आपण बार्डालाच्या जहागिरदाराकडे नोकरी करतो, असे सांगून रंगोपंताला दिलेल्या आपल्या बंदुकीचा वृत्तांत सांगितला. त्याचप्रमाणे ती त्याने परत आणून न दिल्याने आपणच ती बंदूक देवळात जाऊन परत आणल्याचे सांगितले. तो म्हणाला : " रंगोपंतानं माझ्यापाशी १०० माणसं दरमहा रु. १० आणि अन्न या पगारावर मागितली. महाराजांना आम्ही कधी पाहिलं नाही." शेख शहा-बुद्दीन शेख इमाम म्हणाला : "अमूरला रोहिला वस्तीत रंगोपंत आला होता, त्यावेळी (वासुदेव बळवंतांकडे हात दाखवून) हे महाराज त्याच्यासमवेत होते." यावेळी घडलेल्या वरील वृत्तांतात शेख शहाबुद्दीन याने यानंतर संपुष्टी दिली. इस्माईलखान करीमखान याने अपेक्षेप्रमाणे रोहिल्यांच्या भरतीसंबंधीच्या ठरावपत्रांचा वृत्तांत आणि ती सर्व गोष्ट खोटी आहे असे सांगितले. रंगोपंत आपल्या वस्तीत आल्याचे आणि त्याने वरील वेतनावर माणसे ठेवण्याची सिद्धता दाखवल्याचे इस्माईल-खानाने मान्य केले. पण तो म्हणाला : "आमचं काम काय असं विचारलं, तेव्हा दिवसा जंगलात राहून रात्री लुटी मारायच्या असं रंगोपंत म्हणाला. तो म्हणाला की 'मी इंग्रजांचा शत्रू आहे.' तेव्हा, 'तू इथून निघून जा आणि पुन्हा मला तुझं तोंड दाखवू नको,' असं मी त्याला सांगितलं. त्याच्यासमवेत आलेल्या माणसाचा चेहरा

झाकलेला होता. त्यामुळे तो म्हणजेच आरोपी नं. १ असं मी ओळखू शकत नाही !"

इस्माईलखानाच्या खऱ्या गोष्टी नाकारण्याच्या मनोवृत्तीमुळे उलट तपासणीत आपणास अनुकुल अशी बरीच उत्तरे त्यांच्याकडून आपटे यांनी काढून घेतली. त्या-उलट तपासणीत तो म्हणाला : "मी पेशावर पलीकडील राहणारा आहे. माझी मातृभाषा पुश्तु आहे. मला मराठी येत नाही." इतर रोहिले साक्षीदारांनी सांगितले की, "बंडासाठी पाचशे रोहिल्यांची भरती करण्याचे वासुदेव बळवंतांनी ठरवले होते." हे सर्व हैदराबादचे साक्षीदार जवळजवळ तोच तोच पुरावा देणार असल्या-मुळे न्या. न्यूनहॅम म्हणाले की, "अशा वेळी त्यांना बोलावन फक्त उलट तपासणीसाठी पुढे करावयाचे अशी नेहमीची प्रथा आहे." त्यांच्या या सूचनेप्रमाणे मग या साक्षी-दारांना उलट तपासणीसाठी बोलविण्यात आले.

हसनखान शेरेखान खालच्या न्यायालयात हाच वृत्तांत सांगून म्हणाला होता : "जमादारास दहाचे ऐवजी महिना पंचवीस रुपये आणि जेवण देण्याचे महाराजांनी मान्य केलं होतं. येतील तेवढी माणसं मी ठेवीन असंही ते म्हणाले. दिवसा जंगलात राहून रात्री इंग्रज मुलूख लुटावयाचा हे काम समजताच मी नोकरी पत्करण्याचं नाकारलं. परंतु इस्माईलखानानं त्याचा करार मान्य केला. पेशावरील मुलुखांतून स्वतः आपल्या भाईबंदानाही मी नोकरीवर राहण्याविषयी विचारीन, असं इस्मा-ईलखानानं म्हटलं ! मी स्वतः ते मान्य करण्याचं नाकारलं. महाराज तोंड झाकून बोलत होते. त्याचं कारण देताना ते आजारी आहेत, असं रंगोपंत म्हणाला ! तरी-ही आरोपी नं. १. हेच ते महाराज म्हणून मी निश्चित सांगू शकतो ! मी रोहिला वस्तीत नोकरी करीत असलो तरी आहे मी दख्खनीच." शेख सोडू शेख अहंमद वरील वृत्तांत सांगून म्हणाला होता : "मीही हसनखान शेरेखानप्रमाणेच महंमद-खान जमादाराकडेच नोकरी करतो. काम काय करावयाचं ते समजताच मी महा-राजांकडे नोकरी करण्याचं नाकारलं. तेव्हा इस्माईलखान म्हणाला की, 'तू म्याड दख्खनी आहेस.' आणि त्यानं ठरावपत्रावर सही केली. सय्यद हसनखान गुलामखान वरील सर्व वृत्तांत सांगून म्हणाला होता : "जेव्हा महाराज म्हणाले की, इंग्रज हे माझे शत्रू आहेत, तेव्हा आम्ही म्हणालो की, ते आमचे शत्रू नाहीत."

ठरल्याप्रमाणे या सर्व साक्षीदारांना मग उटल तपासणीसाठी बोलावण्यात आले. आणि बचावपक्षाच्या वकिलांना तुम्हाला त्यांची उलट तपासणी करावयाची आहे काय, असे विचारण्यात आले. तेव्हा वासुदेव बळवंतांचे वकील आपटे यांनी धूर्तपणाने मला ती घ्यावयाची नाही, असे सांगितले.

वाई येथे पागोटी बांधण्याचा धंदा करणारा बाबाजी नारायण जोशी याने खालच्या न्यायालयात वासुदेव बळवंताविरुद्ध साक्ष दिली होती. तो स्वतः एका

लुटीच्यासंबंधात अटकेत होता. त्याची साक्ष चालू झाली, तेव्हा न्यायालयात पुन्हा खळबळ उडाली. कारण, खालच्या न्यायालयात वासुदेव बळवंतांविरुद्ध साक्ष द्याव-यास लागली म्हणून त्याच्या मनात चुटपुट लागून राहिली होती. त्यामुळे कुंटे यांच्या-प्रमाणेच त्यानेही आपली साक्ष फिरविली. तो म्हणाला: "मी वाईचा राहणारा आहे. आरोपी वासुदेवाला मी ओळखतो. त्याच्याविरुद्ध मी खालच्या कोर्टात साक्ष दिलेली आहे. सात आठ महिन्यापूर्वी मी त्याच्या घरी पंधरवडाभर राहिलो होतो. त्याच्याकडे रामोशी लोक नेहमी येत नसत. मी त्यांना एकदा-दोनदाच आलेले पाहिले. मी भोरचे लोक त्याच्याकडे आलेले पाहिले नाहीत. वासुदेवानं माझ्यादेखत दंडात सामील होण्यास त्याना कधी सांगितलं नाही. दुष्काळात लोकांना लुटावं असं रामोश्यांनी सुचविलं. पण वासुदेव म्हणाला की, तसं करून काही उपयोग नाही. मी बडोद्याकडे जाणार आहे अस तो म्हणाला. तो म्हणाला की, मी हिंदू लोकांच्या कल्याणासाठी झटत आहे. तो म्हणाला की मला हिंदुधर्माची प्रस्थापना करावयाची आहे." [११]

नानाभाई हरिदास यांनी या वेळेस साक्षीदाराचे खालच्या न्यायालयातील निवेदन वाचून दाखवून त्याला म्हटले: "खालच्या न्यायालयात तू असं सांगितलं आहेस की, वासुदेव म्हणाला की, मला हिंदुधर्माची आणि हिंदू राज्याची प्रस्थापना करावयाची आहे आणि इग्रजांच राज्य उलथून पाडावयाचं आहे." साक्षीदार: "मला खालच्या कोर्टात मी काय म्हणालो ते आठवत नाही. त्या वेळी मला ताप आलेला होता." न्या. न्यूनहॅम: "हे खरं नाही. त्या वेळी तुला ताप आलेला नव्हता." साक्षी-दार: "दुष्काळात लोकाना लुटावं, असं रामोशी वासुदेवाला म्हणाले, हे खरं आहे पण तो म्हणाला की, 'अस करून काही उपयोग नाही. हिंदुधर्माचा प्रचार करावा आणि मला हिंदुधर्माची प्रस्थापना करायची आहे,' असे तो म्हणाला हे खरं आहे. पण ब्रिटिश राज्य उलथून पाडलं पाहिजे, असं तो म्हणाला नाही." तुझी कोणती साक्ष खरी. खालच्या न्यायालयातील की या न्यायालयातील, असे विचारताच आताचीच आपली साक्ष खरी आहे, असे जोशी पुढे म्हणाला.

नानाभाई हरिदास: "तू तुझ्या पूर्वीच्या निवेदनात म्हटल्याप्रमाणे वासुदेवानं रामोश्याना पंधरा रुपये वेतनावर माणसं जमविण्यास सांगितले की नाही?" साक्षी-दार: "नाही!" आपटे यांनी मग या साक्षीदाराची उलट तपासणी घेतली. त्या वेळी तो म्हणाला: "मला नाना फौजदार यांनी वाईला अटक करून दोन शिपायां-च्या मदतीनं मागे एकदा पुण्याला आणलं होतं. त्या वेळी ३।४ दिवस पोलीस कोठ-

---

११ "हिंदुधर्म मजला स्थापन करणे आहे," न्या. न्यूनहॅम यांनी नोंदलेल्या पुराव्यात वासुदेव बळवंतांचे म्हणून नेमके हे शब्द या साक्षीदाराच्या साक्षीत दिलेले आहेत. 'इंपरेटिव्ह V/s वासुदेव बळवत फडके," केस न. 153 of 1879

डीत ठेवलं होतं. त्या वेळी वासुदेवाबद्दल मला माहीत होतं, ते मी पोलिसांना सांगितलं होतं. मला नंतर पुन्हा अटक करून वाईहून पुण्यास आणण्यात आलं आणि गेले १०।१२ दिवस पोलीस कोठडीत ठेवण्यात आलं आहे. मी अजून फरासखान्यातच आहे. माझी वासुदेवाशी गेले सहा एक महिने ओळख आहे. त्यानंतर मी पुण्याला पंधरावडाभर त्याच्याकडे राहिलो होतो. त्या वेळी मी त्याच्याकडेच जेवत असे. वासुदेव हिंदुधर्मस्थापनेविषयीच बोलत असे. इंग्रजांचं राज्य उलथून पाडण्याविषयी नाही." नाना भिडे यांनी सरकारची बाजू सावरण्याकरिता साक्षीदाराकडून फेर तपासणीत वदविलं : "मला वाई तालुक्यात धोंड आणि निंब येथील दरोड्यासंबंधात अटक करण्यात आली होती." न्या. न्यूनहॅम यांनी जोशी याला प्रत्यही न्यायालयात उपस्थित राहण्यास सांगितले. नानाभाई हरिदास : "तो दोन दरोड्याच्या आरोपांवरून पोलीस कोठडीतच आहे." न्या. न्यूनहॅम: "अस्स? मग खोटी साक्ष दिल्याच्या आरोपावरून त्याच्यावर अभियोग भरण्यात काही अर्थ नाही. नाहीतर मी खचित तसा अभियोग त्याच्यावर भरला असता." नाना भिडे: "अभियोजकांचा पुरावा देण्याचं काम उद्या निश्चित संपेल." नानाभाई हरिदासांनी म्हटले: "सरकारच्यावतीनं आता आणखी दोन साक्षीदारच बोलवावयाचे राहिले आहेत. त्यांना उद्या बोलावून सरकारच्या बाजूचा पुरावा उद्या संपेल." आणि मग या दिवशीचे न्यायालयाचे काम संपले.

नवव्या दिवशी गुरुवारी ६ नोव्हेंबरला सकाळी १०॥ वाजताच न्यायालय प्रेक्षकांनी भरून गेले. कारण, आज अभियोगाचा शेवटचा दिवस असेल आणि वासुदेव बळवंतांचे निवेदन आणि अभियोगाचा निर्णय ऐकावयाला मिळेल अशी लोकांची अपेक्षा होती. परंतु निर्णय काही त्या दिवशी लागला नाही. आज रंगोपंत महाजनची ५५ वर्षांची विधवा आई दुर्गाबाई मोरेश्वर महाजन यांची प्रथम साक्ष झाली. त्या म्हणाल्या : " रंगू माझा मुलगा आहे. मी त्याच्याजवळच गाणगापुरला राहाते. आरोपी नं. १ वासुदेव यास मी गाणगापुरास पाहिला. तो देवळात राहात असे. तो फार आजारी होता. तो आमच्याकडे दीड एक महिना जेवणास येत असे. त्याच्या कागदपत्राचं एक बंडल आमच्याकडे होतं. मी काशीहून आले, तेव्हा रंगूनं सांगितलं की, ते वासुदेवाचे कागद आहेत. तो गेल्यावर आणि त्याला अटक झाल्याचं कळताच मी घाबरले. ते कागदपत्र मी फाडून टाकले आणि नदीत फेकून दिले. त्या कागदात दोन पुस्तकं मला चांगली दिसली. ती मात्र मी नदीत फेकून दिली नाहीत. मी ती देवळाच्या पुजाऱ्याला दाखविली. तो म्हणाला की, ते इंग्रजी नकाशे होते. रंगूचं दप्तर निराळं ठेवण्यात आलं होतं. ते मात्र मी नष्ट केलं नाही. " आपटे यांनी बाईंची उलट तपासणी घेतली, तेव्हा त्या म्हणाल्या : " ते वासुदेवाचे कागदपत्र होते, हे मला रंगूनं तसं सांगितलं म्हणून समजलं. वासुदेवाला मी काशीकरबावा म्हणून ओळखत असे. तो जेवायला आमच्याकडे येई, तरी देवळातच रहात असे.

तो तापानं आजारी होता. त्याचं नाव वासुदेव होतं, हे तो पूर्वी आमच्याकडे बड-दाळेस आला होता, म्हणून मला कळलं."

एका रामोश्याचे पूर्वीचे निवेदन पुराव्यात प्रविष्ट करण्याचे नानाभाई हरि-दास यांनी सुचविताच त्याच्या उलट तपासणीस आपणास संधी मिळाली नव्हती, या कारणावरून या गोष्टीला आपटे यांनी आक्षेप घेतला. त्यांचा हा आक्षेप न्या. न्यूनहॅम यांनी उचलून धरला.

नंतर सरकारच्या बाजूने आणखी साक्षीदार नाहीत, असे नानाभाई हरिदास यांनी सांगितले. वासुदेव बळवंतांनी आपल्यावतीनं साक्षीदारांची एक नामावली खालच्या न्यायालयात दिली होती, तरी अभियोगाचा एकंदर रागरंग पाहून त्यांनी आपल्यावतीने कोणालाही साक्षीदार म्हणून बोलावले नाही.

यानंतर वासुदेव बळवंतांची खालच्या न्यायालयातील निवेदने वाचण्यात आली. त्यांचे या न्यायालयातील निवेदन त्यांच्या दैनंदिनीतील नोंदी, त्यांच्या आत्मचरित्रातील उतारे आणि त्यांच्यावरील प्रश्नोत्तरे या रूपाने केले गेले. ते सर्वच्या सर्व देणे विस्तारभयामुळे अशक्यप्राय असल्यामुळे त्याचा सारांशच येथे दिलेला आहे. प्रश्नोत्तरांमध्ये वासुदेव बळवंतांनी आपली वागणूक सरकारला रामोशी पकडण्यात सहाय्य देण्याची होती असे म्हटले. इतर वेळी न्यायाधिशांचे प्रश्न उडवाउडवीची उत्तरे देऊन त्यांनी परतवले. पण हे सर्व न्यायालयीन बचावासाठी होते हे उघड आहे! त्यांनी आपल्या कृत्याविषयी पश्चातापाचे काहीच उद्‌गार न्याया-लयात शेवटी काढले नाहीत. किंवा क्षमेची याचनाही केली नाही, यावरून ते उघड होते. त्यांच्या दैनंदिनीवर आणि आत्मचरित्रावरच ते दोषी ठरविले गेले आणि यातील विधानेच त्यांचे निवेदन ठरले. अटकेच्यावेळी आपल्याजवळ सापडलेल्या कागदपत्रांपैकी काहीविषयी ते म्हणाले : "मी प्रसिद्धीसाठी एक पुस्तक लिहीत होतो. पुस्तकासंबंधीचे कागद त्याचे आहेत. मी गव्हर्नरसाहेबांना एक अर्ज करीत होतो. पण मी मध्यंतरात आजारी पडल्यामुळे तो अर्धवटच राहिला." त्यांच्या निवेदनातील परिच्छेद न्यायालयात वाचले जाऊ लागले, तेव्हा आपल्या बंडामुळे त्यांचे शब्द ऐकण्यास सोत्कंठ झालेली जनता स्तिमितच झाली. त्या उद्‌गारातील ब्रिटिश राज्याचे त्यांनी काढलेले वाभाडे व्यक्त केलेली आपल्या देशाच्या स्वातंत्र्य-विषयीची दुर्दम्य स्वातंत्र्यलालसा, आपल्या दु:खी देशबांधवांविषयी अंत:करणातील कळवळा आणि 'आत्मचरित्रा'तील हिंदी प्रजासत्ताकाची स्थापना करण्याच्या हिंदु-स्थानच्या अंतिम ध्येयाची तेव्हा शंभर वर्षापूर्वी द्रष्टयांच्या थोरपणाने त्यांनी केलेली घोषणा न्यायालयापुढील त्यांचे निर्भय निवेदन म्हणून भावी पिढयांचा मौल्यवान वारसा ठरली. त्या काळात त्यातील एकेक वाक्य आणि एकेक विचार सिंहाचे हृदय असणारा निधड्या छातीचा पुरुषच उद्घोषू शकेल असा होता!

वासुदेव बळवंत म्हणाले : "हिंदुस्थान देशातील लोक ब्रिटिश राज्याखाली उपासमारीने मृत्युपंथाला लागलेले आहेत. ब्रिटिश लोकांचे वरकरणी मार्ग औदार्याचे; परंतु आत पाहिले तर विश्वासघातकीपणाचे आहेत."

"एका हिंदी माणसाला कोठे एखादी मोठी जागा द्यावयाची आणि वृत्तपत्रे लागलीच डांगोरा पिटावयाला लागतात की, हिंदी माणसांना मोठ्या जागा देण्यात येत आहेत. हिंदुस्थानात तयार झालेल्या कापडाच्या कपड्यांना बाजारात मागणी येऊ लागली मात्र. लागलीच कलकत्त्याच्या व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळात युरोपियनासाठी पाच हजार रुपयांच्या वेतनाची नवी जागा निर्माण करण्यात आली. या नव्या अधिकाऱ्याने आयात होणाऱ्या, इंग्लंडमध्ये तयार होणाऱ्या कापडावरची जकात रद्द केली. चौदा जिल्ह्यांचे एकवीस जिल्हे करण्यात आले. आणि आणखीही वाढतील. याचा अर्थ साहजिकच महिना दोन हजार रुपयांवरील वेतनाचे सात नवे कलेक्टर आणि सात नवे न्यायाधीश यांचीही नेमणूक झाली. हिंदुस्थानात सैन्यात सावलीत बसून एखाद्या युरोपियनाने नोकरी केली की, त्याला निवृत्तीनंतर ७५००० रुपयांची ग्रॅच्युइटी देण्यात येते."

"युरोपियन लोकांस हिंदुस्थानातील लोकांपेक्षा याप्रमाणे लाखो रुपये अधिक देण्यात येतात. हा सगळा पैसा कोणाचा ? इंग्रजांच्या बापाचा काय ? तो काय फुकटचा आला काय ? हिंदूंना आणि मुसलमानांना, दोघांनाही ही लांछनास्पद गोष्ट आहे. त्यापेक्षा आपण सर्व मरून गेलो असतो, तर फार बरे झाले असते."

"त्यांनी दुष्काळी कामे उघडली. पण प्रत्येकाला मजुरी दिली रोज दीड आणा आणि त्या वेळी धान्य मिळत होते रुपयाला पाच शेर. असे करणे शुद्ध फसवणूक होती. म्हणजे तोंडाने सांगावयाचे खा म्हणून; पण हातांनी दाखवावयाचे की, तसे केलेस तर मारीन म्हणून ! अशा फसवेगिरीची हजारो उदाहरणे देता येतील. परंतु आमच्यापैकी एकाने तरी त्याचा शोध केला आहे काय ? या सर्वांचा अर्थ काय ? याचा अर्थच मुळी पैसा गोळा करावयाचा, हा देश अमेरिकेप्रमाणे इंग्रजांची वसाहत बनवावयाचा आणि आमचा धर्म नष्ट करावयाचा, हा आहे!"

"या आणि इतर हजारो गोष्टींचा रात्रदिवस विचार करता करता माझे मन हिंदुस्थानातील इंग्रजी सत्तेचा नाश करण्यासाठी उद्युक्त होऊन गेले. मला दुसरा कसलाही विचार सुचत नसे. सकाळपासून संध्याकाळपर्यंत, मी शौचास गेलो असता, स्नान करीत असता, काम करीत असता, जेवीत असता आणि झोपेत–आणि कधी कधी प्रहर न् प्रहर त्या विचारामुळे मला झोपही येत नसे – मी त्याच गोष्टीचा विचार करीत असे. मध्यरात्रीच्या अंधःकारात मी उठून बसत असे आणि ब्रिटिश सत्तेचा उच्छेद कसा करता येईल त्याचा विचार करीत बसे ! त्या विचाराने असा मी वेडा होऊन गेलो ! "

" या देशात शेती कालव्याच्या पाण्यावर करतात. आणि सरकारने जर आमच्या लोकांना दोन महिने पुरेल इतके अन्नधान्य आणि फुकट पाणी पुरवले असते, तर पीक भरघोस आले असते आणि जनतेला वर्षभर पुरले असते. मग धान्याची बाहेरून आयात करण्याची आवश्यकता राहिली नसती आणि माझे देशबंधू भुकेने मेले नसते. परंतु सरकार खोट्या दयेचा आव आणते आणि लोकांची उपासमार दूर करण्याकरिता बराच खर्च आला आहे, या मिषाने नवे कर आणि लायसेन्स ड्यूटी बसवते. "

" अशा आपत्तीत उपासमारीने जे गरीब लोक मरत आहेत आणि ज्यांच्या हाडांचे फक्त सापळे राहिले आहेत, त्यांना मी वाचवू कसा शकेन, याचा मी कित्येक वर्षे सतत विचार करीत आलो आहे. त्या कार्यात मी माझी पै न् पै खर्च करून टाकली आहे. त्याच उद्दिष्टासाठी मी श्रीशैल मल्लिकार्जुनास आणि इतर तीर्थक्षेत्रांच्या दुसऱ्या ठिकाणी तपश्चर्येसाठी गेलो. आणि माझे उद्दिष्ट जर साध्य झाले नाही, तर स्वतःच मरून जायचे ठरविले ! "

" लोक दुःखांनी गांजलेले आहेत तेव्हा मी म्हटले, युध्यात तर करून पाहू ! उपासमारीने मरणारे लोक कदाचित शेवटी यश येईल या विचाराने मला येऊन मिळतील ! "

" मी बंदूक उडविण्यास शिकलो. घोडदौड करण्यास, तरवार फिरविण्यास आणि भाला आणि निशाण मारण्यास शिकलो. हत्यारांचा फार शौक. नेहमी दोन-तीन बंदुका, पाच चार तरवारी, पट्टे, भाले माझ्यापाशी असत. "

" माझा देशाभिमान अतिशय जाज्वल्य होता. ईश्वराला माझी प्रार्थना असे की, त्याने माझे प्राण घ्यावे ; पण माझ्या देशबांधवांना मुक्त करावे ! मी कपाळाला गंध लावण्याचे सोडून दिले. जटा आणि दाढी वाढविली आणि कापल्या कासेत झोळी घेतली. पागोटे घालण्याचे सोडून दिले. "

" कित्येकदा रजा घेऊन नाशिक, अहमदनगर, खानदेश, उज्जयिनी, इंदूर, बडोदा, नागपूर, कोल्हापूर, सांगली, मिरज, वगैरे ठिकाणचा मी पायी प्रवास केला. तेथील भिल्ल, कोळी आणि रामोशी लोकांना ब्रिटिश राज्याविरुद्ध उठविणे हे माझे पहिले काम होते. काही संस्थानातील लोकांना माझ्या प्रयत्नात मी सहभागी करून घेतले. मी रामोश्यांना वेतन दिले. त्यांना पागोटी बांधली. ब्रिटिशांविरुद्ध बंड करण्यास सिद्ध केले. "

"ज्या भूमीच्या पोटी आपण जन्मलो, तिच्याच पोटी ही सारी लेकरे झाली. त्यानी अन्नान्न करीत उपाशी मरावे ; हा देश अमेरिकेप्रमाणे ब्रिटिशांची वसाहत व्हावा आणि आपण कुत्र्याप्रमाणे स्वतःचे पोट भरीत रहावे हे माझ्याच्याने पाहवले नाही आणि म्हणून मी ब्रिटिश सरकारविरुद्ध सशस्त्र बंड पुकारण्याचे ठरविले. त्यापेक्षा हिंदुस्थानच्या लोकांच्या हितासाठी ईश्वराच्या न्यायसभेत हजर होणे बरे."

"काहीही विचार न करता मी शेवटी नोकरीवर लाथ मारली आणि स्वराज्यासाठी लूट मारून पैसा मिळविण्याचे ठरविले. त्या पैशाने मला वाटले की, मला माणसे नोकरीस ठेवता येतील. त्यांच्या लढाऊ टोळया निर्माण करता येतील आणि कार्याला प्रारंभ होईल. लहान मूल जन्मताच काही मोठया माणसांची कामे करू शकत नाही. ते तसे करावयाला कित्येक वर्षे मध्ये जावी लागतात. तेव्हा चांगल्या पायावर उभारलेले लहानसे बंड उभारून शेवटी आपले राज्य परत का मिळवू नये ? अशा सर्व गोष्टींचा सूक्ष्मपणे विचार करून माझ्या टोळया घेऊन मी कार्य सुरू केले."

"पुण्याचा खजिना लुटण्याची माझी सर्व योजना पुरी झाली होती. पण आयत्या वेळेला एका मुसलमानाने तो बाहेर फोडली. त्यामुळे तो बेत मला सोडून द्यावा लागला. त्यानेच–त्यानेच सर्व हिंदुस्थानचा घात केला! नतर आम्ही धामारी लुटली. वाल्हे आणि कित्येक गावांच्या लुटी मारल्या, चांदखेड आम्ही रात्री लुटले. पण माझे उद्दिष्ट सफल होणार नाही, असे मला वाटू लागले. त्यावेळी माझ्या अंगात ताप होता. आणि तो किती दिवस टिकेल ते सांगता येत नव्हते. त्यामुळे रामोशांचा नाद सोडून मी श्रीशैल मल्लिकार्जुनी गेलो."

हवा तेवढा पैसा हातात आल्यावर प्रत्यक्षात आणावयाच्या बंडाच्या आपल्या योजनेची कल्पना देताना वासुदेव बळवंत म्हणाले, "मी माझी माणसे दोन दोन महिने आधी पाठवून देशाच्या चारी कोपऱ्यात बंडे करविली असती. एकाच वेळी असा भडका उडला तर युरोपियन लोकात भीतीचा वायुगोळा उठला असता!. त्यामुळे डाका बंद झाल्या असत्या. रेल्वे उखडल्या गेल्या असत्या! तारांचे खांब उपटले जाऊन तारायंत्रे मोडून पडली असती. सर्व दळणवळण पार थंडावले असते. आणि एका टोकाकडून दुसऱ्या टोकाकडे बातमी गेली नसती. असे झाले असते म्हणजे तुरुंग फोडण्यास संधी मिळाली असती. तुरुंगातील मोठ्या मुदतीचे कैदी सरी आम्हालाच येऊन मिळाले असते. कारण ब्रिटिश राजे पुन्हा प्रस्थापित झाले असते, तर ते पुन्हा पकडले गेले असते, अशी भीती त्याना असती! त्यानंतर सरकारी खजिने लुटता आले असते. आमचे सामर्थ्य किती, आम्ही कितीजण, कोठे आहोत इत्यादीचा काहीच पत्ता न लागल्यामुळे हजारो अडाणी लोक आम्हाला येऊन

मिळाले असते. आणि सर्वत्र एकच चमत्कार व्हावा त्याचप्रमाणे होऊन (हिंदुस्थानांतून) इंग्रजांना हाकून लावून प्रजासत्ताक राज्याची स्थापना करण्याचे माझे जे उद्दिष्ट पूर्णपणे सिद्धीस गेले असते! पण आकाशातील बापानेच खाली उतरून इंग्रजांना वाचविले असते तर कोणास माहीत! "

"पण आपले लोक चांगल्या कामात मागेच राहतात. ब्रिटिशांचे ढोंगी राज्य गेले तर त्यांना आनंद वाटेल. पण ते म्हणतील, 'आमचा पैसा मात्र मागू नका!' अशा लोकांकडून कशाची अपेक्षा करता येईल?"

"अहो, तुम्ही हिंदुस्थानवासी लोकहो आणि माझ्या बंधूनो, मी तुमच्या पाया पडून तुम्हाला शेवटचे वंदन करतो. तुमच्या हितासाठी मी माझे प्राण देऊन तुमचा वकील-म्हणून ईश्वराच्या समक्ष हजर होणार आहे. सर्व स्त्रियांना मी माझ्या मातेप्रमाणे मानले आहे. आणि त्यांचा पैसा मला वमनासमान आहे. जर त्याचा काही अंश माझ्याकडे अजाणता आलाच असेल तर त्याचा उपयोग माझ्या मनात असलेल्या पवित्र कार्यासाठीच झाला असेल! "

"मी ईश्वराला भीत नाही. मी त्याच्याशी भांडण्यास जातो. असे करण्यातही मी काय पुरुषार्थ केला आहे? दधिची ऋषींनी आपल्या अस्थी नाही का देवांच्या कल्याणासाठी काढून दिल्या? तसेच माझे प्राण घेऊन ईश्वराने तुम्हा सर्वांना सुखी करावे अशी माझी त्याला हात जोडून प्रार्थना आहे."

सरतेशेवटी वासुदेव बळवंतांनी देश स्वतंत्र करण्यात आपल्याला आलेल्या अपयशाविषयी आपल्या देशबांधवांची क्षमा मागितली आणि ते म्हणाले : "पण हे होऊ शकले नाही. पण ईश्वरालाच माहीत आहे की, मी हे सर्व तुमच्या हितासाठी केले! अहो, तुम्ही सर्व हिंदुस्थानवासी लोकहो, आणि माझ्या देशबांधवहो, माझ्यामुळे तुम्हाला काहीसुद्धा लाभ झाला नाही. मी माझे उद्दिष्ट साध्य करू शकलो नाही! त्याविषयी मला क्षमा करा!"

दुसऱ्या अभियुक्तांच्यावतीने थोड्या साक्षीदारांच्या साक्षी झाल्यावर ब्रिटिश सरकारचे त्या बंडासंबंधीचे वासुदेव बळवंतांविरुद्धचे आरोप कसे सिद्ध झाले आहेत ते दाखविण्यासाठी अभियोजकांच्यावतीने भाषण करण्यासाठी नानाभाई हरिदास हे उभे राहिले. ते म्हणाले : "पंचातील सभ्य गृहस्थहो, मी पहिल्या प्रथमच तुम्हास या आरोपीविरुद्ध असलेली बाजू विशद केली होती. ती आता पूर्णपणे सिद्ध झालेली आहे. ब्रिटिश राज्य उलथून पाडण्याचा वासुदेव बळवंतांचा उद्देश पुराव्याने पूर्णपणे सिद्ध झालेला आहे. त्याने निरनिराळ्या ठिकाणी माणसे गोळा केली होती, पैसे जमविले होते! त्याची दैनंदिनी आणि आत्मचरित्र ब्रिटिश सरकारविरुद्ध सशस्त्र युद्ध पुकारण्याचे त्याचे उद्दिष्ट असल्याचेच दाखवितात. बाहेरच्या कोणालाही त्याने हे उद्दिष्ट सांगितले नसले, तरी ब्रिटिश राज्य उलथून पाडण्यावाचून त्याचे उद्दिष्ट

दुसरे कोणते असू शकेल? त्याच्या दैनंदिनीत आणि आत्मचरित्रात याला संपुष्टी देणाराच पुरावा आहे. आणि त्याने त्यात उल्लेखिलेल्या घटनांना येथे मांडण्यात आलेल्या तोंडी पुराव्याने संपुष्टी मिळालेली आहे. त्याने आत्मचरित्रात म्हटले आहे की, आपल्यावर झालेल्या कित्येक अन्यायाचा आणि इतर हजारो गोष्टींचा विचार करता आपले मत इंग्रजांविरुद्ध प्रक्षुब्ध झाले आणि त्यांचा नाश करण्याचा आपण निश्चय केला. सकाळी, दुपारी आणि रात्री, स्नान करीत असता, जेवण करीत असता, झोपेत असता हे उद्दिष्ट साध्य कसे करता येईल त्याचाच तो विचार करीत असे. एकसारखा तो त्या विचारात गर्क असे आणि त्याला त्यामुळे हवी ती शांतताही लाभत नसे. मध्यरात्रीसुद्धा तो उठून बसे आणि इंग्रजांचा नाश कसा करता येईल त्याचा विचार करी. इतका की, तो शेवटी भ्रमिष्टाप्रमाणे झाला. राणी सरकार-विरुद्ध सशस्त्र युद्ध पुकारण्याचा हेतू दाखविणाराच हा पुरावा नाही काय?"

नानाभाई हरिदास पुढे म्हणाले: "वासुदेव बंदूक उडविण्याचा सराव ठेवीत असे, आखाड्यातील पेच करी आणि तलवार पट्ट्याचे हात खेळत असे. नेहमी आपल्याजवळ शस्त्रे ठेवीत असे. त्याच्या घराची गेल्या मार्चमध्ये जेव्हा झडती झाली, तेव्हा त्याच्या घरात बंदुकीची दारू, शिसे आणि इतर वस्तू सापडल्या आणि त्या वेळी पंच म्हणून नियुक्त झालेल्यापैकी एकाने येथे येऊन तसा पुरावा दिला आहे."

वरील लिखाणातील उतारे सविस्तरपणे वाचून दाखवीत नानाभाई हरिदास म्हणाले, "एके ठिकाणी वासुदेव म्हणतो की, एकाद्या सावकाराकडून ५००० रुपये मिळाल्यावर रेल्वे उखडून टाकण्यासाठी, तारायंत्रे मोडून टाकण्यासाठी आणि दळण-वळण बंद पाडण्यासाठी सगळीकडे लोकांच्या लहान लहान टोळ्या निर्माण करण्या-चा आपला विचार होता. त्यानंतर तुरुंग फोडावयाचे आणि आतील बंदी सोडून द्यावयाचे होते. हे बंदी आपल्याला येऊन मिळाले असते, असे त्याला वाटत होते. तो म्हणतो की, आपल्याला जर असे दोनतीनशे लोक मिळते तर आपला हेतू साध्य झाला असता. परंतु असे पैसे मिळणे कठीण झाले."

"तरी पण अशा लोकांनी आपल्याभोवती गोळा व्हावे म्हणून त्याने एक मेज-वानी दिली. आपल्याजवळचे पैसे त्याने व्यतीत केले आणि ते लुटी मारून पुन्हा मिळविण्याची आशा धरली." वासुदेव बळवंतांच्या आत्मचरित्रातील आणि दैनं-दिनीतील उतारे वाचून दाखवून नानाभाई म्हणाले, "एके ठिकाणी तो विचारतो की, जर ही माणसे मला अशी सोडून जात राहिली, तर माझे उद्दिष्ट कसे साध्य होईल? ब्रिटिश राज्य उलथून पाडण्याचे ध्येय त्याने सतत आपल्यापुढे ठेवलेले होते. त्याने लुटीत भाग घेतला आहे हे न्यायालयापुढे आलेल्या पुराव्यावरूनच स्पष्ट होते. त्याच्या दैनंदिनीतील नोंदीवरून ते स्पष्टपणे दिसून येते. धामारी येथील

छाप्यात आणि इतर गावांवरील छाप्यात त्याने भाग घेतला आहे. त्या वेळी लूट तोच घेत असे. आणि त्यापैकी काही पैसा शस्त्रे विकत घेण्यासाठी पाठविण्यात येत असे." एका गोपनीय अशा सरकारी मुद्रित पुस्तकातील उतारे बऱ्याच विस्ताराने वाचून दाखवून नानाभाई हरिदास पुढे म्हणाले, "रोहिला साक्षीदारांचा पुरावा आणि रंगोपंत महाजन याची त्याला दुजोरा देणारी साक्ष वासुदेव बळवंताच्या गाणगापूर येथील हालचाली सिद्ध करतात. ब्रिटिश राज्य उलथून पाडण्याच्या त्याच्या उद्दिष्टासाठीच त्या झालेल्या होत्या. राज्यपालांच्या मस्तकासाठी ५००० रुपयांची आणि जिल्हाधिकाऱ्यांच्या मस्तकासाठी २००० रुपयांची वासुदेव बळवंताने काढलेली राजघोषणासुद्धा त्याच उद्दिष्टाचे पुरावे आहेत. त्याचप्रमाणे बनारसच्या ज्योतिष्याचे वासुदेवाजवळ सापडलेले पत्र म्हणजे त्याच्या ब्रि. सरकारविरोधी हेतू सिद्ध करण्यासाठी आम्ही पुढे मांडलेल्या पुराव्याच्या साखळीतीलच एक दुवा आहे."

"येथे आलेल्या साक्षीदारांच्या पुराव्यावरून आणि वासुदेवाच्या दैनंदिनीवरून आणि आत्मचरित्रातील पुराव्यावरून भारतीय दंडविधानाच्या निरनिराळ्या परिच्छेदाखाली त्याच्यावर ठेवण्यात आलेले आरोप संपूर्णपणे सिद्ध झाले आहेत, असा माझा दावा आहे. तेव्हा वासुदेवाला त्यावरून त्याचप्रमाणे त्याच्या स्वतःच्या निवेदनांवरून आणि विधानांवरून तुम्ही दोषी ठरवा."

न्या. न्यूनहॅम : "(आरोपपत्रकातील एक परिच्छेद वाचून मध्येच) घडलेले अपराध विशद करणाऱ्या दंडविधानातील परिच्छेदांच्याच जोडीला आरोपीला द्यावयाची शिक्षा विशद करणाऱ्या दंडविधानातील परिच्छेदाखालीही आरोपींना सत्र न्यायालयाकडे पाठविण्याची मूर्ख चूक येथील दंडाधिकारी बहुधा करीत असतात."

इतर आरोपींवर ठेवण्यात आलेल्या दरोड्यांच्या आरोपासंबंधीचे विवेचन करून नानाभाई हरिदास शेवटी म्हणाले: "या प्रकरणाकडे दृष्टिक्षेप टाकताच पहिल्या प्रथमच बोलताना तुम्ही कदाचित म्हणाल की, मूठभर रामोश्यांच्या साहाय्याने ब्रिटिश राज्य उलथून पाडण्याची कल्पनाही दुर्घट आणि अशक्यप्राय आहे. परंतु हे लक्षात ठेवा की, प्रथम लहान टोळ्यांचे म्होरके म्हणून खटपट सुरू करणारे लोक पुढे सैन्याचे नेते बनलेले आणि राज्यांचे राज्यकर्ते बनलेले आहेत. वासुदेवापुढे ही उदाहरणे नव्हती असे कसे म्हणता येईल? तो अशा लोकांच्या चरित्रांचे लक्षपूर्वक अवलोकन करीत होता आणि त्यांच्या आदर्शाचे अनुकरण करण्याचा प्रयत्न करीत होता असे कशावरून नसेल? त्याच इतिहासाची पुनरावृत्ती करण्याचा त्याचा प्रयत्न होता! तो फसला म्हणून तो करण्याचे त्याच्यावरील आरोप कमी गंभीर ठरत नाहीत. या सर्व वृत्तांतावरून माझी निश्चिती आहे की, या सर्व आरोपांखाली त्याच्याविरुद्ध 'दोषी' असाच निर्णय एकमताने तुम्ही द्याल."

सरकारी वकिलाने केलेल्या जोरदार भाषणानंतर प्राप्त परिस्थितीत वासुदेव बळवंतांचा बचाव करण्याची पराकाष्ठा करण्याच्या निर्धाराने वासुदेव बळवंतांचे वकील महादेव चिमणाजी आपटे यांनी बचावाचे भाषण सुरू केले. आपटे अस्खलितपणे युक्तिवाद करून वासुदेव बळवंतांवरील आरोपाचा फोलपणा दाखवीत होते. त्यांचे वक्तृत्व पाहून प्रेक्षक खूप झाले होते. त्यांच्या निबंधपांडित्याची वाहवा करीत होते. पण त्यांच्या मनात येत होते: "हे सर्व वासुदेव बळवंतांना सोडवून नेण्यास पुरेसे होईल काय?" अशा लोकसमुदायाच्या प्रशंसेच्या आणि सहानुभूतीच्या वातावरणात आपटे म्हणाले: "पंचातील सभ्य गृहस्थहो! कित्येक वर्षात न्यायालयासमोर आणि चाणाक्ष पंचांसमोर आला नव्हता असा महत्त्वाचा अभियोग आज तुमच्यापुढे येथे आलेला आहे. वासुदेव बळवंतांविषयी आधीच या देशात मोठी दुष्कीर्ती झालेली आहे. तेव्हा माझी तुम्हाला अशीही विनंती आहे की, या अभियोगातील महत्त्वाच्या गोष्टींकडे तुम्ही दक्षतापूर्वक लक्ष द्यावे. माझी तुम्हाला अशी विनंती आहे की हा अभियोग सुरू होईपर्यंत न्यायालयाच्या बाहेर वृत्तपत्रातून, लोकांकडून किंवा घडून आलेल्या घटनांवरून तुमचे जे समज झाले असतील, ते तुम्ही आपल्या मनातून काढून टाकावे! वर्तमानपत्रात वासुदेवाविरुद्ध तुम्ही जे काही वाचले असेल किंवा न्यायालयाबाहेर जे काही तुम्ही ऐकले असेल, ते काही वेळ तुम्ही विसरून गेले पाहिजे! येथे न्यायालयापुढे पुरावा म्हणून जे जे काही आले असेल, त्यावरच फक्त आपण आपले लक्ष केंद्रित कराल अशी मला आशा आहे." एक दायित्वपूर्ण वकील म्हणून अणि एक प्रतिष्ठित गृहस्थ म्हणून या अभियोगातील पुराव्याने ज्याला दुजोरा मिळणार नाही, असा कोणताही बचाव किंवा अशी कोणतीही गोष्ट सिद्ध करण्याचा मोही प्रयत्न करणार नाही. हे वासुदेव बळवंतांच्या इच्छेच्या विरुद्धही असेल पण तरीही मी हाच मार्ग स्वीकारणार आहे."

अशा प्रस्तावनेनंतर आपल्या काळाला अनुरूप असा बचाव देताना आपटे पुढे म्हणाले: "पंचांतील सभ्य गृहस्थहो, अभियोजकांनी स्वतःच मान्य केले आहे की, वासुदेव बळवंताने राणी सरकारविरुद्ध सशस्त्र युद्ध करण्याचे प्रयत्न सुरू केले असे म्हटले गेले, त्या वेळेपर्यंत, तो एक कुलीन घराण्यात जन्मलेला समाजाचा सभ्य घटक होता. त्याला मिलिटरी फायनान्स ऑफिसात महिना ६० रुपये वेतनाची नोकरी होती. चांगला सरकारी नोकर म्हणून त्याची कीर्ती होती! हे सर्व आपण विसरता कामा नये!"

आणि ब्रिटिश सरकारविरुद्ध लोकांना चिथावणी दिली."

आपटे यांनी मग पंचांना विचारले : "अशा प्रतिष्ठेच्या मनुष्याने या गोष्टी कराव्यात याला काय कारणे असावीत ? वासुदेवाने या गोष्टी केल्या आहेत हे आपले म्हणणे सिद्ध करण्यात अभियोजक यशस्वी झाले आहेत, असेही घटकाभर समजून चालले तरी त्या करताना वासुदेव हा शुद्धीवर होता आणि योग्य मनःस्थितीत होता असे तुम्ही म्हणू शकाल काय ? असे करण्याची कारणे वासुदेवाच्या दैनंदिनीत आणि आत्मचरित्रात पाहावयाला मिळतात. ही दोन्ही चोपडी अटकेच्या वेळी त्यांच्याजवळ सापडली. पण त्या वेळेला त्याला ताप येत होता. आणि तापाच्या भरात त्याने ती लिहिली आहेत. ही खरी वस्तुस्थिती आहे. पंचांतील सभ्य गृहस्थहो, म्हणूनच त्या पुस्तकातील लिखाण वाचताना तुम्ही बरीच दक्षता घेतली पाहिजे. कारण, राज्यसरकारविरुद्धचे अपराध केल्याचे आरोप मुख्यत्वे करून याच कागदपत्रांवर आधारलेले आहेत. खरे म्हणजे, या आरोपाचा ही लिखाणे हाच एकमेव पुरावा आहे. "

आपटे पुढे म्हणाले : " त्याला वेडयाच्याच रुग्णालयात नेऊन टाकावे अशी वासुदेव बळवंतांची मनःस्थिती नाही हे खरे आहे. परंतु तो बराच काळपर्यंत एकाच गोष्टीचा विचार करणारा एक विषयभ्रम (मोनोमॅनिआ) झालेला मनुष्य होता. तो त्याच मनःस्थितीत वावरत असे. वरील चोपड्यातील काही उतारे भारतीय दंडविधानाच्या आक्षेपाखाली पडतील, असे असतीलही. परंतु ते एका विचित्र मनःस्थितीमध्ये लिहिले गेले होते. पंचांतील सभ्य गृहस्थहो, या वस्तुस्थितीकडे तुम्ही दुर्लक्ष करता कामा नये. जर वासुदेव बळवंत उत्तम मनःस्थितीत असता तर आपल्या अटकेच्या वेळी त्याने असली चोपडी स्वतःजवळ ठेवली असती काय ? त्याने तो पुरावा नाहीसा करून टाकला नसता काय ? "

"मेजर डॅनिअलनी येथे सांगितले आहे की, त्याला अटक झाली, तेव्हा वासुदेव बळवंत, ज्याच्यासमोर आपले मरणच पुढे येऊन ठेपले आहे, अशा माणसासारखा नेत्र विस्फारून पाहात राहिला. मग त्याने अटकेची अशी भीती असता ही चोपडी आपल्याजवळ कशी ठेवली असती ? तेव्हा बहुधा ती सरकारच्या स्वाधीन करण्याचाच त्याचा विचार असला पाहिजे."

पुराव्यातील प्रत्यक्ष पुराव्याकडे वळून आपटे म्हणाले की, दैनंदिनीत उल्लेखिलेल्या कृत्यात असा काही तरी वेध हेतू असल्यावाचून वासुदेव बळवंत आपली दैनंदिनी स्वतःजवळ ठेवील हे बरेचसे अशक्यप्राय वाटते. "काही एका मर्यादेपर्यंत दरोडेखोरांसमवेत जाऊन, नंतर त्यांना पोलिसांच्या हाती देण्याच्या विचारानेच तो त्याना जाऊन मिळाला. त्याना जाऊन मिळण्यात त्याचा हेतू थेट त्या चोपड्यात दाखविला आहे. तोच होता. तो म्हणजे गरीब लोकाचे, त्याचा धाक नसता तर

झालेच असते अशा अत्याचारापासून संरक्षण करणे हा होय. असा काहीतरी हेतू असल्यावाचून त्याने ती चोपडी आपल्याजवळ ठेवली नसती. लुटी मारण्यात त्याचा असा हेतू नसता, तर त्याने दरोड्यात दरोडेखोरांना इतके धाकात ठेवले नसते ! त्याने एकाही लुटीत एकही दुष्ट कृत्य किंवा अत्याचार केल्याचा पुरावा आपल्यापुढे आलेला आहे काय ? किंवा निरनिराळ्या ठिकाणी मारलेल्या लुटीमधून आपल्या स्वत.साठी काही लाभ उठविल्याचा पुरावा आहे काय ? नसेल तर दरोडे-खोरांना जाऊन मिळण्यात वासुदेवाचा हेतू, मी म्हटले त्याच्यावाचून दुसरा कोणता-ही असू शकणार नाही !"

"वासुदेव हा एक असामान्य मनुष्य आहे नि म्हणून त्याने बंड पुकारले होते, हे म्हणणे रास्त ठरणार नाही. तो असामान्य मनुष्य असता तर त्याने नुसत्या शाळकरी पोराना हाताशी धरले असते काय ? आणि तेही ब्रिटिश राज्य उलथून पाडण्यासारख्या भव्य प्रयत्नासाठी ?"

अभियोजकांच्या कित्येक साक्षीदारांच्या पुराव्याचा फोलपणा दाखविण्याचा आपटे यानी मोठा नाटयपूर्ण प्रयत्न करताना म्हटले की, "त्यातील कित्येक साक्षी-दार पोलिसाच्या कोठडीत होते. आणि न्यायालयात त्यानी काय म्हणावयाचे ते त्याना तेथेच सांगण्यात आले होते." आपटे पुढे म्हणाले : "अभियोगातील कित्येक साक्षीदार पोलिसांच्या दमदाटीस घाबरून साक्ष देण्यास सिद्ध झाले आहेत. वासु-देवाचा मेहुणा पोलिसांच्या दडपणामुळेच त्याने केलेली विधाने करण्यास सिद्ध झाला, हे आता सिद्ध झालेले आहे. त्याने येथे पोलिसांच्या जगदी तोंडावर सांगि-तले आहे की, आपल्यावर खोटी विधाने करण्याची सक्ती करण्यात आली. त्याची विधाने त्याने निर्देश केलेल्या संबंधित साक्षीदारांनी फोल ठरविली आहेत. यावरून साहजिक निष्कर्ष असा निघतो की, साक्षीदारांपैकी बहुतेकांच्या संबंधात असेच दड-पण पोलिसांनी आणले असले पाहिजे."

कागदपत्रांतील उताऱ्यांविषयी बोलताना आपटे म्हणाले की, "ब्रिटिश सर-कारविरुद्ध सशस्त्र युद्ध पुकारण्यासंबंधीचे आणि त्यासाठी शस्त्रे गोळा करण्यासंबंधी-चे उतारे वासुदेव बळवंताच्या आत्मचरित्रात सुरवातीलाच आलेले नाहीत, तर मध्यावर आणि शेवटी आलेले आहेत." परंतु वासुदेव हा एक असामान्य आणि दुष्ट मनुष्य होता हे दाखविण्यासाठी त्यासंबंधीचे फक्त त्रोटक भागच तुमच्यापुढे येथे वाचण्यात आले.

अभियोजकांच्या पुराव्यातील ठळक त्रुटी दाखविताना आपटे म्हणाले की, "वासुदेव बळवंत याला तो एक असामान्य व्यक्तित्वाचा मनुष्य आहे किंवा अट्टल बदमाष आहे असा अभियोजकांनी रंगविलेला आहे. परंतु यापैकी कोणतीही गोष्ट सिद्ध करण्यात अभियोजक अपेशी ठरलेले आहेत. वासुदेव बळवंतांसारख्या असामान्य

व्यक्तिमत्वाच्या मनुष्याने ब्रिटिश राज्यच उलथून पाडण्यासारख्या अफाट कामात साध्यासुध्या शाळकरी पोरांचेच फक्त सहाय्य मिळविण्याचा प्रयत्न केला असता का ? "

वासुदेव बळवंतांच्या पूर्वायुष्याविषयी बोलताना आपटे म्हणाले : " वासुदेव हा मिलिटरी फायनान्स खात्यात नोकरीला होता. मग ब्रिटिश राज्याचे सामर्थ्य त्याला माहीत नव्हते, हे शक्य तरी आहे काय ? आणि ते उलथून टाकण्याचा प्रयत्न करणे हे मूर्खपणाचे ठरेल, हे त्याला माहीत नव्हते हे शक्य आहे काय ? त्याला हे माहीत असले, तर मग एक विपयभ्रमिष्ट माणूस सोडला, तर ते उलथून टाकण्याचा निश्चय आपण केल्याचे लिहून ठेवणारा, दुसरा कोण माणूस असा प्रयत्न करील ? "

वासुदेव बळवंतांनी केलेल्या रोहिल्यांची भरती करण्याच्या प्रयत्नासंबंधी बोलताना आपटे यांनी पंचांना विचारले की, हैदराबादच्या साक्षीदारांनी सांगितल्याप्रमाणे त्यांना महिना १० रु. प्रमाणे वेतन मिळत असताना, ते रोहिले लोक दुसऱ्या नोकरीसाठी जातील, हे शक्य आहे काय ? आपटे म्हणाले : " त्या दोन्ही पक्षांचा एकमेकांशी परिचय नव्हता. ठरावपत्र झाल्याचे इस्माईलखानाने स्वतःच अमान्य केले आहे. वासुदेव जर खरोखरीच रोहिल्यांना नोकरीवर घेण्यासाठी गेला असेल, तर त्याने रंगोपंतांसारख्या एका साध्यासुध्या टोलनाक्याच्या लेखनिकाच्या भावापेक्षा अधिक प्रतिष्ठित माणसाचा बहाणा केला असता ! अशा माणसाच्या आश्वासनांवर कोण विश्वास ठेवील ?" असे विचारून आपटे यांनी पंचांना या संबंधाचे अभियोजकांचे म्हणणे अशक्य म्हणून विचारात घेण्याचे सोडून देण्यास सांगितले.

बचाव पक्षाच्या या निष्णात वकिलांनी यानंतर म्हटले की, " राज्यपालांच्या मस्तकासाठी ५००० रुपयांचे पारितोषिक देऊ करणारी आणि जिल्हाधिकारी आणि दुसऱ्या अधिकाऱ्यांच्या मस्तकासाठी ३००० रुपये देऊ करणाऱ्या वासुदेव बळवंतांच्या राजघोषणा तर त्याच्या आत्मचरित्रातील शेवटच्या पानापेक्षाही अधिक मूर्खपणाच्या आहेत आणि त्या काढण्याचे कोणीही सुबुद्ध माणूस मनातसुद्धा आणणार नाही ! "

ब्रिटिश राज्याला अपाय करण्याचा विचारही असा कोणीही सुबुद्ध मनुष्य मनात आणणार नाही, असे म्हणून आपटे आपल्या भाषणाच्या शेवटी म्हणाले : " राज्याविरुद्धचे अपराध जाणूनबुजून आणि डोके ठिकाणावर असलेला मनुष्य म्हणून वासुदेव बळवंताने केले असे आता तरी तुम्ही म्हणणार नाही, असा पंचांतील सभ्य गृहस्थहो, माझा विश्वास आहे. तसे तुम्ही म्हणणार नाही आणि त्याला त्याच्यावर ठेवण्यात आलेल्या सर्व आरोपांतून निर्दोषी म्हणून सोडून द्याल अशी माझी निश्चिती आहे, कारण या विवेचनानंतरही त्याला त्या आरोपांखाली दोषी

ठरवून शिक्षा झाली, तर तो एक खरोखरीच दुर्दैवी मनुष्य ठरेल ! " वासुदेव बळवंतांना वाचविण्यासाठी अशा आशयाचे प्रदीर्घ आणि सुंदर भाषण केल्यानंतर आपटे खाली बसले, तेव्हा आपल्या पांडित्याने आणि निबंधनैपुण्याने त्यांनी न्यायालयातील श्रोत्यांवर चांगलीच छाप पाडली. यानंतर इतर आरोपींच्यावतीने त्यांच्या वकिलांची बचावाची भाषणे झाली.

*न्या. न्यूनहॅम*— (*वासुदेव बळवंतांना*) "*तुला न्यायालयात* भाषण करावयाचे होते, असे तू म्हणाला होतास. ते आता तू करू शकतोस ! " वासुदेव बळवंत : " मला या न्यायालयात आता काहीही सांगावयाचं नाही. " वासुदेव बळवंतांच्या *या उद्‌गारांनी लोक चमकले, तोच न्या. न्यूनहॅम यांनी पंचांना विचारले : " आता* जवळ जवळ पाच वाजले आहेत आणि वेळ फारच थोडा राहिला आहे. तेव्हा माझे भाषण मी आताच करावे असे तुम्हाला वाटते की, ते मी उद्या करू ? " पंच-प्रमुख : " ते उद्याच झालेले बरे. " आणि मग या ठिकाणी अभियोगाचे आजचे काम संपले.

अभियोगाच्या पाचव्या दिवशी शुक्रवारी ७ नोव्हेंबर १८७९ ला तो अभियोगाचा शेवटचा दिवस असल्यामुळे लोकांनी सकाळी ९ वाजल्यापासूनच न्यायालयाकडे धाव घेतली. १० वाजता न्यायालयाचे दालन उत्सुक प्रेक्षकांनी गच्च भरून गेले. मागल्या कोणत्याही दिवसांपेक्षा आज तेथे अधिक गर्दी होती. इतकी की, आत लोकांना गुदमरल्यासारखे झाले. ते एकमेकाला खेटून कसे तरी उभे होते. कित्येक जण कपाळावरील घाम पुसत होते. न्यायालयाच्या आवाराच्या टोकापर्यंतही सहस्रावधी लोक दाटीदाटीने उभे राहिले. न्यायालयाचे आवार भरून गेले, तेव्हा नंतर येणाऱ्या लोकांना पोलिसांनी आवाराबाहेरच हटकवून ठेवले आणि त्यांचा जमाव शेकडोंच्या संख्येने मुळामुठा नद्यांच्या संगमाच्या तीरावर नदीकाठाने मागे पसरला. जसजशी दुपार होऊ लागली तसतशी ती प्रचंड गर्दी आणखी वाढू लागली. जागा पुरेना म्हणून भिंतींवर आणि आजूबाजूंच्या झाडांच्या फांद्यांवरही लोक चढून बसले. *आणि तेथून न्यायालयातील काही दिसते का ते पाहू लागले. लोक*समुदायाचा हा विराट लोंढा आटोक्यात ठेवण्यासाठी आज शेकडो अधिक पोलीस ठिकठिकाणी उभे होते. आणि घोडेस्वारांची आवश्यकता भासली, तर त्यांच्या साहाय्यासाठी तेही जवळच उभे होते.

न्यायालयाचे आसंधक (बेलिफ) डिव्हाइन हे आत शिस्तीने सुव्यवस्था राखीत होते. तेथे गर्दी इतकी प्रचंड होती की लोकांच्या गलबलाटाने न्यायाधिशांच्या भाषणातही आज एकदोनदा अडथळा आला.

विराट जनसंमर्दीच्या या गलकलाटातच सशस्त्र पोलिसांचा आणि घोडेस्वारांचा गराडा असलेली वासुदेव बळवंतांची शिग्राम त्याना घेऊन तेथे येऊन थांबली आणि

गाडीतून उतरून लोकांच्या कुजबुजीत ते न्यायालयात जाऊ लागले, तेव्हा साऱ्या लोकांचे डोळे त्यांच्याकडे लागले. त्यांचे भवितव्य आज तेथे ठरणार होते. एका असहाय्य राष्ट्राचे लोक व्यथित अंतःकरणाने त्यांच्याकडे पाहत त्यांच्या मस्तकावर दैव हौतात्म्याचा मुकूट चढविणार काय, त्याची चर्चा करीत उभे होते.

अभियोगातील पुरावा आणि निर्बंधाच्या कक्षा पंचाना समजावून देणारे आपले भाषण करताना न्या. न्यूनहॅम म्हणाले. " पंचातील सभ्य गृहस्थहो, वासुदेव बळवंताच्या बचावाच्या वकिलांनी केलेल्या या अभियोगात न्यायालयापुढे माडण्यात आलेल्या पुराव्यावरच काय ते तुम्ही अभियोजकांच्या बाजूसंबंधी आपले मत ठरवावे, या विधानाशी मीही संपूर्णपणे सहमत आहे." ते पुढे म्हणाले : "आपला निर्णय देताना, बाहेर तुम्ही ऐकलेल्या किंवा वर्तमानपत्रात वाचलेल्या कोणत्याही गोष्टीचा तुम्ही आपल्या मतावर परिणाम होऊ देता कामा नये. गेले बरेच महिने तुम्ही या अभियोगाविषयी बरेच काही ऐकलेले आहे. पण आपला निर्णय देताना तुम्ही ते सर्व आपल्या मनातून काढून टाकावयाचे आहे. "

दंडविधानाच्या निरनिराळ्या परिच्छेदांखाली कोणत्या गोष्टींसाठी वासुदेव बळवंत दोषी होते की नाही, हे पंचांनी ठरवावयाचे होते ते त्यांना सांगून न्या. न्यूनहॅम म्हणाले : "अभियोगातील घटना अशा आहेत की, आरोपी वासुदेव बळवंत फडके हा सैनिकी वित्त विभागात (मिलिटरी फायनान्स ऑफिसात) नोकरीला होता; तो पुण्याहून एकाएकी फरारी झाला. त्याच्या अटकेसाठी पारितोषिक देऊ करणारा जाहीरनामा काढण्यात आला; त्याचा नंतर निजामच्या राज्यापर्यंत पाठलाग करण्यात आला आणि त्याला शेवटी अटक करण्यात आली. त्याच्याजवळ अटकेच्या वेळी त्याने राज्याविरुद्ध केलेल्या हालचालींसंबंधीचा आणि लटपटीसंबंधीचा, शस्त्रे गोळा केल्यासंबंधीचा, आणि धामारी आणि इतर खेड्यांवर घातलेल्या दरोड्यासंबंधीचा, तसेच रामोश्यांसमवेत त्याने केलेल्या भ्रमंतीसंबंधीचा, ब्रिटिश राज्याविरुद्ध शेतकऱ्यांपुढे त्याने केलेल्या व्याख्यानांचा आणि भाषणांसंबंधीचा आणि शेवटी ब्रिटिश सरकारविरुद्ध बंड पुकारण्या संबंधीचा वृत्तांत कथन करणारी त्याने स्वत:च लिहिलेली त्याची दैनंदिनी आणि त्याचे आत्मचरित्रही सापडली. "

न्या. न्यूनहॅम यांनी वासुदेव बळवंतांनी, दोन्हीही हस्तलिखित कागदपत्रात दिलेल्या आपल्या हालचालींच्या वृत्तांताला संपुष्टी देणाऱ्या बऱ्याच साक्षीदारांच्या पुराव्याचा संदर्भ देऊन या दोन्ही हस्तलिखितातील उतारेही विस्ताराने वाचून दाखविले. आणि मग ते म्हणाले : "यात्रमाणे, ब्रिटिश सरकार विरुद्ध बंड करण्याच्या आरोपी वासुदेव बळवंत फडके याच्या उद्दिष्टाविषयीचा, त्याने माणसे आणि दरोडे घालून पैसा गोळा केल्याचा, आणि त्याच्या भावी चढाईचा भरपूर पुरावा

आपल्यापुढे आहे. या सर्व गोष्टी बंड करण्याचा त्याचा एकच एक हेतू सिद्ध करतात."

वासुदेव बळवंतांच्या हालचालीविषयी आणि कृत्याविषयी बचाव पक्षाने मांडलेल्या युक्तिवादासंबंधी बोलताना न्या. न्यूनहॅम म्हणाले : "वासुदेवाच्या वकिलाने केलेल्या युक्तिवादावर गंभीरपणे विचार करणेच अशक्य आहे. तो बचाव ऐकणे आणि गंभीर मुद्रा ठेवणे, काल मला अशक्य झालेले होते. तो इतक्या खुळचट विचारांनी परिपूर्ण होता."

वासुदेव बळवंताला सरकारला साहाय्य द्यावयाचे होते आणि दरोडेखोरांना पोलिसांच्या स्वाधीन करावयाचे होते, या बचावपक्षाच्या युक्तिवादाचा उल्लेख करून न्या. न्यूनहॅम म्हणाले : "हें कारण जर खरे होते, तर जेव्हा पोलीस त्याचा सर्व इलाखाभर शोध करीत होते, तेव्हा तो पोलिसांपुढे जाऊन उपस्थित का झाला नाही? वासुदेवाने शेतकऱ्यांपुढे आणि इतर लोकांपुढे राजद्रोही भाषणे केली, हे मान्य करण्यात आलेले आहे. परंतु आपल्या लोकांमध्ये, किती अज्ञान पसरलेले आहे, ते पाहाण्यासाठी म्हणून त्याने ती भाषणे केली, असे सांगण्यात आले. असल्या सर्वस्वी फुसक्या युक्तिवादावर मी काही बोलावयालाच सिद्ध नाही."

सरकारने मांडलेल्या पुराव्यात बरेच अनैसर्गिक दुवे असल्याच्या बचावपक्षाच्या प्रतिपादनाचा प्रतिवाद करताना न्या. न्यूनहॅम म्हणाले : "वासुदेवाने फक्त शाळकरी मुलांचेच साहाय्य मागितले, कारण त्याला बहुधा ती मुले तेवढी धोकादायक वाटली नसावीत आणि त्यांनी खऱ्या गोष्टी कोणाला सांगितल्याच तर त्यांच्यावर कोणीही विश्वासच ठेवणार नाही असे त्याला वाटले म्हणून. दैनंदिनी आणि इतर कागदपत्र त्याने आपल्याजवळ बाळगले, ते नंतरच्या आपल्या धाडसाचा वृत्तांत त्यात लिहिण्यासाठी म्हणून. कदाचित ते कागदपत्र सहज हाताळता येणारे होते म्हणूनही आणि बहुधा तो त्या वेळेपर्यंत सर्व बाजूंनी पोलिसांकडून आणि आपल्या शत्रूंकडून संपूर्णपणे वेढला गेला होता म्हणून सुद्धा असतील."

वासुदेव बळवंत हा एक विपयभ्रम झालेला मनुष्य होता या बचावाच्या युक्तिवादासंबंधी न्या. न्यूनहॅम म्हणाले : "आरोपीच्या वकिलांचे म्हणणे आरोपीला वेड लागलेले आहे हे नाही, तर तो एक विषयभ्रमिष्ट आहे हे आहे. हा बचाव क्षणभर जरी ग्राह्य म्हणून ठरू दावला, तरी कोणताही बधकरी निर्बंधामधून सुखनैव निसटून जाईल. कोणत्याही प्रकारचा एक विषयभ्रम आपल्या मनावरील सर्व ताबाच त्या माणसापासून हिरावून घेण्याइतका आणि आपल्या कृत्याचे परिणामच त्याला न समजण्याइतका त्याच्या मनाचा तोल जाण्याइतके त्याचे मन जर विकृत करीत नसेल, तर त्याच्या कृत्याचे समर्थनीय कारण ठरत नाही." दैनंदिनी आणि आत्मवृत्त अंगात ताप असतानाच वासुदेवाकडून लिहिली गेली होती. त्या बचावा-

संबंधी न्या. न्यूनहॅम म्हणाले : "वासुदेव फक्त शेवटच्या दिवसातच रुग्णाईत होता. गाणगापुरास जाईपर्यंत तरी तो रुग्णाईत नव्हता? त्या काळापर्यंतच्या त्याच्या कार्याविषयी आणि विचारांसंबंधीची वस्तुस्थिती ही हस्तलिखिते अगदी स्पष्ट करतात."

न्या. न्यूनहॅम म्हणाले : "ब्रिटिश राज्य उलथून टाकण्याचा वासुदेव बळवंताचा प्रयत्न तुच्छ असेल! पण तरीही ब्रिटिश राज्य उलथून टाकण्याचाच तो प्रयत्न होता. राजद्रोह करण्याचा त्याचा प्रयत्न क्षुद्र असेल पण तरीही तो राजद्रोह करण्याचाच प्रयत्न होता आणि बोललेल्या शब्दाने राजद्रोहाला चिथावणी देण्याचाच प्रयत्न होता. हे करण्याच्या त्याच्या प्रयत्नात तो यशस्वी होण्याची थोडीशीही शक्यता नव्हती. परंतु तुम्ही हे विसरता कामा नये की, त्या प्रयत्नांमुळे बरीचशी हानी झाली असती आणि भयंकर परिणामही घडून आले असते!"

इतर आरोपींविरुद्ध आलेल्या पुराव्याचे विवेचन केल्यानंतर पंचांना उद्देशून केलेल्या आपल्या भाषणाचा समारोप करताना न्या. न्यूनहॅम म्हणाले: "पंचांतील सभ्य गृहस्थहो, या सर्व पुराव्यावरून तुम्हाला आरोपीसंबंधीचा आपला निर्णय द्यावयाचा आहे. पण जर तुम्हाला या पुराव्यासंबंधी काही रास्त संशयच असेल, तर त्या संशयाचा लाभ मात्र तुम्ही आरोपी वासुदेव बळवंत फडके यालाच द्यावयाचा आहे."

न्यायाधिशांच्या भाषणानंतर पंच विचारविनिमयासाठी आपल्या खोलीत गेल्यावर न्यायालयातील शेकडो प्रेक्षक त्यांच्या निर्णयासंबंधी उलटसुलट तर्क बांधीत होते. त्यांच्यातील काही जणाना वाटत होते : "वासुदेव बळवंतांविरुद्धचे सर्व आरोप सिद्ध झाले, असे ठरविण्यात येऊन त्याना फाशीची शिक्षा ठोठावण्यात येणार!" परंतु त्यांच्यातील बहुतेकजण म्हणत होते : "त्या शिक्षेहूनही अधिक भयंकर अशी जन्मठेप काळ्यापाण्याचीच शिक्षा त्याना होणार!"

त्याच वेळी न्या. न्यूनहॅम यांनी वासुदेव बळवंतांचा मेव्हणा बल्हाळ किंवा गणेश काशिनाथ कुंटे याच्यावर खोटी साक्ष दिल्याच्या आरोपावरून अभियोग भरण्यात यावा असा आदेश दिला. आणि ते आपल्या खोलीकडे निघून गेले.

ते गेल्यावर आरोपींच्या पिंजऱ्यात बसलेल्या वासुदेव बळवंतांजवळ एक वृद्ध गृहस्थ बोलताना लोकांना दिसले. ते गृहस्थ म्हणजे वासुदेव बळवंतांचे वृद्ध वडील बळवंतराव अर्थात दादा फडके हे होते. मृत्यूच्या छायेखाली असलेल्या आपल्या बंडखोर पुत्राचे शेवटचे दर्शन घेऊन त्याला निरोप देण्यासाठी शिरढोणहून ते आले होते. सकाळपासून ते न्यायालयात उपस्थित होते. पण वासुदेव बळवंतांना होणारी शिक्षा ऐकण्याचा ताण त्यांच्या वृद्ध मनास सहन होणारा नव्हता! पंच न्यायालयात परत येईपर्यंत 'वासुदेवा'शी ते बोलत राहिले. पण पंच परत येण्यापूर्वीच

ती भेट संपवून ते खिन्न अंतःकरणाने आणि जड पावलांनी न्यायालयाबाहेर निघून गेले !

दोन तासांच्या विचारविनिमयानंतर दुपारी दोन वाजल्यानंतर थोड्या वेळाने पंच न्यायालयात परत आले. त्याच्या एखाद तास आधी, त्यांनी संदर्भासाठी एक पुस्तक मागवून घेतले होते. "तुमचा निर्णय काय ?" म्हणून न्यायाधिशांनी विचारताच पंचप्रमुख नारायणराव बानवलकर म्हणाले : "आमचे सर्व निर्णय एकमताचे आहेत." आणि मग टाचणी पडली तरी ऐकू येईल अशा शांततेत त्यांनी वासुदेव बळवंत हे भारतीय दंड विधानाच्या परिच्छेद १२१ अ, १२२, १२४ अ, ३९५ आणि ४०० या परिच्छेदाखाली राणी सरकारविरुद्ध सशस्त्र बंड पुकारण्याचा कट केल्याच्या, त्यासाठी माणसे आणि शस्त्रास्त्रे गोळा करून किंवा इतर प्रकारे सशस्त्र युद्ध पुकारण्याची सिद्धता केल्याच्या, लोकांमध्ये सरकारविरुद्ध शब्दाने अप्रीती पसरविल्याच्या, दरोडे घालण्याच्या आणि सराईतपणे दरोडे घालण्यासाठी एकत्र आलेल्या गटाचा सदस्य असल्याच्या इ. सर्व आरोपांखालील अपराधांविषयी दोषी असल्याचा पंचांचा एकमताचा निर्णय घोषित केला नि इतर आरोपी शेवटच्या दोन परिच्छेदाखाली दोषी असल्याचा एकमताचा निर्णय घोषित केला.

लोकांना दुःखाचा धक्का देणारे हे निर्णय एकामागोमाग एक याप्रमाणे लिहून घेतल्यावर न्या. न्यूनहॅम पंचांना म्हणाले : "पंचातील सभ्य गृहस्थहो ! या काहीशा कसोटी पाहणाऱ्या अभियोगात आपण आपले कर्तव्य प्रामाणिक नागरिकांप्रमाणे काहीही भय न बाळगता किंवा पक्षपात न दाखविता जागरूकपणे बजावलेले आहे. आणि आपण जो त्रास घेतलात, त्याविषयी मी आपले आभार मानतो." नंतर वासुदेव बळवंताकडे वळून न्या. न्यूनहॅम यांनी त्याला विचारले : "मी शिक्षा सांगण्यापूर्वी तुला काही सांगावयाचे आहे काय ? "

पंचांचा आपल्याविरुद्धचा निर्णय ऐकल्यावर न्यायालयीन निर्णयासंबंधी वासुदेव बळवंतांना आता काहीही शंका राहिलेली नव्हती. आपली या अभियोगांतून सुटका होईल ही त्यांची आशा पार मावळली होती. त्यामुळे निश्चित आणि निर्भयमनाने त्यांनी उत्तर दिले : " मला काहीही सांगावयाचे नाही ! " न्यायाधिशांचे शिक्षापत्र आता काय असणार त्या विषयीच्या उत्सुकतेने परिपूर्ण अशा गंभीर वातावरणात हे संभाषण ऐकल्यावर त्या प्रचंड जनसमुदायाने न्यायाधिशांचा निर्णय ऐकण्यासाठी आपले कान टवकारले. शिक्षा घोषित करताना न्या. न्यूनहॅम गंभीर आवाजात वासुदेव बळवंतांना म्हणाले : " वासुदेव बळवंत फडके, तुझ्यावर ठेवण्यात आलेल्या सर्व आरोपांखाली पुरेशा पुराव्याने तुला दोषी ठरविण्यात आलेले आहे. तुला जी शिक्षा मी आता सुनावणार आहे, ती दंडविधानाच्या सौम्यपणामुळे सर्व प्रकरणात देण्यात येणारी सर्वात मोठी शिक्षा नाही, याचेच मला दुःख होत

आहे. तुझ्या हानिकारक मूर्खपणामुळे ब्रिटिश राज्याला काहीसुद्धा धोका पोचलेला नाही. त्याचप्रमाणे चांगल्या कामगिरीसाठी पारितोषिक मिळालेले पोलीस सोडले, तर कोणाचेही भले झाले नाही ! तू स्वतःचा तर संपूर्ण नाश करून घेतलेला आहेसच; पण वर तुझ्याच शेकडो देशबांधवांवर सर्वनाशाची आपत्ती ओढवण्यास कारणीभूत झालेला आहेस. पळस्पे येथील शिपाई सबासिंग याच्या आणि दौलतरावासह ठिसुबाईच्या डोंगरावर शस्त्रे घेऊन सरकारशी लढताना गोळ्या घालून मारण्यात आलेल्या गरीब आणि वाट चुकलेल्या तुझ्या लोकांच्या मृत्यूलाही तूच कारणीभूत झालेला आहेस. त्यांच्या मृत्यूला नैर्बंधिकदृष्ट्या नाही, तरी नैतिकदृष्ट्या तूच उत्तरदायी आहेस. त्यामुळे तुला मी जन्मठेप काळ्या पाण्याची शिक्षा ठोठावतो!" इतर दोषी ठरलेल्या आरोपींनाही दहा दहा वर्षे जन्मठेप काळ्या पाण्याच्या शिक्षा न्या. न्यूनहॅम यांनी ठोठावल्या. जन्मठेप काळे पाणी ! फाशी नव्हे ! जन्मठेप ! ! त्या काळातील जन्मठेप काळ्या पाण्याची शिक्षा म्हणजे फाशीपेक्षाही भयंकर शिक्षा होती. अंदमानाच्या तुरुंगातील बंदिवानांचे शरीर पिचवत रेंगाळवत येणारे मरण, हे फाशीवरील क्रूर परंतु तत्काळ येणाऱ्या मरणापेक्षा अधिक भयंकर होते. जन्मठेप काळ्या पाण्याच्या शिक्षेचा न्यायाधिशांचा हा निर्णय त्यामुळेच एखाद्या भयानक स्फोटगोलाप्रमाणे न्यायालयात आदळला.

न्यायाधिशांचा निर्णय ऐकताच आरोपींच्या पिंजऱ्यातील वासुदेव बळवंतांकडे पहाणाऱ्या शेकडो लोकांच्या गंभीर मुद्रेवर चिंता आणि सहानुभूती यांची झुंज सुरू झाली. पण जन्मठेपीची शिक्षा ऐकूनही वासुदेव बळवंतांची शूर छाती हादरली नाही. त्यांचे धैर्य उसळून आले. त्यांची मुद्रा अधिक करारी आणि तेजस्वी झाली. ते शांत आणि अविचलितच राहिले. त्यांच्या मुद्रेवर निर्भयतेचे हास्य झळकले आणि तेथे जमलेल्या आपल्या शेकडो देशबांधवांकडे दृष्टी टाकीत ते आपल्या सहबंद्यांना धीरोदात्तपणे म्हणाले : " मित्रहो ! आज आपल्याला या भयंकर शिक्षा मिळालेल्या आहेत. पण त्या सोसून उद्या देशात आपलं नाव तरी अमर होऊन राहील याची खात्री बाळगा. कित्येक जण या त्रस्त जीवनातून स्वतःची सुटका करून घेण्यासाठी ईश्वराची प्रार्थना करतात. पण तशी याचना न करताच पारतंत्र्याच्या या जीवनातून आपणास सोडविण्याची न्यायालयानंच कृपा केली आहे. त्यात आनंद माना. "[१२]

या शिक्षेच्या वज्राघातानंतरही वासुदेव बळवंतांनी दाखविलेले दुर्दांत धैर्य पाहून लोक आणि वर्तमानपत्रांचे प्रतिनिधी थक्क झाले. त्यांचे तेच धैर्य पाहात न्या. न्यूनहॅमही निघून गेले. सर्व बंद्यांना तडकाफडकी बेड्या ठोकण्यात आल्या. वासुदेव बळवंतांना बेड्या ठोकून काढण्यानी आणि साखळदंडानी जखडण्यात आले आणि शांतता राखण्यासाठी सशस्त्र युरोपियन सोजिरांचे आवाज चढले ! न्यायाधीश

१२ 'बॉबे गॅझेट', दि. १० नोव्हेंबर १८७९.

निघून जाताच सर्व लोकांनी आपापल्या जागा सोडल्या आणि वासुदेव बळवंत उभे होते, त्या आरोपीच्या पिंजऱ्याकडे ते वेगाने धावले. त्यांची एकच झिम्मड उडाली. त्यांच्यातील कित्येकांनी त्यांना अभिवादन केले. त्या खाली आरोपीचा तो पिंजरा मोडून पडणार असेच वाटू लागले. त्यांना हटविता हटविता पोलिसांची आणि सोजिरांची त्रेधा उडाली. प्रथम न्यायालय मोकळे करून मगच वासुदेव बळवंताना बाहेर नेण्यास न्यायाधिशांनी पोलिसाना सांगितले होते. मेजर डॅनिअलच्या अधिपत्याखाली अर्ध्या पाऊण तासाच्या अविरत परिश्रमानंतर गर्दी हटवून न्यायालय रिकामे करण्यात पोलिसाना यश आले. नंतर वासुदेव बळवंताना प्रथम तेथून हालविण्यात आले. आणि मग इतर बंदिवानांना.

सशस्त्र सैनिकांच्या रांगेतून लोकांचे प्रणाम स्वीकारीत वासुदेव बळवंत न्यायालयाबाहेर आले, तेव्हा सागराप्रमाणे तेथे पसरलेल्या बाहेरच्या लोकांना ते दिसताच लोक विद्युत्संचार झाल्याप्रमाणे पुलकित झाले आणि त्यांच्या शेकडो कंठांतून आकाश भेदून जाणारे जयघोष निघाले : "वासुदेव बळवंत फडके की जय!" याच जयघोषांनी आजूबाजूचे वातावरण काही वेळ दुमदुमत राहिले. वासुदेव बळवंतांसारख्या देशभक्ताच्या त्यागाची आणि शौर्याची प्रशंसा, त्या कृतज्ञ जयघोषावाचून दुसऱ्या कोणत्या मार्गाने लोक दाखवू शकले असते? लोकांच्या अशा जयघोषांत हातापायातील जड लोहशृंखला लीलेने उचलून घेत धीरगंभीर पावलांनी वासुदेव बळवंत न्यायालयाच्या आवाराबाहेर चालत गेले. आणि आपल्या जयजयकाराच्या कानठळ्या बसविणाऱ्या कल्लोळांत आपल्यासाठी सज्ज करून ठेवलेल्या तेथे उभ्या असलेल्या तुरुंगाच्या बंदिस्त गाडीत शिरले. ती गाडी सर्व बाजूंनी बंद झाली. आणि सशस्त्र घोडेस्वारांच्या गराड्यात चालू झाली. तेव्हा काही अंतरापर्यंत लोक तिच्यामागे धावत गेले. ते मोठ्याने त्या घोषणेने त्यांचा जयजयकार करीत होते "वासुदेव बळवंत फडके की जय!"[११]

* * *

# प्रकरण १९ वे

## देशत्यागाचा इतिहास

कशास आई, भिजविसि डोळे उजळ तुझे भाल,
रात्रीच्या गर्भात उद्यांचा असे उषःकाल,
सरणावरति आज आमुची पेटताच प्रेते,
उठतील त्या ज्वालांतुनि भावी क्रांतीचे नेते;
लोहदंड तव पायामधले खळाखळा तुटणार, आई ! खळखळा तुटणार;
गर्जा जयजयकार क्रांतीचा, गर्जा जयजयकार !

—कुसुमाग्रज

वासुदेव बळवंतांच्या जन्मठेपीनंतरही त्यांच्याविषयीचे त्यांच्या देशबांधवांचे प्रेम कमी झाले नाही. माधवराव रानडे यांची मत अशीच झाली. ज्ञानप्रकाश पत्रात ध्येयवेडा देशभक्त (ए मॅड पेट्रियट) या मथळ्याखाली वासुदेव बळवंतांच्या देशभक्तीची प्रशंसा करणारा एक अग्रलेख त्यांनी लिहिला. वासुदेव बळवंतांच्या बंडाची उघड प्रशंसा करता येणार नव्हती. पण राष्ट्रासाठी त्यांनी केलेल्या सर्वस्व त्यागामुळे त्यांच्याविषयी उचंबळणारा आदर तर लपवता येत नव्हता. अशा कचाट्यात सापडून रानडे म्हणतात : "ते गरीब पथभ्रष्ट लोक काही वेळा इतकी चिकाटी, परिश्रमशीलता, स्वार्थत्यागाची वृत्ती दाखवितात की, त्यांच्या ज्या गुणांनी स्वतःसाठी आपल्या लक्षावधी देशबांधवांची चिरंतन कृतज्ञता संपादन केली असती, त्या गुणांचा सदुपयोग करण्याचा त्यांनी कधीही विचार केला नाही, हे मनात येऊन अतिशय वाईट वाटते. याच गरीब वाट चुकलेल्या लोकांमध्ये वासुदेव बळवंत फडके यांना आपण समावेश केला पाहिजे. आणि अँग्लोइंडिअन लोकांपैकी अत्यंत विपरीत ग्रह करून घेतलेले लोकही आपल्या विचारी मनःस्थितीच्या वेळी आमच्यासमवेत याच मताचे झाल्यावाचून राहणार नाहीत." रानडे पुढे म्हणतात :

"And if the public continue to hold Wasudeo in this kind of estimation, Government has none to blame but

themselves, for it is they and they alone who have invested him with the character of a Patriot and a Martyr to his country's cause, though we freely confess.........that he was a mad patriot and caused many of them to be plunged into unutterable misery simply because this mad patriotism got the upper hand over his reason........."

("तो एक ध्येयवेडा देशभक्त होता आणि केवळ त्याच्या वेड्या देशभक्तीची त्याच्या विवेकशक्तीवर कुरघोडी झाल्यामुळेच आपल्या देशबांधवांपैकी बऱ्याच जणांना अवर्णनीय दुःखात लोटण्यास तो कारणीभूत झाला, हे जरी आम्ही अगदी मोकळेपणाने मान्य करतो, तरी जर लोकांना वासुदेवाविषयी अशाच प्रकारची प्रशंसा वाटली तर तो दुसऱ्या कोणाचा नाही तर, सरकारचा स्वतःचाच दोष आहे, कारण वासुदेवाला स्वदेशाच्या पवित्र कार्यातील देशभक्ताची आणि हुतात्म्याची प्रतिष्ठा त्याने आणि त्यानेच प्राप्त करून दिलेली आहे.")

वासुदेव बळवंतांच्या अभियोगाच्या वेळी उडालेल्या गर्दीचे रसभरीत वर्णन करून आणि त्यांच्यावरील आरोपांचा आणि त्यांना ठोठावण्यात आलेल्या शिक्षेचा वृत्तांत देऊन या अग्रलेखात पुढे म्हटले होते, " वासुदेवानं जर आपली देशभक्ती आपल्या विचारशक्तीच्या योग्य नियंत्रणाखाली ठेवली असती, तर त्याला हे स्पष्ट दिसून आले असते की, जर उद्या ब्रिटिश साम्राज्य उलथून टाकण्यात आले, तर या देशावर त्याच्याहून दुसरे अधिक मोठे संकट येणार नाही." हिंदुस्थानावरील ब्रिटिश राज्य हा एक शाप तर नाहीच. पण अगदी बावनकशी वरदान आहे असे म्हणून त्या अग्रलेखात पुढील सुंदर शब्दात वासुदेव बळवंतांच्या देशभक्तीचा जयजयकार केलेला होता :

"It is a great pity that Wasudeo did not perceive this and allowed himself to be made a toy of, as it were, by his strong feelings of patriotism. Would that amongst our *right-thinking public men, there were a few dozen* as strong-willed, as persevering and as self-sacrificing as Wasudeo has proved himself to be — but of course in a better cause Born of respectable parents, he appears to have received a tolerably respectable education......... and was well-situated as far as his own emoluments are concerned.........He had nothing to gain by the overthrow of the present Government but everything to lose. And yet he sacrificed all this because he fancied that by so doing, he would ameliorate the condition of his fellow-countrymen.........He leaves behind him everything that

a man holds most dearest next to his life — a father, a mother, brothers, a daughter and above all a young beautiful and virtuous wife."

("वासुदेवाला हे उमगले नाही आणि त्याने आपल्या जाज्वल्य देशाभिमानापुढे आपल्या स्वतःचे जणू काही एक खेळणे होऊ दिले, हे अतिशय शोचनीय आहे. एवढ्या दृढ निश्चयाचे, चिकाटीचे आणि स्वार्थत्यागी असे काही डझन लोक, अर्थात अधिक चांगल्या कार्यात, जर आमच्या सुविचारी सार्वजनिक कार्यकर्त्यांमध्ये निर्माण होतील तर किती बरे होईल? त्याचा जन्म प्रतिष्ठित आईबापांच्या पोटी झाला होता आणि त्याचे बरेचसे प्रतिष्ठेचे शिक्षण झाले होते. आणि स्वतःच्या मिळकतीचा विचार केला तर त्याला चांगली नोकरी होती... सध्याचे सरकार उलथून टाकण्यात त्याचा काही लाभ तर नव्हताच, पण त्याचे सर्वस्वच गमावले जाणार होते. आणि तरीही त्याने त्या सर्वांचा होम केला. कारण, त्यामुळे आपल्या देशबांधवांची दु:स्थिती आपण सुधारू, अशी त्याची कल्पना होती. आपल्या स्वतःच्या प्राणानंतर मनुष्याला जी सर्वात अधिक प्रिय वाटते ती ती प्रत्येक गोष्ट मागे टाकून देऊन तो गेलेला आहे. वडील, आई, भाऊ, मुलगी आणि सगळ्यात मोठी गोष्ट म्हणजे आपली सुंदर आणि सुशील पत्नी!") वासुदेवाचे सरकारविरुद्ध काही वैयक्तिक वैर नव्हते असे म्हणून शेवटी 'ज्ञानप्रकाश'ने पुढील शब्दात या अग्रलेखाचा शेवट केला होता :

"We curse Wasudeo, the leader of the dacoits as being one of the causes of untold misery of hundreds of his fellow countrymen. Yet we cannot but hold in grateful recollection and honour the memory of Wasudeo, the Patriot, who sacrificed himself and all his fine prospects in a mad and suicidal project."

("लुटारूंचा नेता म्हणून आपल्या शेकडो देशबांधवांच्या असीम हालअपेष्टांचे अनेकांपैकी एक कारण म्हणून वासुदेवाचा आम्ही धिक्कार करतो. परंतु एका ध्येयवेड्या आणि आत्मनाशाप्रत नेणाऱ्या योजनेच्या पायी आपला स्वतःचा आणि आपल्या स्वतःच्या सगळ्या उज्ज्वल भविष्यकाळाचा होम करून टाकणारा देशभक्त म्हणून वासुदेवाचे नेहमी कृतज्ञ भावनेने आणि सन्मानाने स्मरण केल्यावाचून मात्र आमच्याने राहावणार नाही.")

या स्तुतीवर अग्रलेखांनी जळफळून मुंबईच्या 'बॉम्बे गॅझेट' या हिंदी द्वेष्ट्या वर्तमानाने म्हटले.

"It was not Wassudev Balwunt and his gang of wretched Ramoshis that were to be feared, but that if the

१ 'ज्ञानप्रकाश', दि. १० नोव्हेंबर १८७९.

gang should go on meeting with success and if the spirit of uncertainty should go on increasing, a large portion of inhabitants of Western India might be induced and driven to lawless courses. And for Britain threatened with war on every hand, possibility existed of the movement becoming serious."[१]

(" वासुदेवाची आणि त्याच्या क्षुद्र रामोश्यांच्या टोळक्याची कोणाला भीती नव्हती. पण त्याच्या टोळीला जर यश मिळत गेले असते आणि जर अनिश्चिततेचे वातावरण वाढत गेले असते तर पश्चिम हिंदुस्थानातील रहिवाश्यांपैकी बऱ्याच मोठ्या जनसमुहाची अनैर्बंधिक गोष्टी करण्याकडे प्रवृत्ती झाली असती आणि त्या करण्यास त्यांना भाग पडले असते (असे मात्र भय होते) आणि सगळीकडून युद्धाची भीती असणाऱ्या ब्रिटनच्या दृष्टीने या उठावणीला गंभीर स्वरूप येण्याची शक्यता होती. ") ' टाइम्स ऑफ इंडिया ' पत्राने दोन स्तंभभर मोठा अग्रलेख लिहिला. त्यात म्हटले :

"Sivajee the second has not prospered. After a short and troubled reign, he was ignominiously 'run in' by the police and Mr. Newnham has now sentenced him to transportation for life. Even the honour of martyrdom on gallows is denied to him."

("दुसरा शिवाजी भरभराटला नाही. थोड्या आणि धकाधकीच्या राजवटीनंतर त्याला लाजिरवाण्या रीतीने पोलिसांकडून पकडण्यात आले आणि मि. न्यूनहॅम यांनी आता त्याला जन्मठेप काळ्यापाण्याची शिक्षा ठोठावली आहे. फासावरील हौतात्म्याचा मानही त्याच्यापासून हिरावून घेण्यात आला आहे. ") वासुदेव बळवंतांच्या जयापजयासंबंधीच्या संपादकाच्या विनोदबुद्धीच्या अन्योक्तिपूर्ण, अभ्यासू आणि सोचक लेखनशैलीने भरलेला हा साराच लेख वाचनीय आहे. राजकीय बंडाच्या समर्थनाचे विवेचन करून वासुदेव बळवत हे देशभक्तीनेच बंडास प्रवृत्त झाले होते हे त्यात मान्य केले होते. पण त्याच्या देशभक्तीला विकृत प्रकृतीची देशभक्ती संबोधून हिंदी लोकांना अनाहूत उपदेश करताना त्यात शेवटी म्हटले होते : " त्यांच्या या येडगळ बंडाच्या अपयशामुळे आणि आम्हाला आणखी म्हणावेसे वाटते त्याप्रमाणे कदाचित फाशी देणाऱ्या माणसाकडून ते संतांच्या मालिकेत प्राणप्रतिष्ठा होण्यापासून निसटले या गोष्टीमुळे तरी, त्यांच्या वर्गाच्या कोणाही माणसाकडून त्यांनी केलेल्या अपराधाची पुनरावृत्ती होणे हे कठीण होऊन बसेल! ' हे म्हणताना या पत्राच्या संपादकाला माहीत नव्हते की चारेकरापासून सरदार

२ 'बॉम्बे गॅझेट', दि. ११ नोव्हेंबर १८७९.

१ 'टाइम्स ऑफ इंडिया', दि. १० नोव्हेंबर १८७९.

उधमसिंगापर्यंत हुतात्म्यांची एक दिव्य मालिकाच वासुदेव बळवंतांमागून त्याच पवित्र कार्यात ते यशस्वी होईपर्यंत फाशीच्या तख्तावर चढत रहाणार होती!

वासुदेव बळवंतांच्या बंडावर एका सरकारधार्जिण्या प्रकाशक संस्थेने यानंतर लवकरच प्रसिद्ध केलेल्या एका पुस्तिकेच्या प्रस्तावनेत पुढील भाष्य केलेले आढळते : " आपल्यावर आणि आपल्या देशबांधवांवर झालेल्या खऱ्याखुऱ्या किंवा कल्पित अन्यायांच्या भावनेने चिडून जाऊन, सरकारी सेवेतील जी चांगल्या भवितव्याची होती असे दिसते अशी नोकरी ज्याने सोडून दिली आणि ब्रिटिश सरकार उलथून पाडण्याच्या प्रयत्नात उठावणी करून आपल्याला येऊन मिळण्यासाठी लोकांचे मन वळविण्याचा प्रयत्न करीत त्यांच्यापुढे व्याख्याने देत देशभर जो फिरू लागला अशा एका मनुष्याची माहिती यापुढील पृष्ठात आपल्याला सांगितलेली आहे. आपल्या कार्यासाठी फक्त मूठभरच बेभान माणसे मिळविण्यात त्याला यश आले. या प्रास्ताविकात पुढे म्हटले होते :

"Success is the only justification of rebellion......... William Wallace, Robert Bruce and Oliver Cromwell would not have been entitled to the praise of posterity which is now accorded them had they not been successful in their respective undertakings.........It is to be hoped that his (Wassudeo Bulwunt's) rapid downfall will be a warning (to all)." [४]

(" यशप्राप्ती हेच काय ते बंडाचे समर्थन होऊ शकते... विल्यम वॅलेस, रॉबर्ट ब्रूस आणि ऑलिव्हर क्रॉमवेल हे त्यांची सध्या होते, त्या भावी पिढ्यांच्या स्तुतीला ते आपल्या विवक्षित कार्यात यशस्वी झाले नसते तर पात्र ठरले नसते... त्यांच्या (वासुदेव बळवंताचा) त्वरेने झालेला पाडावच (सर्वांना) चेतावणी ठरेल अशी आशा करावीशी वाटते. ") तेव्हा वासुदेव बळवंत अयशस्वी झाले म्हणूनच राज्यकर्त्यांना त्यांची स्तुती होऊ नये असे वाटत होते तर ! मग उच्च देशाभिमानी ध्येयवादाने प्रेरित होऊन त्यांनी बंड केले असल्यामुळे त्यांनी आपल्या देशबांधवांची त्या बंडामुळेच वाहवा मिळविली.

हिंदुस्थानातील राष्ट्रीय वृत्तपत्रे त्याच्या देशभक्तीसाठी वासुदेव बळवंतांवर मनमोकळेपणाने स्तुतिसुमनेही उधळीत होती. वासुदेव बळवंतांच्या अभियोगाने सर्व हिंदुस्थानचे लक्ष वेधून घेतले होते. त्याचा निर्णय लागताच त्यामुळेच महाराष्ट्राबाहेरच्या इंग्रजी वृत्तपत्रांनीही त्यांच्यावर अग्रलेख लिहिले. शिशिरकुमार घोष यांच्या संपादकत्वाखाली कलकत्ता येथे निघणाऱ्या 'अमृत बझार पत्रिका' या विख्यात वृत्तपत्राने आपल्या सुंदर अग्रलेखात म्हटले :

४ "रिपोर्ट ऑफ दि ट्रायल ऑफ वासुदेव बळवंत फडके (प्रिंटेड ॲट दि डेली टेलेग्राफ ॲंड डेक्कन हेरल्ड प्रेस, पुना)

"Wassudev Bulwant Phadke possesses many of the traits of those high-souled men who are now and then sent in this world for the accomplishment of great purposes! He was an angel tempted by the devil and seduced. His heart was sound; but his reason led him astray. Yet the noble feelings of a Washington, a Tell[5] and a Garibaldi animated his breast, and if he is not appreciated in this country where patriotism is unknown he will be better appreciated in England and other Western countries. As a dacoit his crime must be detested. Yet it is but due to him that his is a noble soul! His heart overflowed with love for India and what Indian can regard such heart with indifference? Even as a dacoit he had a horror of looting the property of females, and he never looted property for his selfish ends. He is the most unselfish of men and his diary breathes a spirit of unselfishness, which is truly divine. Whatever he had, he was willing to offer for his country, even his life. The very idea of establishing a Republic shows the unselfish nature of his mind. He had no intention to establish a Raj of his own."

("महान ध्येयाच्या सिद्धीसाठी या जगात वेळोवेळी अवतरणाऱ्या महात्म्यांच्या अंगी असणाऱ्या सद्‌गुणांपैकी बरेच सद्‌गुण वासुदेव बळवंत फडके यांच्या अंगात आहेत! ते एक देवदूत होते. पण एका वाईट पिशाच्च्याने त्यांना मोह घालून पापभ्रष्ट केले. त्यांचे अंतःकरण सुदृढ होते. पण त्यांच्या बुद्धीने त्यांना आडमार्गाला नेले. तथापि वॉशिंग्टन, टेल आणि गॅरिबाल्डी यांच्या उदात्त भावनाच त्यांच्या अंतःकरणात उचंबळत होत्या. आणि देशभक्ती अज्ञात असलेल्या या देशात त्यांची महती समजली नाही तरी इंग्लंडमध्ये आणि इतर पाश्चिमात्य देशांत त्यांची महती अधिक चांगल्याप्रकारे समजून येईल! लुटारू म्हणून त्यांच्या अपराधांचा धिःकार केला पाहिजे. परंतु तरीही त्यांचा आत्मा हा एक उदात्त आत्मा आहे! असे त्यांच्याविषयी म्हटलेच पाहिजे. त्यांचे अंतःकरण हिंदुस्थानाविषयी वाटणाऱ्या प्रेमाने ओसंडत होते आणि कोणता हिंदी मनुष्य अशा अंतःकरणाची उपेक्षा करील? लुटारू म्हणूनही स्त्रियांच्या संपत्तीची लूट करण्यात त्यांना भीषणता वाटे. आणि आपल्या स्वार्थी उद्दिष्टांसाठी त्यांनी कधीही संपत्तीची लूट मारली नाही. ते मानवातील सर्वांत निःस्वार्थी मानव आहेत आणि त्यांच्या दैनंदिनीतून दरवळणारी निःस्वार्थीपणाची वृत्ती खरोखरीच दिव्य आहे. आपल्याजवळ होते ते सर्व काही आपल्या देशासाठी

५ विल्यम टेल हा स्वित्झर्लंडचा स्वातंत्र्यवीर होता.

द्यावयाला ते सिद्ध होते. आपले प्राणसुद्धा ! प्रजासत्ताक राज्य स्थापन करण्याची कल्पनाच मुळी त्यांच्या मनाचा निःस्वार्थीपणा दाखविते. आपले स्वतःचे राज्य स्थापन करण्याची त्यांना इच्छा नव्हती !" वासुदेव बळवंतांच्या व्यक्तिमत्वाची थोरवी वर्णन करताना या अग्रलेखात शेवटी म्हटले होते :

"Eminently pious, he always prayed to God for the regeneration of his country. Forget for a moment that Phadke led bands of dacoits and sought the subversion of British Government and then he stands before you as a being who is as superior to the common herd of humanity as a Himalayas to the Satpoora Range !"[६]

("ते उत्कटत्वाने नीतिमान असून ते आपल्या देशाच्या पुनरुद्धारासाठी नेहमी ईश्वराची उत्कटतेने प्रार्थना करीत असत. लुटारूंच्या पथकांचे फडके यांनी नेतृत्व केले होते, हे क्षणभर विसरून जा आणि मग सातपुडा पर्वतराजीसमोर हिमालय पर्वत जितका उंच दिसेल, तितकेच सर्व सामान्य माणसाहून फडके थोर असलेले तुम्हाला दिसतील !")

महाराष्ट्रातील राष्ट्रीय वृत्तीची वृत्तपत्रेही वासुदेव बळवंतांची अशी स्तुती करण्यात मागे नव्हती. साताऱ्याच्या 'शिवाजी' पत्राने म्हटले :

"The intentions of Wassudev were praiseworthy, but he did not go the right way to work (them). For the good of his countrymen, he gave up a comfortable situation, abandoned a young wife and sacrificed his own happiness. He did not commit dacoities to amass wealth. We cannot help praising him for his disinterestedness and patriotism.........In these days we very much feel the need of individuals possessing his disinterestedness and self-denial."[७]

("वासुदेवाची उद्दिष्टे प्रशंसनीय होती. परंतु ती साध्य करण्यासाठी तो योग्य मार्गाने गेला नाही. आपल्या देशबांधवांच्या हितासाठी त्याने आपली चांगली नोकरी सोडली. आपल्या तरुण पत्नीला वाऱ्यावर सोडून दिले. आणि आपल्या सुखाचा होम केला. पैसा साठवून ठेवण्यासाठी काही त्याने दरोडे घातले नाहीत. आपल्या निःस्वार्थीपणासाठी आणि स्वदेशाभिमानासाठी त्यांची स्तुती केल्यावाचून आम्हाला राहवत नाही. या दिवसात त्याचा निःस्वार्थीपणा आणि अपरिग्रह अंगी असणाऱ्या व्यक्तींची आम्हाला फार फार आवश्यकता भासत आहे.")

---

६ 'अमृत बझार पत्रिका', दि. १३ नोव्हेंबर १८७९.
७ 'शिवाजी', दि. २१ नोव्हेंबर १८७९.

ऐतिहासिक योगायोग असा आहे की, वासुदेव बळवंतांच्या सर्वस्वार्पणावर रानड्यांप्रमाणेच लो. टिळकांनीही एक अग्रलेख लिहिण्याचा प्रसंग घडला. 'डेक्कन स्टार' या इंग्रजी पत्राचे संपादक वर्गापैकी ते एक होते हे मागे आलेच आहे. टिळक हे उत्तम इंग्रजी लिहीत आणि वरील अनुभवामुळेच 'मराठा' पत्र निघाल्यावर त्यांच्या संपादकत्वाची धुरा त्यांच्यावर येऊन पडली. 'डेक्कन स्टार' या पत्राच्या पहिल्याच वर्षी वासुदेव बळवंतांचा उल्कापात पुण्यात आणि महाराष्ट्रात घडला. त्याचे संपादक नामजोशी तर वासुदेव बळवंतांचे सहकारी, टिळक त्यांचे एका वेळचे शिष्य आणि वासुदेव बळवंतांची उठावणी हे देशभक्तीचे रोमांचकारी बंड म्हणून देशभक्तांना एक स्फूर्तिदायक घटना होती. तेव्हा त्यांच्यावर 'डेक्कन स्टार' पत्रात चांगला अग्रलेख लिहिण्यास टिळकांनी सरसावावे हे साहजिक होते. नामजोशी काही लिखापडी करण्यासाठी प्रसिद्ध नव्हते. त्यामुळे हा अग्रलेख टिळकांनी लिहिलेला होता, हे अगदी शक्यही वाटते. प्रख्यात संशोधक अ. ज. करंदीकर म्हणतात: "रशियन प्रवासी मिनाएफ यांच्या दैनंदिनीत नामजोशी वासुदेव बळवंतांचे नुसते स्नेहीच नव्हते, तर त्यांच्या अभियोगातही अडकलेले होते अशी नोंद आहे. त्यामुळे त्यांच्या पत्राच्या लिखाणाचा भार टिळकांवर पडणे स्वाभाविकच होते. वासुदेव बळवंतांना ७ नोव्हेंबर १८७९ या दिवशी जन्मठेपेची शिक्षा झाली. आणि तो लेख 'डेक्कन स्टार' च्या २३ नोव्हेंबरच्या अंकात प्रसिद्ध झाला. त्याच्या आधी टिळक एल्. एल्. बी. च्या परीक्षेत गुंतले होते. पण नंतर यावेळेला परीक्षेतून ते मोकळे झाले होते. त्यामुळेच या अग्रलेखालाही इतका विलंब लागला असावा. नाही तर 'अमृत बझार पत्रिके'त जर असा अग्रलेख १३ नोव्हेंबरलाच येतो, तर या पुण्याच्याच पत्रात तो इतका विलंबाने का यावा? दुसरे म्हणजे या अग्रलेखात वासुदेव बळवंतांचे कृत्य खऱ्या ख्रिश्चन मनोवृत्तीचे आहे, असे म्हटले आहे. या विवेचनांत टिळकांच्या विचारसरणीचेच प्रतिबिंब आहे. त्या दिवसांत टिळकांवर ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या निःस्वार्थी सेवेचा 'मिशनरी स्पिरिट' चा प्रभाव पडलेला होता, हे प्रसिद्धच आहे. रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक आणि त्यांचे मित्र बडोद्याचे न्यायमूर्ती यशवंत वासुदेव आठल्ये हे तर टिळकांना पुण्याचे जेझुइट असेच चेष्टेने म्हणत असत. त्यावरूनही हा लेख टिळकांनी लिहिला असावा हेच सिद्ध होते. [८] 'डेक्कन स्टार' पत्रात टिळकांनी लिहिलेल्या या अग्रलेखात म्हटले होते :

"In the eyes of his countrymen, Wasudev Balvant Phadke did not commit any wrong.........All true English-men must sympathise with him.........Besides, our rulers are Christians who are commanded by their religion to love their neighbours as themselves. Wasudev, though a

---

८ अ. ज. करंदीकर, "लोकमान्य टिळक नि त्यांचा काळ", पृ. ९९-१००

Brahmin, showed a truly Christian spirit when he tried to relieve the misery of his countrymen. Those who censure Wasudev for pursuing the course which he did, are simply dissemblers."

("आपल्या देशबांधवांच्या दृष्टीने वासुदेव बळवंत फडके यांनी काहीही वाईट गोष्ट केली नाही......सर्व सच्चा इंग्रज लोकांनी त्यांच्याविषयी सहानुभूतीपूर्णच असले पाहिजे......आणखी असे की, आमचे राज्यकर्ते ख्रिस्चन आहेत आणि त्यांना त्यांच्या धर्मानेच शेजाऱ्यावर आपल्या स्वतःवर करावी तशीच प्रीती करण्याची आज्ञा दिलेली आहे. स्वतः ब्राह्मण असूनही आपल्या देशबांधवांची दुःखे नाहीशी करण्याचा प्रयत्न करताना, वासुदेवाने खरोखरी ख्रिस्चन वृत्तीच दाखवली आहे. वासुदेवानें चोखाळला तो मार्ग चोखाळण्याविषयी वासुदेवाला जे दोष देतात ते निव्वळ ढोंगी आहेत.") अमेरिकेच्या वसाहतींनी स्वातंत्र्यासाठी केलेल्या प्रयत्नाचा आसरा घेऊन 'डेक्कन स्टार' पत्राने पुढे म्हटले :

"When war was raging between Great Britain and her American colonies, one Dean Tucker wrote a pamphlet to show that the separation of American colonies from their mother country would be no loss to the latter, but a clear gain to her. This opinion did not find favour at that time. But we know from history that his opinion was right. Wasudev deserves the highest praise, not only from all natives, but even from Englishmen who wish for the prosperity of Her Majesty's Eastern Empire. By sacrificing himself, he has averted a danger which sooner or later must follow intolerable oppression. We consider him as the harbinger of a bright future for India."[१]

("ग्रेट ब्रिटन आणि त्याच्या अमेरिकेतील वसाहती यांच्यामध्ये जेव्हा जोरात युद्ध चालू होते, तेव्हा डीन टकर नावाच्या एका माणसाने अमेरिकन वसाहतींचे आपल्या मातृदेशापासून होणारे विभक्तीकरण हे त्या मातृदेशाला कोणत्याही प्रकारे हानिकारक होणारे नसून उघड उघड लाभकारक ठरेल असे सिद्ध करणारी एक पुस्तिका लिहिली. या मताला त्यावेळी पाठिंबा मिळाला नाही. परंतु इतिहासावरून आपल्याला माहीत आहे की, त्याचे मत बरोबर होते. वासुदेव केवळ हिंदी लोकांच्याच नव्हे तर राणीसरकारच्या पूर्वकडील साम्राज्याची भरभराट व्हावी अशी इच्छा करणाऱ्या इंग्रज लोकांच्यासुद्धा प्रशंसेलाच पात्र ठरतो. आपल्या स्वतःची आहुती देऊन, असह्य छळापाठोपाठ आज ना उद्या अटळपणे आलेच पाहिजे असे

१ 'डेक्कन स्टार', दि. २३ नोव्हेंबर १८७९

सकटच वासुदेवाने वारलेले आहे. त्यांना आम्ही हिंदुस्थानच्या उज्ज्वल भवितव्याचे अग्रदूतच मानतो.") 'बोध सुधाकर' पत्राने म्हटले :

"Some journals of Bombay have heaped all kinds of opprobrious epithets on Wasudev. But his autobiography shows that he possessed some sterling qualities. He must be classed with some of the best benefactors of mankind .........His intentions were good, but the means by which he hoped to carry out his ideas were utterly unsuited to his times."

("मुंबईच्या काही पत्रांनी वासुदेवाच्या डोक्यावर सर्व प्रकारची शिवीगाळ करणाऱ्या नावाची रासच उभी केली आहे. परंतु त्याच्या अंगात काही विशुद्ध गुण होते, असेच त्याच्या आत्मचरित्रावरून दिसते. मनुष्य जातीच्या काही अत्युत्तम हितकर्त्यांमध्ये त्याची गणना केलीच पाहिजे. ... ... त्यांचे हेतू चांगले होते. परंतु ते ज्या साधनांनी आपल्या कल्पना प्रत्यक्षात आणण्याची त्यांनी आशा धरली होती, ती त्यांच्या काळाला अयोग्य होती. ") वासुदेव बळवंतांच्या श्रेष्ठत्वाचे वर्णन करण्यासाठी अमेरिकेच्या स्वातंत्र्यवीरांशीच त्यांची तुलना करताना हे पत्र पुढे म्हणाले :

"We are certain that those who esteem and applaud Washington will do the same in case of Wassudev; but the natives of India have lost all ideas of patriotism, and hence there is no one to appreciate him. Washington pursued a policy which was perfectly understood by all his countrymen; but the plans of Wasudev were utterly unintelligible to his followers. The opinion which Wasudev has expressed with regard to the oppressiveness of the British rulers are true to a certain extent, and it would be well, if our governors were to profit by them."[१०]

(" आमची अशी निश्चिती आहे की, वॉशिंग्टनची जे प्रशंसा किंवा वाहवा करतात ते वासुदेवांसंबंधीही तेच करतील. परंतु हिंदुस्थानच्या रहिवाश्यांमध्ये देशभक्तीच्या सगळ्या भावनाच नाहीशा झाल्या आहेत आणि म्हणून त्यांची योग्यता ओळखणारा येथे कोणीच नाही. आपल्या सर्व देशबांधवांना नीट समजून येणारे धोरण वॉशिंग्टनने ठेवले. परंतु वासुदेवाच्या योजना त्यांच्या अनुयायांना पूर्णपणे अनाकलनीय होत्या. ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या छळवादीपणाविषयी वासुदेवाने व्यक्त केलेली मते काही मर्यादेपर्यंत खरी आहेत. आणि आमच्या राज्यकर्त्यांनी त्यांच्यापासून काही बोध घेतला तर चांगले होईल. ")

१० 'बोध सुधाकर', दि. ३ डिसेंबर १८७९.

शुक्रवार ७ नोव्हेंबर १८७९ ला वासुदेव बळवंतांच्या अभियोगाचा निर्णय लागला. बुधवारी १२ नोव्हेंबरला त्यांना अंदमानच्या वाटेवर ठाण्याच्या तुरुंगात हालविण्यात येणार होते. त्यांचे निर्गमन गुप्त ठेवण्याविषयी सरकारने अतिशय दक्षता घेतली. पण ती बातमी तरीही बाहेर फुटलीच. बुधवारी दुपारी उतारू (पॅसेंजर) गाडीने ते ठाण्याला जाणार असे समजताच, ती गाडी सुटण्याच्या आधी एक तास पुण्याच्या स्थानकाच्या आजूबाजूच्या रस्त्यांवर आणि स्थानकावर त्यांना पहाण्यासाठी शेकडो लोकांनी गर्दी केली. 'वासुदेव बळवंतांच्या' भरारीमुळे त्यांच्या नावात युरोपियनांनाही आकर्षण वाटत होते. त्यामुळे हा बंडखोर वासुदेव बळवंत दिसतो तरी कसा, ते पहावे म्हणून तेही मोठ्या संख्येने पुण्याच्या स्थानकावर जमले. त्यात युरोपियन स्त्रियाही होत्या. गाडी सुटण्याच्या काही वेळ आधी सशस्त्र पहाऱ्यात वासुदेव बळवंतांना पुणे स्थानकावर आणण्यात आले. तेव्हा त्यांच्या नावाचा जनसमुदायाने प्रचंड जयजयकार केला. युरोपियन स्त्रियांमध्येही त्यांना पहाण्यासाठी पुढे सरकण्याची धडपड सुरू झाली. त्यांच्यापैकी एकीने तर पुढे क्षेप घेऊन वासुदेव बळवंतांना फुलांचा एक भरगच्च पुष्पहार भेट म्हणून दिला. त्यांनीही त्या विचित्र प्रेमोपहाराचा आनंदाने स्वीकार केला. आणि त्या बाईंचे आभार मानले. हे वृत्त समजताच राज्यकर्त्यांनी पुढे त्याविरुद्ध ओरड करून आकाशपाताळ एक केले आणि राज्यपालांच्या कार्यकारी मंडळाच्या एका सदस्याने त्या युरोपियन महिलेचे नाव मिळविण्याची खटपट केली. तेव्हा त्या महिलेचे नाव कळले– मिसेस हिगिन्स ! तो पुष्पहार हातात वागवीत स्थानकावर उभ्या असलेल्या गाडीत पोलिसांनी आपल्यासाठी ठेवलेल्या एका राखीव डब्यात ते शिरले. आणि लोकांनी केलेल्या " वासुदेव बळवंत फडके की जय " या जयघोषात त्यांच्या गाडीने पुणे सोडले. ते जात होते जन्मठेपीवर ! आपण मृत्यूच्या भेटीस जात आहो हे त्यांना समजत होते. पण आपल्या हौतात्म्याचा आपल्या देशबांधवांकडून कृतज्ञतेने जयजयकार होत आहे हे पाहून त्यांच्या हृदयात समाधानाच्या उर्मी उठल्या असतील !

स्टुअर्ट नावाच्या युरोपियन अधिकाऱ्याच्या हाताखाली सशस्त्र सोजिरांचा आणि सैनिकांचा त्यांच्यावर पहारा होता. त्यांच्या आगमनाची वार्ता वाटभर लोकांना कळली होती. त्यामुळे बऱ्याच स्थानकांवर त्यांच्या दर्शनासाठी लोक जमले होते. काही स्थानकांवर गाडीच्या खिडकीत कोपरे टेकून उभे राहात, तेही लोकांशी चार शब्द बोलले.

वासुदेव बळवंतांच्या या वादळी प्रवासाचे वृत्त दुसऱ्या दिवशी समजताच सरकारी वरिष्ठ अधिकाऱ्यांना राग आला. थेट राज्यपालांच्या कार्यकारी मंडळातही त्याची चर्चा झाली. मंडळाच्या सदस्यांनी या राजकीय निदर्शनाविषयी आणि वासुदेव बळवंतांना वाटेवरील स्थानकावर लोकांशी बोलण्याची मोकळीक देण्यात

आल्याविषयी कडक शब्दात नापसंती व्यक्त केली. विशेषत: कल्याण स्थानकावर दोन हिंदुशी आणि एका गृहस्थाशी या बंद्याला का बोलू देण्यात आले त्याची चौकशी करण्याचा त्यांनी आदेश दिला. मुंबई सरकारचे हंगामी मुख्य सचिव उद्गारले : "वासुदेवाच्या पुण्याहून ठाण्याला करण्यात आलेल्या स्थानांतराच्या एकंदर सर्व प्रकारातच पराकाष्ठेची अव्यवस्था झालेली दिसून येते." [11]

ठाण्यात वासुदेव बळवंतांच्या आगमनाचे वृत्त बुधवारी सकाळीच पसरले आणि त्यांना पाहण्यास शेकडो लोकांनी लागलीच ठाणे स्थानकाकडे धाव घेतली. पण त्यांना स्थानकावर जाऊ देण्यात आले नाही. तेव्हा स्थानकापासून ठाण्याच्या तुरुंगाकडे जाणाऱ्या रस्त्यावर लोक दुतर्फा उभे राहिले. आणि एका बंद गाडीतून ठाण्याच्या तुरुंगाकडे ते जाऊ लागले, तेव्हा वाटेवर लोकांनी त्यांच्या दर्शनासाठी धावपळ केली. १२ नोव्हेंबर १८७९ला ते ठाण्याच्या तुरुंगात आले [12] आणि काळ्यापाण्यावर जाणाऱ्या बंद्यांच्या कोठड्यांच्या आवारातील एका कोठडीत त्यांना बंद करण्यात आले.

वासुदेव बळवंतांच्या ठाण्यापर्यंतच्या विजयी प्रवासाची वर्णने वाचून अँग्लो वर्तमानपत्रकारांची माथी भडकली नि त्यांच्यापैकी एकाने आपल्या अग्रलेखात विचारले : "सर्व स्थानकावरच गाडीच्या खिडकीतून बाहेर वाकून कोणाशीही त्यांना बोलू देण्यात आले. जणू काही ते काळ्यापाण्यावर शिक्षा भोगण्यासाठी जाणारे दंडित नसून सरकारचे एक सन्मान्य पाहुणेच होते. या मनुष्याला हुतात्मा न बनविण्यात सरकारने शहाणपणाची कृती केलेली आहे. आणि म्हणून आता या देशातून बाहेर त्यांना अशा गुप्तपणे हलविण्यात आले पाहिजे की, कुणाचेही तिकडे लक्ष जाऊ नये. म्हणजे त्यांचा लोकांना शक्य तेवढ्या लवकरात लवकर विसर पडेल !" हिंदी द्वेष्ट्या लोकांची ही दुष्ट मनिषा अर्थातच अगदी फोल ठरली. कारण वासुदेव बळवंतांचे नाव यानंतर येथे ब्रिटिश सत्तेला धावयाच्या आव्हानाचे, आत्यंतिक आदराचे आणि स्वदेश प्रीतीचे बोध चिन्हच होऊन बसले !

त्या वेळी अंदमानला पाठविण्यात येणारे सर्व बंदी प्रथम ठाण्याच्या तुरुंगात एकत्र करण्यात येत असत. त्यांच्या या भरतीस 'चलान' असे म्हणत. असे चलान वासुदेव बळवंत ठाण्यास पोचल्यावर एकाच आठवड्यात तेथे आले होते. आणि त्याच्यातूनच त्यांना मंगळवारी १८ नोव्हेंबर १८७९ ला अंदमानला पाठविण्याचे ठरले होते.

मुंबई सरकारच्या वरिष्ठ वर्तुळातील यंत्रणा वासुदेव बळवंतांना अंदमानला पाठविण्यासाठी करावयाच्या व्यवस्थेतच आता व्यग्र होती. जे. आर. नेलर हे आता

११ हंगामी मुख्य सचिवांचे अवर सचिवास पत्र ; दि. १४ नोव्हेंबर १८७९ ; मुंबई सरकारचे कागदपत्र.

१२ 'रजिस्टर शोईंग दि डिस्पोझल ... ऑफ दि इयर" 1879

मुंबई सरकारचे हंगामी सचिव झाले होते. निदर्शनाची पुनरावृत्ती टाळण्यासाठी त्यांनी आपल्या हाताखालच्या अधिकाऱ्यांना वासुदेव बळवंतांना काळ्यापाण्यावर पाठविण्याच्या व्यवस्थेसंबंधी सविस्तर आणि सक्त सूचना दिल्या. या सूचनांप्रमाणे वासुदेव बळवंतांना ठाण्याच्या तुरुंगातून १८ नोव्हेंबरला तेथील मुख्य चलानात न पाठविता १७ नोव्हेंबरलाच सायंकाळी वेचक आणि कुशल संरक्षकांच्या हाती गुप्त-पणे आगगाडीच्या दुसऱ्या वर्गाच्या एका विशेष राखीव डब्यातून जळगावपर्यंत पाठवावयाचे होते. जळगाव स्थानकाजवळच्या दुय्यम तुरुंगात १८ नोव्हेंबरपर्यंत त्यांना बंदिस्त करून ठेवावयाचे होते. आणि मग १८ नोव्हेंबरला तेथे येणाऱ्या मुख्य चलानासमवेत मेल गाडीने त्यांना पुढे प्रवास करावयाचा होता. गाडी जर जळगावला थांबणारी नसली तर त्यांनी जळगावऐवजी भुसावळला उतरावयाचे आणि मग वर सांगितल्याप्रमाणे पुढे जावयाचे होते.

अंदमानसाठी ठेवावयाच्या त्यांच्या या प्रस्थानाची वासुदेव बळवंतांना ते रेल्वे स्थानकाच्या वाटेवर चालू लागेपर्यंत सूचनाही देण्यात यावयाची नव्हती. आवश्यक ते गाडीचे तिकीटही आधीच काढून ठेवावयाचे होते आणि गाडी ठाण्याला येण्याच्या केवळ काही मिनिटे आधी त्यांना स्थानकावर पोचवावयाचे होते. त्यांच्या समवेतच्या संरक्षकांनाही १६ नोव्हेंबर किंवा १७ नोव्हेंबरला सकाळी, १७ नोव्हें-बरला तुम्ही कामगिरीसाठी सिद्ध राहावे, इतकेच काय ते सांगावयाचे होते. आणि कामगिरीचे प्रयोजन किंवा जाण्याचे ठिकाण त्यांना सांगावयाचे नव्हते! स्थानकावर जाताना वाटेत किंवा प्रवासात वासुदेव बळवंतांना कोणाशीही बोलू देण्यात येऊ नये आणि ज्या स्थानकावर गाडी थांबत असेल, अशा सर्व स्थानकांवर त्यांचे कोणाशीही संभाषण होऊ देता कामा नये, असेही वरील सूचना देताना अधिकाऱ्यांना सांगण्यात आले होते. ठाण्याच्या तुरुंगाचे पर्यवेक्षक स्मिथ यांना विशेष आणि स्पष्ट चेतावणी देण्यात आली होती की, "या आज्ञा अगदी गोपनीय असून त्या गुप्त ठेवा-वयाच्या आहेत. वासुदेव बळवंतांना १७ नोव्हेंबरला ठाण्याहून हालविण्यात यावयाचे होते, हे जर कोणालाही आधी कळले, तर सरकार त्यानाच त्याविषयी उत्तरदायी धरील आणि या आज्ञा तंतोतंत आणि पूर्णपणे पाळावयाच्या आहेत."

परंतु स्मिथ यांनी अशी सूचना केली की, जळगाव हे अगदी लहान गाव असल्यामुळे वासुदेवाला थेट अलाहाबादला नेणेच अधिक श्रेयस्कर ठरेल. त्यांनी सरकारला असेही कळविले की, १७ नोव्हेंबरला रात्री या बंद्यासमवेत जाण्यासाठी म्हणून एका युरोपियन अधिकाऱ्याची आवश्यकता लागेल. त्यांच्या या दोन्ही सूचना स्वीकारण्यात आल्या.

तथापि ठाण्याच्या तुरुंगात आल्यावर दुसऱ्याच दिवशी वासुदेव बळवंतांनी तुरुंगाच्या अधीक्षकास कळविले की, आपणास झालेल्या शिक्षेविरुद्ध उच्च न्याया-

लयाकडे अभ्यर्थना (अपील) करावयाचा आपला विचार असल्यामुळे सत्र न्याया-धिशांच्या निर्णय पत्राची प्रत मागविण्यात यावी आणि आपल्याला ती देण्यात यावी. अधीक्षक स्मिथ यांनी १४ नोव्हेंबर १८७९ ला ते केले.

वासुदेव बळवंतांच्या या संकल्पाचा सुगावा सरकारपक्षीय पत्रांना लागलीच लागला. आणि त्यांनी 'वासुदेव बळवंत' या मथळ्याखाली ती बातमी प्रसिद्ध केली.[११] कोणाही बंद्याला त्याच्या अभ्यर्थनेचा निर्णय लागेपर्यंत देशाबाहेर हालवावयाचे नाही असा सरकारी नियम होता. आणि वासुदेव बळवंतांना अंदमानला पाठविण्या-संबंधीच्या मुंबई सरकारच्या हंगामी मुख्य सचिवांच्या वरील आज्ञा त्या नियमांच्या विरुद्ध होत्या. राज्यपालांच्या कार्यकारी मंडळाचे एक सदस्य अॅशबर्नर यांना वासुदेव बळवंताना तडकाफडकी अंदमानला पाठवावे अशी घाई झाली होती. तिच्या भरात ते म्हणाले: "त्यांना ठाण्याहून अभ्यर्थना करावयाची आहे, तशीच ते अंदमा-नातूनही करू शकतील!" ते त्यासाठी हा नियमही धाब्यावर बसविण्याला सिद्ध होते. कारण त्यांच्या मते ज्या सरकारने तो नियम केला त्या सरकारला तो रहितही करण्याचा अधिकार होता. आणि वासुदेव बळवंतांना अंदमानला पाठविले की, त्यांच्या अशा पाठवणी संबंधात जनतेत असलेल्या प्रक्षोभाच्या भावना लागलीच ओसरतीळ, असेही त्यांना वाटत होते.

परंतु अॅशबर्नर यांचे सहकारी रावेन क्रॉफ्ट मात्र त्या नियमांचे असे उल्लंघन करण्याच्या विरुद्ध होते. ते म्हणाले की, वासुदेव बळवंतांना देशाबाहेर पाठवणीची अशी घाई करू नये. कारण त्यामुळे माझ्या मते "मूर्ख आणि क्षुद्र" असणाऱ्या या बंद्यासंबंधात सरकारला अशी नेहमीच्या प्रथेबाहेरची उपाययोजना करावी लागली, अशी सगळीकडे समजूत होऊन बसेल. आणि म्हणून त्यांनी अॅशबर्नर यांच्या मताविरुद्ध मत दिले. अॅशबर्नर आणि हंगामी मुख्य सचिव यांना त्या विधेयावर शेवटी माघार घ्यावी लागली. वासुदेव बळवंतांची जन्मठेपीवरील पाठवणी तात्पु-रती स्थगित करण्यात आली.

डिसेंबर १८७९ च्या पहिल्या आठवड्यात आपण मागविलेले कागदपत्र हाती येताच वासुदेव बळवंतांनी स्वतःच मुंबईच्या उच्च न्यायालयाला उद्देशून एक लांबलचक अभ्यर्थना मराठीत लिहून काढली. तीत आपल्या अभियोगाचे कागदपत्र मागविण्यात यावे आणि आपणाविरुद्ध लागलेला आपणास दंडित ठरविणारा निर्णय आणि आपणास मिळालेली शिक्षा ही रहित करण्यात यावीत किंवा शिक्षा कमी तरी करण्यात यावी, अशी त्यांनी उच्च न्यायालयाला विनंती केली. त्यांची ही अभ्यर्थना मुंबईच्या उच्च न्यायालयाला ७ डिसेंबर १८७९ ला मिळाली.

या अभ्यर्थनेची सुनावणी १८ डिसेंबर १८७९ ला त्या न्यायालयात न्यायमूर्ती पिन्हे आणि न्यायमूर्ती मेलव्हिल यांच्यासमोर सुरू झाली. अपोलो स्ट्रीटवरील 'अॅट-

११ 'बॉम्बे गॅझेट', १४ नोव्हेंबर १८७९.

मिरॅलिटी हाऊस' मधून हे उच्च न्यायलय त्यावेळेला नुकतेच आताच्या वास्तूमध्ये आलेले होते. "या वेळीही महादेव चिमणाजी आपटे यांनीच वासुदेव बळवंतांचे वकील पत्र घेतले. बहुधा वकिलांच्या मते असावयाला पाहिजे असे एक पुरवणी आवेदन त्यांनी उच्च न्यायालयात केले. आणि मग ते वासुदेव बळवंतांच्यावतीने उच्च न्यायालयात अभिभाषण करण्यास उभे राहिले.

आपल्या अभिभाषणात आपटे म्हणाले : "मला जर या ठिकाणी अभियोगातील पुराव्याच्या खरेपणात शिरण्याची निर्बंधाने मोकळीक असती, तर माझ्या पक्षकाराविरुद्ध करण्यात आलेल्या कल्पनातीत आणि आवाच्यासवा आरोपामधील कोणत्याही गोष्टी करण्याचे त्याला सामर्थ्य नव्हते आणि धडाडीही नव्हती आणि राणी सरकारविरुद्ध युद्ध पुकारण्याच्या त्याच्या प्रयत्नाचा दुसऱ्या कोणत्याही दृष्टीनें विचार करता येणार नाही, हे मी जवळजवळ निर्णायक रीतीने सिद्ध करू शकलो असतो. एकदा हे राजकीय आरोप काढून टाकले की, मग त्याच्यावर केवळ साधे दरोडेखोरीचे आरोपच बाकी उरतात. आणि वासुदेव बळवंताला केवळ काही वर्षांच्या कारावासाची योग्य ती शिक्षा देता येईल. परंतु निर्बंधाप्रमाणे (कायद्याप्रमाणे) घटनांच्या खरेपणात जाण्याचा अधिकार मला राहात नाही. त्यामुळे खालच्या न्यायालयाच्या निर्बंधाच्या चुकाच दाखविणे आणि ठोठावण्यात आलेली शिक्षा सौम्य करण्यासाठी न्यायमूर्तींचे मन वळविणे मला भाग पडत आहे."

सत्र न्यायाधिशांनी पंचांना उद्देशून केलेल्या भाषणाकडे वळून आपटे म्हणाले: "त्यांनी केलेली निर्बंधविषयक चूक अशी आहे की, त्यांनी अगदी स्पष्ट शब्दात वासुदेव हा दोषी आहे असे मत व्यक्त केले. बंगालच्या न्यायालयाच्या काही निवाड्याप्रमाणे ही निर्बंधविषयक चूकच आहे." बंगालच्या न्यायालयाचे हे उतारे वाचून दाखवून आपटे पुढे म्हणाले : "बचावाचे म्हणणे वेडगळपणाचे आणि हास्यास्पद आहे असे सांगण्यात आणि पुराव्यात नसलेल्या गोष्टी पचांना उद्देशून केलेल्या भाषणात समाविष्ट करण्यात सत्र न्यायाधिशांनी चूक केलेली आहे." आपटे यांनी शेवटी म्हटले की, " सत्र न्यायाधिशांनी ठोठावलेली शिक्षा फारच कडक आहे आणि म्हणून ती रहित किंवा कमी करण्यात यावी."

न्या. पिन्हे : "मी सत्र न्यायाधीश असताना आरोपींच्या अपराधित्वाविषयीचे माझे मत मी पंचांना सांगत असे. आणि मध्याच्या इंग्लंडच्या सर न्यायाधिशांसह बऱ्याच न्यायाधिशांची तशी प्रथाही आहे. अशी प्रथा अनैर्बंधिक ठरविणारा एकादा निर्बंध अस्तित्वात नाही."

न्या. पिन्हे यांच्या या मतप्रदर्शनानंतर अभ्यर्थनेविषयीचा आपला निर्णय देताना न्यायमूर्ती पिन्हे यांनी म्हटले : "तुरुंगातून या बंद्याने मराठीत धाडलेले

१४ 'अॅडमिरॅलिटी हाऊस' च्या आणि आताच्या उच्च न्यायालयाच्या वास्तूमधील दगडावरील कोरीव लेख.

लांबलचक आवेदन आम्ही शांतपणे वाचून पाहिले आहे. आणि त्याच्या वकिलांना त्यासंबंधी काय म्हणावयाचे आहे आणि आपल्या पक्षकाराच्यावतीने काय प्रतिपादन करावयाचे आहे तेही आम्ही ऐकलेले आहे. या प्रकरणातील कागदपत्र आणि कामकाज मागवून घेण्याच्या मताचे आम्ही व्हावे असे काहीही कारण आम्हाला आढळत नाही. निबंधाचे जे विधेय आपटे यांनी उपस्थित केले आहे, त्यासंबंधी माझे मत मी आधीच व्यक्त केलेले आहे. त्यांनी निबंधाचा दुसरा कोणताही प्रश्न न्यायालयाच्या दृष्टीला आणलेला नाही. हा एक पचांनी ऐकलेला अभियोग असल्यामुळे पुराव्याच्या खरेपणाच्या प्रश्नात शिरण्यास आम्हाला प्रतिबंध आहे. ठोठावण्यात आलेली शिक्षा सौम्य करण्यासंबंधी बोलावयाचे तर या मनुष्याच्या कृत्यामुळे आपत्तिजनक परिणाम घडत आलेलें आहेत ही गोष्ट आता खरोखर अगदी इतिहासाचाच भाग होऊन राहिली आहे. आणि ती आम्हाला विसरता येत नाही. कित्येक अज्ञानी रामोश्यांना, कुणब्यांना आणि दुसऱ्या जातीच्या शेतकऱ्यांनासुद्धा लुटीसाठी एकत्र संघटित होण्यास प्रवृत्त करण्यात आले होते. आणि त्यांच्यापैकी काहीना आपल्या अपराधांसाठी दीर्घ अवधीच्या कारावासाच्या शिक्षा ठोठावण्यात आलेल्या आहेत. दुसऱ्या काहीजणांना जन्मठेप काळ्यापाण्याची आणि आणखी काही जणांना फाशीची शिक्षा ठोठावण्यात आलेली आहे. या परिणामांसाठी आवेदक नैर्बंधिकदृष्ट्या उत्तरदायी नसेल, परंतु नैतिकदृष्ट्या त्यासाठी तो उत्तरदायी आहे; यात काही संशय राहात नाही. तेव्हा शिक्षा सौम्य करण्याच्या दृष्टीने अभियोगाच्या कामकाजाच्या कागद मागविण्यास आम्हाला काहीच कारण दिसत नाही आणि म्हणून आम्ही हे आवेदन फेटाळून लावतो।"

उच्च न्यायालयाने हे अभ्यर्थनाचे आवेदन फेटाळून लावल्यानंतर कोणत्याही वेळी वासुदेव बळवंतांची अंदमानाकडे पाठवणी होणे, ही निश्चिती झाली. परंतु अंदमानात त्या वेळी १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धातील बरेच बंदी होते. दीर्घ अवधीच्या शिक्षा झालेल्या बंधाना नियमाप्रमाणे त्या बेटावरच काही काळानंतर सुटे सोडण्यास लागत असे. तेव्हा या परिस्थितीचा आणि या सवलतीचा लाभ घेऊन त्या लोकांच्या साहाय्याने वासुदेव बळवंत तेथे काय नवी धामधूम उडवून देतील, याची सरकारला निश्चिती नव्हती. त्यामुळे राज्यपालांच्या कार्यकारी मंडळाच्या २२ डिसेंबरच्या बैठकीत या प्रश्नाची चर्चा झाली, त्यावेळी राज्यपाल सर रिचर्ड टेंपल आणि त्यांचे मंत्रिमंडळ यांनी वासुदेव बळवंताना काळ्या पाण्याची शिक्षा भोगण्यासाठी अंदमानास पाठविण्याचा विचार रहित केला. हंगामी मुख्य सचिव नेलर यांनी त्या प्रकरणाच्या कागदपत्रावर लेखणीच्या किंवा खरे तर पेन्सिलीच्या " एका फटकाऱ्याने अधिक सुरक्षित आणि संरक्षित आणि मुंबई सरकारच्या स्वतःच्या अधिकारक्षेत्रा-

---

१५ नेलर यांची पेन्सिलीची नोंद; दि. २२ डिसेंबर १८७९, मुंबई सरकारचे कागदपत्र.

खाली असणाऱ्या एडनच्या किल्ल्यातील तुरुंगाची अंदमान ऐवजी वासुदेव बळवंतांच्या जन्मठेपीसाठी निवड केली.

"*Wasudeo to go to Aden, not to the Andamans*"

("वासुदेवाला एडनला धाडावयाचे; अंदमानला नाही") असे म्हणून नेलर यांनी या नोंदीत पुढे म्हटले : "यासंबधीची आगाऊ सूचना द्यावयाची नाही. फक्त पोलीस महानिरीक्षकाना गुप्त चेतावणी द्यावयाची. (बंदिवानाला) पी. अँड. ओ. कंपनीच्या आगनावेने युरोपियन पोलीस अधिकाऱ्याच्या अधिपत्याखाली पाठवावयाचे."

असे करण्यात मुंबई सरकारने वासुदेव बळवंतांवर काही दया दाखविली नव्हती. *कारण एडनचे वायुमान तर अंदमानच्या वायुमानापेक्षाही वाईट होते.* एडनच्या मध्यभागी निद्रिस्त ज्वालामुखीचा भव्य डोंगर असून सभोवताली तुटलेल्या खडकाळ कडयांनी ते द्वीपकल्प घेरलेले आहे. एडनचे वायुमानही सरासरी ८७ अंश असते. कित्येक वेळा ते ९८ अंशापर्यंतही चढते. "या ठिकाणी बराच काळ राहिल्यास मनुष्याच्या आकलनशक्तीचा आणि प्रकृतीचा चक्काचूर होऊन जातो, असे सरकारी चोपडयात म्हटले आहे. [१६] तुरुंगाबाहेर असणाऱ्यांची प्रकृती जर तेथे अशी ढासळत असे, तर तुरुंगातील बंदिवानांच्या अवस्थेची कल्पनाच करावी. एडनच्या सैनिक बळाच्या जोरावर वासुदेव बळवंतांवर अधिक दाब ठेवणेही शक्य आहे असे सरकारला वाटले. तुरुंगातील हालअपेष्टांनी चिडून जाऊन बंदिवानांनी आक्रोश केला तरीही तो बाहेर ऐकू येऊ नये, अशा या ठिकाणच्या क्रूर कारागारात वासुदेव बळवंतांना नेऊन टाकण्याचा ब्रि. सरकारने निर्णय घेतला !

वासुदेव बळवंतांना काळ्या पाण्यावर पाठविण्यासाठी आखलेल्या व्यवस्थेचा आता पुन्हा विचार करणे सरकारला भाग होते. २३ डिसेंबर १८७९ ला त्यामुळेच नेलर यांनी तुरुंगयंत्रणेचे महानिरीक्षक डॉ. क्रुकशँक यांना एक चिठी लिहिली. आणि तीत ही नवी व्यवस्था सांगितली. त्या वेळी पी. अँड ओ. कंपनीची आगनाव माजगावच्या धक्क्यावरून सुटत असे. त्यामुळे नेलर यांनी डॉ. क्रुकशँक यांना कळविले की, आगनावेने माजगावचा धक्का सोडण्याच्या फक्त काही वेळच आधी वासुदेव बळवंत तेथे पोचतील, अशा बेताने येणाऱ्या गाडीने त्यांना ठाण्याच्या तुरुंगातून मुंबईला आणावे आणि मग त्यांना एकदम माजगावच्या धक्क्यावर उभ्या असणाऱ्या आगनावेवरच नेण्यात यावे. तुरुंगाच्या अधीक्षकावाचून दुसऱ्या कोणालाही हा आदेश कळू देऊ नये. मुंबईचे पोलीस आयुक्त फँक साऊटर यांनी यापुढील किंवा आणखी

---

१६ "दि इंपिरिअल गॅझेटिअर ऑफ इंडिया," खंड ५ पृ. १०-११

१७ कॅप्टन एफ्. एम्. हंटर : "अँन अकाउंट ऑफ दि ब्रिटिश सेटलमेंट ऑफ एडन इन अरेबिया," पृ. ३

पुढील टपाल नेणाऱ्या (मेल) आगनावेने एडनला जाताना वासुदेव बळवंतांसमवेत राहाण्यासाठी म्हणून एका युरोपियन अधिकाऱ्याची नियुक्ती करावी ! नेलर यांनी साऊटर यांनाही याकरिता आवश्यक ती उपाययोजना करण्यास सांगितले आणि म्हटले की, या सर्व योजना प्रथमपासून अखेरपर्यंत, " स्वतः वासुदेव बळवंतालाही ठाण्याहून निघण्याची वेळ येईपर्यंत आपल्या निर्गमनाची माहिती न देता, गुप्त राखाव्या. "

२५ डिसेंबर १८७९ ला डॉ. कुकर्सेक यांनी नेलरना पत्र लिहून " बळवंत वासुदेव फडके " याच्या संबंधीच्या वरील पत्राची पोच दिली आणि कळविले की, पी. अँड ओ. कंपनीची पुढील आगनाव शनिवारी ३ जानेवारी १८८० पर्यंत काही निघणार नाही. आणि त्यावेळी तुमच्या आज्ञा पाळल्या जातील त्याप्रमाणे शनिवारी ३ जानेवारी १८८० ला सकाळी ६ वाजता भायखळा स्थानकावर वासुदेव बळवंतासाठी एक घोडागाडी आणून उभी ठेवण्यात आली. त्यांना ठाण्याहून भायखळ्याला नेण्यासाठी सकाळची पहिलीच गाडी ठरविण्यात आली. कारण म्हणजे मग लोक झोपेतून उठण्यापूर्वीच त्यांना ठाण्याच्या तुरुंगातून बाहेर आणि ठाणे गावातून नेता येऊन भायखळ्यालाही स्थानकावर लोकांचा काही वावर सुरू होण्यापूर्वी भायखळ्याला आणता येणार होते. जलप्रवासाचे एडनपर्यंतचे तिकीट काढण्यास आणि त्यांच्यासमवेत एक युरोपियन अधिकारी देण्यास साऊटर यांनाच सांगण्यात आले.

शनिवारी ३ जानेवारी १८८० ला पहाटेसच, ठाण्याच्या तुरुंगाच्या जुनाट करड्या दगडी भिंतीवर हिवाळपाच्या वाऱ्याच्या लाटा धोंपावू लागल्या, तोच वासुदेव बळवंतांना एकाएकी येथून निघण्याची तुमची सिद्धता करा असे सांगण्यात आले. त्या तुरुंगाचे अधीक्षक स्मिथ यांनी मग त्यांना पहाटेस बाहेर अजून काळोख आणि शांतता असताच गुप्तपणे आपल्या कोठडीबाहेर काढले. वासुदेव बळवंतासमवेतच्या संरक्षकावाचून कोणालाही ते माहीत नव्हते. "तुरुंगातील ब्राह्मण लेखनिकांनासुद्धा ! " त्यांना एका बंद घोडागाडीतून ठाण्याच्या रिकाम्या रस्त्यावरून वेगाने स्थानकावर नेण्यात आले. हा रस्ता म्हणजेच आताच्या जांभळी नाक्यावरून जाणारा ठाण्याचा जुना 'स्टेशनरोड' होय. पहाटे ५ वाजता ठाण्याहून सुटणाऱ्या पहिल्या गाडीच्या काही वेळ आधीची ही वेळ होती. त्या गाडीने मग त्यांना भायखळ्याला नेण्यात आले. ठाणे ते भायखळा या स्थानकामधील वाटेवरील स्थानकांवरच्या रेल्वे पोलिसांना आपापल्या स्थानकांवर लोकांना येऊ देऊ नये. आणि जनतेचे कसाही रीतीने निदर्शन त्यांच्या त्या प्रवासात होऊ देऊ नये, म्हणून चेतावणी देण्यात आली होती.[१८] त्यावेळच्या जी. आय. पी. रेल्वेच्या (आताच्या मध्य रेल्वेच्या) पोलीस अधि-

१८ तुरुंगाच्या महानिरीक्षकांनी मुंबई सरकारला धाडलेले प्रतिवृत्त : दि. ६ जानेवारी १८८०, मुंबई सरकारचे कागदपत्र.

क्षकांनी अशी आवश्यक ती सर्व दक्षता घेतली जात आहे की नाही ते पाहण्यासाठी त्याच गाडीने भायखळ्यापर्यंत प्रवास केला.

या व्यवस्थेमुळे वाटेवरच्या कोणत्याही स्थानकावर एखाद दुसराच प्रवासी होता आणि अधीक्षक स्मिथ यांच्यासमवेत वासुदेव बळवंत त्या गाडीने प्रवास करीत होते, हे कोणालाच माहीत नव्हते. भायखळ्यास उतरताच एडनच्या बंदिपालाला उद्देशून लिहिलेल्या अधिपत्रासह वासुदेव बळवंतांना एडनला नेण्यासाठी नियुक्त करण्यात आलेले पो. निरीक्षक मॅकडरमॉट यांच्या स्वाधीन करण्यात आले. त्यांना दोन पोलीस सहाय्य करीत होते.[१९] यानंतर माजगावच्या धक्क्यावरून सुटणाऱ्या पी. अँड ओ. कंपनीच्या एस्. एस्. तेहरान आगनावेवर वासुदेव बळवंतांना चढविण्यात आले. जिवंत किंवा मृतावस्थेत ते पुन्हा कधीच हिंदुस्थानच्या भूमीवर पुढे पाऊल ठेवणार नव्हते!

'तेहेरान'ने दुपारी २-३० वाजता हिंदुस्थानचा किनारा सोडला.[२०] आणि वासुदेव बळवंत आणि त्यांची मातृभूमी यांच्यामध्ये समुद्राचा पसारा वेगाने वाढत चालला. मातृभूमीशी ही ताटातूट होताना, त्यांच्या मनात भावनांचा केवढा हलकल्लोळ उडाला असेल! आपल्यापुढे दिसणाऱ्या मृत्यूमुळे नव्हे, तर आपल्या देशाचे पारतंत्र्य नाहीसे करून आपण त्याला पुन्हा वैभवाच्या शिखरावर चढवू ही आपली आकांक्षा धुळीला मिळाली म्हणून! 'तेहेरान'ने एडनला जाताना आगनावेवर मिळणारे पाणी पिताना एडनला पोचल्यावर तेथील मचूळ पाणी आपण कसे पिऊ शकू या संबंधीच ते पो. निरीक्षक जोन्स यांच्याशी एकसारखे बोलत. ब्रिटिश तुरुंगातील हालअपेष्टात वर्षानुवर्षे पिचत पडण्याची आपली सिद्धता नाही, या विचाराने ते समवेतच्या अधिकाऱ्यांना मोकळेपणाने सांगत की, मला आता फार जगण्याची इच्छाच नाही. सहा दिवसांनी शुक्रवारी ९ जानेवारी १८८० ला दुपारी ११-३० वाजता 'तेहेरान' एडनला पोचली आणि वासुदेव बळवंतांना तेथील अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करून आपल्या लंडनकडील पुढील प्रवासाला निघाली.[२०]

या वेळी वासुदेव बळवंतांच्या मनात मातृभूमीविषयी काय विचार आले असतील? ते बहुधा भारतमातेला म्हणाले असतील: "आई, तुझ्या डोळ्यात दुःखाने कशासाठी बर अश्रू उभे राहिले आहेत? या काळ्याकुट्ट अंधःकारातच तुझ्या उद्याच्या भाग्यकालाचा उषःकाल दडलेला आहे, हे निश्चित समज! आज आमची प्रेतं सरणावरती पेटून जातील! पण त्यांच्या ज्वालांतूनच पारतंत्र्यातून तुला मुक्त करणारे भावी क्रांतीचे नेते जन्म पावतील! त्यांच्या कर्तृत्वाने त्या वेळी तुझ्या

---

१९ पी. अँड ओ. नॅव्हिगेशन कंपनीच्या जनता संपर्क अधिकाऱ्याचे लेखकास पत्र; दि. ११ ऑगस्ट १९५८

२० एडन सरकारचे लेखकास पत्र, दि. १३ सप्टेंबर १९४७

पायातील लोहशृंखला खळाखळा तुटतील आणि तू स्वतंत्र होशील ! त्या क्रांतीचा जयजयकार असो. "

'तेहेरान' वरून उतरून संरक्षकांच्या गराड्यात चालत जात एडनच्या कारागारात शिरण्यासाठी वासुदेव बळवंत त्या तुरुंगापुढे उभे राहिले, तेव्हा त्यांच्या दारावर मृत्यूचे दूत आपले क्रूर नृत्य करताना त्यांना दिसले ! या वाटेने आपण पुन्हा जिवंत बाहेर तर पडणार नाहीच; पण आपणास येणारा मृत्यूही देहदंडाच्या चरकात वर्षानुवर्षे आपला देह पिचवत, स्वाभिमानाची राखरांगोळी झाल्यानंतर आणि आपल्या असहाय्यतेचा आनंद मदोन्मत्त राजदूतांनी मनःपूत भोगल्यावरच आपणास येणार हे त्यांनी ओळखले. परंतु त्या कल्पनेनंही ते कचरले नाहीत.

एडनला जाताना तेथील तुरुंगाच्या अधीक्षकांच्या नावे असणारे आवश्यक ते अधिपत्र आणि इतर कागदपत्रे नेण्यास मॅकरमॉट विसरले होते. तेव्हा त्याच दिवशी अगदी ६–४० ही वेळ टाकून एडनचे काराधीक्षक डॉ. कोलसन यांनी त्या संबंधात ब्रि. राजनिवासाला लेखी प्रतिवृत्त धाडले आणि वासुदेव बळवंतांना तात्पुरते आपल्या तुरुंगात ठेवून दिले. चार दिवसांनी लॉक यांनी आपल्या कार्यालयाला विचारले की, वासुदेवाचे कागदपत्र मिळाले का ? तेव्हा त्यांना होकारार्थी उत्तर मिळाले आणि बरे आहे म्हणून त्यांनी त्या प्रश्नावर पडदा टाकला.[२१]

आणि त्या दिवसापासून आपल्या ज्वलंत देशभक्तीचे मूल्य वासुदेव बळवंत अक्षरशः आपल्या रक्तामांसाने देऊ लागले. राजकीय अपराधासाठी ब्रि. सरकारने जन्मठेपेवर पाठविलेले ते पहिलेच बंदी होते. त्या जुन्या काळातील त्यांच्या हालअपेष्टांची आणि छळाची कहाणी संपूर्णपणे बाहेर कळावी कशी ? पण तरीही सुदैवाने तिची भीषणता कळावी इतका वृत्तांत इतिहासाच्या सदर्भ छायाचित्रात पकडला गेला आहेच.

एडनच्या काळ्या पाण्यावर पहिल्या दिवसापासूनच त्यांच्याकडून प्रत्यही २५ पौंड धान्य दळण्याचे चक्की पिसण्याचे छावी फोडणारे काम करून घेण्यात येई.[२२] *सुशिक्षित पांढरपेशा बौद्धिक वृत्तीच्या माणसाला* हे काम तसेच भासे. ते करताना त्याचे हात रक्ताळत. पुढील पिढ्यांच्या क्रांतिकारकांना हिंदुस्थानात ३० ते ३५ पौंड धान्य दळावे लागे. तो काळ अशा दंडितांच्या पहिल्या पिढीचा म्हणून म्हणा किंवा एडनचे वायुमान माणसाला लवकर दमवणारे म्हणून म्हणा, ते प्रमाण

---

२१ ही माहिती पुण्याचे विठ्ठलराव जोशी यांनी पाठविलेल्या एडन सरकारच्या कागदपत्रांच्या प्रतीतील एका पत्रात मिळाली ते १९६२ मध्ये एडन सरकारात सार्वजनिक कामे आणि विमान वाहतूक विभागाचे मंत्री होते.

२२ एडनच्या तुरुंगाचे मधीक्षक डॉ. ई कोल्सन यांचे एडनच्या पहिल्या महाध्यक्ष राजनिवासाला पत्र क्र.६८५ (१८८०), दि ८ डिसेंबर १८८० ; एडन सरकारचे कागदपत्र.

त्यावेळी २५ पौंड ठरले असेल. पण जेमतेम जगण्याइतक्या निःसत्व अन्नावर जगताना एडनला हे कामही माणसाचा जीव काढणारे होते.

या दळणाचा ढीग प्रत्यही पुढे असताही वासुदेव बळवंतांनी धैर्यशाली आणि करारी वृत्तीने तुरुंगातही सरकारशी लढा दिलाच. त्यांच्या या लढ्याचा वृत्तांत वाचनीय आहे. तेथे आल्यावर चारच दिवसात १३ जानेवारी १८८० ला त्यांनी काराव्यवस्थेविरुद्ध दंड थोपटले ! त्या तुरुंगात पिण्याचे पाणी बाहेरून कातड्याच्या पखालीने पुरविण्यात येई. अशा पखालीतून येणारे पाणी पिणे माझ्या धर्माने घालून दिलेल्या शुचितेविरुद्ध आहे, असे म्हणून ते पिण्याचेच वासुदेव बळवंतांनी संपूर्णपणे नाकारले." त्याचप्रमाणे तेथे मिळणारे अन्न दुसऱ्याने शिजवलेले असल्यामुळे याच कारणासाठी मला ग्रहण करता येणार नाही, असे त्यांनी घोषित केले. काराव्यवस्थेतील सवलतीसाठी पुढील सत्तर वर्षातील क्रांतिकारकांनी केलेल्या लढ्याची ही नांदीच वासुदेव बळवंतांनी केली, असे आव्हान तेथील अधिकाऱ्यांना अश्रुतपूर्व होते. त्यामुळे त्याने त्यांना हादराच बसला. तेव्हा तुला हवा तर आपला स्वयंपाक आपल्या हाताने करण्याची तुला मोकळीक आहे, अशी सवलत तात्पुरती म्हणून त्यांनी त्यांना देऊन टाकली. परंतु वासुदेव बळवंतांनी त्या पाण्याला किंवा अन्नाला स्पर्श केला नाही. अधिकाऱ्यांनी फारच कटाक्ष धरला, तेव्हा सबंध सहा दिवसात त्यांनी फक्त एक बाटली दही आणि खोबऱ्याचे तीन तुकडे खाल्ले. हा पेचप्रसंग मिटण्याची सहा दिवस वाट पाहिल्यावरही वासुदेव बळवंत आपल्या निश्चयावर जेव्हा अढळ राहिले, तेव्हा कारधिक्षकांनी २० जानेवारी १८८० ला त्यांच्या वरील लढ्याचे सविस्तर प्रतिवृत्त राजनिवाशाकडे धाडून दिले. त्यांत त्यांनी म्हटले की, कारागाराच्या नियमांप्रमाणे पाहता आपल्या जातीचा प्रश्न न उभा करता या बंद्याने इतर बंदिवानांप्रमाणे खाणेपिणे केले पाहिजे. परतु त्याने सहा दिवस या कारणावरून काही खाल्लेले नाही, या सवघात काय करावे ते समजत नाही. तुरुंगाच्या आवारातील विहिरीचे पाणी त्याला स्वत:ला काढून दिले तरी तेही पक्के मचूळ आहे आणि त्याला तुरुंगाच्या कोठडीबाहेर सोडणे हितावह नाही कारण तुरुंगातून निसटून जाण्याची कोणतीही संधी त्याला मिळता कामा नये! राजनिवाशाने या पत्रावर तुरुंगाच्या नियमांची पुस्तिका दाखविण्यास आपल्या कार्यालयास सांगितले. मग ती वाचून त्यांनी म्हटले की, मला वाटते या बंदिवानाचा आक्षेप आहे तो पाणी चांगले नाही हाच होय. सहाय्यक राजनिवासी कॅप्टन सीली यांनी यावर मत द्यावे. त्याचप्रमाणे एडनला येताना जलप्रवासात 'बळवंत वासुदेव' फडके यांच्यासाठी काय व्यवस्था केली होती आणि मिळणारे पाणी काहीही आक्षेप न घेता तो प्यायला होता काय, ते पो. निरीक्षक जोन्स यांना

२१ एडन सरकारचे लेखकास पत्र; दि. १३ डिसेंबर १९४७.

पायातील लोहशृंखला खळाखळा तुटतील आणि तू स्वतंत्र होशील ! त्या क्रांतीचा जयजयकार असो. "

'तेहेरान' वरून उतरून संरक्षकांच्या गराड्यात चालत जात एडनच्या कारागारात शिरण्यासाठी वासुदेव बळवंत त्या तुरुंगापुढे उभे राहिले, तेव्हा त्याच्या दारावर मृत्यूचे दूत आपले क्रूर नृत्य करताना त्यांना दिसले ! या वाटेने आपण पुन्हा जिवंत बाहेर तर पडणार नाहीच; पण आपणास येणारा मृत्यूही देहदंडाच्या चरकात वर्षानुवर्षे आपला देह पिचवत, स्वाभिमानाची राखरांगोळी झाल्यानंतर आणि आपल्या असहाय्यतेचा आनंद मदोन्मत्त राजदूतांनी मन.पूत भोगल्यावरच आपणास येणार हे त्यांनी ओळखले. परंतु त्या कल्पनेनंही ते कचरले नाहीत.

एडनला जाताना तेथील तुरुंगाच्या अधीक्षकांच्या नावे असणारे आवश्यक ते अधिपत्र आणि इतर कागदपत्रे नेण्यास मॅकरमॉट विसरले होते. तेव्हा त्याच दिवशी अगदी ६–४० ही वेळ टाकून एडनचे काराधीक्षक डॉ. कोलसन यांनी त्या संबंधात ब्रि. राजनिवासाला लेखी प्रतिवृत्त धाडले आणि वासुदेव बळवंतांना तात्पुरते आपल्या तुरुंगात ठेवून दिले. चार दिवसांनी लॉक यांनी आपल्या कार्यालयाला विचारले की, वासुदेवाचे कागदपत्र मिळाले का ? तेव्हा त्यांना होकारार्थी उत्तर मिळाले आणि बरे आहे म्हणून त्यांनी त्या प्रश्नावर पडदा टाकला. [२१]

आणि त्या दिवसापासून आपल्या ज्वलंत देशभक्तीचे मूल्य वासुदेव बळवंत अक्षरशः आपल्या रक्तामासाने देऊ लागले. राजकीय अपराधासाठी ब्रि. सरकारने जन्मठेपीवर पाठविलेले ते पहिलेच बंदी होते. त्या जुन्या काळातील त्यांच्या हालअपेष्टांची आणि छळाची कहाणी संपूर्णपणे बाहेर कळावी कशी ? पण तरीही सुदैवाने तिची भीषणता कळावी इतका वृत्तांत इतिहासाच्या संदर्भ छायाचित्रात पकडला गेला आहेच.

एडनच्या काळ्या पाण्यावर पहिल्या दिवसापासूनच त्यांच्याकडून प्रत्यही २५ पौंड धान्य दळण्याचे चक्की पिसण्याचे छाती फोडणारे काम करून घेण्यात येई. [२२] सुशिक्षित पांढरपेशा बौद्धिक कुवतीच्या माणसाला हे काम तसेच भासे. ते करताना त्याचे हात रक्ताळत. पुढील पिढ्यांच्या क्रांतिकारकांना हिंदुस्थानात ३० ते ३५ पौंड धान्य दळावे लागे. तो काळ अशा दंडितांच्या पहिल्या पिढीचा म्हणून म्हणा किंवा एडनचे वायुमान माणसाला लवकर दमवणारे म्हणून म्हणा, ते प्रमाण

---

२१ ही माहिती पुण्याचे विठ्ठलराव जोशी यांनी पाठविलेल्या एडन सरकारच्या कागदपत्राच्या प्रतीतील एका पत्रात मिळाली ते १९६२ मध्ये एडन सरकारात सार्वजनिक कामे आणि विमान वाहतूक विभागाचे मंत्री होते.

२२ एडनच्या तुरुंगाचे अधीक्षक डॉ. ई. थॉम्सन यांचे एडनच्या पहिल्या महापौर राजनिवासाला पत्र क्र.६८५ (१८८०), दि ८ डिसेंबर १८८० ; एडन सरकारचे कागदपत्र.

मागील कुसाफ खोऱ्यातील हिंगलजच्या देवळातील ब्राह्मणाकडून दर तीन दिवसांनी एकदा या बंद्यासाठी तुरुंगात पाणी आणावे किंवा या बंद्याला दही आणि दूध देण्याची तुरुंगाच्या वैद्यकीय अधिकाऱ्याला किंवा काराधीक्षकाला अनुज्ञा द्यावी. मध्यंतरात (मुंबई) सरकारकडे प्रतिवृत्त कळविता येईल. आणि जर, या बंदिवानाला उपाशी रहावयाचेच असेल तर राहू द्यावे असे ठरले, तर चांगलेच होईल. मग ही दुधाची व्यवस्था बंद करता येईल. या बंद्याचा हा आक्षेप धार्मिक निष्ठांमुळे कितीसा आहे आणि तो घेऊन आपल्याला स्वत:ला पाणी काढण्याची सवलत मिळून तुरुंगाबाहेर जावयाला मिळावे म्हणून कितीसा आहे ते समजणे कठीण आहे." शेवटी कॅप्टन सीली म्हणाले : "शक्य असेल तेवढी दंगल उडवून द्यावयाची हेच त्याचे खरे उद्दिष्ट आहे अशी माझी एकट्याचीच समजूत आहे असे नाही." लॉर्ड यांनी त्यावर शेवटी २२ जानेवारीला म्हटले की, फक्त जातीच्या आधारावर वासुदेव बळवंतांच्या मागण्या मान्य करता येणार नाहीत. बंदिवानाचे अन्न बदलून दूध आणि दही त्याला द्यावयाचे की नाही ते वैद्यकीय अधिकाऱ्यांनी ठरवावे आणि त्याला स्वत:चे अन्न स्वत: शिजवू द्यावे की नाही यासंबंधी कारामहानिरीक्षकांच्या सूचना मागवाव्या. या निर्णयाची प्रत काराधीक्षकांना पाठविण्यात आली आणि हे प्रकरण संपले.

परंतु यामुळे वासुदेव बळवंतांचा शारीरिक छळ टळला नाही. त्यांच्या छळाची काही कल्पना त्यांच्यानंतर तीस वर्षांनी १९११ मध्ये ते छळ किती असह्य होते त्यावरून येईल. अंदमानातील जन्मठेपीवरील आपल्या हालअपेष्टांचे वर्णन करताना स्वातंत्र्यवीर सावरकर म्हणतात : "दोन दोन महिने तेलाच्या घाण्यास त्यांना (देशभक्तांना) जुंपून देण्यात येई. घाण्याची लोखंडी दांडी, खोबरे उखळीत पडले की, इतकी जड होई की, कसलेले हमाल देखील तिच्या वीस फेऱ्या फिरविताच रडकुंडीस येत ! लंगोटी नेसून सकाळी दहा वाजेपर्यंत काम करावे, सारखे फिरत राहिल्याने चक्कर यावी ! अंगाचे ठणकणे तर इतके की, रात्री फळ्यावर अंग टाकताच झोप लागण्याचे स्थळी अंगात कसर भरून तळमळ करीत पडावे, लागे, की पुन्हा दुसऱ्या दिवशी तो घाणा दत्त म्हणून उभा ! ......एके दिवशी भयंकर उकाड्यात कोलू फिरवीत असताना धापा टाकीत गिरकी आल्यासारखे वाटून खाली बसलो आणि पोट, फार श्रम होताच आतडी ताठरतात तशी ताठरल्याने, हातानं धरून भिंतीशी टेकलो आणि डोळे मिटले... थोड्या वेळाने सावध झालो... मन एकसारखे म्हणे : मयांची शून्यता तेच मरण..." त्या दोरीच्या तुकड्याने गळफास लाव आणि करून टाक त्या जीवनाचा अंत ![२४]"

तेव्हा अशा छलयंत्रातही वासुदेव बळवंत मरहू जाऊ लागले. कारण, मनकी

---

२४ बॅरिस्टर सावरकर. "माझी जन्मठेप," भाग १, पृ. १०, ११.

विचारावे. पो. निरीक्षक वेट यानी जोन्स याना विचारून कळविले की, प्रवासात 'बळवंत' मिळेल ते पाणी प्यायला होता. पण एडन येथील वाईट पाण्याविषयी मात्र तो सतत बोलत असे.

हो माहिती हाती आल्यावर तुरुंगाचे नियम सविस्तरपणे उधृत करून राजनिवासी एफ. लॉक म्हणाले की, बंदिवानाला स्वतः पाणी काढण्याची सवलत देता येत नाही. स्वयंपाकही ठराविक पद्धतीनेच झाला पाहिजे. त्यामुळे बळवंत वासुदेव फडके याला जातीच्या कारणावरून या नियमातून सूट कशी देता येईल ते समजत नाही. पण तरीही या प्रकरणात तडकाफडकी निर्णय न देता लॉक यानी म्हटले: "परंतु या विषयावर निर्णय देण्यापूर्वी कॅप्टन सीलीनाही या प्रश्नाची चौकशी करून या बंदिवानाचे खरे गाऱ्हाणे तरी काय आहे त्यावर अभिप्राय देण्यास सांगणे बरे पडेल." त्यानीच हा पत्रव्यवहार २१ जानेवारी १८२० ला कॅप्टन सीली यांच्याकडे धाडून त्यांना विनती केली की, "तुम्ही फडके याला भेटा आणि तुला स्वतःला पाणी काढून देता येणार नाही. परंतु तुला चांगले पाणी मात्र मिळाले पाहिजे हे मान्य आहे, हे त्याला समजावून देता आले तर पाहा."

कॅप्टन सीली यांच्या सांगण्याप्रमाणे वेट यांनी लागलीच एडनच्या तुरुंगाला भेट दिली. ते वासुदेव बळवंतांना भेटले आणि त्यांनी एकाच दिवसात २२ जानेवारीला आपले प्रतिवृत्त लॉक यांच्याकडे धाडले. त्यात ते म्हणाले : "हा बंदिवान आपण कोकणस्थ चित्पावन ब्राह्मण आहोत असे म्हणतो. स्टील यांच्या 'हिंदू कास्ट' या पुस्तकाप्रमाणे पहाता, ही महाराष्ट्र ब्राह्मणांची एक जात आहे. पण त्या पुस्तकात पाण्याच्या प्रश्नावर काहीही माहिती मला आढळली नाही. १७ जानेवारीला आणि १९ जानेवारीला मी आणि कॅप्टन हंटर यांनी तुरुंगास भेट दिली. तेव्हा आपणास पिण्यास देण्यात येणाऱ्या पाण्याविषयी या बंदिवानाने गाऱ्हाणे केले होते .. तेव्हा काही झाले तरी या गोष्टीत तो सुसंबद्ध रीतीने तरी वागत आहे आणि तो सध्या फार निस्तेज आणि अशक्तही दिसतो आहे !" त्याला आपण तुरुंगाचे नियम समजावून दिले आणि अशा परिस्थितीत चांगल्यात चांगली व्यवस्था करण्यात आलेली आहे, असे त्याला सांगितल्याचे कळवून आपल्या प्रतिवृत्तात वेट पुढे म्हणाले : "त्याचा आक्षेप प्रत्यक्ष मिळणाऱ्या पाण्यापेक्षा ते काढण्याच्या पद्धतीला आहे आणि तो म्हणतो की, असे कातड्याने, मग ते कातडे कोणतेही का असेना, काढलेले पाणी पिणे हे आपल्या धर्मविरुद्ध आहे. आणि शेवटी तर तो म्हणाला की, फक्त ब्राह्मणाने काढलेल्या पाण्यावाचून इतर पाणी मी पिणार नाही. कारण, त्यावाचून धर्मप्रमाणे पहाता शुद्ध आहे असे मला वाटत नाही."

पंजीकार (रजिस्ट्रार) मंचरजी रुस्तुमजी यांच्याशीही कॅप्टन सीली यांनी या प्रश्नाची चर्चा केली आणि मग सुचविले की, एक तर राजनिवासाच्या प्रासादा-

मागील कुसाफ खोन्यातील हिंगलजच्या देवळातील ब्राह्मणाकडून दर तीन दिवसांनी एकदा या बंद्यासाठी तुरुंगात पाणी आणावे किंवा या बंद्याला दही आणि दूध देण्याची तुरुंगाच्या वैद्यकीय अधिकाऱ्याला किंवा काराधीक्षकाला अनुज्ञा द्यावी. मध्यंतरात (मुंबई) सरकारकडे प्रतिवृत्त कळविता येईल. आणि जर, या बंदिवानाला उपाशी रहावयाचेच असेल तर राहू द्यावे असे ठरले, तर चांगलेच होईल. मग ही दुधाची व्यवस्था बंद करता येईल. या बंद्याचा हा आक्षेप धार्मिक निष्ठांमुळे कितीसा आहे आणि तो घेऊन आपल्याला स्वतःला पाणी काढण्याची सवलत मिळून तुरुंगाबाहेर जावयाला मिळावे म्हणून कितीसा आहे ते समजणे कठीण आहे." शेवटी कॅप्टन सीली म्हणाले : "शक्य असेल तेवढी दंगल उडवून द्यावयाची हेच त्याचे खरे उद्दिष्ट आहे अशी माझी एकटयाचीच समजूत आहे असे नाही." लॉक यांनी त्यावर शेवटी २२ जानेवारीला म्हटले की, फक्त जातीच्या आधारावर वासुदेव बळवंतांच्या मागण्या मान्य करता येणार नाहीत. बंदिवानाचे अन्न बदलून दूध आणि दही त्याला द्यावयाचे की नाही ते वैद्यकीय अधिकाऱ्यांनी ठरवावे आणि त्याला स्वतःचे अन्न स्वतः शिजवू द्यावे की नाही यासंबंधी कारामहानिरीक्षकांच्या सूचना मागवाव्या. या निर्णयाची प्रत काराधीक्षकांना पाठविण्यात आली आणि हे प्रकरण संपले.

परंतु यामुळे वासुदेव बळवंतांचा शारीरिक छळ टळला नाही. त्यांच्या छळाची काही कल्पना त्यांच्यानंतर तीस वर्षांनी १९११ मध्ये ते छळ किती असह्य होते त्यावरून येईल. अंदमानातील जन्मठेपीवरील आपल्या हालअपेष्टांचे वर्णन करताना स्वातंत्र्यवीर सावरकर म्हणतात : "दोन दोन महिने तेलाच्या घाण्यास त्यांना (देशभक्तांना) जुंपून देण्यात येई. घाण्याची लोखंडी दांडी, खोबरे उखळीत पडले की, इतकी जड होई की, कसलेले हमालदेखील तिच्या वीस फेऱ्या फिरविताच रडकुंडीस येत! लंगोटी नेसून सकाळी दहा वाजेपर्यंत काम करावे, सारखे फिरत राहिल्याने चक्कर यावी! अंगाचे ठणकणे तर इतके की, रात्री फळीवर अंग टाकताच झोप लागण्याचे स्थळी अंगात कसर भरून तळमळ करीत पडावे लागे, की पुन्हा दुसऱ्या दिवशी तो घाणा दत्त म्हणून उभा!......एके दिवशी भयंकर उकाड्यात कोलू फिरवीत असताना घापा टाकीत गिरकी आल्यासारखे वाटून खाली बसलो आणि पोट, फार श्रम होताच आतडी ताठरतात तशी ताठरल्याने, हाताने धरून भिंतीशी टेकलो आणि डोळे मिटले... थोड्या वेळाने सावध झालो... मन एकसारखे म्हणे : मरणाची शून्यता तेच मरण..." त्या दोरीच्या तुकड्याने गळफास फास लाव आणि करून टाक त्या जीवनाचा अंत!"[२४]

तेव्हा अशा छळयंत्रातही वासुदेव बळवंत मरडू जाऊ लागले. कारण, चक्की

---

२४ बॅरिस्टर सावरकर : "माझी जन्मठेप," भाग १, पृ. १००, ११०.

पिसण्याने जो क्रांतिकारक हतबल होत नसे त्याला या तेल गाळण्याच्या कोलूस जुंपून टाकण्यात येऊन त्याच्याकडून २५ पौंड तेल प्रत्यही गाळून घेण्यात येई. मुंबई सरकारच्या कागदपत्रातील एडनच्या तुरुंगाच्या मानचित्रात तेलाच्या कोलूचे म्हणून एक घर दाखविले आहे आणि धान्य दळण्याची छपरीही. यावरूनही वरील कामे त्यांच्याकडून करवून घेण्यात आली या समजुतीस दुजोरा मिळतो. त्यात त्यांनी आणखी सरकारशी त्या तुरुंगात झुंजही मांडली होती. तेव्हा त्यांना या छलयंत्रात लोटण्याला राजकर्त्यांना आणखीच कारण होते.

या ऐतिहासिक उल्कापाताचा परिणाम हिंदुस्थानबाहेरील लोकांवर किती प्रखरपणे झाला होता त्याचे प्रत्यंतर प्रख्यात रशियन पंडित इवान पावलोविच मिनाएफ यानी हिंदुस्थानला याच वेळी दुसऱ्यांदा दिलेल्या ऐतिहासिक भेटीच्या वृत्तांतात मिळते.

मिनाएफ यांचा जन्म १८४० मध्ये झारशाहीतील रशियात तांबोळ गावी झाला. वयाच्या ५० व्या वर्षी पीटर्सबर्ग येथे ते मृत्यू पावले. पण या अवधीत एक विद्वान पर्यटनप्रेमी, आणि स्वातंत्र्याचा कैवारी म्हणून त्यांची ख्याती झाली. वयाच्या १८व्या वर्षी पीटर्सबर्ग विद्यालयात शिरून दहा वर्षेपर्यंत त्यांनी पौर्वात्य भाषांचा अभ्यासक्रम पूर्ण केला. संस्कृत, पाली आणि इतर प्राकृत भाषा ते शिकले. १८६८ मध्ये आपला "प्रतिमोक्ष सूत्र" हा पहिला ग्रंथ त्यानी लिहिला. पुढच्याच वर्षी पीटर्सबर्ग विश्वविद्यालयात संस्कृत वाङ्मयाचे ते प्राध्यापक झाले त्याच पदावर शेवटपर्यंत असताना, संस्कृत वाङ्मयाची शब्द रूपावली, आणि गणव्यवस्था, अफनासि निकितीनचा भारत प्रवास, सिलोन आणि भारत यांची रेखाचित्रे, असे ग्रंथ त्यांनी लिहिले.

१८७४ ते १८८६ पर्यंत त्यांनी तीनदा हिंदुस्थानास भेट दिली. बऱ्याच लोकांना ते भेटले. वासुदेव बळवंत गुप्ततेत कार्य करीत नसते तर त्यांचीही पुण्यात त्यांनी भेट घेतली असती. त्यांचा विषय हिंदुस्थानला दिलेल्या दुसऱ्या भेटीत त्यांच्या मनात प्रभावीपणे वावरत होता. हिंदुस्थानच्या या भेटीसाठी २० जानेवारी १८८० ला ते मुंबईस उतरले. त्यांच्या प्रवासाचा सर्वच वृत्तांत मनोरंजक असला तरी वासुदेव बळवंतांशी संबद्ध असा वृत्तांतच काय तो येथे देणे योग्य ठरेल. मुंबईस ते काशीनाथ त्र्यंबक तेलंगांना भेटले, तेव्हा तेलंगांनी अस्खलित इंग्रजीत वासुदेव बळवंतांचेच जहाल विचार त्यांना गुणावले. अफगाण युद्धाचा बोजा भारतावर विनाकारण पडत आहे. सुशिक्षितच काय पण शेतकरीही येथे असंतुष्टच आहेत, दरडोई अवजड कर, अरण्यात लाकूडफाटा तोडण्यावरील बंदी, मनुशाकराचा निर्बंध वि. अधिकाऱ्यांची लठ्ठ वेतने ही तेलंगांनी दिलेली भारतीय असंतोषाची कारणे, वासुदेव बळवंतांच्या प्रतिपादनातीलच होती. ३१ जानेवारी १८८० ला तेलंग त्यांना म्हणाले : "वासुदेव बळवंत फडके याला पोडे बहुत इंग्रजी येत होते. आणि तो

इंग्रजांच्याच नोकरीत होता. इंग्रजांची नोकरी करीत असताही तो इंग्रज राजवटी संबंधी उघडउघड बोलत असे. पोलिसांनी पकडलेल्या दरोडेखोरांनी त्याचा विश्वासघात केला आणि म्हणून तो पोलिसांच्या हाती लागला !"

२ फेब्रुवारीला मिनाएफ पुण्यात गेले. आणि नेपिअर हॉटेलमध्येच उतरले. वासुदेव बळवंतांचे बंड आणि अभियोग हाच विषय तेथे तरुणांच्या बोलण्यात होता. दुसऱ्याच दिवशी तीन विद्यार्थी त्यांच्याकडे आले. त्याचा वृत्तांत सांगताना मिनाएफ म्हणतात : "आम्ही दोन तास बोलत बसलो, तिघांचेही फडक्यांविषयी एकमत होते. त्यांचे ध्येय उदात्त होते. पण साधने व्यवहार शून्य होती." त्यांच्या अभियोगाच्या वेळी आपण न्यायालयात उपस्थित होतो, असे त्या विद्यार्थ्यांनी त्यांना सांगितले. त्यावर मिनाएफ रास्तपणे उद्गारतात : "कदाचित 'फडके की जय' म्हणून त्यांनीही त्या वेळी घोषणा केल्या असतील !"

तरुणांवरही वासुदेव बळवंतांचा कसा प्रभाव पडला होता, ते सांगताना मिनाएफ म्हणतात : "त्यांच्या (त्या विद्यार्थ्यांच्या) बोलण्यातून ब्रिटिश राजवटीसंबंधी असंतोष प्रकट होत होता. सर्वत्र ऐकू येत होती, तीच गाऱ्हाणी त्यांनी केली." हिंदुस्थानी लोकांना वरच्या जागा मिळत नाहीत, कर अवजड आहेत आणि हिंदुस्थानच्या संपत्तीचा ओघ इंग्लंडात जात आहे, याचा उल्लेख करून; सायंकाळी जेवणाच्या वेळी तर रशिया नि इंग्लंड यांचे अफगणिस्थानात युद्ध होणे आता अटळ आहे, असेही ते विद्यार्थी म्हणाल्याचे मिनाएफ सांगतात. ४ फेब्रुवारीला पर्वतीचे देऊळ पाहाण्यास ते गेले. त्याचा वृत्तांत सांगताना मिनाएफ म्हणतात : "मला रस्ता दाखविण्यासाठी आलेली ब्राह्मण मंडळी इंग्रजीत बोलत होती ... फडक्यांविषयी एक जण उद्गारला, "मूर्ख होता झालं! उगाच स्वतःचा नाश करून घेतला त्यानं!" पण गरिबांच्या ज्या दुर्दशेविषयी वासुदेव बळवंत मनस्वी हळहळत असत, त्या गरिबांच्या हलाखीची जाणीव त्या मंडळीच्या याही बोलण्यात मिनाएफना दिसून आली! त्याच दिवशी मिनाएफ जेव्हा डेक्कन कॉलेजमध्ये गेले तेव्हा वासुदेव बळवंतांनी आपल्या रोमांचकारी जीवनाने सर्वच विद्यार्थ्यांना कसे भारून टाकले होते, ते तेथील विद्यार्थ्यांच्या भेटीत त्यांना दिसले. ते म्हणतात : "डेक्कन कॉलेजमधील विद्यार्थ्यांत असंतोषाची भावना खोलवर पसरली असून स्वातंत्र्याचे वारे सळसळत आहे ... एका खोलीत मला विद्यार्थ्यांनी एक छायाचित्रांचा संग्रह दाखविला. त्यातील काही ठळक व्यक्तींच्या छायाचित्रात वासुदेव बळवंत फडके यांचे छायाचित्रही होते !"

संध्याकाळी 'डेक्कन स्टार'चे संपादक माधवराव नामजोशी यांना भेटण्यासाठी आणि मोरोबादादाच्या वाड्यात नुकतेच सुरू झालेले न्यू इंग्लिश स्कूल पाहण्यास मिनाएफ तेथे गेले. नामजोशी वासुदेव बळवंतांचे सहकारी म्हणूनही त्यांना भेटण्यास मिनाएफ गेले असतील. पण नामजोशी तेथे नसल्यामुळे तेथे त्यांना भेटले

नाहीत. त्यांच्या या भेटीची बातमी समजताच ५ फेब्रुवारीला नामजोशीच नेपिअर हॉटेलवर येऊन मिनाएफना भेटले. त्यासंबंधी मिनाएफ लिहितात,

"The editor who visited me today turned out to be a friend of Phadke! He was even produced before the Court. The talk with him was not uninteresting. He expressed strong though not active disaffection with the British Government."[२५]

("जे संपादक आज मला भेटावयाला आले ते खर फडक्यांचे मित्रच निघाले. (फडक्यांच्या प्रकरणात) त्यानाही न्यायालयापुढे उभे करण्यात आले होते. त्यांच्याशी झालेले संभाषण कंटाळवाणे नव्हते. ब्रि. सरकारविषयी कृतिपूर्ण नाही तरी अगदी कडक भाषेत त्यानी आपला द्वेष प्रकट केला. ") नामजोश्यांनी वासुदेव बळवंतांचीच विचारसरणी मिनाएफ यांच्यापुढे मांडली. दुष्काळ फंडाचा दुरुपयोग, निरक्षरता, निर्यातीवरील कर रहित केल्यामुळे झालेले विणकऱ्यांचे हाल इ. गाऱ्हाणी त्यांनी मांडली.

७ ते १३ फेब्रुवारीपर्यंत हैदराबादेत असताही मिनाएफनी फडक्यांचा विषय तेथील लोकांजवळ काढला. तेव्हा ते लोक म्हणाले : "फडक्यांचा ध्येयवाद उदात्त होता आणि त्यांची उद्दिष्टे उत्तुंग होती. पण त्यांना अपयश येणार हे भवितव्य कोणालाही दिसणे मोठे कठीण नव्हते. " १४ एप्रिलला ते दिल्लीला गेले, तेव्हा तेथे कळलेली हिंदूंची त्यावेळची समजूत लिहून ठेवताना मिनाएफ म्हणतात : "ब्रिटिश राजवट सव्वाशे वर्षांच्या आत संपुष्टात येणार असा लोकसमज हिंदू लोकात सध्या आढळतो... " महाराष्ट्रातील राजकीय जागृती आठवून ते म्हणाले : " महाराष्ट्रात गतकाळातील वैभवाविषयीचे आकर्षण एखाद्या रम्य कथेप्रमाणे अजून जिवंत आहे. प्रादेशिक मराठा देशाभिमानाचे पडसाद साहित्यिक लिखाणात उमटत आहेत.... बंड करण्याचा प्रयत्न करणे ही (मात्र) अजून तरी अकाली अशीच घटना ठरेल असे फडक्यांवर भरण्यात आलेल्या अभियोगावरून प्रत्ययास येते. " मुंबईस परतल्यावरही पुण्याचा विचार मनात येऊन ते म्हणाले : " पुणे म्हणजे राजद्रोहाचे सदसदते कुंड समजले जाते." पुढे ७ जून १८८० ला शेवटी रशियाला परत जाण्यासाठी त्यांनी हिंदुस्थान सोडला!

बाहेरच्या कोठडीच्या खिडकीच्या गजातून एडनच्या कारागृहाच्या बाहेरील तट पाहताना वासुदेव बळवंत विचार करीत की, या तटावर चढून जाऊन जिवंतपणे आपण कधी बाहेर जाऊ शकू काय ? " पण ते कसे शक्य होईल ? अशा हताश विचाराने मग ते कोठडीत परत फिरत आणि त्यांच्या कोठडीत औदासिन्याची काळोखी पसरे!

परंतु शारीरिक हालअपेष्टांनी वासुदेव बळवंत झिजले तरी त्यांचे मानसिक धैर्य अचलच राहिले. कारण महा महिने या हालअपेष्टात पडल्यावर तो छळ निमूट-

२५ आय. पी. मिनाएफ : "ट्रॅव्हल्स इन अँड डायरीज ऑफ इंडिया अँड बर्मा," पृ. ५४

पणे सोसणे, त्यांच्या सहनशक्तीच्या बाहेरचे झाले. शिवाजीचे ते कट्टे भक्त आणि राजकीय वंशज होते. त्यानीच त्यांना स्फूर्ती दिली आणि त्यांनी तुरुंगातून निसटून जाण्याच्या योजना आखण्यास सुरुवात केली. जन्मठेपीचे हाल भोगत असता तसे करणारे मन केवढे दुर्दम्य इच्छाशक्तीचे असले पाहिजे! या धाडसात त्यांना एका सहबंद्याने सहाय्य केले. परंतु तो अज्ञात राहिला. त्यांचा हा निसटून जाण्याचा विचार, कारागृहाध्यक्ष डॉ. कोलसन यांना त्यांच्या हस्तकांनी दिलेल्या गुप्त माहितीमुळे कळून आला. आणि त्यांनी वासुदेव बळवंतांना आपल्या कार्यालयाजवळच्याच कोठडीत तात्काळ स्थानांतरित करून टाकले. त्याच्यावर रात्रीही संरक्षक नेमून आणखी एका विशेष संरक्षकाची नियुक्ती केली. या संरक्षकांनी रात्रभर जागे राहून वासुदेव बळवंतांवर लक्ष ठेवावे अशा कडक सूचना दिल्या. दक्षता म्हणून वासुदेव बळवंतांना पायबेड्याही ठोकल्या. यानंतरही एडनच्या तुरुंगातून वासुदेव बळवंत निसटलेले पाहून आपण स्तंभितच होतो.

वासुदेव बळवंतांच्या हालचालींवर लक्ष ठेवणारे हे संरक्षक प्रथम प्रथम फारच दक्ष राहात असत. पण काही दिवस वासुदेव बळवंतांनी निसटून जाण्याचा काहीच प्रयत्न केला नाही, तेव्हा ते आपल्या कामात काहीसे सैल झाले. आणि मग तुरुंगातून निसटून जाण्याची आपली योजना प्रत्यक्षात आणण्यासाठी वासुदेव बळवंतांनी पुढे पावले टाकली.

होती. त्यामुळे तोही तेथे येऊन पलीकडेच झोपला होता. आपल्या पायांतील बेड्यांच्या आवाजाने पहारेकरी जागे झाले नाहीत याची निश्चिती करून घेऊन वासुदेव बळवंतांनी आपली एक बेडी कोठडीच्या दाराच्या मोठ्या बिजागराच्या लोखंडी खुंटावर ठेवली आणि ती ताणली. त्यांच्या अंगच्या प्रचंड बळाने ती वाकडी झाली. त्यांनी आणखी जोर केला आणि ती आपल्या कड्यांतून निसटली आणि मोडून पडली. नंतर दुसऱ्या पायातील बेडीही दाराच्या लोखंडी खुंटावर ठेऊन त्यांनी ताणली आणि तीही विचकून पडली. त्यांचा लोखंडी पसारा त्यांनी हळूच कोठडीच्या कोपऱ्यात नेऊन ठेवला आणि समाधानाचा सुस्कारा टाकला. आऽऽ हाऽऽ! कोठडीत तरी ते आता मोकळे झाले होते. लागलीच कारागारी गणवेषाचे कपडे त्यांनी अंगावरून काढून टाकले आणि दुसरे हेतुतःच आधी मिळविलेले अंगावर चढविले. हे कपडे देण्याच्या कामी त्यांना साहाय्य कोणी केले ते अधिकाऱ्यांना पुढेही समजले नाही. कदाचित आपल्या देशभक्त व्यक्तिमत्वाने त्यांनी भारून टाकलेल्या तुरुंगातील लोकांपैकीच कोणी सहानुभूतिकाने ते केले असेल. बाहेर दूरवर आकाशात एडनच्या उंच टेकड्यांच्या मागे मावळता चंद्र लपून गेल्यामुळे आकाशात दिसत नव्हता.[२६] त्यांनी नंतर आपल्या प्रचंड बाहुबळाने कोठडीची दोन्ही दारे एका मागोमाग एक याप्रमाणे त्यांच्या उखळी बिजागरांतून निखळवून उचलली. कोठडीतील आपले कांबळे डोक्यावर घेतले आणि कोठडीची उखळलेली दारे हातात घेऊन ते कोठडीबाहेर आले.[२७]

आवारात एका बाजूला खडीच्या आणि दगडाच्या बऱ्याच राशी पडलेल्या होत्या. त्या त्यांच्या आणि पहारेकऱ्यांमध्ये येत होत्या. तेव्हा त्या बाजूनेच झोपलेल्या पहारेकऱ्यांवर लक्ष ठेवीत, त्या राशीच्या आडोशाने तुरुंगाचे अर्धे आवार ते सुरक्षितपणे ओलांडून गेले. तोच त्यांना पहारेकरी शेख सुगुन याने अबदुल रहिम यास हाक मारलेली ऐकू आली. शेख सुगुनकडे तुरुंगाच्या आवारातील दिवा लावण्याचे काम असे. चंद्र टेकाडधापलीकडे असल्यामुळे तुरुंगाच्या आवारात काळोख होता. तेव्हा शेख सुगुनने अबदुल रहिमला दिवा लावण्यास सांगितले. अबदुल रहिम जागा झाला. आणि ते एकमेकांशी बोलू लागले. तेव्हा त्यांच्या बोलण्यात एक जुना बंदिवान युदुनखान याच्याविषयीही बोलणे झाले. ते अशा रीतीने जागे झाले आहेत असे दिसताच, वासुदेव बळवंत जरासे चमकले. पण तेवढ्यात त्यांना समोरची धान्य

---

२६ आपल्या पलायनाचा हा वृत्तांत वासुदेव बळवंतांनीच वरील पहारेकऱ्यांवरील अभियोगातील एक साक्षीदार म्हणून पुढे दंडाधिकाऱ्यांपुढे सांगितला.

२७ "He unhinged the doors of his cell and carried them to up to the jail walls over which he escaped."

'टाइम्स ऑफ इंडिया', दि. २८ ऑक्टोबर १८८०

दळण्याच्या चक्कीची छपरी दिसली. आणि ते घाईने त्या छपरीत शिरुन दबा धरून बसले. बाहेरच्या लोकांची चाहूल घेत आणि आपण केलेल्या जिवावरच्या धाडसाचा शेवट काय होणार, या विवंचनेत, पण धीराने ते तेथेच श्वास आवरून उभे राहिले. ते दोन तासपर्यंत तेथेच राहिले. आणि मग दोड वाजण्याच्या संधीस इतर कोणालाही आपली चाहूल लागू न देता चोर पावलानी हळूच त्या छपरी-बाहेर पडले.[२८]

क्षणभर त्याना तेथे अडखळल्यासारखे झाले. पण तरीही न डगमगता ते तुरुंगाच्या तटापर्यंत पळत गेले. त्यांनी आपल्या हातातील कोठडीची दारे तटाला लावली आणि त्या दारावरून एका दमात तटाची अर्धी भिंत ते चढले. नंतर श्वास घेण्यासाठी ते थांबले आणि मग तटाचा राहिलेला अर्धा भाग भरंकन चढून ते तटावर उभे राहिले. अवघड जागेवर आणि भिंतीवर चढण्याचे पुण्यात गुलटेकडी-वर आणि इतर ठिकाणी घेतलेले धडे त्यांच्या उपयोगी पडले, तटावर उभे राहून हायसे वाटून त्यांनी एकदा आपणास कोंडून ठेवणाऱ्या तुरुंगाकडे पाहिले. आणि मग आनंदात तटाच्या खाली बाहेर उडी टाकली! या वेळेला पहाटे तीन वाजले होते. एडनचा तुरुंग फोडून ते एकदाचे बाहेर पडले होते!

एडन हे बाहेरच्या जगापासून एकाकी पडलेले आणि अरबस्तानाशीच एकदम जोडलेले आहे. अशा प्रदेशात तुरुंगाच्या बाहेर पडताच आपल्या डोक्यावर कांबळे टाकून, कुठून निसटून जावे, या विचारात वासुदेव बळवंत एखाद् तास राहिले. पण नंतर तीन वाजण्याच्या संधीस त्यांचा निर्णय होऊन ते साऊथ गेटपर्यंत चालत गेले. त्यातूनच होकट बे कडे जाणारी वाट होती. पण तो रस्ता त्यांना बंद दिसला. तेव्हा त्यांना आठवले की, मेन गेटमधून आणि बॅरिअर गेटमधून वरीच वाहतूक आणि माणसांची वर्दळ असे. त्या वर्दळीचा गोंधळ त्या रस्त्याने येणाऱ्या जाणाऱ्या उंटांमुळे अधिकच वाढत असे. तेव्हा या वर्दळीचा आणि गोंगाटाचा लाभ घेऊन आपला पाठलाग करणाऱ्यांच्या हातून निसटून जाण्याचे त्यांनी ठरविले आणि ते मागे फिरले. थोड्याच वेळात ते सैनिकी चाळीच्या (बॅरक्सच्या) मेन गेटापाशी पोचले. त्यांना ते उघडलेले दिसले. तेथून एक रस्ता क्रेटरमधून बाहेर एडनच्या पश्चिम किनाऱ्यावरील स्टीमर पॉइंटकडे जात होता. आणि दुसरा वाळवंटातून अरबांनी व्यापलेल्या लाहेज नावाच्या जिल्ह्याकडे जाई. तेथे त्यांना एक शस्त्रधारी सैनिक अधिकारी (कॉर्पोरल) पहारा देत दक्ष स्थितीत उभा असलेला दिसला. हा दरवाजा सकाळी सूर्योदय झाल्यावर उघडण्यात येत असे. त्यामुळे पलीकडे जाण्यासाठी तो उघडण्याची तशीच वाट पहात त्याच्या अलीकडे बरेच लोक उभे

२८ तुरुंगाच्या वरील दोन रक्षकांविरुद्ध भरण्यात आलेल्या अभियोगातील (आराप प्रकरण न. ४२७ मधील) कॅप्टन सीली याचे निर्णयपत्र.

होते. त्यांच्यातच अंग चोरून वासुदेव बळवंत गुप्तपणे उभे राहिले परंतु थोड्याच वेळात त्यांच्या लक्षात आले की, आपण जर मागे फिरून उलट दिशेला गेलो, तर काही अंतरावर सामुद्रधुनीजवळ (इस्थमसजवळ) लाहेजकडे जाण्यासाठी एका बोगद्यातून जाणारा एक रस्ता आपणास मिळेल. तेव्हा ते परत फिरले आणि त्या बोगद्यावाटे पलीकडे जाऊन पुढे चालू लागले. त्यांनी लवकरच बॅरिअर गेट मागे टाकले आणि स्वतंत्रतेचा वारा उपभोगीत ते चालू लागले. त्यांनी कपडे बदलले असल्यामुळे त्यांचा कोणाला संशय आला नाही. काही वेळ चालल्यावर त्यांनी आपली गती वाढविली. उघड्यावर अनिर्बंधपणे पळण्याची संधी त्यांना कित्येक महिन्यांनी मिळत होती. त्या आनंदात ते भराभर अंतर तोडीत होते. पहाटे चारच्या संधीस ते पळू लागले आणि बारा मैल अंतर तोडीपर्यंत ते पळतच 'इंटिरिअर' भागाकडे गेले.

इकडे सकाळी त्यांच्या कोठडीवर शेख बखरुद्दीन आणि फरा अबदुल्ला हे दुसरे दोन पहारेकरी आपल्या पाळीच्या कामावर आले. आपल्या स्वाधीन केल्या गेलेल्या कोठडीची दारे जाग्यावर नाहीत हे पाहून त्यांना धक्काच बसला. त्यांनी कोठडीत पाहिले. तो आतील बंदिवानही नाहीसा झालेला होता. त्याच्या बेड्या तेथेच मोडून पडलेल्या होत्या. ते बाहेर पहातात तो तुरुंगाच्या तटाला लावून उभी केलेली कोठडीची दारे त्यांना दिसली. आणि घडलेला सर्व प्रकार त्यांच्या लक्षात आला.

वासुदेव बळवंतांच्या या थक्क करणाऱ्या पलायनाची बातमी लवकरच अधिकाऱ्यांना कळली. तेव्हा त्यांच्यात एकच गडबड उडाली. तुरुंगाची भयसूचक घंटा मोठ्यांदा खणाणू लागली. सर्व शोधयंत्र लागलीच हालू लागले. सोजिर आणि घोडेस्वार चारी दिशांना लागलीच पाठविण्यात आले. सकाळी आलेल्या रक्षकांच्या जागी दुसऱ्या रक्षकांना नेमून पळालेल्या बंदिवानाचा शोध करून त्याला पकडून आणण्यात सहाय्य केलेत तर तुम्हास पारितोषिके देऊ असे सांगून त्यांनाही त्या कामगिरीवर पाठविण्यात आले.

काराधीक्षक डॉ. कोलमन यांनी एडमचे सहाय्यक राजनिवासी एल. पी. वॉल्श यांना सकाळी ६ वाजल्यानंतर काही क्षणात एक पत्र पाठवून वासुदेव बळवंतांच्या पलायनाची माहिती कळविली. आणि त्यांना पुन्हा पकडण्यासाठी आवश्यक ती सर्व उपाययोजना करण्याची विनंती केली. वॉल्श हे एडनच्या पोलीस विभागाचे मुख्य होते. त्यांनी ती बातमी लागलीच आगनावेच्या टोकास (स्टीमर पॉइंटला) कळविली. आणि आपल्या हाताखालचे मिळण्यासारखे सर्व पोलीस फरारी बंदिवानास पकडण्याच्या कामगिरीवर धाडले. त्यांनी स्वतः १४ व्या पायदळाच्या वसाहतीला भेट दिली आणि आदल्या रात्री तुरुंगात पहाऱ्यावर असणाऱ्या पायदळाच्या रक्षकांना

भेटून त्या संबंधात माहिती मिळविण्याचा प्रयत्न केला. पण त्यांना काहीही विशेष माहिती मिळाली नाही.

पो. निरीक्षक सलिवन यांनी सैनिकी तळाच्या वायव्य भागातील एडनमधील प्रत्येक बंद घर आणि खोरेंही शोधली. आणि मन्सूरी टेकड्यांजवळही सैनिक पथके धाडली. मन्सूरी टेकड्यांवरील वाटेवर त्यांना टाकून दिलेला एक लंगोट मिळाला. आणि त्यावरून हा बंदिवान सामुद्रधुनीकडे पळाला असावा असा त्यांनी साधार तर्क केला. त्या भागाची त्यामुळे त्यांनी प्रदीर्घ आणि दक्षतापूर्वक तपासणी केली.

जलमार्ग आरक्षी (वॉटर पोलीस) म्हणून बंदरावर असणाऱ्या पोलिसांनाही सावध करण्यात आले. तेव्हा ते माल्ला बंदरातील आगनावांवर गेले. आणि त्याही त्यांनी शोधल्या. स्टीमर पाईंटकडेही तसाच शोध पोलिसांनी केला. एडनचे राजनिवासी लॉक यांच्या संमतीने एडनभर दवंडी पिटून वासुदेव बळवंतांना पकडून देणाऱ्यास दोनशे रुपयांचे पारितोषिक घोषित केले, आणि ती घोषणा ऐकताच दोनशेवर सोमाली आणि अरब लोक त्या पारितोषिकाच्या आशेने पळालेल्या बंदिवानाच्या पाठलागात सहभागी झाले. तो पाठलाग मग चिकाटीने त्यांनी पुढे चालू ठेवला.

बलरुद्दीन आणि अब्दुल्ला हे तुरुंग सोडून निघाले. ते प्रथम बॅरिअर गेटवर गेले. त्या दरवाजावरील पहारेकऱ्यास त्यांनी सर्व वृत्तांत सांगितला. मग ते एडनच्या सैनिकी तळावर गेले. आणि तेथेही त्यांनी ती बातमी अधिकाऱ्यांना कळविली. इकडे दिवस वर येताच वासुदेव बळवंत धावण्याचे थांबले. ते एका अज्ञात, कधीही भेट न दिलेल्या प्रदेशातून तुरुंगातून धाडसाने सुटल्यानंतर चालले होते. त्यांच्या मागावर सरकारी लोक होते. आणि आपणास पकडणे त्यांना अशक्य झाले तर आपल्यावर गोळी झाडण्यासही ते कमी करणारे नव्हते, हे ते ओळखून होते. आदल्या रात्रीपासूनच्या दटपटीच्या श्रमाने ते पक्के थकून गेले होते. आणि आता थोडी विश्रांती घ्यावी असे त्यांना वाटू लागले.

माणसास पकडण्याची उत्सुकता पाहून आपणास काही पैसे मिळाले तर आपणही तुम्हाला सहाय्य देऊ असे त्याने शिपायांना म्हटले. शिपायांनी ते करण्याचे त्याला आश्वासन दिले. पण त्या पोटी एखाद रुपया विसार द्या असे तो म्हणाला. तेव्हा सध्या आमच्याजवळ पैसे नाहीत. पण एडनला परत गेल्यावर सरकारकडून तो तुला मिळण्याची व्यवस्था करू असे त्याला त्यांनी सांगितले. त्यावर मात्र त्या उंटवाल्याने एक उंट मिळविला आणि त्यावर स्वार होऊन तो त्वरेने पुढे जाण्यास सिद्ध झाला. आम्हीही तुझ्यामागे येतोच असे त्याला शिपायांनी सांगितले. तो उंटावरून पळावयाला लागल्यावर वाटेतील आणखी तीन उंटवालेही त्या पाठलागात सहभागी झाले.

सुटून गेल्यानंतर देहा तासांनी दुपारी १ वाजण्याच्या संधीस वासुदेव बळवंतांना आपला पाठलाग करणाऱ्या या लोकांची चाहूल लागली. त्या लोकांनी मोठी ओरड केली. आणि त्यामुळे वाटेवरचे अरबही आता वासुदेव बळवंतांना हटकू लागले. त्यांचा वेष पाहूनही त्यांना त्यांचा संशय येऊ लागला. वासुदेव बळवंतांना अरबी भाषा येत नव्हती. त्यामुळे त्यांनी मोडक्या तोडक्या उर्दूमध्ये आपला वृत्तान्त त्यांना सांगण्याचा प्रयत्न केला. पण ते त्या अरबांची काही निश्चिती पटवू शकले नाहीत. तेव्हा मग प्राणावर उदार होऊन वाटेतील लोकांना गुंगारा देत ते पुढे पळू लागले. परंतु उंटवाल्यांच्या वेगाहून अधिक वेगाने ते किती वेळ पळू शकणार? पाठलाग करणाऱ्यांच्या झडपेची छाया वासुदेव बळवंतावर पडू लागली आणि त्यांनी लवकरच एडनपासून १२ मैलांवर लाहेजजवळ बीर ओबेद या ठिकाणी त्यांना घेरले. त्याच्या मागावरचे शिपाईही तेवढ्यात तेथे आले. तू परत एडनला चल, असे त्यांनी त्याना सांगितले. पण वासुदेव बळवंत ते कसे ऐकणार ? तेव्हा मग त्यांची आणि त्याना पकडणाऱ्यांची झटापट झाली. एकाकी असताही वासुदेव बळवंतांनी त्या चार पाच जणांना प्रतिकाराचा चांगलाच क्षणक्षणीत प्रसाद दिला, पुण्याच्या एका मराठ्याच्या हातचा रट्टा काय असतो आणि पेच घालून तो आपली हाडे कशी खिळखिळी करतो, ते त्या भणक अरबाना चांगले कळून आले. पण वासुदेव बळवंत एकटे त्यामुळे शेवटी त्यांचे काही चालले नाही. त्या लोकांनी त्यांच्या कपाळावर ठोसे मारले. त्यात वासुदेव बळवंतांना कपाळावर रक्तबंबाळ करणारी फार गंभीर दुखापत झाली. " आणि शेवटी निरुपायाने संतप्त वासुदेव बळवंत शांत झाले. त्यांच्या अपयशापुढे त्यांच्या धाडसी पराक्रमाने शेवटी हार खाल्ली.

तरी पण त्यांना परत घेऊन येताना त्या पकडणाऱ्या लोकांच्या जिवात जीव नव्हताच. त्यामुळे त्यांनी प्रथमच त्यांना मेजर स्टीव्हन्स या सैनिकी अधिकाऱ्या-

---

२९ काराग्रीतर डॉ. कोलान याचे एडनच्या पहिल्या एहांम्यक राजनिवासाला प्रतिवृत्त प. ६८५ (१८८०) दि. ८ डिसेंबर १८८०

कडेच नेले. कसेही करून आम्हाला एक हातकडी द्या असें त्याला म्हटले आणि ती मिळताच वासुदेव बळवंताच्या हातात त्यांनी ती बळानेच घातली, तेव्हाच त्यांचा जीव थोडा भांड्यात पडला. नंतर ते त्यांना सामुद्रधुनीजवळ घेऊन आले. आणि तेथे पो. अधीक्षक वॉल्श आणि पो. निरीक्षक सलिवन त्यांना भेटले. कारण वासुदेव बळवंतांना पुन्हा पकडण्यात आल्याची बातमी समजताच ते दोघे बॅरिअर गेटपाशी पोचले होते. शिपायांनी घडलेला सारा वृत्तांत त्यांना सांगितला. तेव्हा मग "वासुदेव बळवंताना तुम्ही आमच्या स्वाधीन करा आणि उद्या चौकीवर या," असे त्या लोकांना सांगून त्यांनी त्यांची नावे टिपून घेतली आणि वासुदेव बळवंतांना घेऊन एडनकडे निघाले.

सकाळी झालेल्या वरील धावपळीमुळे एडनमध्ये एकच खळबळ उडाली. हिंदुस्थानातून सीमापार झालेला आणि एडनच्या तुरुंगात ठेवलेला एक बंडखोर त्या दिवशी तुरुंगातून पळाला होता हे ऐकून तेथील लोकात कुतूहल निर्माण झाले. बारा तासानंतर सायंकाळी तीनच्या संधीस त्यांना एडनमध्ये परत आणले, तेव्हा त्यांना पाहण्यास लोकांचे घोळके तेथे जमले आणि " महाराज आले ! राजा आला! " या शब्दांनी लोकांनी त्यांचे स्वागत केले. त्या लोकांना टाकून वासुदेव बळवंत पुढे गेले. एडनच्या तुरुगाची दारे त्यांच्यासाठी उघडली गेली आणि त्यातून आत जाताच बंद झाली! ते पुन्हा जिवंतपणी त्या दारातून कधीच बाहेर पडले नाहीत.

तुरुंगात परत आल्यावर फोडून जाण्यास कठीण अशा दुसऱ्या एकलकोंडीत वासुदेव बळवंतांना कोंडण्यात आले. डॉ. कोल्सन यांनी वासुदेव बळवंतासाठी एडन येथील तोफखान्यातच लोखंडाच्या नवीन जड आणि तोडण्यास कठीण अशा मजबूत पायबेड्या बनविण्याची आज्ञा दिली. त्यांच्या कोठडीवर वेचक घटिंगण रक्षकांची नेमणूक केली आणि सैनिकी पहाऱ्याची व्यवस्था केली. त्यांना कामही अधिक कष्टांचे दिले. वासुदेव बळवंतांच्या पलायनाचे औध्वंदेहिक मग एडन येथे सुरू झाले. शेख शमसुद्दीन आणि अब्दुल रहमान या त्यांच्या कोठडीवरील पहारेकऱ्यांवर पहिला वर्ग दंडाधिकारी कॅप्टन सी. डब्लू. एन. सीली यांच्यापुढे १५ ऑक्टोबर १८८० ला कर्तव्यच्युतीच्या आरोपावरून अभियोग भरण्यात आला. या अभियोगात साक्षीदार क्र.३ म्हणून वासुदेव बळवंत उभे राहिले. आपल्या साक्षीत त्यांनी आपल्या पलायनाचाही वृत्तात सांगितला. दोन्ही आरोपींना त्या अभियोगात २ महिने तुरुंगवास आणि १०० रुपये दंड नि दंड न दिल्यास आणखी दोन महिने तुरुंगवास अशी शिक्षा ठेवण्यात आली दोघांनाही नोकरीतून पदच्युत करण्यात आले.

सरकारच्या पक्षपात्या हिंदी द्वेष्ट्यांनी या पलायनातील भव्यता आणि अंतिम उद्दिष्टांचा फोलपणा दाखविताना म्हटले : वासुदेव बळवंत आता तात्पुरते का होईना स्वतंत्र होते ... ... पण ते अक्षरशः इकडे आड आणि तिकडे विहीर

यांच्यामध्ये सापडले होते. त्यांच्या एका बाजूला वाळवंट पसरले होते. आणि दुसऱ्या बाजूला खोलखोल समुद्र." परंतु त्यांचे खरे उद्दिष्ट काय होते ते एडनच्या तुरुंगाच्या अधीक्षकांच्या पुढील उद्गारांवरून कळून येते.

"(this) important prisoner effected his escape with the greatest ease and had there been some organised plot would now have been on his way to Bombay."

("या महत्त्वाच्या बंदिवानाने अत्यंत सहजपणे आपली सुटका करून घेतली. आणि जर ह्या घटनेमागे काही सुसंघटित कट असता तर हा बंदिवान बहुधा या वेळेपर्यंत मुंबईच्याच वाटेवर असता !")

एडनच्या तुरुंगातूनही वासुदेव बळवंत निसटून गेले, हे समजताच पुण्याच्या नागरिकात पसरलेल्या कल्पना 'अनामिक' यांच्या पुढील आठवणीवरून दिसतील. ते म्हणतात : "फडके पोहण्यात तर अत्यंत तरबेज होते. तुरुंगातून पळाल्यावर ते समुद्रात आतपर्यंत पोहत गेले होते. आणि मग काही अंतरावरच समुद्रात बोटी टाकून त्यांना पुन्हा पकडण्यात आले असे आम्ही ऐकत असू." या घटनेनंतर एडनचे हंगामी राजनिवासी जी. आर. गुडफेलो यांनी त्या सर्व प्रकरणाचे प्रतिवृत्त मुंबई सरकारच्या मुख्य सचिवांकडे १९ ऑक्टोबर १८८० ला धाडून दिले. त्या प्रतिवृत्तावर राज्यपालानी आपल्या कार्यकारी मंडळात चर्चा करून नवीन मजबूत, जड, लोखंडी बेड्या या बंदिवानाच्या पायात घालून त्या नीट खिळवून ठोकून टाकण्याची उपाययोजना लागलीच करावी असा आदेश दिला." परंतु ॲशबर्नर यांनी "बंदिवान वासुदेव याला पळून जाण्याविषयी फटक्यांचीच शिक्षा देऊन त्याचे असेही तोडण्याचे शासन त्याना केले असेल." अशी आशा व्यक्त केली.

लोहाराकडून बनवून घेतलेल्या जड बेड्या वासुदेव बळवंतांच्या पायात मग ठोकण्यात आल्या. त्यामुळे त्यांना पळून जाता येणे तर शक्य नव्हतेच ; पण त्यांच्या त्रासाने कोठडीतही जीवन नकोसे झाले. त्यांना त्या अपराधासाठी २५ फटक्यांची शिक्षा देता येणार होती. पण अनधिकृतरीत्या त्यांना खूप मारहाण आधीच झाली होती आणि तीत कपाळावर दुखापत झाली होती. त्यामुळे त्यांना ते मारण्यात आले नाहीत.

वासुदेव बळवंतांना आता एकलकोंडीत (सॉलिटरी कन्फाइनमेंटमध्ये) एकाकी ठेवण्यात आले आणि रात्री तर त्यांच्या हातातही हातकड्या अडकविण्यात येऊ लागल्या. सुटकेच्या प्रयत्नामुळे याप्रमाणे त्यांचे हाल चुकले नाहीतच पण ते सहस्रपटीने वाढले. पुढे सव्वा दोन वर्षे त्यांनी त्या छळाला धैर्याने तोंड दिले. परंतु या रक्त ओकायला लावणाऱ्या अतिश्रमाच्या कामापुढे त्यांच्या शरीराने

---

१० न्यायविभाग; सरकारी ठराव-(जी. आर.) न ७८१० (१८८०). मुंबई सरकारचे कागदपत्र

शेवटी हार खाल्ली. ते वारंवार रुग्णाईत होऊ लागले. आणि १८८१ च्या मध्याला तुरुंगातील दुर्दैवी बंदिवानांचा मित्र असलेल्या क्षयरोगाने त्यांच्यावर झडप घातली. तेव्हा जुलै १८८१ मध्ये त्यांना वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या विचाराने अधिक दूध आणि बटाट्यांचे पदार्थ आहारात देण्यात येऊ लागले. कारण, ते शाकाहारी असल्यामुळे मांसाहार त्यांना वर्ज्य होता. काराधिकाऱ्यांनी कारागारांच्या महानिरीक्षकांना कळविले की, "एकलकोंडीच्या बंदीत असणाऱ्या बंदिवानासंबंधात अपेक्षा करता यावी तितकी त्यांची प्रकृती चांगलीच आहे."[३१] कदान्नावरील जीवनात, अतिश्रमाच्या क्रूर तुरुंगात मानसिक अवदशेत आणि एडनच्या रोगट वायुमानात दुसरे काय होणार ? शरीराच्या अविनाशीपणा विषयीची आशाही त्यांनी लवकरच सोडली. मृत्यूची पावले आपल्या कोठडीभोवती पडलेली त्यांना ऐकू येऊ लागली. त्यांना जगण्यात राम वाटेना! असल्या स्थितीत जगून काय उपयोग? या विचाराने त्यांनी मरून जावयाचे ठरविले.

ऑगस्ट १८८२ मध्ये काराधीक्षक डॉ. कोलसन दीर्घ सुटीवर गेले. आणि त्यांच्या जागी डॉ. रॉब याची नेमणूक झाली. तेव्हा वासुदेव बळवंतांनी आपल्याला मिळणारे सर्व अन्न ग्रहण करण्याची आणि पचविण्याची आपणास शक्ती नाही म्हणून आपल्याला मिळणारे अधिक अन्नपदार्थ अर्ध्यांनी कमी करावे, अशी डॉ. रॉब यांना विनंती केली. डॉ. रॉब यांनी तसे केले. आणि वासुदेव बळवंतांचे कित्येकदा वजन करून पाहिले. पण त्यांचे वजन झपाट्याने कमीच होत चालले आहे असे त्यांना आढळले. डॉ. कोलसन हे सप्टेंबर १८८२ मध्ये कामावर परत आले. देण्यात येणारे अन्नपदार्थ घ्यावयाचे सोडल्यामुळे त्यांचे वजन कमी होत आहे असे म्हणून त्यांनी त्यांची त्याविषयी कान उघाडणी केली आणि सर्व अन्न सतत नेमाने खात जा असा त्यांना आदेश दिला."

वासुदेव बळवंतांनी आणखी काही झगड्यानंतर निर्वाणीचा निर्धार म्हणून एडनच्या तुरुंगात आमरण अन्नत्यागास आरंभ केला. आपल्या पायातील जड बेड्या काढून टाकण्यात याव्या असाही सतत आग्रह धरला. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्य लढ्यात क्रांतिकारकांनी पुढे महिनोगणती अन्नत्याग करून ध्येयवादाच्या आपल्या दृढ निश्चयाविषयी जगाची वाहवा मिळविली. त्याचा ओनामा वासुदेव बळवंतांनीच पहिल्यांदा घालून दिला होता. त्या दिव्यांत त्यांचा तेथे अंतही झाला असता. पण त्यांचा असा मृत्यू लांबणीवर टाकणारा धन्वंतरी त्यावेळी एडनच्याच तुरुंगात होता. त्या तुरुंगात वैद्यकीय अधिकारी असलेले डॉ. मनोहरपंत बर्वे हेच ते धन्वंतरी होत.[३२] डॉ. बर्वे

---

३१ काराधीक्षक डॉ. कोलसन यांचे महा-कारानिरीक्षक, पुणे यांना पत्र ; क्र. ५४१ (१८८२) मुंबई सरकारचे कागदपत्र.

३२ डॉ. मनोहरपंत बर्वे यांचे चिरंजीव डॉ. द. म बर्वे यांचे लेखकास पत्र ; दि. २५ ऑगस्ट १९५९. डॉ. बर्वे यांची अधिक माहिती त्यांनीच धाडली.

मूळचे फलटणचे राहाणारे. आपण टिळकांच्या वयाचे आहोत, असे ते म्हणत असत. त्यावरून त्यांचा जन्म १८५६ मधील होता. त्यांचे शिक्षण फलटण आणि पुणें येथे झाले. पुण्यास बी. जे. मेडीकल स्कूलमधून ते उप-सहाय्यक शल्यचिकित्सक झाले. नंतर त्यांनी फलटणला वैद्यकीय व्यवसाय केला. त्यांचा वर्ण सावळा, आणि उंची चांगली ५ फूट ८ इंच होती. त्यांनी भरपूर व्यायामाने शरीर कमावले होते. ते कुस्ती उत्तम खेळत. पुढे ते सैन्यात वैद्यकीय सेवेत शिरले आणि एडनच्या तुरुंगात वैद्यकीय अधिकारी म्हणून नियुक्त झाले. त्यांना या प्रख्यात बंदीच्या निश्चयाचा वृत्तांत समजला. आणि त्यांना त्यांनी त्यापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. परंतु वासुदेव बळवंतांनी त्यांचे ऐकले नाही. बरेच दिवस अन्नत्याग केल्यावर त्याचा अंत आता जवळ येत चालला असे पाहून डॉ. बर्वे यांनी पुन्हा त्यांचे मन वळविण्याचा प्रयत्न केला. ते त्यांना म्हणाले की, "तुम्ही आजारी आहात म्हणून वैद्यकीय अधिकारी या नात्याने माझ्या हातात आहात. तुम्ही अन्नत्यागाचा मार्ग धरू नका! आजारी माणसाला मिळणारे अन्न तुम्हाला मिळावे म्हणून मी शिफारस करतो. आणि तुम्हीही मग माझ्यासाठी हॉस्पिटलमध्ये मी सांगेन ते अन्न ग्रहण करण्यास प्रारंभ करा!"[1]

या बोलण्यामुळे वासुदेव बळवंतांचा निश्चय पालटला. डॉ. बर्वे यांनी त्यांना रुग्णाईत म्हणून रुग्णालयात प्रविष्ट करून घेतले. आणि डॉ. बर्वे यांच्या हातून दूध घेऊन वासुदेव बळवंतांनी आपला अन्नत्याग थांबविला. ते पुढे तेथे नुसत्या दुधावरच राहिले. परंतु शारीरिक श्रमांतून मुक्तता झाली, तरी मनच निरुत्साही बनलेले असल्यामुळे त्यांच्या ढासळलेल्या प्रकृतीत सुधारणा होऊ शकली नाही. ते आपले दिवस मोजीत होते. पायातील जड बेड्याही त्यांना असह्य झाल्या आणि वैद्यकीय कारणांसाठीच त्या काढून टाकणे भाग आहे असे सरकारी अधिकाऱ्यांनाही निरुपायाने पटले. पण कारामहानिरीक्षकाच्या अनुज्ञेने वासुदेव बळवंतांसाठी त्यांनी विशेष बनावटीच्या हलक्या बेड्या बनवून घेतल्या. आणि त्या जड बेड्यांच्या ठिकाणी त्यांच्या पायात चढविल्या. त्या बेड्या बनविण्यासाठी टाकल्या आहेत असे समजताच वासुदेव बळवंतांनीही आपले सगळे अन्न शक्य तितके ग्रहण करण्यास सुरुवात केली. मी आता बरा होण्याचा प्रयत्न करीन असेही ते डॉ. बर्वे यांना म्हणू लागले.

परंतु ब्रि. सरकारला त्यांना त्वरेने मारण्यात यश येत होते. क्षयरोगाच्या शेवटच्या अवस्थेने त्यांना आपल्या मिठीत पक्के धरून टाकले होते, त्याच्या जोरामुळे त्यांची प्रकृती खालावत जाऊन १५ जानेवारी १८८३ ला ती पूर्णपणे कोलमडून पडली. आता तरी हा बंदिवान पळून जाऊ शकणार नाही अशी निश्चिती पटून डॉ. कोलमन यांनी त्यांच्या पायातील बेड्या काढून टाकल्या आणि त्यांची एक

1 ग. ना. जोशी यांनी लिहिलेली माहिती डॉ. द. म. बर्वे यांनी हा वृत्तांत बरोबर आहे म्हणून १९५९ मध्ये कळविले आहे.

मागणी पुरी केली."पण त्याच दिवशी त्यांनी आदल्या दुखण्याच्या शेवटच्या टप्प्यात प्रवेश केला.

तरीही वासुदेव बळवंत मनाने खंबीर होते. १० फेब्रुवारीला डॉ. कोलमन त्यांना पाहण्यास येतांना त्यांनी कारासंहिते (जेल मॅन्युअलमधील) ऋणाईत बंदिवानास सोडून देण्याचा अधिकार सरकारास देणाऱ्या परिच्छेदाकडे त्यांचे लक्ष वेधले. पण राजकीय बडखोराच्या संबंधात ब्रिटिश राज्यकर्ते असे नियम धाब्यावर बसवत असत. त्यामुळे वासुदेव बळवंतांना या परिच्छेदाची माहिती कशी मिळाली याविषयी डॉ. कोलसन यांनी आश्चर्य व्यक्त केले. पण त्यांचे पालन करण्यासंबंधात मात्र काही केले नाही. शेवटी ब्रि. सरकारच्या राक्षसी सत्तेने जेथे काही करण्याचे नाकारले, तेथे मृत्यूचा दयाळू हात पुढे सरसावला. आणि या इहलोकातील शेवटच्या टप्प्यात वासुदेव बळवतांनी पाऊल टाकले.

डॉ. बर्वे मोठ्या दुःखाने त्यांचे शेवटचे क्षण मोजू लागले. घरदारापासून दूर एका तुरुंगातील मृत्युशय्येवर वासुदेव बळवत पहुडले होते. तुरुगाच्या अधिकाऱ्याच्या दृष्टीत त्यांच्याविषयी विशेष आस्था नव्हती, त्यांच्या कुटुंबियांपैकी कोणीही शेवटचे शब्द बोलण्यास त्यांच्याजवळ नव्हते. आपल्या मोठ्या मुलाच्या या शोकांतिक शेवटाने व्यथित झालेले त्यांचे वडील, एका क्रुद्ध साम्राज्याच्या राजकीय प्रतिशोधात भरडले गेलेले त्यांचे भाऊ, त्यांच्याकडून तीनचार वर्षात एखादे पत्रही न येता कल्पना करता न येणाऱ्या अंतःकरण पिळवटून टाकणाऱ्या त्यांच्या हालअपेष्टांनी व्यथित झालेली त्यांची पत्नी, त्यांच्या अशा अवस्थेमुळे दुःखी कष्टी झालेला त्यांचा मेहुणा आणि इतर नातलग हे लांब लांब, शेकडो मैल दूर, शिरढोण, पुणे येथे आणि इतर ठिकाणी राहात होते ! हिंदुस्थान देश पुन्हा पारतंत्र्याच्या घोर निद्रेत गुरफटून गेला होता ! डॉ. बर्वे सोडता त्यांच्याजवळ धीराचा शब्द बोलण्यास एकही हिंदी देशबांधव तेथे नव्हता, परंतु मृत्यूच्या समोरही त्यांचे शेवटचे विचार मागे एकदा तशाच अवस्थेत श्रीशैल मल्लिकार्जुनास असताना त्यांनी मनात बाळगले होते त्याहून दुसरे काय असणार ? त्यावेळी ते म्हणाले होते : "मी मरून जाईन पण या दुष्ट चांडाळ प्रजाभक्षक (इंग्रजांना) मेल्यानंतरही मी शांतता लाभू देणार नाही !"[३५]

१७ फेब्रुवारी १८८३ ला सकाळीच त्यांची शोचनीय तळमळ सुरू झाली. वैद्यकीय अधिकाऱ्यांनी आशा सोडली. शेवटच्या घटकेची औषधे त्यांना दिली. पण त्यांचा काही परिणाम दिसला नाही. मध्यान्हास त्यांची शोचनीय तळमळ आणखी वाढली. त्यांचे पाणीदार तेजस्वी डोळे शून्यपणाने फिरू लागले. शेवटी ते थिजले. त्यांनी बेशुद्धीत प्रवेश केला. चारच्या सुमारास त्यांचे शरीर थंड पडू लागले. लवकरच त्यांना शेवटची घरघर लागली. त्यांचा देह निश्चेष्ट झाला आणि १७ फेब्रुवारी

३४ डॉ. कोलसन यांचे मुंबई सरकारला प्रतिवृत्त क्र १४३ (१८८३) ; मुंबई सरकारचे कागदपत्र.
३५ वासुदेव बळवंतांचे 'आत्मचरित्र'

१८८३ ला संध्याकाळी ४.२० वाजता[१६] त्यांचे प्राण त्यांचा नश्वर देह सोडून गेले.

त्यांच्या उत्तरक्रियेस तेथे कोणी आप्त नव्हते. तुरुंगाच्या अधिकाऱ्यांनीच एडनच्या किनाऱ्यावर त्यांच्या मृतदेहाची चिता पेटवून त्यांची उत्तरक्रिया पार पाडली. डॉ. बर्वे हे त्यांचे एकच देशभक्त देशबांधव शून्य मनाने त्यावेळी उपस्थित होते, तीनच तासाच्या आत त्यांच्या नश्वर देहातील अस्थि आणि त्याची रक्षा अरबी समुद्रात फेकून देण्यात आली. लाखांच्या मोलाने तोलता येणारा वासुदेव बळवंतांचा देह अशा हृदयद्रावक पण स्फूर्ती पेटवणाऱ्या स्थितीत नष्ट झाला. एडनचा किल्ला स्वतंत्र हिंदुस्थानच्या मुलाबाळांना म्हणूनच यात्रेच्या ठिकाणाप्रमाणे भासला पाहिजे.

डॉ. कोल्सन यांनी एडनचे सहाय्यक राजनिवासी कॅप्टन जे. एस. किंग यांना ती बातमी कळविली. आणि किंग यांनी ते वृत्त राजनिवासाला कळविताच त्याने तशी तार मुंबई सरकारला ७–५५ वाजता धाडून दिली. ती त्या वेळीच्या ईस्टर्न टेलिग्राफ कंपनीच्या मध्यस्थीने सुएझमार्गे मुंबई सरकारकडे पोचली. ती पुढीलप्रमाणे होती.

THE EASTERN TELEGRAPH COMPANY Station Bombay ADEN via Suez Day—17; 7-55 p.m.
LIFE CONVICT WASSUDEO BULWUNT PHADKE DIED THIS AFTERNOON. BOMBAY 17-2-83.

त्यावर मुंबई सरकारने एडनच्या राजनिवासाकडून या मृत्यूविषयी अधिक सविस्तर माहिती मागविली आणि आता तेथे राजनिवासी असलेले, ब्रिगेडिअर जनरल जेम्स ब्लेअर यांनी ती तीन दिवसात मुंबई सरकारला धाडून दिली. राज्यपालांच्या कार्यकारी मंडळापुढे ती ठेवण्यात आली. तेव्हा त्याने एक ठराव करून मृताच्या नातेवाईकांना ही बातमी करविण्यासाठी तुरुंगाच्या महानिरीक्षकांना आदेश दिला.[१७]

परंतु यावर कारागृहाधीक्षकांनी पाठविलेल्या पत्रात वासुदेव बळवंतांच्या दुखण्याचा, वाईट प्रकृतीचा आणि मृत्यूचा वृत्तांत देऊन म्हटले की, या सर्व घटना एकत्र करता माझे असे मत आहे की, या बंदिवानाने आपल्या बेड्या काढून टाकल्यावर पळून जाण्याच्या उद्देशाने किंवा आपली प्रकृती इतकी वाईट करून घ्यावयाची की, आपली सुटका करणे अधिकाऱ्यांना भाग पाडावे या उद्देशाने, आपली प्रकृती हेतुतः वाईट करून घेतली ! आणि त्यावर हंगामी मुख्य सचिव नेलर यांनीही ४ मार्च १८८३ ला या मल्लिनाथीला दुजोरा दिला. पण वासुदेव बळवंतांना असे नैसर्गिक मरण आले यावर जनतेचा विश्वास बसला नाही. एडनच्या तुरुंगातून

१६ एडन सरकारचे लिखाण पत्र; दि. १३ सप्टेंबर १९४७
१७ जी. आर. क्र. १२६२ (१८८३); जे. डी. व्हॉल्यूम, ६० (१८८३); मुंबई सरकारचे दप्तर

निसटून जाताना किंवा इतर काही कारणावरून इंग्रजांनी त्यांना गोळी घालूनच ठार मारले असाच संशय लोकांच्या मनात वावरत राहिला.[१८]

वासुदेव बळवंतांचे प्राण त्यांचे नश्वर शरीर सोडून गेले ! पण त्यांचा आत्मा अमर होता ! त्यांची देशप्रेमी कष्ट भोगलेली शूर काया सोडून तो अंतराळात वर वर गेला ! समुद्र, नद्या, पर्वत आणि देश ओलांडून त्यांच्या मृत्यूने हळहळणाऱ्या असंख्य देशबांधवांच्या विस्तृत समुहात येऊन पुन्हा तो घोटाळत राहिला. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याची त्याची आकांक्षा अपुरी राहिली होती. त्या अतृप्त स्थितीतच पुढील प्रत्येक पिढीतील तरुणांमध्ये आपली स्वातंत्र्याची आकांक्षा त्याने रोवली आणि १८८३ मध्ये त्याने पेटविलेली ही स्वातंत्र्यकांक्षेची ज्योतच पुढे या देशातील कोटी कोटी हृदयात कालांतराने पेटून तिची एक विराट ज्वाला बनली. त्या ज्वालेत सहस्रावधी हिंदी तरुणांचे तांडे काही मारीत, काही मरत, काही काळ्या पाण्यावर हालअपेष्टा भोगीत, पण सतत लढत राहिले ! त्यांच्या अविरत स्वातंत्र्ययुद्धाच्या रणयज्ञातूनच भारतीय स्वातंत्र्याचे सुंदर दृश्य शेवटी साकार झाले !

* * *

---

१८ 'अनामिक' यांच्या आठवणी

## प्रकरण २० वें

## सहकाऱ्यांची वाताहत

वासुदेव बळवंतांच्या सहकाऱ्यांचा वाताहातीचा समजला तो वृत्तांत पुढे दिला आहे. त्यांचे दुसरे बंधू पांडुरंग बळवंत याना पोलिसांनी सोडून दिल्यावर पेण मार्गावर खोपोली येथे ते काही दिवस राहिले. बंडाच्या परिणामांचा काही मागमूसही राहिला नाही तेव्हा ते बडोदा संस्थानात नवसारी येथे गेले, गुजराथी भाषा शिकले. त्यानी वकिलीची सनद मिळविली आणि वकिली केली. गणेश कृष्ण देवधर धामारीच्या लुटीच्या अभियोगातील सश्रम कारावासाची शिक्षा भोगून बाहेर पडताच वासुदेव बळवंतविरुद्ध साक्ष देण्याचे टाळण्यासाठी नापत्ता झाले. ते १८८९ च्या संधीस मृत्यू पावले. सितारामअय्या गोकाक आणि गोपाळ यर्वं हे अटक होण्यापूर्वीच अज्ञात झाले. त्यांच्या साक्षीची आवश्यकता भासली तेव्हा त्यांचा पोलिसांनी शोध केला. पण ते त्यांना सापडले नाहीत. वासुदेव बळवंत गाणगापूर सोडून गेल्यावर मेजर डॅनिअल सायंकाळी कृष्णाजीपंत गोगटयाच्या घरी गेला. त्याच वेळी गोगटे मागील दाराने बाहेर पडता पडता पत्नीस म्हणाले, " मी शौचास जातो आहे. " डॅनिअलने गोगटे कोठे आहेत म्हणून विचारताच तिने म्हटले : " ते शौचास गेले आहेत. मी स्वयंपाक करून त्यांची वाट पाहात बसले आहे. " कोणी साधू इथे कधी आले होते का, असे त्याने विचारताच ती म्हणाली : " कोणी तरी साधू आले होते हे खरे, पण ते कोण होते आणि कोठे गेले ते मला माहीत नाही. " डॅनिअल बराच वेळ बसला, गोगटयाची चलाखी त्याने ओळखली नि मग त्यांच्या घरावर शिपाई ठेवून तो निघून गेला गोगटे पुढे चौदा वर्षांनी गर्द वादळ शमल्यावर आपल्या मुलामाणसात परत आले.

विष्णू विनायक दढे पुण्यास होते. त्यांचे लग्न ठरले होते. पण वासुदेव बळवंतांच्या अटकेची बातमी आली आणि त्यांच्या दैनंदिनीत आपल्या नावाचा उल्लेख आहे असे पळनाथ नारायण वान्हेरे आणि जोशी या सहकाऱ्यासह भर लग्नमंडपातून पसार झाले. त्या तिघांनी पृथकपणे नर्मदा प्रदक्षिणा केली. नर्मदेच्या तीरावर

कर्नाळीस ते पुन्हा एकत्र आले. कर्नाळीस विनायकशास्त्री वेलणकर नावाचे विद्वान गृहस्थ होते. संन्याशाच्या वेशात या तरुणांची गूढ वागणूक पाहून त्याना सहाय्य करण्यासाठी वेलणकर याना भेटले. विश्वासाने त्यांची माहिती मिळवून गद्रयांना त्यांनी आश्रय दिला. गद्रयांनी मनःशांतीसाठी एकवीस दिवसांचे देवीचे व्रत केले. देवीचा त्यांना दृष्टांतही झाला. वेलणकरांनी त्याना सागवाऱ्याच्या राजाकडे दुभाष्याचे काम दिले. रावसाहेब या नावाने राहून त्याच्या दिवाणाचेही पुढे त्यांनी काम केले. कर्नाळीस गद्रयांनी गायत्रीचे मदिर बांधले आणि त्यात भिंतीत वासुदेव बळवंतांचे एक चित्र खोदून घेतले. गद्रे नाहीसे झाल्यावर त्यांच्या घराच्या झडतीत त्यांच्या घराच्या भिंतीही पोलिसांनी खोदून काढल्या. त्यांच्या वृद्ध आई बापाना ठाण्यावर हेलपाटे घालावयाला लावले अगठे धरून उभे करण्यापर्यंत त्यांना छळ केला. त्यामुळे गद्रयांचे वडील दोवटी मृत्यूमुखी पडले. काही काळाने गद्रयाचे मामा सहस्त्रबुद्धे चिंचवडला होते. त्यांच्या मध्यस्थीने त्यांच्या आईला त्यांची माहिती वेलणकरांनी कळविली. द्वारकेस यात्रेस जाण्याच्या मिषाने ती एक दिवस मुंबईस गेली आणि गाडीत बसली. तिला मग भडोच येथे उतरवून घेऊन बऱ्याच वर्षांनी मुलाशी तिची वेलणकरांनी भेट घडविली! गद्रयांनी विवाह केला नि ते बडोद्यापासून पुढे राहिले. ते कर्नाळीस १९०५ मध्ये निवर्तले कान्हेरे आणि जोशी यानी नर्मदा प्रदक्षिणा केली. कान्हेऱ्यानी बडोद्यात सिद्धनाथी निवास ठोकला. बरीच वर्षे मौन पाळले. मुनीमहाराज म्हणून ते प्रसिद्ध झाले.वेलणकरांच्या मुलाना त्यानी शिकविलेच पण त्यांच्या पुस्तकांची हस्तलिखितेही लिहिली. ते १९३४ मध्ये मृत्यू पावले. त्यांच्या भक्तांनी पंढरपुरास भीमेच्या काठावर 'दत्ताश्रम' नावाची त्यांची समाधी बांधली.[१] आपणास अटकेचे भय आहे हा या लोकांचा कयास अचूक होता. कारण वासुदेव बळवंताच्या दैनंदिनीत किंवा आत्मचरित्रात ज्यांची नावे आहेत त्यांच्याविरुद्ध त्याचा काय उपयोग करून घेता येईल, अशी मेजर डॅनिअलने विधिविशारदांकडे विचारणा केली होती.[१]

ने त्याविरुद्ध ओरड केली. तेव्हा त्यातील बऱ्याच जणांना निजाम सरकारने सोडून दिले. पकडलेल्यातील इस्माईलखान रोहिला आणि दुसरे लिंगायत आणि कोळी यांच्यावर १७ मार्च १८८० ला मेजर डॉब्स यांच्यापुढे शाहाबाद येथे वासुदेव बळवंतांना लढवय्ये लोक पुरविल्याच्या आरोपावरून अभियोग भरण्यात आला. त्यात इस्माईलखानास ७ वर्षे आणि दुसऱ्या दोघांना अनुक्रमे दीड आणि एक वर्षाची सश्रम कारावासाची शिक्षा ठोठावण्यात आली आणि पाटील आणि पटवारी यांना दंडाची.

रंगनाथ मोरेश्वर महाजनांचा पुढील वृत्तांतही बऱ्याच प्रयासानंतर मिळाला. बंडामुळे गाणगापुरची त्यांची नोकरी गेली. अजर्ल्यास असतानाही उलाढाली स्वभावामुळे दोन दोन महिने ते नापत्ता होत. कलकत्त्यापर्यंत भटकंती करून पुस्तक भांडारातही काही दिवस त्यांनी काम केले. टिळकांकडे पैशासाठी ते टुमटुम करीत. तेव्हा मग टिळक त्यांना म्हणाले : "असं करीत राहण्यापेक्षा तुझ्या एका मुलाचे सर्व शिक्षणच मी करतो." त्या प्रमाणे त्यांचे चिरंजीव गंगाधरपंत यांचे बी. ए. जी. पर्यंतचे शिक्षण टिळकांनी केले. गंगाधरपंतांनी पुढे साखरधंद्यात खूप नाव आणि पैसा मिळविला. रंगोपंतांना अजर्ल्यास लोक बाबा म्हणत. बंडात ते राणीचे साक्षीदार असल्यामुळे आणि त्यांचा स्वभाव रागीट म्हणून तो विषय त्यांच्यापाशी कोणी काढीत नसे. अंगात पांढरा सदरा, कुडता किंवा काळा कोट, डोक्यावर पांढरा रुमाल, आखूड धोतर, पायात वहाणा असा त्यांचा वेष असे. त्यांची प्रकृती ठणठणीत असे. सुपारी ते खात. विडी कधी कधी ओढीत. वाचनाचा त्यांना पक्का नाद होता. लहान मुले त्यांना रंगूभाऊ किंवा रंगूमामा म्हणत. ते उंच आणि हातपाय हेलकावत घालत म्हणून समवयस्क लोकांनी त्यांचे नाव डोलकाठ्या ठेवले होते. बुद्धिबळाचा त्यांना षौक होता. राष्ट्रीय कीर्तनकार वासुदेवराव कोल्हटकर हे अंजर्ल्याचेच. त्यांच्या वडिलांशी रंगोपंतांनी बुद्धिबळाचे डाव टाकलेले बुवांनी लहानपणी पाहिलेले आहेत. महाजन १९३१ च्या सुमारास दिवंगत झाले.

महर्षी अण्णासाहेब पटवर्धन १८८० मध्ये राजकीय कारस्थानासाठी मद्रासला गेले. तेथे एक पांथस्थ त्यांच्याकडे जेवण्यास आला. जेवण्यापूर्वी काढून ठेवलेल्या त्याच्या बंडीतून ओटी झाडणाऱ्या गड्याला एक गुंडाळी पडलेली आढळली. ती त्याने अण्णासाहेबांना आणून दिली. तीव्र धारेचा तो एक लांब पट्टा होता. अण्णासाहेबांना विश्वासाने त्याने माहिती सांगितली. वासुदेव बळवंतांचा तो एक उत्तम साथीदार होता. ते पकडले गेल्यावर तो देशोधडीस लागला. पट्टा वापरण्यात ते दोघेही फार निष्णात होते. एक दिवस तो तेथून निघून गेला![1] देशोधडीस लागलेल्या लोकांची गत अशी झाली.

---

[1] अप्रबुद्ध - 'श्री. अण्णासाहेब पटवर्धन यांचे चरित्र", पृ. ८०

वासुदेव बळवंताच्या सहकाऱ्यांपैकी घोटवडेकर, भिकाजीपंत हर्डीकर, अप्पाराव वैद्य इ. सहकारी टिळक युगात वावरले. भिकाजीपंत १९०० मध्ये मृत्यू पावले. वैद्य त्यानंतर बऱ्याच वर्षांनी! वासुदेव बळवंतांचे बाकीचे सहकारी कुठे गेले? त्यांचे काय झाले? संभ्रमित इतिहास तोच प्रश्न विचारीत राहिला. "कुठे गेले ते? काय झाले त्यांचे?"

* * *

## प्रकरण २१ वे

# वीरपत्नी गोपिकाबाई फडके

" ज्यांची भेट कधीच व्हावयाची नाही, अशा आपल्या प्रियकरांची, मूर्च्छित होत, झिजत, वाट पहात पहात मातृभूमीसाठी किंवा स्वधर्मासाठी मरणाऱ्या हुतात्म्यांप्रमाणे हिंदुस्थानातील या युवती मरून जातात! ज्ञातपणे हाल सोशीत, अज्ञातपणे सेवा करीत, या हिंदी युवती झुरत झुरत आपल्या मातृभूमीसाठी देह ठेवतात. "[1]

— स्वातंत्र्यवीर सावरकर

भारतवर्षातील पराक्रमी पुरुषांच्या चौघड्याचे आवाज जेवढ्या तारस्वराने इतिहासात दुमदुमले आहेत, तितक्याच तारस्वराने त्यांच्या स्त्रियांच्या त्यागाच्या आणि हालअपेष्टांच्या सनईचे शोकसूर इतिहासात उमटलेले आहेत. वासुदेव बळवंतांच्या प्रथम पत्नीला हा भोग विशेष भोगावयाला लागला नाही. पण वासुदेव बळवंतांची दुसरी पत्नी गोपिकाबाई फडके यांचे जीवन मात्र एक कष्टशी लतेची, हालअपेष्टांची आणि दु:खाची अखंड मालिका होती. सर्व आयुष्यभर दुसऱ्यासाठी खपावयाचे काही माणसांच्या दैवात असते ना ? गोपिकाबाई अशाच जिवांपैकी होत्या. कलकत्याच्या 'अमृत बझार पत्रिका' या वृत्तपत्राने वासुदेव बळवंतांचे देवदूत म्हणून वर्णन केले होते. गोपिकाबाई फडके या एक "देवता" होत्या असे म्हणावे लागेल !

त्यांच्या कुटुंबावर जुन्या वळणाची छाप होती. पण लहानपणापासून त्यांचा टापटिपीचा स्वभाव आणि शांत वृत्ती वाखाणण्यासारखी होती. लहानसहान कामातही त्यांचे गुण दिसून येत. त्यांची पाठांतराची शक्ती दांडगी होती! त्यामुळे जुन्या पद्धतीची गाणी आणि उतारे घडाघडा म्हणून दाखविण्यात त्यांनी स्पृहणीय यश मिळविलेले होते. कुटुंब मंडळी मग पुण्यास रहाण्यास गेली. तेव्हाच भटगुरूंच्या वाड्यात रहाणाऱ्या वासुदेव बळवंतांना कदाचित त्यांनी प्रथम पाहिले असेल. त्यांच्याशी त्यांचा विवाह झाला. त्याच वर्षी त्यांचे वडील दिवंगत झाले आणि पितृवियोगाच्या

1 स्वातंत्र्यवीर सावरकर : " [illegible]," " समग्र सावरकर वाङ्मय," खंड ५ वा पृ ४८७

दु:खात त्या होरपळून निघाल्या. त्यानंतर त्यांच्या भोवतालचे वातावरणही बदलून गेले. विवाह झाल्यावर आपल्या बिऱ्हाडात सवंगड्यांच्या ठिकाणी त्यांना आपल्या दीरांशी जमवून घ्यावे लागले. त्यांच्या संसारास आणि वासुदेव बळवंतांच्या क्रांतिकारक जीवनास जवळ जवळ एकदमच प्रारंभ झाला. देशाची चिंता वाहणाऱ्या यजमानांमुळे घरात पैशाची चणचण भासू लागली. तेव्हा गाऱ्हाणी सांगण्यास बाईंना कितीतरी वाव होता! परंतु बाईंचा स्वभावच इतका सहनशील आणि सौख्यविन्मुख की त्यांनी तसे गाऱ्हाणे कधीच केले नाही!

प्रथम काही दिवस त्यांची सावत्र भावजय त्यांच्या बिऱ्हाडात होती. पण पुढे बाईंवरच घराचे सर्वदायित्व पडले. तरी घरातील व्यवस्था सांभाळून वासुदेव बळवंतांच्या इच्छेप्रमाणे समवयस्क दीराच्यासमवेत त्यांनी लेखन, वाचन आणि अमरकोशादी संस्कृत पाठांतरे केली. घोड्यावर बसणे, पट्टा फिरविणे, बंदूक उडविणे या विद्या वासुदेव बळवंतांनी त्यांना शिकविल्या. बंदूक उडविण्यास नरसिंहाच्या देवळाच्या आवारात त्यांचे बिऱ्हाड असतानाच बाईंना त्यांनी शिकविले. पुढे ते थट्टीवाल्यांच्या वाड्यात राहाण्यास आले. त्या वाड्याच्या मागील बाजूस एक मोठे वडाचे झाड होते; त्याच्या फांदीला निशाण बांधून त्यावर बंदुकीच्या गोळीचा नेम मारण्यास ते त्यांना शिकवीत. आपली मुलगी मथुताई ही चार-पाच वर्षांची असता धनुकलीवर बाण चढवून तिची नेम मारण्याची हौस त्या फेडीत.[२] मथुताई ही आपली सावत्र मुलगी आहे ही भावना बाईंना कधीच शिवली नाही. त्या बंदुकीचा नेम मारू लागल्या की, मथुताई पुढे येई नि म्हणे : "मला पण नेम मारावयाचा आहे." आणि मग लहान मुलांना पत्त्यांच्या डावात पान टाकायला देतात, त्याप्रमाणे तिच्या हातात बंदूक देऊन त्या स्वतः ती उडवीत.

वासुदेव बळवंतांचे मन जेव्हा अकारण व्रतामध्ये रमे, तेव्हा त्यांचे सोवळे, त्यांची व्रते आणि आचार सांभाळता सांभाळता बाईंची त्रेधा उडे. पण त्यांची व्यवस्था बाईंना करावी लागे.

बंडासाठी वासुदेव बळवंत बाहेर पडले त्यापूर्वीचा काळ बाईंनी फार चिंतेत घालविला. कामासाठी वासुदेव बळवंत बाहेर जात, ते रात्री उशीरा घरी येत. बाहेर ते कोठे काम कारस्थाने करीत बसतील त्याचे तर्क करीत बाई घरी बसत. ते घरी परतले म्हणजे बाईंना हायसे वाटे. पण पूर्व संकेताप्रमाणे पुन्हा रात्री जेवण होताच वासुदेव बळवंत बाहेर पडत आणि बाईंच्या चिंतेला पुन्हा सुरुवात होई. आपल्या चिंतेची वासुदेव बळवंतांजवळ त्यांनी वाच्यता केली की, ते म्हणत : "ॐ! त्यात इतकं भिण्याचं कारण काय?" परंतु त्या उत्तराने बाईंची चिंता नाहीशी होत नसे नि त्यांच्या मनाचे विचंवडे कमी होत नसत!

२ ल. ना. जोशी : "स्मरण पुराण," लेखांक २ रा, "मौज," दि. १७ जुलै १९२९

स्वयंपाकघरात त्या अशा मनःस्थितीत वावरत असत. तेवढ्यात खेडेगावचे रामोशी वासुदेव बळवंतांच्या घरी येत आणि ते घरी नसले तर त्यांचा ठावठिकाणा विचारीत. दुसरे काही त्यांची वाट पहात तेथेच बसत. माणसांच्या या वर्दळीमुळे बाईंना अधिक धावपळ करावी लागे. पण गोंधळ उडालेल्या नवख्या प्रदेशात उत्तरदायी अधिकाऱ्याने वावरावे तशा शांततेने बाई शांतपणे बिऱ्हाडात व्यवस्था ठेवीत. वासुदेव बळवंतांचे वेतन क्रांतिकार्यात व्यतीत होऊन जात होते. संसाराला लागेल तेवढा पैसा कसाबसा ते बाजूला काढीत. तेव्हा बाईंची दागिन्यांची हौस पुरी करण्यास ते पैसा कोठून आणणार? परंतु बाई इतक्या समाधानी की, परिस्थिती ओळखून त्यांनी तो प्रश्नच पतीजवळ कधी काढला नाही. बाईंचा हा थोरपणा वर्णन करताना ते आत्मचरित्रात म्हणतात: "पहिल्या बायकोपेक्षा दुसऱ्या बायकोचा स्वभाव फारच शांत. मनुष्याचा कंटाळा दोघींनाही नसे. पहिली एखादे वेळेस तरी दागिन्यांसंबंधी गोष्ट काढी. परंतु दुसरीने एक चकार शब्दही काढला नाही! हे कृत्य सुरू झाल्यापासून एक पैशाचे सोने किंवा रुपे किंवा पितळेचे भांडे विकत घेतले नाही असे म्हणावयास हरकत नाही... परंतु या बायकोसारखी शांत, फार न बोलणारी व समजूतदार बायको दहा लक्ष बायकांतसुद्धा मिळणे कठीण. लग्न झाल्यापासून कोणत्याच रीतीने हिच्यापासून आजपर्यंत दुःख झाले नाही. हिच्या गुणाचे वर्णन करीन तितके थोडे! पदार्थ, पक्वान्ने वगैरे करण्यात ती कुशल असे!"[3]

पतीच्या बोलण्यावरून बाईंनी आपले भवितव्य ओळखले होते. दिवसा आपल्या भावी संकेतामध्ये वासुदेव बळवंत गर्क असतच! पण झोपेतून उठून मध्यरात्रीच्या काळोखातही बाहेर जाऊन बसत आणि तासन्तास विचार करीत असत.[4] बाईंनी त्यांना विचारावे: "असं काय होतं आहे हे तुमचं?" मग बाईंकडे पाहात, वासुदेव बळवंत उद्गारत: "त्यांचं राज्य नष्ट केल्यावाचून मला शांती मिळणार नाही!" या उद्गारानंतरच्या त्यांच्या दृष्टीला दृष्टी भिडविताना बाई कासावीस होऊन जात!

१८७९ च्या फेब्रुवारीमध्ये बाईंच्या तर्काचा शेवट झाला. आपल्या संसाराची नाव खडकावर आपटणार हे त्यांना स्पष्टपणे दिसू लागले, वासुदेव बळवंत निरवानिरवीची भाषा बोलू लागले. त्यांनी बाईंना विचारले: "माझ्यामागे तू काय करशील?" त्यावर बाईंनी उत्तर दिले: "तुमच्या मागे मी एक महिनाही जिवंत राहणार नाही." त्यांच्या उत्तरावर वासुदेव बळवंतांचा ठाम विश्वास होता. त्यांनी बाईंचा हा उद्गार आत्मचरित्रात उल्लेखून ठेवला आहे.

पट्टीवाल्यांच्या बिऱ्हाडातून बाईंना जुन्नर येथे पोहोचविण्याच्या वेळेला

---

३ वासुदेव बळवंतांचे 'आत्मचरित्र'.

४ बाई फडके यांच्या स्नुषा उमाबाई फडके यांनी सांगितलेल्या त्यांच्या आठवणी

बाईंच्या आणि वासुदेव बळवंतांच्या हृदयांची झालेली व्याकुळता मागे सांगितलीच आहे. अशक्यप्राय असणाऱ्या पण दुर्दम्य आशावादामुळे वासुदेव बळवंतांना शक्य वाटणाऱ्या भवितव्याचा निर्देश करवून ते म्हणाले : "थोड्याच दिवसात आपला देश स्वतंत्र होईल ! मग आपण पुन्हा भेटू !" त्यांना सोडून जाताना बाईंचे मस्तक सुन्न झाले. पतीच्या गांभीर्यपूर्ण मुद्रेकडे अश्रुपूर्ण नेत्रांनी पाहात त्या दूर दूर जाऊ लागल्या, तेव्हा वासुदेव बळवंत उद्गारले असतील : "आणि हे सर्व माझ्या देशासाठी !" बाईंच्या आयुष्यात पतीशी झालेली हीच शेवटची भेट ! वासुदेव बळवंतांना त्या पुन्हा कधी पाहू शकल्या नाहीत !

बाई जुन्नरला पोहोचल्या आणि वासुदेव बळवंतांच्या बंडाचा झंझावात महाराष्ट्रात घोंघावू लागला. त्यात कित्येक गावे चमकली. आगी प्रकाशल्या ! दऱ्याखोरी वासुदेव बळवंतांच्या नावाने दुमदुमून गेली. जुन्नरच्या घरात पडल्यापडल्या त्या बातम्या ऐकल्यावर बंडाच्या धुमःश्चक्रीत वावरणारे आपले पती बाईंना दिसले! बाईंच्या मनात येई :" ही धुमःश्चक्री किती दिवस चालणार ? आज त्यांना काही अपघात तर झाला नसेल ? सरकारी हस्तकांना त्यांचा तपास लागल्यावर त्यांचे काय होईल ?" चारच महिन्यात सरकारी हस्तकांच्या ससेमिऱ्याने त्या हैराण झाल्या. पांढरपेशा कुळात बायकांना तो प्रकार नवा होता. वासुदेव बळवंत बाईंना भेटण्यास जात असतील या समजुतीने सरकारी अनुचरांच्या जुन्नर येथे रात्री अपरात्री फेऱ्या सुरू झाल्या. त्यांच्या प्रश्नोत्तरांना उत्तरे देता देता आपले सर्व धैर्य बाईंना एकवटावे लागले. त्या दिसल्या की त्यांच्याकडे बोट दाखवून लोकही म्हणत : "हीच ती ! वासुदेव बळवंतांची बायको !" ते ऐकून बाईंना परमावधीचे दुःख होई, आणि त्या प्रकारामुळे त्या घराबाहेरच पडत नाहीशा झाल्या. थोड्याच दिवसात सरकारचे सशस्त्र सैनिक आणि घोडेस्वार दामले यांच्याकडे आले आणि बाईंना जुन्नरहून शिरढोणास हलविण्याचा सरकारी आदेश दाखवून त्यांना शिरढोणास नेण्यासाठी ते निघाले. आपल्याविषयी मुळीच सहानुभूती नसलेल्या सोजिरांच्या आणि घोडेस्वारांच्या पहाऱ्यात जुन्नरपासून शिरढोणपर्यंत प्रवास करण्याचा प्रसंग बाईंवर आला होता. पण कर्जतमार्गे बाई धैर्याने शिरढोण येथे पोहोचल्या.[५] बंडाच्या काळात वासुदेव बळवंत बाईंना कधीच भेटले नाहीत ! पण सरकारचा संशय तो ! सत्तेपुढे कोणाचे शहाणपण चालत नाही.

आपल्या अल्पवयी, सुस्वभावी सुनेला सोजिरांच्या पहाऱ्यात पाहिल्यावर शिरढोण येथे दादांच्या हृदयात चर्रर्र झाले. पण त्यांनी शांतपणे बाईंना धीर दिला. वासुदेव बळवंतांचे पराक्रम आणि हालचाली बाईंनी पुढे शिरढोणासच ऐकल्या. त्यांनी दरोडे घातले, सरकारी खजिना लुटण्याचा कट केला, त्यांनी पुणे जाळले;

५ बाई फडके यांच्या स्नुषा उमाबाई फडके यांनी सांगितलेल्या त्यांच्या आठवणी.

त्यांच्या अटकेसाठी 'जाहीरनामे' लागले आहेत. त्यांचा सुगावा लागलेला आहे, ते गाणगापुरास आहेत, त्यांना मोंगलाईत पकडले आहे, त्यांचा छळ होत आहे, त्यांचा खटला सुरू झाला आहे, त्यांना आगीच्या बंबात घालून जाळणार आहेत, अशा एकेकापेक्षा एकेक स्फोटक बातम्या त्यांनी ऐकल्या. त्या ऐकून त्यांच्या हृदयाचे स्पंदन वाढू लागले. पतीच्या चिंतेने त्या वाळून सुकून गेल्या ! मध्येच त्यांना समजले की, वासुदेव बळवंतांना मुंबईचा मोठा वकील मिळाला आहे. त्यांना आशा वाटली ! शेवटी त्यांना बातमी मिळाली : " वासुदेव बळवंतांना जन्मठेप काळ्या पाण्याची शिक्षा झाली ! " जन्मठेप काळे पाणी म्हणजे मृत्यूच ! काळ्या पाण्यावरून क्वचितच एखादा बंदिवान जिवंत परत आला असेल ! त्यांच्या हृदयाचे पाणी पाणी झाले ! त्यांचे मन पुण्याकडे ओढ घेऊ लागले. पण त्यांच्या आणि वासुदेव बळवंतांच्या मध्ये क्रूर ब्रिटिश सत्तेची भिंत एखाद्या तटाप्रमाणे उभी होती ! त्या काळात त्यांची ती इच्छा कशी पुरी होणार ? त्यांना न घेताच त्यांचे सासरे निरुपायाने एकटेच आपल्या मुलाला भेटण्यासाठी पुण्यास निघाले. त्यांच्याशी बाईंचे निघताना काही बोलणे झाले नि ते पुण्यास गेले. न्यायालयात त्यांनी आपल्या मुलाची भेट घेतली आणि शिरढोणास परत आल्यावर त्यांनी त्या भेटीचा वृत्तांत बाईंना सांगितला; त्यावरच समाधान मानीत बाई नंतर बसल्या !

बाई त्या दुःखात होत्या, तेव्हा त्यांचा भाऊ गणेश याच्यावर खोटी साक्ष दिल्याच्या आरोपावरून अभियोग भरण्यात आला. कोवळ्या वयाच्या त्या पोराला नोव्हेंबरच्या शेवटी न्या. हॅमिक यांनी शिक्षा सुनावली ती अठरा वेत मारले जाण्याची. तुरुंगात गणेश यास अठरा वेत मारले गेले, या वृत्ताने बाई होरपळून निघाल्या असतानाच डोळ्यादेखत कोणी आपले प्राण हिरावून न्यावे, त्याप्रमाणे १८८० च्या जानेवारीत सरकारने वासुदेव बळवंतांना हिंदुस्थानातून हालविल्याचे वृत्त त्यांना समजले ! एखाद्या दणकट दुर्गाच्या कोटाने तोफांच्या मोठमोठ्या गोळ्यांच्या धडका छातीवर झेलाव्या, त्याप्रमाणे त्या बातम्यांचे धक्के बाईंनी सहन केले. काळ पुढे जात होता. आपल्या पतीचे काळ्या पाण्यावर किती हाल होत असतील, त्याची दिवसादिवसाला चिंता करीत बाईंनी चार वर्षे काढली. त्या काळात घरी पत्र पाठविण्याची सवलतही त्यांच्या पतीला ब्रिटिश सरकारने दिली नाही. मग आपल्या वायकोला भेटण्याची संधी देण्याची तर गोष्टच सोडा. थडग्यात जिवंत पुरल्या गेलेल्या माणसाप्रमाणे आपले पती एडनमध्ये गुप्त झालेले बाईंना भासले.

त्यांनी केला, त्यापेक्षा आपल्या पतीला त्यांनी वाहिलेल्या शिव्याशापांनीच बाईंच्या काळजाला घरे पडत असत. बाईंना अजून आशा वाटत होती की, आपले धैर्यवान आणि शूर पती आपदांना लाजवीत आणि मृत्यूलाही पराभूत करीत काळ्यापाण्यावरून घरी परत येतील. या वेड्या आशेत बाईंनी चार वर्षे घालविली. पण १८८३ च्या फेब्रुवारीत त्यांच्या दुर्दैवाने आपल्या भात्यांतील शेवटचा बाण त्यांच्यावर रोखला. वासुदेव बळवंतांचे वृत्त समजत नाही, हे बाईंचे दुःख होते ना? डॉ. कुकर्शेक यांच्या- कडून १९ फेब्रुवारी १८८३ ला त्यांच्या विषयीचे वृत्त कळविणारी एक तार बळवंत- राव दादांच्या हातात पडली! पण ते वृत्त होते वासुदेव बळवंतांच्या मृत्यूचे! १७ फेब्रुवारीस ते हे जग सोडून गेले होते.

बाईंनी ते ऐकले आणि तोपर्यंत उभा असलेला त्यांच्या धैर्याचा कोट धडा- धड कोसळून खाली पडला. त्यांच्या दुःखाच्या भावना अश्रूंच्या धारांनी बाहेर ओसंडू लागल्या. वासुदेव बळवंतांचे वृद्ध वडील ती तार हातात असताच बाईंचा शोक पाहून त्यांचे सांत्वन करू लागले. पण त्यांचा आक्रोश अविरतपणे चालूच राहिला. रडून रडून त्या किती रडणार? त्यांच्या दुःखाचे अश्रूच शेवटी आटून गेले. त्या रडण्याच्या थांबल्या. शास्त्राप्रमाणे पिठाचे बाहुले चितेवर चढवून वासुदेव बळवंतांचा अंत्यविधी इतरांनी शिरढोणास केला. पुढे अबोल वृत्तीनेच बाई शिरढोण येथे वावरू लागल्या.

वासुदेव बळवंतांच्या मृत्यूपासून फडके कुटुंबावर वाताहत करणारा परिणाम झाला. त्यांचे बंधू कृष्णाजी बळवंत किंवा बाबा काही महिन्यांच्या तुरुंगवासानंतर सुटले. पांडुरंग बळवंत किंवा आबा वकिलीची परीक्षा उत्तीर्ण झाले. तरी त्यांना इंग्रज सरकारने वकिलीची सनद नाकारली. इंग्रज सरकार क्रांतिकारकांच्या कुटुंबि- यांचाही असाच वृत्तिच्छेद करीत असे पण आबा बडोदे संस्थानात गेले नि नवसारीस त्यांनी ती सनद मिळविली. पुढे वकिलीत त्यांनी खूप पैसा मिळविला. बाई पुढे निरंतर सासरीच राहिल्या. विवाहानंतर मथुताई सौ. सीताबाई कर्वे झाल्या. बाईं- च्या त्या सावत्र कन्या. तरी त्यांचे माहेरपण बाईंकडेच अगदी रीतीप्रमाणे होई. मथु- ताई १९३० मध्ये दिवंगत झाल्या. त्यांचे वंशज मुंबईला असतात. बाईंचे समवयस्क दीर गंगाधर बळवंत पुढे क्षयाने ऋणाईत झाले. तेव्हा बाईंनी त्यांची अविश्रांत शुश्रूषा केली. ते १८८९ मध्ये शेवटी दिवंगत झाले. बाईंची आई बरीच वर्षे विद्य- मान होती. त्यांचा भाऊ गणेश मुंबईत ठाकुरद्वाराच्या वाडीत राहात असे. त्याने जी. आय. पी. रेल्वेत नोकरी केली. पण १९०० मध्ये त्यांची आई मृत्यू पावली. त्यावर्षी ते स्वतः बडोदा पाहण्यास म्हणून गेले आणि वयाच्या ३२ व्या वर्षी पटकीने तडकाफडकी मृत्यू पावले. कृष्णाजी बळवंत आणि त्यांची पत्नी १९०२ मध्ये पाच दिवसाच्या अंतराने निधन पावली. त्यांची मुले लहान होती. त्यांचे संगोपन बाईं-

नीच अगदी सख्ख्या आईप्रमाणे केले. १५ ऑगस्ट १९०८ ला पांडुरंग बळवंत असेच एकाएकी मृत्यू पावले. त्याना कोणी मूठ मारली असा त्यामुळेच समज होता... हे धक्के खात बळवंतराव दादा वृद्धावस्थेत दिवस काढीत होते. पण ते वृद्धापकाळाने वयाच्या ८५ व्या वर्षी फेब्रुवारी १९०९ मध्ये मृत्यू पावले. मृत्यूच्या सत्रातील बाईंवरचा हा शेवटचा प्रहार होता.

हे आघात सोसूनही बाई कधीही कोणाला त्रासलेल्या दिसल्या नाहीत. त्यांची दिनचर्या नित्याप्रमाणे संयपणे चालू असे. गीतेत स्थितप्रज्ञाची जी लक्षणे सांगितलेली आहेत, ती त्यांच्या ठायी पूर्णपणे वसत होती. त्या भल्या पहाटेस उठत आणि प्रातर्विधी उरकून भूपाळीचे सूर आळवीत असताच चुलीत सरपण घालून ती पेटविण्याची इ. सकाळची कामे करीत. मग घरातील दिवसाच्या कामाचे त्यांचे चक्र सुरू होई. त्यांचे देवदेवतार्जन आणि गुरुमंत्राचा जप कधी चुकला नाही. तिन्ही वेळा देवांना निरांजन दाखविण्याचे कधी थांबले नाही. दुपारी झोप अशी त्या कधी घेत नसत. पुढे पुढे ईशप्रार्थनेतच त्या बराच वेळ घालवीत.

त्यांचे दोन पुतणे गो. कृ. किंवा बंडोपंत फडके वकील आणि डॉ. त्रि. कृ. किंवा बाबुराव फडके यांनी आपापल्या व्यवसायात पनवेलीस मोठा लौकिक आणि पैसा मिळविला. त्या वेळी त्या त्यांच्याजवळच पनवेलीस राहू लागल्या. त्या दोघांनी त्यांची आईप्रमाणे शेवटपर्यंत सेवा केली, त्यांच्या नातवंडांना बाईंची आठवण राहिली ती त्यांच्या या पुस्तकातील छायाचित्रातील स्वरूपातीलच होय. पतिनिधनानंतर बाईंनी हिंदुगतधवांच्या पद्धतीचा वेश धारण केला. बाईंची उंची साधारण होती. त्यांचे व्यक्तिमत्व भव्य होते. आणि काठी बळकट होती. त्यांची प्रकृती निकोप होती. रुग्णाईत अशा त्या कधीच पडल्या नाहीत. त्यांचा वर्ण निमगोरा होता. त्यांच्या भालप्रदेशावरील आठया चिंतेने वाढल्या आहेत असे वाटे. पण त्यांच्या मुद्रेवर त्रासिकपणाची छटा कधीच दिसत नसे. निश्चयी मनुष्यात दिसतो तसा त्यांचा जबडा रुंद, नासिका सरळ, आणि लांब होती. आणि डोळे प्रेमळपणाची साक्ष देणारे, अंतर्मुख दिसणारे, काहीसे लहान आणि दुःखाने भारावलेले दिसत. त्या हसू लागल्या म्हणजे त्यांच्या मुद्रेवर सुरकुत्या पडत. त्यांच्या वृद्धपणामुळे पाहुणाऱ्याचे मन वितळे ! पण त्यांच्या हास्याचे दुर्मिळ दृश्य त्याला दिसे ! कारण, बाई फारच थोड्या वेळा हसताना दिसत !

बाई लहान आवाज बोलत. त्यांच्याशी बोलताना महान आपत्ती सोसलेल्या स्थितप्रज्ञ व्यक्तीशी आपण बोलत आहोत असे लागलीच भासे. बाईंचा वडिलकीचा मान आणि त्यांची इच्छा कोणी धुडकावीत नसे. पण कोणी अशिष्टपणाने वागला आणि त्याना राग आला तरी त्यांना मोठमोठ्याने रागावताना कोणी पाहिले नाही. कारण त्यांचा रागही शांतपणाचा असे. राग आला की, त्या बोलत नाहीशा

होत. त्याचा परिणाम होई. त्यांच्या इच्छेविरुद्ध वागणारा माणूस ती गोष्ट सोडून देई. बाईंचा राग नातवंडांच्या लाघट बोलण्याने पुष्कळदा कमी होई. वरचा ओठ खालच्या ओठावर दाबून त्या हसू लागत आणि काळ्या ढगावर वीज चमकून जाताना पाहावी तसे त्यांची गंभीर मुद्रा पाहिलेल्या माणसाला ते हास्य पाहून वाटे.

आपण शिकलेल्या युद्धकलांची बाईंना उत्तर आयुष्यात काही वेळा आठवण येई, आणि प्रसंगी पट्ट्याचे दोन हात त्या करून पहात. १८९६–९७ मध्ये दसऱ्याच्या दिवशी आपटे गावी दसऱ्याचा मोठा समारंभ झाला. तेव्हा गावकऱ्यांनी 'बाईसाहेब' यांना फार आग्रह केल्यामुळे उत्सवात बाईंनी दांडपट्ट्याचे काही हात करून दाखविले. बाई त्यावेळी क्षीण झालेल्या होत्या. पण त्यांचा जोर वाखाणण्यासारखा होता.[६]

बाईंची व्रतवैकल्ये आणि देवदर्शने कधी चुकत नसत. त्या धार्मिक आणि जुन्या वळणाच्या असल्यातरी नव्याचा त्यांना पूर्ण तिटकारा नव्हता. त्या म्हणत : "मुलं तरी अगदी तुमच्या जुन्या चाकोरीत कशी रहातील ? त्यात काही अनीतिमान नसलं म्हणजे झालं." आणि त्या गोष्टी बोलण्यावर घालवीत. नाटक किंवा चित्रपट पहाण्याची बाईंना आवड नव्हती. मराठी रंगभूमीला बालगंधर्वांनी वैभवाच्या शिखरावर चढविले, तेव्हा गंधर्वाचे नाटक पहाण्याचा त्यांना, त्यांच्या पुतण्यानी आग्रह केल्यावरसुद्धा बाई नाटक पहाण्यास गेल्या नाहीत. बोलपट पहाण्यातून मात्र त्या सुटल्या नाहीत. पुतण्याच्या " बाई, हा बोलपट तू पाहिलाच पाहिजे. बाई, तू आलंच पाहिजे! " अशा आग्रहामुळे दोनचार पौराणिक आणि ऐतिहासिक चित्रपट त्यानी पाहिले. त्यात 'प्रभात'चा 'संत तुकाराम' हा बोलपट त्यांना मनापासून आवडला होता.

बाईंचा स्वभाव काटकसरी आणि मितव्ययी होता. त्या काशीयात्रेला निघाल्या, तेव्हा त्यांनी स्पष्टपणे काहीच मागितले नाही. त्यामुळे पुतण्यानी भरपूर वाटतील इतके पैसे त्यांच्या हातात ठेवले. पण त्यातील आवश्यक ते व्यय करून राहिलेले बाईंनी पुतण्याना परत दिले. त्यांनी आश्चर्याने विचारले : " हे काय बाई ? " तेव्हा बाई म्हणाल्या : "अरे, उगाचच काय खर्चून टाकायचे सगळे पैसे ? हवे तेवढे घेतले ! बाकीचे परत आणले. दे ठेऊन. लागले तर तुमच्याजवळून घ्यायचेच आहेत पुढे मला ते ! " याच वेळी काशीला वासुदेव बळवंतांच्या पार्थिव देहाचा अंत्यसंस्कार झाला नव्हता म्हणून शास्त्राप्रमाणे नारायण नागवळी विधी त्यांच्या पुतण्यांनी केला.

मुलाच्या बंडखोरपणाचे बाईंना कौतुक वाटे. तालीम करणे, खेळ खेळणे, पोहणे इ. मध्ये कोणी विक्रम केला की, कामात असल्या तरी मध्येच थबकून त्या

६ प्रबोधनकार ठाकरे यांचा लेख; 'ज्ञानप्रकाश,' दि. ७ जून १९३९

सांगणाऱ्याचे बोलणे ऐकत. नातवंडांना त्या नेहमी म्हणत : " दररोज नमस्कार घालावे, शरीर कमवावे, खेळ खेळावे ! " त्यांचे पाठांतर दांडगे असल्यामुळे मुलांना त्या नवी नवी स्तोत्रे शिकवीत. दिवेलागणी झाली की मुले ओढीत त्यांना बाजूच्या खिडकीपाशी नेत आणि म्हणत : " बाई, सांग आम्हाला शुभं करोति ! " अशा वेळी मुलांच्या कोंडावळयात स्तोत्रे सांगताना बसलेल्या बाई अधिष्ठात्री देवतेप्रमाणे सर्वांना भासत.

वासुदेव बळवंतांविषयी अलीकडे त्या बोलक्या झाल्या होत्या. त्या वेळी त्यांच्या तोंडून मिळालेल्या माहितीची त्यांच्या नातलगांनी टाचणे केली. पनवेलीस कोणी प्रसिद्ध व्यक्ती आली की, वासुदेव बळवंतांचे कुटुंब तेथे आहे असे कळताच ती व्यक्ती बाईंच्या दर्शनास येई. अशा वेळी फडके वकिलांनी आत जाऊन बाईला म्हणावे : " बाई, हे आले आहेत तुला भेटायला बरं का ! " पण बाई म्हणत : " अरे, मला बिचारीला काय पहायचं आहे आता? ज्यांना पहायचं ते निघून गेले! " पण त्यांना बाहेर येण्यावाचून गत्यंतर नसे. त्यांचे दर्शन होताच आलेली व्यक्ती धन्य होई. स्वातंत्र्यवीर सावरकर प्रथम पनवेलीस गेले, तेव्हा बाईंच्या दर्शनासाठी गेले. वासुदेव बळवंतांविषयीच्या आदराने बाईंपुढे नारळ ठेऊन त्यांना नमस्कार करीत ते म्हणाले : " आपले पती महाराष्ट्राच्या स्वातंत्र्यलालसेचं स्फूर्तिस्थान! ते गेले तरी त्याच ध्येय आपण लवकरच साध्य करूच करू ! " कोणत्या प्राणांतिक दिव्यातून जिवंत राहून सावरकर आपल्या राजकीय मूळ पुरुषाला श्रद्धांजली वाहत होते असे वाटून विधिघटनेचे सभोवतालच्या लोकांना कौतुक वाटले.

आपल्या मागे बाई महिनाभरही जगणार नाहीत असे वासुदेव बळवंतांनी लिहिले आहे. मग प्रदीर्घ वैधव्य त्यांनी कसे पत्करले, हे एक कोडे होते. बाईंनीच शेवटी त्यावर प्रकाश टाकला. कोणाच्या तरी मृत्यूचे वर्तमान ऐकून एकदा त्या म्हणाल्या : " ज्याचं भरलं तेच मरायचं! इतर कोणी प्रयत्न केला तरी त्याला ते साधायचं नाही. " आपल्या बोलण्याचा अर्थ त्यांनीच पुढे सुनांना सांगितला. वासुदेव बळवंतांच्या मृत्यूनंतर लागलीच वैतागाने एकदा आणि पुढे थोड्या दिवसांनी दुसऱ्यादा अफू खाऊन जीव देण्याचा त्यांनी प्रयत्न केला होता; पण तो फसला, असे त्या म्हणाल्या.[७] पतीसवे सती जाणाऱ्या स्त्रीपेक्षा बाईंचे हे धैर्य आणि ही निष्ठा निराळी नव्हती.

वासुदेव बळवंतांची माहिती महाराष्ट्रात बऱ्याच प्रमाणावर झाल्यावर वृत्तपत्रांतून त्यांचे वृत्तांत येऊ लागले. तशा एका वृत्तपत्राचा अंक बाईंना दाखवून त्यांचा नातू त्यांना एकदा म्हणाला : " बाई, हे बघ यात काय आलं आहे! " तेव्हा बाई

७ बाई फडके यांच्या स्नुषा उमाबाई फडके यांनी सांगितलेल्या त्यांच्या आठवणी.

म्हणाल्या : " जग तरी पाहा कसं आहे! जिवंतपणी त्यांना अमिष्ट म्हणे! ' नि आता मात्र त्यांना डोक्यावर घेऊन नाचतं आहे! " बाईंचे उद्गार खरे होते. जगाच्या पुढे असणाऱ्या क्रांतिकारकांविषयी नेहमी असेच होते.

सत्तावनच्या वर्षाच्या खडतर वैधव्यानंतर १९४० मध्ये बाई स्वत. शेवटी फार दुखणाईत झाल्या. त्या दुखण्यातून त्या पुन्हा उठल्या नाहीत. दुसऱ्याला आपल्यामुळे त्रास होऊ नये म्हणून त्या दुखण्यातही निरुपाय होईपर्यंत सर्व विधी अंथरूण सोडून जाऊनच त्या करीत. पुढे त्यांच्या सुनांनी त्यांची जिवापाड शुश्रूषा केली. त्या दुखण्यात एखाद्या ज्योतिषाने सांगावे तसे, " आता मला हे होईल, आता मला ते होईल, " असे आठवड्याचे आठवड्याला बाई बिनचूक सांगत नि त्या प्रमाणे घडून येई. त्यांचे दुखणे वाढले. त्यांची लांबलांबची मंडळी तातडीने येऊन त्यांना भेटून गेली. बाई आता अंथरुणावरून उठण्यासही असमर्थ झाल्या. मे पासून ऑगस्टपर्यंत मृत्यूच्या दिशेने त्यांचे जीवन चालू होते. आपल्या इच्छेप्रमाणे त्यांनी धर्मदान करून घेतले आणि आप्त मंडळीस, कोणास चांदीचे भांडे, कोणास कापडचोपड अशा भेटी आठवण म्हणून दिल्या. सप्टेंबरच्या पहिल्या आठवड्यात त्यांची शुद्ध जाऊ लागली. त्यांचा अंतिम क्षण जवळ आल्याचे सर्वजण समजून चुकले. त्या आठवड्याच्या शेवटी बाई म्हणाल्या : " आता माझे चारच दिवस उरले. आता मी जाणार ! "

सरतेशेवटी ११ सप्टेंबर १९४० चा दुर्दैवी दिवस उजाडला. फडक्यांच्या घरांतील नित्य व्यवहार स्थगित झाले. आतल्या दालनात बाईंचा क्षीण देह मृत्युशय्येवर पहुडला होता. त्यांच्या मृत्युशय्येवर त्यांचे पन्नाशी गाठलेले 'लहानगे' पुतणे, सुना, नातवडे आणि इतर आप्त गोळा झालेले होते. सारा जन्म दु खात काढलेल्या त्या सतीचे शेवटचे क्षण पाहणे साऱ्यांना असह्य झाले होते ! दुपार कशीबशी टळली. सायंकाळच्या वेळी बाईंना गंगा पाजण्यात आली. बाईंच्या मुद्रेवर समाधान दिसले! पण ते नुसते समाधान होते, टवटवी नव्हती ! जवळच्या समयांतील वाती मिणमिणत्या झाल्या होत्या आणि त्यांच्या हालत्या ज्योतीमुळे घरातील अंधःकार घरात आपल्या दाट छायांनी पुढे मागे धावत होता. काळाचे पायही त्या घरात पुढे मागे धावत होते !

कसेबसे जेवण उरकून रात्री ही सर्व मंडळी बाईंच्या शय्येभोवती घुटमळत राहिली. रात्री एक वाजता बाईंना घरघर लागली. ती वाढली आणि थोड्याच वेळात सर्व प्रयत्न पराभूत करीत मध्यरात्री १.२० वाजता त्यांचे प्राण त्यांच्या भरजर कुडीतून निघून गेले ! डबडबत्या नेत्रांनी एक थोर ऐतिहासिक व्यक्ती या जगातून

८ *From the diary found in his (Wasudeo Balwant's) possession doubts have been raised as to his sanity.*
(" वासुदेव बळवंतांजवळ सापडलेल्या दैनंदिनीवरून त्यांचे डोके ठिकाणावर नव्हते असा शंका व्यक्त करण्यात आली आहे. ") " गॅझेटिअर ऑफ दि बॉम्बे प्रेसिडेन्सी, " खंड १८, भाग ३, पृ. ३८

नाहीशी झालेली बाईंच्या आप्तांनी पाहिली ! हिंदुस्थानाच्या आद्य क्रांतिकारकाची सहचरी त्यांच्या हुंदक्यांच्या आणि शोकाच्या आर्त स्वरात हें जग सोडून गेली.

बाईंच्या मृत्यूची वार्ता पसरल्यावर गावातील शेकडो देशभक्त लोक त्यांच्या अंत्ययात्रेस जमले. वाटभर बाईंच्या मृत देहावर पुष्पहारांचा आणि पैशांचा वर्षाव होत होता. स्मशानभूमीवर बाईंच्या थोरपणाचे वर्णन करणारी भाषणे तेथे झाली नि थोड्याच वेळात त्यांचा पार्थिव देह चितेच्या धडधडत्या ज्वाळांमध्ये गुरफटला गेला.

मृत्यू किती विचित्र आहे पाहा ! सत्तावन वर्षांपूर्वी एक पुरुष एडन येथे त्याच्या पाशात पहुडला होता. त्याच्या राष्ट्राला त्याचा उपयोग होणारा होता ! पण तरी त्याला नेण्याचे त्याने सोडले नाही. एक क्षणही पुढे जगावयाचे नाही, असे दुसरा एक जीव शिरढोण येथे प्रत्यही म्हणत होता, पण सत्तावन वर्षे त्याने त्याच्याकडे लक्षही दिले नाही. सत्तावन वर्षांनंतरच पनवेलच्या एका वाड्यातून त्याने बाईंना उचलले ! प्रदीर्घ अवधीचे दुःख सहन करणे त्यांना त्याने भाग पाडले! मृत्यू ! किती निर्घृण मृत्यू !

* * *

# प्रकरण २२ वे

## वासुदेव बळवंत फडके (व्यक्ति आणि जीवितकार्य)

> यज्ञी ज्यांनी देऊन निजशिर, घडिले मानवतेचे मंदिर,
> परी जयांच्या दहनभूमीवर, नाही चिरा, नाही पणती,
> तेथे कर माझे जुळती —बा. भ. बोरकर

पारतंत्र्याच्या जाचाला कंटाळून आपले हिमालयासारखे स्वर्गतुल्य निवासस्थान भारतमातेने सोडले आणि प्रांतामागून प्रांत टाकीत कळवळत्या अंत:करणाने ती आपल्या सुपुत्रांना विचारू लागली : " मला या जाचातून कोणी सोडवील का रे ?" महाराष्ट्राच्या सीमेवर येताच तिला उत्तर ऐकू आले : " होय ! आई ! मी– मी तुला बंधमुक्त करीन. माझा तसा निश्चय झालेला आहे !" त्याचा आनंद वाटून ती म्हणाली : " काय, तुझं नाव काय ? " आणि तिला प्रतिसाद मिळाला : "माझं नाव वासुदेव बळवंत फडके! " १८७९ मध्ये तसे उत्तर देणारा हिंदुस्थानात /हा एकच बेडर पुरुष पुढे आला. आपल्या भरारीमुळे आणि पराक्रमी उत्थानामुळे आपल्या नावात त्याने एका प्रकारची जादू उत्पन्न केली. त्यांचे नाव उच्चारताच येथील देशभक्तांची अंतःकरणे देशप्रेमाने उचंबळू लागत. वासुदेव बळवंत हे नाव इंग्रजाविरुद्ध होणाऱ्या बंडाचे प्रतीक होऊन बसले. त्याविषयी साहित्यसम्राट तात्या साहेब केळकर म्हणतात : " टिळकांपूर्वीच्या काळात वासुदेव बळवंत फडके यांना एक विशिष्ट स्थान मिळते... फडके यांनी नोकरीत असताच बंडाची चळवळ केली .. फडके यांच्या मनाने असे घेतले होते की राजकीय चळवळीला राजमार्गाने न मिळणारे द्रव्य आडमार्गाने पुष्कळ मिळवावे व त्याच्या जोरावर सरकार हालवून सोडावे. शिकारी व लष्करी पेशाचे सर्व खेळ फडके हे खासगी रीतीने शिकलेले असून १८७६–७७ च्या दुष्काळातच रामोशी वगैरे लोकांनी घातलेल्या दरोड्याचा मुहूर्त समजून फडके यांनीही आपल्या उद्योगास प्रारंभ केला. नानासाहेब पेशव्यानंतर ज्यांचे नाव घेताच इंग्रज कावरेबावरे होत, असा फडके हाच प्रथम झाला." [१]

---

१ न. चिं. केळकर : " लो. टिळकांचे चरित्र, " खंड १ ला, पूर्वार्ध, पृ. ८१

क्रांतिकारकाला आणि बंडखोराला साजेसेच वासुदेव बळवंतांचे व्यक्तिमत्व होते. इंग्रजी, मराठी, संस्कृत, मुसलमानी (उर्दू), कानडी आणि तेलगू या भाषा त्यांना अवगत होत्या. त्यामुळे आपल्या सान्निध्यात येणाऱ्या कोणावरही ते मोहिनी टाकीत. खेडेगावचे शेतकरी नि जमाती त्यांचे स्वैर आनंदाने स्वागत करीत. एखादा लुटीचा कट यशस्वी करण्यासाठी केवढे कर्तृत्व लागते. मग ज्या कामात अपयश आले तर फाशीची शिक्षाच अटळ असे, अशा ब्रिटिश राज्य उलथून पाडण्याचा कट करण्याच्या प्रयत्नास केवढे असामान्य कर्तृत्व लागत असले पाहिजे ? आणि तसे असामान्य कर्तृत्व त्यांच्या अंगी होते. नोकरीत झालेल्या अन्यायाचा त्याचप्रमाणे दख्खनमधील दुष्काळाचा, त्यातील जनतेच्या उपासमारीचा आणि सरतेशेवटी पुण्याच्या देशहितेच्छू आणि स्वातंत्र्याकांक्षी वातावरणाचा संघर्ष ज्या व्यक्तिमत्वावर घडून आला, ते वासुदेव बळवंतांचे व्यक्तिमत्व भावनाप्रधान आणि ध्येयवादी होते. त्यामुळे, त्या संघर्षाची ठिणगी पडताच विपरीत परिस्थितीला ठोकरून त्यांनी स्वातंत्र्यासाठी बंड उभारले.

त्यांच्या लोकांजवळ बहुधा तोडयाच्या बंदुका, लोखंडी आकडया, काठया आणि भाले अशीच शस्त्रे होती. पण त्यांच्यामागची स्वातंत्र्यनिष्ठा सुभाषचंद्रांच्या शेवटच्या विजिगीषू सेनेच्या स्वयंचलित बंदुकांच्या आणि अत्याधुनिक तोफांच्या मागे असलेल्या स्वातंत्र्यनिष्ठेपेक्षा कमी ज्वलंत नव्हती. वासुदेव बळवंतावर या लोकांची अशी आत्यंतिक निष्ठा होती की, त्यांच्यापैकी बऱ्याच जणांनी नंतरच्या चौकशीत आणि न्यायालयात वासुदेव बळवंतांनी आपणास बंड करण्यासाठी चेतविले असे सांगण्याचे नाकारले.

"भारताला राष्ट्रधर्माची दीक्षा देणाऱ्या प्रेषितांमध्ये वासुदेव बळवंतांचे स्थान हे जॉन दि बॅप्टिस्ट यांचेच असून काही काळ त्यांचे शिष्यत्व पत्करणाऱ्या बाळ गंगाधरांनीच पुढे भारताला राष्ट्रधर्माची दीक्षा दिली."[२] समाजातील सर्वात खालच्या स्तरांतील लोकांच्या खांद्याला खांदा लावून, मिसळून आणि त्यांच्यासमवेत खाणेपिणेही करून त्यांनी तथाकथित उच्च वर्णियांच्या स्वत:विषयीच्या उच्चतेच्या भावनांवर क्रांतिकारी घाव घातला. आणि जातिभेद आणि अस्पृश्यतेला कित्येक वर्षांपूर्वी तिलांजली दिली.

इंग्रज राज्यकर्त्यांनीही वासुदेव बळवंतांना हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यासाठी बंड करणारे पहिले क्रांतिकारक म्हणूनच शेवटपर्यंत मानले. हिंदुस्थानचे शेवटचे राजप्रतिनिधी लॉर्ड लुई, माऊंटबॅटन लंडनमध्ये 'टिळक हाऊस' च्या नामकरण समारंभात मुख्य पाहुणे म्हणून भाषण करताना २४ जानेवारी १९६२ ला म्हणाले : "हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याची चळवळ टिळकांनी सुरू केली असे म्हटले जाते. पण इतिहास पाहता ही समजूत तितकीशी बरोबर नाही पुण्याला असलेल्या एका वेगळ्या प्रवृत्तीच्या सरकारी नोकराने—वासुदेव बळवंत फडके यांनीच स्वातंत्र्य लढ्याचा मार्ग पहिल्यांदा अवलंबिला .. हिंदुस्थानच्या (स्वातंत्र्याच्या) चळवळीचा उगम कोठे झाला (त्याची) सर्वांना माहिती असणे अत्यावश्यक आहे "[३]

असा अभिप्राय दिलेला आहे. तरी पण आपल्या विशुद्ध देशभक्तीमुळे वासुदेव बळवंत नंतरच्या कित्येक क्रांतिकारकांना आणि देशभक्तांना स्फूर्ती देणारे राष्ट्रपुरुष होऊन बसले. चापेकरांपासून टिळक-सावरकरांपर्यंत देशभक्तांनी त्यांच्या सैन्यशिक्षणाच्या कटाक्षाना पुढे पुरस्कार केला. नाशिक कटापासून तो बेचाळीसच्या आंदोलनापर्यंत कित्येक क्रांतिकारकांनी राजकीय दरोड्याचा अवलंब केला.

१८९७ मधील रँड वधासाठी फाशी गेलेले दामोदरपंत चापेकर त्यांना बालपणापासूनच आपले स्फूर्तिदाते मानीत. १८८४ च्या सुमारास वडिलांसमवेत आगगाडीने रायपूरला जाताना घडलेली घटना सांगताना ते म्हणतात : "तो डोंगराळ प्रदेश आमच्या नजरेस येताच वासुदेव बळवंत फडके यांच्या बंडाची आठवण होऊन आम्ही उभयता बंधू त्या वेळेपासून या भयंकर कृत्याचा विचार करू लागलो."[४] दुसऱ्या ठिकाणी ते म्हणतात : "जे इंग्रजांशी सामना देऊन धारातीर्थी पतन पावले, असे पुण्यवान पुरुष पाहू गेले तर ५७ साली नानासाहेब, त्यानंतर वासुदेव बळवंत आणि त्यानंतर आम्ही दोघे भाऊ दामोदर आणि बाळकृष्ण हरि

२ अ. ज. करंदीकर : "क्रांतिकारक टिळक व त्यांचा काळ," पृ. १०१

३ 'लोकमित्र,' मुंबई, दि. १३ मार्च १९६२

४ चापेकरांचे अप्रकाशित आत्मचरित्र (मराठी) पृ १, १४ अ

चापेकरांवाचून कोणी स्वधर्म आणि स्वदेश यासाठी जिवावर उदार झाला आहे काय ?"[५]

स्वातंत्र्यवीर सावरकर यांना तर वासुदेव बळवंतांचे जीवन हा स्फूर्तीचा झराच वाटला. त्यांच्या चरित्राची मॅझिनी, गॅरिबॉल्डी, शिवाजीच्याच जोडीने त्यांच्या मंडळीत पारायणे होत.

ते म्हणतात: "क्रांतिवीर फडक्यांच्या सशस्त्र उठावणीविषयी अनेक दंतकथा आम्ही तरुण मंडळी त्यावेळच्या प्रौढांकडून मोठ्या उत्सुकतेने ऐकत असू. आमची क्रांतिप्रविण हृदये त्या वीरकथा ऐकताना स्फुरण पावत. नाशिकला मित्रमेळ्याच्या बैठकीत आमच्या राज्यक्रांतिकारक गुरुपरंपरेची जी चित्रे लावलेली असत, त्यात एका शिंप्याच्या दुकानात त्याने मोठ्या भक्तीने पण आडपड्याने ठेवलेले फडक्यांचे एक भव्य चित्र आणून तेही आम्ही लावलेले होते."[६]

वैध आंदोलनाचा मार्ग चोखाळणारे बॅ. मुकुंदराव जयकरही त्या मोहिनीतून लहानपणी सुटले नाहीत. ते म्हणतात : "मुंबईजवळ काही मैलांवरच्याच खेड्याचे रहिवासी असणारे वासुदेव बळवंत फडके यांच्या प्रयत्नाविषयी आम्हाला विशेष वाहवा वाटली.... आम्ही बरेच विचलित चित्त झालो."[७]

वासुदेव बळवंतांच्या उज्ज्वल देशभक्तीमुळे महाराष्ट्रात त्यांच्या नातलगांविषयीही नितांत प्रेम उत्पन्न होई. 'ज्ञानकोश'कार डॉक्टर केतकर वयाच्या ५ व्या वर्षी १८९४ च्या संग्रीस अमरावतीला इंग्रजी दुसऱ्या इयत्तेत असताना, "वासुदेव बळवंतांचा एक पुतण्या इंग्रजी दुसरीत त्यांच्याबरोबर होता. तो अत्यंत गरीब आणि दैन्यात दिवस कंठी. पण एका थोर देशभक्ताशी त्याचे जे नाते होते, त्यामुळे केतकर त्याला भाग्यवान समजत."[८]

क्रांतिकारकांचे आणि स्वातंत्र्याच्या उपासकांचे वासुदेव बळवंत आद्य पुरुष होते. स्वातंत्र्य हा शब्द उच्चारण्याची कोणाची प्राज्ञा नसताना ते ध्येय त्यांनी उघड उघड घोषित केले. द्रष्ट्याप्रमाणे 'हिंदी प्रजासत्ताक' राज्याचे ध्येय त्यांनीच प्रथम पाहिले आणि पुढे ६८ वर्षांनी तेच ध्येय स्वातंत्र्यवाद्यांनी साध्य करून घेतले. बेचाळीसच्या आंदोलनाची रूपरेषा ६३ वर्षे आधी त्यांनी पाहिली होती. या आणि मागे सांगितलेल्या गोष्टीत अनेक दृष्टींनी ते हिंदुस्थानच्या इतिहासात पुरस्सर (पायोनिअर) होते. त्यांच्याविषयी त्यांच्या देशबांधवांना अलोट प्रेम होते. स्वातंत्र्यलढ्यातील महापुरुषाच्या नावापुढे 'की जय' हे शब्द जोडून जयजयकार असा

५ चापेकरांचे अप्रकाशित आत्मचरित्र (मराठी) पृ ५४
६ स्वा. सावरकर : "पूर्वपीठिका," आत्मचरित्र, नाशिक- पृ.४५
७ एम्. आर. जयकर : "दि स्टोरी ऑफ माय लाईफ," खंड १ला पृ. १०
८ डॉ. द. न. गोखले : "डॉ केतकर," पृ. ८

'त्यांच्याच अभियोगाच्या वेळी प्रथम झाला. आणि ठाण्यास जाताना वाटभर लोकांनी तो केला. त्यांना मुलगा नव्हता. तेव्हा त्यांना श्राद्धपिंड कोण देणार? या विचाराने राष्ट्रीय कीर्तनकार डॉ. पटवर्धनांसारखे लोक गणपतराव घोटवडेकरांसारख्या त्यांच्या सहकाऱ्याप्रमाणे वडिलांच्या श्राद्धाच्या प्रसंगी त्यांनाही पिंड देत. महर्षी पटवर्धनांसारखे लोक संध्येच्या बारा नावांनंतर त्यांचे तेरावे नाव घेत. त्यांचे छायाचित्र जवळ सापडणे पोलिसांच्या छळाला आमंत्रण असे. तरीही लोक ती गुप्तपणे स्वतःजवळ ठेवीत. लो. टिळकांच्या संग्रहातही त्यांचे एक छायाचित्र होते. जुलै १८७९ मध्ये डेक्कन कॉलेजात असतानाच मिनाएफनी वर्णन केलेल्या तेथील विद्यार्थ्यांजवळच्या छायाचित्रांप्रमाणेच त्यांनी हे मिळविले असेल. त्याच्या पाठीवर टिळकांनी लिहिले होते 'काशीकरबाबा!' ते छायाचित्र टिळकांनी ठेवले होते बंडवाले नानासाहेब आणि रासबिहारी बोस यांच्या छायाचित्रांच्यामध्ये!

वासुदेव बळवंतांची काही विकृत छायाचित्रे पुढे प्रसृत झाली. पण त्यांचे खरे छायाचित्र या ग्रंथात छापले आहे, तेच होय पनवेलचे कुबेर विठाप्पा संढाण्या गुळवे यांनी त्यांचे एक छायाचित्र काढविले होते त्या छायाचित्रामागे अस्पष्ट अक्षरात लिहिले होते : 'वासुदेव बळवत बडवाले'. विठाप्पाचे नातू आत्मारामपंत आठवणे यांनी प्रबोधनकार ठाकरे यांच्या सूचनेवरून ते बृहत्तर करून आपल्या ओटीवर लावले. प्रबोधनकार हरहुन्नरी. वासुदेव बळवंतांविषयी त्यांना खराखुरा आदर. स्वतः उत्तम चित्रकार असल्यामुळे प्रबोधनकारांनी स्वतःच त्यांच्या दोन प्रतिमा केल्या. त्यावरूनही वासुदेव बळवंतांची लहान अस्सल छायाचित्रं महाराष्ट्रात प्रसृत झाली.[९]

वासुदेव बळवंतांच्या घरी मात्र त्यांनी काढून घेतलेल्या एकमुखी दत्ताच्या चित्राची चौकट, दत्ताच्या चांदीच्या पादुका आणि सपुष्टे आणि 'दत्तमहात्म्य' ग्रंथाच्या हस्तलिखिताची पोथी, या वस्तू सोडल्या तर दुसरे काही आढळले नाही. नाही म्हणावयाला त्यांच्या अभियोगाचे वृत्त असलेला 'ज्ञानप्रकाश'चा एक दुर्मिळ अंक फाटक्या तुटक्या अवस्थेत मला तेथे १९४५ मध्ये मिळाला.

त्यांच्या घरातील माणसे बाईंना वाईट वाटेल म्हणून त्यांच्याविषयी काही बोलत नसत. त्यांच्या वडिलांनाही त्यांची गोष्ट निघाली की वाईट वाटे. मुंबईच्या 'विहारी' या राष्ट्रीय वृत्तीच्या पत्राचे संपादक विष्णू भास्कर फडके आणि त्यांचे स्नेही सदाशिव विनायक बर्वे हे जहालपणाच्या बेहोषीत त्यांना १९०६ मध्ये भेटायला गेले. परंतु त्यांनी तो विषय काढताच 'वासुदेवा' विषयी दादा काही बोलू शकले नाहीत. ते फक्त ढसाढसा रडू लागले.[१०]

१८५७ च्या स्वातंत्र्य युद्धानंतर आणि स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या विद्यार्थी

९ प्रबोधनकार ठाकरे यांचा लेख, 'ज्ञानप्रकाश,' दि. ७ जून १९३१

१० गो कृ. फडके यांची आठवण.

संघटनेच्या आंदोलनाच्या आधी स्वातंत्र्याच्या ज्या पहिल्या दोन सशस्त्र उठावांचा उल्लेख इतिहासकाराना करावा लागतो, त्यात या बंडाचा समावेश होतो. सर व्हॅलेंटाइन चिरोल यांनी तो उल्लेख पुढीलप्रमाणे केला आहे : "१८५७ च्या सैनिकी उत्थानामधील नानासाहेबांच्या आणि त्यांच्या अनुयायांच्या उलाढालीपर्यंत किंवा १८७९ मध्ये पुण्याभोवतालच्या टापूत झालेल्या रामोश्यांच्या बंडापर्यंत मागे गेले नाही, तरी एतद्देशीय वृत्तपत्रांनी ब्रिटिश राजसत्ता आणि ब्रिटिश राज्यकर्ते यांच्यासंबंधी, जिच्यामुळे १८७९ चा मुद्रण निर्बंध करावा लागला अशा अत्यंत कडक शत्रुत्वाच्या भाषेचा पहिल्यांदा अवलंब केला, तो पुण्यातच होय !" [११]

या बंडाचे महत्त्व वर्णन करताना मुंबईचे राज्यपाल सर रिचर्ड टेंपल म्हणतात.

"The Brahmin leader and his immediate adherents were avowedly forming a conspiracy against the Government.........Some of his colleagues in mischief probably entertained political views of some sort.........A nucleus was formed by them around which badly-disposed persons might gather largely Their proceedings were watched by a strange interest by some sections of the native community.........and though any exaggeration of the importance of such silly and clumsy designs ought to be avoided still these occurrences demand the thoughtful attention of politicians." [१२]

("हा ब्राह्मण नेता आणि त्याचे अगदी निकटचे सहकारी ब्रिटिश सरकारविरुद्ध उघडउघडपणे कट रचीत होते. त्यांच्या काही सहकाऱ्यांच्या मनात काही एका प्रकारची राजकीय उद्दिष्टेही होती. त्यांनी असे एक केंद्र निर्माण केले होते की, ज्याच्याभोवती वाईट प्रवृत्तीच्या लोकांनी मोठ्या संख्येने गोळा व्हावे. हिंदी लोकांपैकी काही गटांचे त्यांच्या खटपटींकडे जरा वेगळ्याच तऱ्हेच्या उत्कंठेने लक्ष लागले होते ... ... आणि जरी असल्या मूर्ख नि भाडमुठ्या उद्दिष्टांच्या महत्त्वासंबंधी अतिशयोक्ती टाळली पाहिजे तरी या घटनांकडे राजकारणी लोकांचे विचारपूर्ण लक्ष असणे आवश्यक आहे.")

वासुदेव बळवंताचे बंड ऐन भरात असताना राजप्रतिनिधी लॉर्ड लिटन यांना त्याचे महत्त्व काय होते, त्या संबंधीचे आपले विचार कळविताना सर रिचर्ड टेंपल म्हणाले होते :

"महाशय आपण पाहिलेच आहे त्या प्रमाणे ही वावटळ येवढी फार सौम्यच निघाली. तरीही ही गोष्ट बाकी राहतेच की, एक ब्राह्मण लेखनिक दुसऱ्या

११ सर व्हॅलेंटाइन चिरोल : "दि इंडियन अनरेस्ट " पृ ३९-४०
१२ सर रिचर्ड टेंपल : " इंडिया इन 1880, " पृ- ११८-११९

शिवाजीच्या नावाने मराठयांच्या पुराण्या परंपरेप्रमाणे त्याच प्राचीन डोंगराळ प्रदेशात लुटालुटीचा प्रारंभ करतो आणि प्रदीर्घ काळ चालू राहिलेल्या दुष्काळामुळे अधिकच प्रबळ झालेल्या काही जमातींच्या लुटारुप्रवृत्तीमुळे त्याला तात्पुरते का होईना यश मिळतें. या साहसाविषयी बऱ्याच जणांना सहानुभूती वाटते; इतर बऱ्याच जणाना अफवा पसरल्याप्रमाणे आपल्या सैनिक सामर्थ्यावर त्याच्यामुळे ताण पडला आहे किंवा कसे ते पाहण्याची आणि सरकार त्याला कसे तोंड देते तें पाहण्याचीही उत्सुकता आहे."

एका मनुष्याने उभारलेल्या क्रांतिसंघटनेचा वासुदेव बळवंतांचे उत्थान हा सर्वात मोठा प्रस्फोट होता. त्यात काळया पाण्यावर गेलेल्या लोकांची संख्याच साठावर होती. तीनचार जणाना फासावरही चढविण्यात आले. नंतरच्या दुसऱ्या कोणत्याही क्रांतिकटात इतके बंदी काळया पाण्यावर गेले नाहीत. या वाचून जे दुसरे बरेच कटवाले दबून राहिले त्यांची संख्याही शेकडोनी असेल.

वासुदेव बळवंतांच्या बंडाचा इंग्रज राज्यकर्त्यांवर झालेला परिणाम म्हणजे त्यांच्यापैकी एकाने केलेली कॉंग्रेसची स्थापना होय. कॉंग्रेसच्या स्थापनेस त्यांचे बंड हे निकटचे प्रमुख कारण होते. ॲलन ऑक्टोव्हियन ह्यूम हे त्यावेळी नगर येथे जिल्हाधिकारी होते. आणि त्यांनी बंडाचा हादरा अनुभविला होता. आणि सरकार विरोधी असंतोषाला वाव देणारे वायुद्वार (सेफ्टीव्हाल्व) हिंदुस्थानात असणे आवश्यक आहे, असे त्यांना वाटू लागले. १८८२ मध्ये सरकारी नोकरीतून बाहेर पडताच ह्यूम यांनी कॉंग्रेसच्या स्थापनेची खटपट सुरू करून १८८५ मध्ये ती स्थापन केली. यासंबंधी त्याचे चरित्र लेखक वेडरबर्न म्हणतात:

"The forecast of the trouble was in exact accordance with what actually occurred in Bombay Presidency in connection with the agrarian rising ..... .It began with operadic gang robberies and attacks on money-lenders until the bands became too strong for the police; and the whole military force at Poona — horse, foot, and artillery — had to take the field against them. Roaming through the jungle tracts of the Western Ghauts, these bands dispersed in the presence of military force, only to reunite immediately at some convenient point.........A leader from the move instructed class was found, calling himself Sivaji the Second, who addressed challenges to the Government, offered a reward.........for the head of the H.E. Sir Richard Temple (the Governor of Bombay) and claimed to lead a national revolt upon the lines on which the

१३ सर रिचर्ड टेंपल यांचे राजप्रतिनिधी लॉर्ड लिटन यांना पत्र; (गोपनीय); ९ जुलै १८७९.

Mahratta power had originally been founded." [१४]

("घडून येणाऱ्या या आंदोलनाचा अंदाज अगदी थेट मुंबई इलाख्यात शेतकऱ्यांच्या दंग्याच्या संबंधात जे घडले त्याच्याप्रमाणेच होता. त्याची सुरवात अकस्मात टोळ्या-टोळ्यांनी घातलेल्या दरोड्यांनी आणि सावकारावरील हल्ल्यांनी झाली. पुढे पोलिसानाही त्या टोळ्या न आवरता येण्यापर्यंत त्या गोष्टी चालूच राहिल्या. आणि पुण्याला असलेल्या सर्व सैनिकबळाला, घोडदळाला, पायदळाला आणि तोफदळाला त्याच्याविरुद्ध रणक्षेत्रात उतरावे लागले! पश्चिम घाटातील अरण्याच्या प्रदेशात हिंडत असता, सैन्याशी गाठ पडताच त्या टोळ्या एखाद्या सोयीस्कर ठिकाणी पुन्हा लागलीच एकत्र होण्यासाठी नाहीशा होत. अधिक सुशिक्षित वर्गापैकी एक नेता त्यांना लाभला. तो आपणास 'दुसरा शिवाजी' म्हणवत असे. त्याने सरकारला आव्हान देणाऱ्या घोषणा घाडल्या, (मुंबईचे राज्यपाल) सर रिचर्ड टेंपल यांच्या मस्तकासाठी पारितोषिक घोषित केले. आणि अगदी प्रथम मराठ्यांचे राज्य ज्या पद्धतीने स्थापन करण्यात आले होते, त्याच पद्धतीने घडून येणाऱ्या एका राष्ट्रीय बंडाचे नेतृत्व आपण घेतलेले आहे असे घोषित केले.")

अयशस्वी झाले तरीही वासुदेव बळवंतांच्या बंडाचे महत्त्व होतेच. अशा बंडामुळे परतंत्र राष्ट्राच्या लोकात असा आत्मविश्वास उत्पन्न होतो की, आपण या नेत्याविरुद्ध लढू शकतो येथे आपणास असे आव्हान देणारा पक्ष आहे, या जाणिवेने परकीय सरकारलाही एक प्रकारचा वचक बसतो. या अग्निदिव्यात बंडखोर देशभक्त मृत्यू पावले, तरी त्यामुळे देशात राजकर्त्यांविरुद्ध चीड आणि प्रक्षोभ उत्पन्न होतात आणि स्वातंत्र्यासाठी लढण्याची स्फूर्ती संचारते. वासुदेव बळवंतांच्या बंडामुळे हेच परिणाम हिंदुस्थानात झाले.

त्यांनी स्वातन्त्र्यवाद्यांची एक पिढी सर जन्माला घातली आणि ती पुढे टिळकांच्या प्रभावळीत चमकलीच. पण त्यांच्या बंडाच्या रोमहर्षक इतिहासाने, तुरुंगातील हालअपेष्टांनी आणि व्याकुळ करणाऱ्या बलिदानाने सबंध हिंदुस्थानच पेटवला. सर्व देशभक्तांना स्फूर्तिदायक ठरलेले 'वंदे मातरम्' हे राष्ट्रगीत ज्या कादंबरीत प्रथम प्रसिद्ध झाले, ती 'आनंदमठ' कादंबरी लिहिण्याची स्फूर्तीच मुळी बंकिमचंद्रांना वासुदेव बळवंतांच्या बंडाने दिली. त्याचा इतिहास आता समग्र बाहेर आला आहे. 'बंकिमसरणी' या पुस्तकाचे लेखक प्रमथनाथ विशी म्हणतात की, त्या कादंबरीची पृष्ठभूमी बंगाल देशाची असली तरी त्या कथेची वास्तविक भूमी भारतवर्षव्यापी आहे. बंकिमचंद्रांना ते कथानक बंगालच्या सीमेबाहेरील इतिहासावरून सुचले. स्वातंत्र्यासाठी बंड करण्याचे तोपर्यंत तरी बंगालमधील लोकांना माहीत नव्हते. तशा घटना महाराष्ट्रातच घडल्या होत्या. बंकिमचंद्रांनीच म्हटले आहे की, अखिल हिंदुस्थानात राष्ट्रीयत्व आणि स्वातन्त्र्यप्रियता हे गुण एकट्या महाराष्ट्रातच आढळून

१४ सर रिचर्ड टेंपल: "मेन ॲन्ड इव्हेन्ट्स ऑफ माय टाइम इन इंडिया" पृ. ८२

येतात. प्रेमथनाथांच्या या मताला आधार त्यावेळी तरी वासुदेव बळवंतांचे बंड हाच होता.

डॉ. विमान बिहारी मुजुमदार यांनी आपल्या पुस्तकात त्या उत्थानाचा सूक्ष्म आढावा घेऊन 'आनंदमठ आणि फडके' या एका स्वतंत्र प्रकरणात हाच निष्कर्ष काढलेला आहे. आणि वासुदेव बळवंत हेच 'आनंदमठा'चे स्फूर्तिदाते होते, हे निर्णायक रीतीने सिद्ध केले आहे.[१५] त्याच्या विवेचनाप्रमाणे बंकिमचंद्र चतर्जी १८५८ पासून १८९१ पर्यंत ३२ वर्षे बंगालमध्ये 'डेप्युटी मॅजिस्ट्रेट' होते. वासुदेव बळवंतांप्रमाणेच सरकारी नोकरीत त्यांच्या स्वातंत्र्यप्रेमी वृत्तीच्या जिवाचा तडफडाट झाला. तसे म्हटले तर 'वंदे मातरम्' हे गीत १८७५ मध्येच त्यांनी लिहून 'वंगदर्शन' मध्ये प्रसिद्ध केले होते. पण १८७९ मध्ये हुगळी येथे डे. मॅजिस्ट्रेट असताना 'आनंदमठ'ची शेवटची प्रकरणे त्यांनी लिहावयास घेतली आणि १८८० मध्ये ती पूर्ण केली. वासुदेव बळवंतांना २० जुलै १८७९ ला अटक झाली. त्यांच्या आत्मचरित्राचा अनुवाद 'समाचार चंद्रिका' पत्रात प्रसिद्ध होऊन ८ फेब्रुवारी १८८० ला तो पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाला. त्याच्या प्रकाशनाने सर्व हिंदुस्थानभर खळबळ उडवून दिली. बंकिमचंद्र समकालीन घटनांचे सूक्ष्म अभ्यासक होते. आणि वृत्तपत्रांचे विवेचक वाचक होते. कलकत्त्याच्या 'अमृत बझार पत्रिके'ने वासुदेव बळवंताचा थोर देशभक्त म्हणून अपूर्व गौरव केला होता. कलकत्ता त्या वेळी हिंदुस्थानची राजधानी होती. तेथे जर त्या बंडाचे हे प्रतिध्वनी उमटून सरकारची झोप उडाली तर बंकिमचंद्रावर त्याचा मोठा प्रभाव पडला असला तर त्यात नवल नाही. त्याच वेळी त्यांनी 'आनंदमठ' कादंबरी लिहिण्यास प्रारंभ केला. तिच्यातील संतानांच्या उत्थानाचे वासुदेव बळवंतांच्या बंडाशी बरेच साम्य आहे.

कादंबरीतील उत्थानाची पार्श्वभूमी १७६८–६९ च्या, दख्खनमधील १८७६–७७ च्या दुष्काळासारख्या, दुष्काळाची आहे. वासुदेव बळवंत संन्याशाच्या वेषात इंग्रजी राज्याविरुद्ध प्रचार करीत होते, प्रार्थना करीत होते. आणि त्यात अपयश आल्यावर त्यांनी आत्मार्पणाची प्रतिज्ञा केली. 'आनंदमठ' मधील भावानंद आणि जीवानंद यांनी आत्मार्पण करण्याचा तसाच निश्चय केलेला आहे. हे संतान रामोश्यांप्रमाणेच अशिक्षित, अर्धनग्न आणि टोळधा बनवून हाहा:कार आणि लुटालूट करणारे आहेत. संन्याशांनी सरकारी खजिना लुटला नव्हता. वासुदेव बळवंतांनी तसा प्रयत्न केला होता. कादंबरीच्या पहिल्या आवृत्तीत मात्र तशी लूट होती. वासुदेव बळवंतांच्या आकांक्षांची ही पूर्ती होती. कादंबरीत संतानांनी तुरुंग फोडले आहेत, रक्षकांना ठार केले आहे, तुरुंगातील बंद्यांना सोडले आहे. संन्याश्यांच्या उत्थानात असे काही घडले नव्हते. वासुदेव बळवंतांच्या तशा योजना होत्या. तेव्हा त्याच्या

१५ डॉ. विमान बिहारी मुजुमदार : "मिलिटंट इंडियन नॅशनॅलिझम ॲंड इट्स् सोशिओ-रिलिजिअस बॅकग्राउंड – 1897-1917." पृ.१२, १३, १८१-१९७.

आत्मचरित्रावरूनच या घटना बंकिमचंद्रांनी घेतलेल्या दिसतात. इंग्रजांना हाकून देऊन हिंदुस्थान स्वतंत्र करण्याचा वासुदेव बळवंतांचा प्रयत्न बंकिमचंद्रांनी म्लेंच्छांच्या कचाट्यातून हिंदुस्थान स्वतंत्र करण्याचा निश्चय सत्यानंदाच्या अनुयायांना करावयाला लावून प्रतिबिंबित केला आहे. इंग्रज सरकारचा पाडाव करण्याची कथा उघड लिहिणे शक्य नव्हते म्हणून त्यांनी हे केले. त्यांच्या राष्ट्रीय वृत्तीमुळे त्यांना वासुदेव बळवंताच्या बंडास,रखे पराक्रमी नि झुंजार कथानक रंगविण्याची कल्पना आली असा संशयातीत निष्कर्ष डॉ. विमान बिहारींनी शेवटी काढला आहे. इतिहास पहाता 'आनंदमठ' ऐतिहासिक कादंबरी ठरू शकत नाही, या यदुनाथ सरकारांच्या उद्गारानंतर डॉ. विमान बिहारींनी त्याच सत्यस्थितीच्या अनुरोधाने हा निष्कर्ष काढला आहे.

प्रख्यात बंगाली साहित्यिक चित्तरंजन बंधोपाध्याय यांनी वासुदेव बळवंतांचे चरित्र आणि बंड आणि 'आनंदमठ' यांच्यात दिसणारी आणखी काही साम्यस्थळे दाखविली आहेत. त्याचा वृत्तांत एक साक्षेपी लेखक आणि कलकत्त्याच्या राष्ट्रीय ग्रंथालयात ग्रंथपाल असलेले श्री. वा. जोशी यांनी दिला आहे.[१६] त्यानुसार बंधोपाध्याय म्हणतात की, वासुदेव बळवंतांचे नरसिंह मंदिरातील शास्त्राध्ययन, दत्तात्रेयाची उपासना, त्याचे महात्म्य वर्णन करणाऱ्या ग्रंथाचे लेखन, यशासाठी अक्कलकोट स्वामी महाराजांशी आशीर्वादाची याचना याचे कादंबरीतील संन्याशांनी धर्माला दिलेल्या प्राधान्याशी साम्य आहे. बंकिमचंद्रांचे गृहस्थ संतान संन्यासी व्रताचे उद्यापन करणारे असून ध्येयसिद्धीपर्यंत स्त्री आप्तस्वजनाचा स्पर्श न होऊ देण्याची प्रतिज्ञा घेताना दिसतात. वासुदेव बळवंतांनी पत्नीचा निरोप घेताना कार्यसिद्धीनंतरच पुन्हा भेटण्याची प्रतिज्ञा केली होती, त्याचे हे प्रतिबिंब आहे.

वरील साम्यांमुळे इंग्रजांच्या कैवाऱ्यांनी कादंबरीच्या विद्रोही वृत्तीविषयी ओरड केली. बंकिमचंद्र त्यामुळे अस्वस्थ झाले. कारण राजद्रोहाचा आरोप आला की, परिणाम म्हणून येणाऱ्या तुरुंगवासाने मी मी म्हणविणारे लोक त्या काळात माघार घेत. पुढे 'लिबरल' पत्रात तिचा रोख राजनिष्ठच आहे, असा अभिप्राय येताच बंकिमचंद्र आनंदित झाले. कादंबरीच्या दुसऱ्या आवृत्तीनंतर "इंग्रजांच्या राज्यात प्रजा सुखी होईल. तिला आपला धर्म अप्रतिहतपणे अनुसरता येईल," असे नवे वाक्य त्यांनी घातले. त्याचप्रमाणे एके ठिकाणी "आमचा राजा मात्र लोकांचे रक्षण करीत नाही," या वाक्यात राजा या शब्दामागे नंतरच्या आवृत्तीत 'मुसलमान' हा शब्द घातला. इंग्रज सोजिराचा संतान धुव्वा उडवितात ही घटनाही पुढे मुळमुळीत करून टाकली या फेरफारांचा उल्लेख करून डॉ. विमान बिहारी म्हणतात की, बंकिमचंद्राने पहिले उद्दिष्ट वासुदेव बळवंतांच्या जीवनाधारणे पराक्रमी कथानक रंगविण्याचे होते, हे या घटनांवरून सिद्ध होते.

---

१६ 'महाराष्ट्र टाइम्स,' दि. १४ जानेवारी १९६८

पण त्या खऱ्या उद्दिष्टाप्रमाणेच 'आनंदमठ' चा आणि तिच्यातील 'वंदे मातरम्' गीताचा परिणाम होऊन शेकडो देशभक्तांना त्यांनी स्वातंत्र्य लढ्यात स्फूर्ती दिली. 'वंदे मातरम्' जयघोष करीत कित्येक क्रांतिकारक फाशी गेले. परंतु त्या लिखाणाचे स्फूर्तिदाते वासुदेव बळवंतांचे त्यागी बंडखोर जीवनच होते. वासुदेव बळवंतांनी राष्ट्राला दिलेला वारसा पुरस्सरत्वाचा कसा होता ते सांगताना प्रख्यात इतिहासकार डॉ. रमेशचंद्र मुजुमदार म्हणतात :

"The credit for organising the first secret revolutionary society in the post-mutiny period, with the avowed object of overthrowing British rule in India, belongs to Wasudeo Balwant Phadke."[१७]

("सत्तावनच्या बंडानंतरच्या काळात हिंदुस्थानातील ब्रिटिश राज्य उलथून पाडण्याच्या उघडउघड उद्दिष्टाने पहिली गुप्त क्रांतिसंस्था संघटित करण्याचे श्रेय वासुदेव बळवंत फडके यांचेच आहे.") डॉ. मुजुमदार पुढे म्हणतात :

"The single-handed fight of Phadke against the British Empire.........left its legacy and the seeds he sowed grew into a mighty banyan tree, with its roots spread over India, in about a quarter of a century. . .....His method of secretly collecting arms, imparting military training to youths, of securing necessary funds by means of political dacoities was adopted by....... .(his successors). Phadke may be justly called the father of militant nationalism in Inida."[१८]

("ब्रिटिश साम्राज्याविरुद्ध फडके यांनी एकाकी लढाईने आपला वारसा मागे ठेवलाच. आणि त्यांनी जे बीज पेरले त्याचे पाव शतकाच्या अवधीत ज्याच्या शाखा सर्व हिंदुस्थानभर विस्तार पावल्या अशा एका प्रचंड वटवृक्षात रूपांतर झाले... गुप्तपणे शस्त्रे गोळा करण्याच्या, तरुणांना सैनिकी पेशाचे शिक्षण देण्याच्या आणि राजकीय दरोड्यांच्या द्वारा आवश्यक तो पैसा हस्तगत करण्याच्या त्यांच्या मार्गाचा त्यांच्या नंतरच्या क्रांतिकारकांनी अवलंब केला. म्हणूनच फडक्यांनाच हिंदुस्थानातील क्रांतिकारक पंथाच्या राष्ट्रीयत्वाचे यथार्थपणे जनक मानले पाहिजे.")

त्यांच्या अद्भुतरम्य चरित्रामुळे लोकांना त्यांच्या कथा चित्तवेधक वाटत. त्यांच्या जीवनावर आणि उत्थानावर नाटके लिहिण्यात आली आणि महाराष्ट्रातील दुय्यम नगरात ती लोकप्रियही झाली.[१९] अशा एका नाटकात आपल्या अटकेच्या वेळी मेजर डॅनिअलला त्यांनी दिलेल्या आव्हानाच्या प्रसंगी नाट्यगृहात हर्षातिरेकाने

१७ डॉ. आर. सी. मुजुमदार : "हिस्टरी ऑफ दि फ्रीडम मुव्हमेंट इन इंडिया," खंड १, पृ. ३२
१८ कित्ता. खंड १, पृ ४५२
१९ पु. ग. कामेकर : "माझ्या काही नाट्यस्मृती," पृ. २१

प्रेक्षकात टाळ्यांचा कडकडाट होई. त्यांच्यावर शाहिरानी रचलेल्या पोवाड्याचे आणि लोकगीतांचे खेड्यातील लोकाना बराच काळ मोठे आकर्षण वाटे. असा एक प्रसिद्ध पोवाडा बऱ्याच जणानी ऐकला होता. पण बराच प्रयत्न करून मला तो मिळू शकला नाही. त्यांच्या उत्थानाच्या पार्श्वभूमीवर कादंबऱ्याही लिहिल्या गेल्या. अशा एका कादंबरीत त्यांचे त्रोटक का होईना चरित्र असल्यामुळे त्यांचे रोमांचकारी चरित्र वाचण्याची देशभक्त तरुणांची उत्कंठा ती भागवी. तिच्यातील एक-दोन उतारे वाचनीय आणि मनोरंजक आहेत: "आपले दिवस असेच चालतील या भरवशावर त्याने (वासुदेव बळवंतानी) सर्व खर्च राजकीय थाटाचा ठेवला होता. मी आता राजा झालो व थोडेच दिवसांत माझ्या भयाने साहेब लोक आता मुंबई सोडून इंग्लंडास पळून जातील असे त्यास वाटत होते. गव्हर्नरसाहेब मुंबई सोडून गेल्यावर त्यांचे वाळकेश्वरावरील हवेशीर बंगल्यात वासुदेवराव स्वतः राहाण्यास जाणार होता आणि कोटांतील टाऊनहॉल वगैरे इमारतीत तो आपले मुख्य ऑफीस स्थापणार होता. पुण्याच्या गादीवर हरि रामोश्यास बसवावे आणि साताराची चौदा पेट्यांची गादी गण्या मांगास द्यावी असा त्याने निश्चय केला होता."[20] "त्याच्या तळाचे पुढील वर्णन या कादंबरीत आहे. "डोंगराच्या बगलीत दाट आंबराईत एकांत स्थळी निर्भय स्थितीत वासुदेवरावाची छावणी जेव्हा उतरलेली असे तेव्हा त्याच्या छावणीत जिकडे तिकडे फार मौज उडून रहात असे. कित्येक रामोशी आणि मांग लोक आपल्या ढोलक्या आणि तुणतुणी बाहेर काढून त्यावर गायनास आरंभ करीत. कित्येक पत्ते खेळत. कित्येकजण जवळच्या खेड्यातून तमासगीर बोलावून आणून आपले गोटात तमाशांची रात्रभर मौज उडवून देत... रात्र होऊन स्वच्छ चांदणे पडले म्हणजे त्याने बाहेर येऊन एखाद्या स्वच्छ दगडावर व्याघ्रांबर टाकून बसावे आणि तेथे आपली आवडती सतार निरनिराळ्या रागात वाजवावी. तो उदार असल्यामुळे पुष्कळ याचक लोक त्याजकडे नेहमी येत असत व त्यांचे योग्यतेप्रमाणे त्यास तो देणग्या देत असे. वासुदेव कधी एकटा जेवला नाही. नेहमी दहा पाच अतिथी पंक्तीस घेऊन जेवीत असे... त्याची स्वार्थी बुद्धी नव्हती! परंतु आपला देश स्वतंत्र व्हावा, आपले लोक स्वतंत्र व्हावेत आणि आपल्या सर्व लोकास सुख मिळावे अशी त्याची खरोखरी इच्छा होती."[21] "वासुदेव बळवंताचे उत्थान फसल्यानंतर त्यातील कटवाल्यांची आणि त्यांच्या कुटुंबांची जी हृदयद्रावक अवस्था झाली, त्या घाताहतीचे अविस्मरणीय चित्र प्रा. श्री. म. माटे यांनी आपल्या 'उपेक्षितांचे अंतरंग' या पुस्तकातील एका कथेत रंगविले आहे."[22]

---

२० ग. म. पंडित : "भुगोल नमुना अथवा वासुदेव बळवंत फडके यांच्या बंडाची हकीगत," पृ. ८८

२१ किता पृ. ८८-८९.

२२ श्री. म. माटे "उपेक्षितांचे अंतरंग," – 'सावित्रा मुराळीच देखो!' ही कथा माटेयांनी गाव दुराणावरून लिहिलेली आहे

मेजर डॅनिअल जेव्हा विलायतेला परत गेला, तेव्हा त्यानेही आपल्या अनुभवांचे एक पुस्तक लिहिले होते, असे समजते. १९२५ मध्ये डॉ. जॉर्ज नंदी यांनी मुंबईच्या 'बॉम्बे क्रॉनिकल' पत्राच्या रविवारच्या अंकातून "Experiences of a Detective Officer in India." ("हिंदुस्थानातील एका गुप्त अनुचर अधिकाऱ्याचे अनुभव") या मथळ्याखाली एक लेखनमाला आठवड्यामागून आठवडे लिहिली. त्या मालेतील प्रारंभीची प्रकरणे वासुदेव बळवंतांवर होती. त्यांचा मथळा होता–

"A noted Mahratta Dacoit Wasudev Balwant Phadke."

राजकीय परिस्थितीमुळे वासुदेव बळवंतांच्या आठवणी लिहिणे पन्नास वर्षेपर्यंत अशक्य होते. नंतर प्रसिद्ध कादबरीकार आणि मुंबईच्या "मौज" साप्ताहिकाचे संपादक ल. ना. जोशी यांनी त्या साप्ताहिकात आपल्या या गुरुवर्यांच्या जीवनावर सोळा लेखांची 'स्मरण-पुराण' ही लेखमाला १९२९ मध्ये लिहिली. ठाण्याचे रा. ग. बोरवणकर यांनी वासुदेव बळवंतांचे लिहिलेले पहिले नि एकमेव चरित्र मुद्रणात अडचणी आल्या तरी १९२९ मध्ये शेवटी प्रसिद्ध झाले.

१० मे १९३९ ला वासुदेव बळवंतांचे पुतणे डॉ. वि. कृ. फडके यांनी प्रसिद्ध केलेल्या त्यांच्या पहिल्या तीनरंगी चित्रात वासुदेव बळवंतांचे रूप थोडे चुकीचे असले तरी ते चित्र प्रसार मात्र खूप पावले. बाई त्या वेळी विद्यमान होत्या. त्यांच्या इच्छेप्रमाणे वासुदेव बळवंतांचे स्मारक दीपस्तंभाच्या रूपाने शिरढोण येथे उभारले जाऊन १४ नोव्हेंबर १९४० ला दे. भ. रामभाऊ मडलीक याच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या सभेत त्याचे थाटाने अनावरण झाले. महाराष्ट्राबाहेर त्रिपुरी काँग्रेसच्या अधिवेशनात भारतीय हुतात्म्यांचा जो स्मारकस्तंभ उभारला गेला, त्यावर आद्य क्रांतिकारक म्हणून वासुदेव बळवंतांचे नावही ठळकपणे झळकत होते. १९४३ मध्ये स्वातंत्र्यवीर सावरकर पनवेल येथे गेले आणि १ फेब्रुवारीला पुढे शिरढोणला ; वासुदेव बळवंताच्या स्मारकस्तंभापुढे भाषण करताना सावरकर म्हणाले : "आमच्या हृदयातील स्वातंत्र्याकांक्षेची ज्योत ही वासुदेव बळवंताच्या हृदयातील तशा ज्योतीनेच उत्स्फूर्त झालेली आहे ! ज्यावेळी अग्नीची आवश्यकता भासेल, पुढचा मार्ग दिसेनासा होईल, तेव्हा हा दीप (स्तंभावरचा) तुमच्या अंतःकरणात चैतन्य उत्पन्न करील, तुम्हाला मार्ग दाखवील." या भाषणानंतर वासुदेव बळवंतांच्या वाड्यात ज्या ओटीवर वासुदेव बळवंत लहानपणी खेळले, त्याच ओटीवर लोडाला टेकून चार क्षण सावरकर जेव्हा बसले, तेव्हा कोणत्या प्राणसंकटातून पार पडून कोणत्या ऐतिहासिक ठिकाणी दैवयोगाने आपण बसत आहोत असे त्यांना वाटत होते.

वासुदेव बळवंतांची जन्मशताब्दी ४ नोव्हेंबर १९४५ ला देशभर साजरी झाली. त्यावेळी हिंदी स्वातंत्र्याकांक्षा कळसास पोचली होती. आझाद हिंद सैनिकांच्या दुसऱ्याच दिवशी दिल्लीच्या लालकिल्ल्यात सुरू होणाऱ्या खळबळजनक अभियोगा-

च्या ऐतिहासिक वातावरणात शताब्दीचा मुख्य समारंभ शिरढोण येथे धर्मवीर भोपटकर यांच्या अध्यक्षतेखाली पार पडला. वासुदेव बळवंतांच्या घरापासून थोड्या अंतरावरील त्यांच्या स्मारक स्तंभावर कित्येक संस्थांच्यावतीने पुष्पहार घालण्यात आले. समारंभातील आपल्या भाषणांत भोपटकर म्हणाले: " हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचे ध्येय वासुदेव बळवंतानीच प्रथम घोषित केले. तेच आमचं अजूनही ध्येय आहे. ते साध्य होऊन परकीय सत्तेच्या हातून आमचा देश स्वतंत्र होईपर्यंत आमचा लढा कधीही थांबणार नाही. !"

या जन्मशताब्दिनिमित्त सर्व प्रमुख मराठी वृत्तपत्रांनी वासुदेव बळवंतांवर गौरवपूर्ण लेख लिहिले नि त्याचा जीवनवृत्तांत प्रसिद्ध केला. 'ब्लिट्झ' पत्राने आपल्या लेखाच्या शेवटी म्हटले:

"When free India sets up a martyr's gallery she will not fail to bestow a befitting niche to Vasudev Phadke." [२३]

("जेव्हा स्वतंत्र हिंदुस्थान आपले हुतात्म्याचे मंदिर उभारील. तेव्हा त्यात वासुदेव फडके यांच्यासाठी स्मृतिस्थान ठेवण्यास तो विसरणार नाही. !")

'फोरम' साप्ताहिकाने म्हटले:

"Phadke lived and struggled for his motherland at a time when nationalism meant nothing in India. Although his ashes lie far away from his homeland his soul has joined the Valhalla of great Indians, who have left their footprints on the sands of Indian history." [२४]

("फडके यांनी हिंदुस्थानाला राष्ट्रीयत्वाची जाणीव नव्हती अशा काळात मातृभूमीसाठी जीवन वाहिले आणि लढा दिला. त्यांच्या देहाची विभूती आपल्या मातृभूमीपासून फार लांब लांब राहिलेली असली तरी त्यांचा आत्मा ज्या थोर हिंदी पुरुषानी हिंदुस्थानच्या इतिहासाच्या वाळवंटावर आपली पाऊले उमटवलेली आहेत; अशा पुरुषांच्या वीरस्मृतिभवनांत पोहोचलेला आहे.")

वासुदेव बळवंतांचे चरित्रच रोमहर्षक; त्यामुळे त्यांच्या जीवनावर १९५० मध्ये बोलपटही निघाला. महाराष्ट्राबाहेर त्याचे चरित्र माहीत व्हावे म्हणून १९५९ मध्ये "Vasudev Balvant Phadke — First Indian Rebel against British Rule" हे त्यांचे इंग्रजी चरित्र मी लिहिले. त्याच्या रशियन भाषांतरासंबंधीच्या पत्रव्यवहारात मला धाडलेल्या पत्रात सोवियट रशियाच्या ऐतिहासिक वाङ्मयाच्या प्रकाशन संस्थेचे संचालक ए. कुझनेत्सोव्ह म्हणतात: "या पहिल्या (हिंदी) क्रांतिकारकाच्या बंडाचा आणि चरित्राचा वृत्तांत १९६१ मध्ये रशियन भाषेत प्रसिद्ध झालेल्या "हिंदुस्थानचा नवीन इतिहास" या पुस्तकात पृ. ३९०

२३ 'दि ब्लिट्झ,' १ नोव्हेंबर १९४५.
२४ 'दि फोरम,' ११ नोव्हेंबर १९४५.

ते ४०१ पर्यंत देण्यात आलेला आहे.[२५]

क्रांतिवीर वासुदेव बळवंत फडके स्मारक समितीच्या वतीने शिरढोण येथे वासुदेव बळवंतांचे स्मृतिमंदिर उभारण्यात आले आहे. त्याच्या पायाभरणी समारंभ प्रसंगी हिंदुस्थानचे भूतपूर्व अर्थमंत्री चिंतामणराव देशमुख ४ नोव्हेंबर १९५९ ला म्हणाले: "स्वातंत्र्य प्रस्थापित करण्याची मनीषा बाळगणाऱ्यात......वासुदेव बळवंत आघाडीवर होते. म्हणून त्याना आद्य क्रांतिकारक समजण्यात येते. त्यांच्या आत्मत्यागाला तोड नाही. हे मंदिर पाहून लोकांना त्यांच्या मराठी बाण्यांचे सतत स्मरण होत राहील!"[२६] १९५६ मध्ये वासुदेव बळवंतांच्या चरित्राची प्रती भेट म्हणून स्वीकार करताना महाराष्ट्राचे कर्तबगार नेते यशवंतराव चव्हाण मला म्हणाले होते: "हे तुम्ही चागलं केलं. वासुदेव बळवंताना मी आम्हा क्रांतिकारकांचे मूळ पुरुष (फर्स्ट अँन्सेस्टर) समजतो." दोन वर्षांनी मुंबईच्या 'रंगभवना'त भाषण करताना ते म्हणाले: "महाराष्ट्राचा इतिहास हा पहिल्यापासून संघर्षाचा इतिहास आहे. लोकमान्य टिळक, वासुदेव बळवंत यांनी राजकीय क्रांती केली, तर महात्मा फुले, डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी सामाजिक क्रांतीची पताका मिरवली." शिरढोण येथील वासुदेव बळवंत फडके स्मृतिमंदिराचे उद्घाटन मुंबईचे एक अग्रगण्य नेते सदाशिवराव पाटील यांच्या हस्ते १९७० मध्ये झाले.

वासुदेव बळवंतांनी पेटवलेला राष्ट्रयज्ञ त्याच्या मृत्यूनंतर चौसष्ट वर्षे पेटत राहिला. त्या वर्षी त्यात आत्माहुती दिलेल्या हुतात्म्यांच्या यज्ञाची ज्वाला शिखरास पोहोचली! तो पाहा! तो रणयज्ञ त्या हुतात्म्यांच्या स्वर्गीय निवासस्थानासमोर कसा प्रज्वलीत झालेला आहे! त्यातून बाहेर पडणाऱ्या राष्ट्रीय स्वातंत्र्याचे दर्शन घेण्यासाठी ते असंख्य हुतात्मे त्या यज्ञाभोवती अस्वस्थ होऊन बसलेले आहे. त्यांच्या सभेतील एक प्रमुख स्थान मोकळेच दिसत आहे. त्या स्थानाच्या अलीकडे पागोटे घातलेला, कुंडले ल्यालेला, बारा बंदीत वावरणारा हा तेजःपुंज पुरुष बसलेला आहे. "दया • तिचे नाव ॥ भूताचे पालन ॥ आणि निर्दालन कंटकाचे ॥" हा अभंग कीर्तनकाराच्या आवाजात त्याच्या तोंडी घोळत आहे! तो ऐका! त्याचे नाव दामोदर हरि चापेकर! रँड साहेबास १८९७ मध्ये त्याने पुण्यात लोळविले होते! त्याच्याजवळ दुसरे दोन चापेकर बसलेले आहेत! त्यानंतर बसलेल्या तरुणाचे नाव आहे रानडे! धाकट्या चापेकरांसमवेत "फितुरांना नि:पात होवो," असे ते म्हणत आहेत! दृष्टी विस्फारून जरा पुढे पाहा! हा कोण साहेबी थाटातील पोषाखाचा तरतरीत नाकाचा पंजाबी तरुण•? ऐकलेत त्याचे नाव? त्याच्या खिशात पिस्तुल आहे. ते चाचपीत तो म्हणत आहे: "माझे नाव मदनलाल धिंग्रा! मी इंग्लंडमध्ये देह ठेवलेला आहे." त्याच्या बाजूला बसलेला कोवळ्या वयाचा हा

---

२५ कुमनेरद्रोसो यांचे लेखकाम पत्र; दि. १९ जुलै १९६१.

२६ 'मराठा' मुंबई दि. ५ मे १९५९.

दुसरा युवक. त्याचे नाव अनंत लक्ष्मण कान्हेरे ! त्याने जॅक्सनचा वध केला होता. नाशिक कटाच्या अभियोगापूर्वीच तो फासावर लटकला ! तो दुसरा तेजस्वी तरुण ! विष्णू गणेश पिंगळे ! अमेरिकेतील संयुक्त संस्थानापासून हिंदुस्थानातील संयुक्त-प्रांतापर्यंत हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यासाठी तो धापा टाकीत भटकला होता, नि लाहोर-च्या तुरुंगात शेवटी फाशी गेला होता. त्याच्या पाठीवर थाप मारणारे हे दुसरे युवक ! त्यांच्या अग्रभागी तरतरीत मुद्रेने वावरणारे साहेबी टोपी घातलेले सड-पातळ शरीरयष्टीचे सरदार भगतसिंग ! त्यांच्या बाजूला त्यांचे दुसरे मित्र हुतात्मे बसले आहेत. त्यांना टाकून पुढे चला ! लंडनमध्ये फाशी गेलेले हे सरदार उधम-सिंग आणि पलीकडे ही उंचच उंच मूर्ती कोणाची ? सुभाषचंद्रांची तर नाही ना ? दुसरेही कितीतरी असंख्य हुतात्मे या सभेत बसले आहेत ! त्यांची नावे ... हो पण आता त्या यज्ञाकडे पाहा ! त्याच्या ज्वाला वाढत चालल्या आहेत ! त्यांचा प्रकाश ह्या सर्व रुधिरप्रिय देशभक्तांच्या प्रसन्न नि उत्सुक मुद्रांवर पडलेला आहे. ये स्वतं-त्रते ! ये ! तुझ्याच दर्शनासाठी हे सारे महात्मे उत्सुक झाले आहेत ! आता अवधी अगदी थोडा राहिला ! आणि म्हणूनच मधाचे ते रिकामे स्थान ? त्याच्या-कडे कोण चालत येत आहेत ? त्या सर्व हुतात्म्यांचे अध्वर्यू तिकडे चालत येत आहेत. त्यांच्या कमरेला तलवार लटकते आहे. त्यांच्या मुखावर तेज विलसत आहे. त्यांच्या पाठीवर ढाल बांधलेली आहे आणि लांब लांब पावले टाकीत त्यांच्या उंच दणकट आकृतीने त्या सभामंडपात प्रवेश केला आहे. त्यांचे नाव वासुदेव बळवंत फडके ! त्यांनी त्या यज्ञाजवळ कसेबसे आसन ठोकले असेल, तोच त्या यज्ञातून हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचे साकार झालेले दृश्य वरवर येऊ लागले आहे. त्याच दिव्य दृश्याच्या कल्पनेसाठी अशा शेकडो देशभक्तांनी आपले प्राण दिले होते. आणि नरकवत यात-नांनी देह झिजविले होते. त्या सर्वांच्या दहनभूमीवर त्यांची स्मारके उभारली गेली नसली, तरी त्याच दृश्याच्या सिद्धीमुळे हिंदुस्थानातील भावी पिढ्या त्या सर्वांना नित्य सहर्ष अभिवादन करीत राहतील आणि त्याकडे पाहत आद्य क्रांतिकारक वासुदेव बळवंत फडके यांचा चिरंजीव आत्मा एका दिव्य आनंदात चिरंतन विहरत राहील !